# BRIHATKATHÂ SÂGARA.

## AN ANCIENT HISTORICAL ROMANCE.

### VOL: IV.

COMPOSED FROM ORIGINAL SANSKRIT IN MARÂTHI

BY

WÂMAN SHÂSTRI ISLÂMPURKAR.

योग्यस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
सिद्ध्य-सिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥

Bombay:

Printed at the Deváré Printing Press.

1891

PRICE:—

Paper binding Rs. 1 8 Cloth binding Rs. 2/4

# LIST OF MARÂTHI BOOKS

## COMPOSED BY

## PANDIT VÂMAN SHÂSTRI ISLÂMPURKAR

### UP TO 31st DECEMBER 1891.



1.* *Kavyartha Dipikā*—A Marathi Commentary on Kalidasa's Meghaduta Kavya with copious geographical and Historical Notes, Various readings &c.—2nd Edition revised from different 7 Sanskrit Commentaries.

2. *Shudra Dharma Tatva Prakas'a*—A translation of Kamalakar Bhatta's S'udra Dharma Tatva (known as S'udra Kamalakar) with critical Notes and other useful information.

3.* *Bṛihatkatha Sagar*—Ancient Historical Romance to be complete in 10 Volumes 4 of which have been published, the 5th is in Press and the remaining will be published in course of time.

4. *Karuna Raghav*—A life of Ramchandra (Hero of the Ramayana) of the latter half of his age.

5. *Lalita Vatsaraja*—Parts I and II—A story of the Marriage of Vatsaraja (the hero of Gunadhya's Bṛihatkatha) with two different Girls namely Ratnavali and Priyadars'ika.

6. *Charudatta and Vasant Sena*—A life of Charudatta (hero of the Mritchhakatika).

---

* The books against which a star is marked have been published by the auther himself.

7. *Pranayi Madhav*—A story of the Marriage of Madhav ( hero of the Malati Madhav ).
8. *Vidagdha Pururava*—A life of Pururava ( hero of the Vikramorvas'iya ).
9. *Arya Chanakya*—A political life of the great statesman Chanakya ( hero of the Mudra Rakshas ).
10. *Raja Agnimitra*—A story of the Marriage of Agni Mitra ( the hero of the Malavikagni Mitra ).
11. *Sundari and Vasantsena*—Complete in 3 Parts.--A life of the three different births of Sundari and Vasantasena.
12.* *Karpur Manjari* or a lucky wife—A story of the Marriage of Chandapal.
13.* *Karna Sundari*—A story of the Marriage of Raja Karnadeva.
14. *Kavita S'astra or the Science of Poetry*—A literal translation of Amarchandra's Kavya Kalpa Lata Vritti. This book has been made by order of His Highness the Maharaja Gaekwar of Baroda.
15. Other Miscellaneous Biographies.

With the exception of Book No. 14 all the other Books have been composed with the help of the Vernacular or Sanskrit works already extant and are not translations of those works.

# बृहत्कथासागर.

## प्राचीन ऐतिहासिक मराठी कादंबरी.

### भाग चवथा.

हें पुस्तक

संस्कृत ग्रंथाच्या आधारानें महाराष्ट्रभाषेंत

**वामन शास्त्री इसलामपुरकर**

यांणीं तयार करून,



योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
सिद्ध्य-सिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥

( भगवान् )

मुंबईतः—

'देन्हारे प्रिंटिंग प्रेसांत' छापून प्रसिद्ध केलें.

शालिवाहन शके १८१३.

सन १८९१.

किंमतः—

कागदी बांयडिंग १८८ कपड्याचे बांयडिंग २८४

# विशेष सूचना.

ह्या मोठ्या ग्रंथाचे तीन भाग ह्यापूर्वीं प्रसिद्ध झाले असून चवथा भाग वाचकांस सादर करण्याचा हा योग आल्याबद्दल फार समाधान वाटतें. हें पुस्तक लवकर संपूर्ण व्हावें अशी आमची फार इच्छा आहे व त्याप्रमाणें आमच्याकडून तयारी आहे तरी छापखानेवाले फारच विलंब लावितात. याशिवाय या पुस्तकाची एकंदर व्यवस्था ठेवणेंही फार कठीण जातें. यूरोपासारखी येथें स्थिति नसल्यामुळें कर्त्यास पुस्तक तयार करणें, खर्च करून छापविणें व त्याचा प्रसार करणें ह्या तीनही कामांकडे लक्ष पुरवावें लागतें. एखादें पुस्तक कोणी परीक्षणाकरितां पाठविलें ह्मणजे—जाड्या विद्वत्तेची वृथा ऐट दाखविणारे लुंगेसुंगे पत्रकार देखील—"शास्त्रीय ग्रंथ असावेत. महाराष्ट्रभाषेची अभिवृद्धि व्हावी. आह्मास महत्वाच्या विषयांचीं पुस्तकें पाहिजे आहेत. तसले ग्रंथकार केव्हां निपजतील तेव्हां निपजोत," वगैरे प्रकारचे उद्गार काढीत असतात! पण त्यांणीं हातांत घेतलेलें भिकार पत्र वेळच्यावेळीं छापून प्रसिद्ध करण्यास किती श्रम पडतात व लोकाश्रय कितीसा मिळतो या गोष्टींचा ते जर विचार करतील तर शास्त्रीय विषयांचे ग्रंथ होणें व ते तयार करणारास लोकाश्रयावर त्यांचा मोबदला मिळणें हें किती दूरापास्त आहे हें त्यांस कळून येईल. पण एडिटरी सिंहासनावर बसतांच जणुं काय इतर गोष्टींचें व त्यांबरोबर आपल्या देशाच्या स्थितीचेंदेखील त्यांस विस्मरणच होत असावें. किंवा सरहद्दीसारख्या बिकट प्रश्नांचा दोन शद्बांत उलगडा लावणाऱ्या बहादरांना याची अडचण ती कसली वाटणार! असो.

या पुस्तकाच्या पहिल्या तीन भागांची किंमत प्रत्येकीं रु० २८४ होती ती अधिक आहे अशी पुष्कळ लोकांकडून सूचना करण्यांत आल्यावरून या भागाची किंमत मुद्दाम कमी केली आहे. प्रती अधिक काढिल्या ह्मणजे किंमत कमी करितां येते. यूरोपांतील

पुस्तकें सुरेख रीतीनें छापलेलीं असून त्यांच्या किंमती फारच थोड्या असतात. याचें कारण प्रतींची संख्या अधिक हेंच होय. आमच्या इकडे आजपर्यंत छपाई ह्मणण्यासारखी चांगली होत नव्हती. पण अलीकडे कांहींकांहीं छापखानेवाल्यांनीं छापण्याच्या कामांत बरीच सुधारणा केली आहे. त्यामुळें अधिक खर्च केला व मोठ्या काळजीनें काम चालविलें तर—यूरोपियन लोकांच्या पुस्तकांप्रमाणें उत्तम नाहीं तरी त्यांच्याजवळजवळ—सुरेख रीतीनें पुस्तक छापदितां येईल; पण त्यांच्याइतक्या कमी किमतीला मात्र देतां येणें कठीण आहे. कारण इंग्लिश वगैरे भाषांचा पृथ्वीवर सर्व ठिकाणीं प्रसार झालेला असून ते लोक विद्याव्यसनी व भोक्ते असल्यामुळें कोणत्याही पुस्तकाच्या हजारों किंवा लाखों प्रती सहज खपतात. यामुळें प्रती पुष्कळ काढून किंमत हवी तितकी कमी ठेवतां येते. पण ती स्थिति मराठी पुस्तकांस कोठून येणार? मराठी भाषा जाणणाऱ्यांची संख्या कितीशी. त्यांतून हजारीं किती असामींस अक्षरांची ओळख! त्यांतूनही अठरा विश्वे दारिद्र्य! स्वभाषेविषयीं पूज्यबुद्धि नसणें, व कंजुषपणा, वगैरे प्रतिबंधक कारण-समूहांतून बाकी राहणारे पुस्तकाचे ग्राहक कितीसे असणार? एखाद्या पत्रकर्त्याची दोस्ती संपादन करून, मोठ्यामोठ्या अक्षरांनीं पत्राच्या मजकुराच्या मधूनमधून जाहिराती दिल्या, किंवा त्या पत्रकर्त्यानें त्या पुस्तकाचे भाट बनून स्तुतिस्तोत्रांनीं अंकाचे अंक भरून काढले तरी हजार दोन हजार प्रती खपल्या ह्मणजे गंगेस घोडीं न्हालीं! अशी स्थिति असल्यामुळें मराठी पुस्तकाच्या अधिक प्रती काढून तें सुलभ करतां येत नाहीं. तरी वेडेंवांकडें जसें करतां आलें तसें तयार करून व करवेल तितकी किंमत कमी करून हें वाचकांस सादर केलें आहे.

मुंबई, गिरगांव,<br>तारीख ३१ डिसेंबर<br>सन १८९१.

सर्वांचा नम्र सेवक,<br>**वामन शास्त्री.**

# अनुक्रमणिका.



---

वाचकांनीं येथें पृष्ठांवरील अंकाचा क्रम ध्यानांत ठेवावा. अगदीं प्रारंभी १ पासून १६ पर्यंत सारखे असून पुनः १ पासून सुरुवात झाली आहे.

॥ ॐ श्रीगणेशाय नमः ॥

# बृहत्कथासागर.

## ( तिसऱ्या भागाचा अवशेष. )

केलिकेशग्रहव्यग्र-गौरीकरनखावृतम् ।
शिवायानेकचन्द्राढ्य-मिव शार्वं शिरोऽस्तु वः ॥ १ ॥

याप्रमाणें कलिंगसेनेला विष्णुदत्ताची कथा सांगून, सोमप्रभा पुन्हां ह्मणाली, "सखे, कोणत्याही कार्याला प्रवृत्त झालें असतां त्याचीं निमित्तें कशीं होताहेत, याचा नीट विचार करावा. जर चांगलीं निमित्तें झालीं तर विलंब न लागतां तत्काल तें कार्य सिद्ध होईल असें समजावें. आणि जर कां तीं प्रतिकूल झालीं तर त्यांपासून कांहींतरी अनिष्ट होणार असें समजावें. ज्ञात्या पुरुषांनीं ह्या निमित्तांविषयीं जो विशेष विचार सांगितला आहे तो नेहमीं अनुभवास येतो. जे लोक त्यांच्या सांगण्याचा अवमान करून आवेशानें एकदम कोणतेंही कार्य करण्यास प्रवृत्त होतात ते मंदबुद्धी होत. त्यांला पुढें पश्चात्ताप झाल्यावांचून रहात नाहीं. तीं सर्व निमित्तें कालच्यादिवशीं अगदीं अशुभ होतीं. ह्मणूनच मी तुला नको ह्मटलें होतें. असें असतां अविचारानें वत्सराजाकडे, आपल्याला वरण्याविषयीं त्वां दूत पाठविलास, हें चांगलें केलें नाहींस. बरें असो. झालेल्या गोष्टीबद्दल आतां बोलून उपयोग काय? दैव तुझा विवाह निर्विघ्नपणें घडवून आणो ह्मणजे झालें! तूं घरांतून निघालीस त्यावेळीं लग्न वाईट होतें, म्हणूनच तुझा विवाह इतका लांबला. एऱ्हवीं कांहीं चिंता नव्हती; पण प्रत्यक्ष देव देखील तुझ्या रूपाला लुब्ध झाले आहेत. तेव्हां हे सहा महिने कसे पार पडतील, याची मला मोठी काळजी वाटते. गडे, तूं आपलें कन्याव्रत मोठ्या

सावधपणानें राख. देवगंधर्वादिक कधीं व कोणत्यारितीनें तुला फसवितील याचा नेम नाहीं. याशिवाय **वत्सराजा**चा मुख्य प्रधान **यौगंधरायण** याच्याविषयींही तूं चांगला विचार कर. तो मोठा राजकारणी व नीतिशास्त्रांत निपुण आहे; इतकेंही असून तो इतर प्रधानांसारखा नव्हे. स्वतः **वत्सराजाला** आपल्या राज्याविषयीं जितकें अगत्य नसेल तितकें त्या **यौगंधरायणाला** आहे. तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीच्या नादीं लागून राजा व्यसनी होईल; व राज्यव्यवस्थेकडे त्याचें लक्ष्य राहणार नाहीं, असें समजून **यौगंधरायण** कदाचित् तुझ्याशीं विवाह न घडून येण्याविषयीं प्रयत्न करील. इतकेंही असून त्याच्या इच्छेविरुद्ध राजानें तुझें पाणिग्रहण केलें; तर तो कांहीं तरी दोष उघडकीस आणून राजाकडून तुझा त्याग करवील. मी असें ह्मणतें यावरून स्वतः तो, नसतेंच कांहींतरी कुभांड रचील असें मात्र तूं समजूं नकोस. तो मोठा धार्मिक आहे. भलत्याच रितीनें मुद्दाम तुला दूषित करण्याचा कधींही प्रयत्न करणार नाहीं. कदाचित् **यौगंधरायणानें** तुझ्याविषयीं प्रतिकूळ वर्तन केलें नाहीं; तरी दुसरें एक मोठें तुला भय बाळगलेंच पाहिजे. तुला सवती पुष्कळ आहेत; तथापि त्यांत मुख्यत्वें **वासवदत्ते**विषयीं तुला विशेष भय बाळगलें पाहिजे. ती पट्टराणी असून तिला मुलगा झाला आहे. व तोच पुढें राज्याचा अधिकारी होणार. आणि स्वतः **वत्सराजाला** ती अत्यंत प्रिय आहे. तेव्हां ती कदाचित् तुझ्या नाशाविषयीं प्रवृत्त होणार नाहीं, असेंही तूं समजूं नकोस. सवतीमत्सर मोठा भयंकर आहे. त्यांतून राजवाड्यांत तर त्याचा फारच प्रभाव चालतो. राजस्त्रिया आपल्या सवतींचा कशा रितीनें नाश करण्याचा प्रयत्न करितात, याविषयीं प्राचीन इतिहासांत अनेक उदाहरणें आहेत. त्यांतली मी तुला एक कथा सांगतें ती लक्ष्यपूर्वक ऐकः—

या **भरतखंडांत इक्षुमती** नांवाची एक प्रसिद्ध नदी आहे. ति-

च्या तीरावर **इक्षुमती** याच नांवाची एक मोठी नगरी आहे. तींत पूर्वी **विश्वामित्र**ऋषि रहात होता. ती नदी व ती नगरी त्याच ऋषीनें निर्माण केली आहे असें प्राचीन लोक सांगतात. त्या नगरीच्या जवळच एक मोठें अरण्य होतें. तेथें आश्रम करून **मंकणक** नांवाचा एक ऋषि, जमिनीला मस्तक लावून व आकाशाकडे पाय करून, फार वर्षें तपश्चर्या करीत होता. एकान्तांत तो ऋषि याप्रमाणें उग्र तपश्चर्या करीत असतां एकेदिवशीं, केवळ तपाला विघ्न करण्याकरतांच ज्यांचा अवतार, अशा अप्सरांपैकीं **मेनका** नांवाची अप्सरा त्या वाटेनें जात होती, ती त्या ऋषीच्या दृष्टीस पडली. अप्सराच ती! तीचें सौंदर्य काय वर्णन करायचें आहे! त्यांतूनही **मेनका** ह्मटली ह्मणजे फारच सुंदर. तिला पाहून निर्जीव पदार्थाला देखील कामवासना उत्पन्न व्हावयाची. मग बिचाऱ्या त्या ऋषीला तो विकार उत्पन्न झाला तर त्यांत नवल तें काय?

**मंकणका**ची दृष्टी तिच्यावर किंचित् आसक्त होते आहे, इतक्यांत वाऱ्यानें तिच्या अंगावरचा पदर सरकला. वारा हा कामराजाचा साह्य-कारीच आहे. त्याणें योग्य वेळीं आपल्या मित्राची कामगिरी बजाविली. ही संधि साधून मदनानें त्या **ऋषीवर** आपल्या बाणांचा वर्षाव केला. तेव्हां तत्काल, ज्याचें धैर्य नष्ट झालें आहे, असा तो **मंकणक** उफराठा होता तो सुफराठा होऊन, त्या अप्सरेवर तल्लीन झाला. पण तिणें त्याच्याकडे मुळींच पाहिलें नाहीं! आपला पदर सांवरून ती तशीच पुढें निघून गेली. इकडे त्या ऋषीचें मन कामानें खवळवून सोडलें. त्याच्या सर्वांगांत तो मदनरूपी पिशाच संचरला व तत्काल, कित्येक वर्षें पर्यंत मोठ्या कष्टानें संपादन केलेल्या तपासह, त्याचें वीर्य पतन पावलें. तें जवळ असलेल्या केळीच्या मोख्यावर पडलें.

तपस्वी ऋषींचें वीर्य कधींही निष्फळ जात नाहीं, हा त्यांच्या तपाचा प्रभाव होय. **मंकणकाचें** वीर्य पतन पावतांच तत्काल, जिचे सर्व अवयव सुंदर आहेत, अशी एक उत्तम कन्या तेथें उत्पन्न झाली.

व इकडे त्या ऋषीचें मनही पूर्व स्थितीवर आलें. ईश्वरी माया मोठी विलक्षण आहे. जो **मंकणक** घरदार वगैरे सर्व प्रपंचाविषयीं विरक्त होऊन एकांतीं तपश्चरणांत वेळ घालवीत होता, त्याला ती सुंदर कन्या पाहतांच तिच्याविषयीं विलक्षण मोह उत्पन्न झाला. त्या गोजिरवाण्या लहान मुलीला त्याणें प्रेमानें उचलून घेतली. व आपण हिचें रक्षण न केलें तर दुसरें कोण करील? असें समजून तो तिला स्नेहपूर्वक आश्रमांत घेऊन गेला. केळीच्या गाभ्यांतून उत्पन्न झाली म्हणून त्याणें तिला **कदलीगर्भा** हेंच नांव ठेवलें. त्याला रात्रंदिवस त्या मुलीचें कसें होईल याचीच काय ती विवंचना लागली. वस्तुतः त्याच्यासारख्या तपस्व्याला पोरांबाळांचे लिगाड उपयोगाचें नाहीं. ती कन्या हें एक **मंकणकाच्या** तपश्चर्येचा नाश करणारें विघ्नच म्हटलें तरी चालेल. पण सर्व जगाचा व्यवहार चालविणारी माया अशी अगाध आहे कीं, तिच्या प्रभावानें—हें आपल्याला अनिष्ट आहे, असें समजत असतांही मनुष्य त्या कृत्यापासून निवृत्त होत नाहीं! असो.

ती सुंदर मुलगी **कदलीगर्भा**, पूर्वीं **गौतम**ऋषीच्या आश्रमांत **रंभा**-नामक अप्सरेच्या दर्शनानें पतन पावलेल्या त्या ऋषीच्या वीर्यापासून उत्पन्न झालेली व **द्रोणाचार्याची** पत्नी जी **कृपी** तिच्याप्रमाणें, **मंकणकाच्या** आश्रमांत वाढत होती. अनुक्रमानें ती प्रौढ होऊन सुमारें सोळा वर्षांची झाली. तिला आईचें तर मुळींच दर्शन नव्हतें. तिचा सर्व लळा काय तो एकट्या बापावर. त्यालाही तिच्या उत्तम वर्तनानें फार संतोष होत होता. तीं उभयतां मोठ्या आनंदांत तेथें वास्तव्य करीत असत. **कदलीगर्भा** जरी अत्यंत रूपवती व उत्तम स्त्रियांपैकीं एक अशी होती; तरी तिला नागरिक स्त्रियांचे चाळे मुळींच माहित नव्हते. तिचे सोबती म्हटले म्हणजे हरिणी, हरीण, गाई वगैरे पशु हेच होत. वनशोभा अवलोकन करून तिणें काय ती आपल्या मनाची करमणूक करावी; उंची वस्त्रें किंवा हिऱ्यामोत्यांचे दागिने यांचें नांव तरी तिला को-

ठून माहित असणार? आश्रमासभोंवतींच्या झाडांची व वेलींचीं कोंवळीं पानें, फुलें, कमळांचे देंठ, गुंजा इत्यादिकांचे अलंकार हे तिच्या परिचयाचे! शालु, पैठण्या, यांचें तर नांवच नको. झाडांचीं वल्कलें ह्याच तिच्या पैठण्या होत्या. तिच्या केशकलापाला सुगंधी तेलाच्या ऐवजीं हिंगणमिठ्ठ्याचें चिकट तेल लावण्यांत येत होतें. उत्तम शाल्योदनाचा स्वाद कधीं तिला माहितच नव्हता. सांवे, कर्या याच निःसार धान्याला ती उत्तम अन्न मानीत असे. याप्रमाणें जंगलांत राहणारी व नागारिकलोकांचें जिला कधीं दर्शनदेखील झालें नाहीं, अशाप्रकारची ती कन्या एखाद्या श्रीमंती थाटाच्या स्त्रीला केवळ श्वापदासारखी वाटण्यास योग्य होती. तथापि ईश्वरदत्त उत्तम रूपानें व गुणांनीं ती अत्यंत नांवाजलेल्या विदग्ध स्त्रियांलादेखील तुच्छ करणारी होती.

**विधात्यानें** तिला जें अप्रतिम सौंदर्य दिलें होतें त्याच्या योगानें उत्तम वस्त्रें, बहुमोल दागिने, व इतर साधनांची तिला मुळींच अपेक्षा नव्हती. दागिन्यांनीं, पाहिजे तर आपलें सार्थक करून घण्याकरितां किंवा आपल्याला शोभा आणण्याकरितां आपण होऊन तिच्या मनोहर देहाचा आश्रय करावा. वस्तुतः तिला त्यांची मुळींच गरज नव्हती. **कामदेवानें** तिच्या देहांत आपलें आसन मांडलें होतें. तरी अल्लडपणामुळें तिच्या वृत्तींत बदल झाला नव्हता. तिचें तें मुग्ध व शुद्ध हास्य, तिची ती सार्वकाळ आनंदी वृत्ति, जंगलांत मिळत असलेल्या अगदीं तुच्छ अशा वस्तूंवर—त्यांसच उत्तम मानून संतोषानें, निर्वाह करणें, आश्रमांतील लोटझाड, कंदमुळें इत्यादिकांचा स्वयंपाक, बाग बगीच्याची देखरेख, वल्कलादिकांची सफाई ठेवणें, व हरिणी, गाई इत्यादिकांशीं क्रीडा करणें, हा तिचा नित्यक्रम पाहून खरोखर कोणत्याही नागरिकाचें मन हरण करण्यास ती समर्थ होती. महाभारतांत **कण्वाच्या** आश्रमांत असतां **शंकुतलेची** जी स्थिती वर्णन केली आहे, तीच त्या **कदलीगर्भे**चीही होती. ती एवढी मोठी झाली

होती; तरी आतां आपलें लग्न व्हावें, पतिसमागमाचें सुख मिळावें, संसार करावा, इत्यादि विचार मुळींच तिच्या मनांत येत नव्हते. अहाहा! अशाप्रकारच्या आनंदी तरुण स्त्रियांच्या वर्तनाची सर, रात्रंदिवस चट्टीपट्टी करण्यांत व नटण्या मुरडण्यांतच सारा ज्यांचा वेळ जावयाचा, अशा नागरिक ह्मणविणाऱ्या स्त्रियांला कशी येणार? असो. जसजशी ती प्रौढ होत चालली, तसतशी तिच्या बापाचीही काळजी वाढूं लागली. त्याला, तिला योग्य वर मिळून तिचें चांगलें व्हावें, अशी मनापासून इच्छा असणें अगदीं साहजिक होतें. पितृधर्माप्रमाणें तो तिच्याविषयीं काळजी वाहत आहे, इतक्यांत आपोआप तो योग उत्तम प्रकारें घडून आला.

**मध्यदेशा**चा राजा **दृढवर्मा** या नांवानें प्रसिद्ध होता. राजेलोकांला मृगयेचें व्यसन फारकरून असतेंच. त्यांतून **दृढवर्म्याला** तें विशेषच होतें. तो एकसारखा महिना महिना पंधरा पंधरा दिवस शिकारींत दंग होत असे. तो दैवानें त्याच प्रदेशांत मृगया करीत करीत प्राप्त झाला. एका अस्वलाला पाहून त्याचा घोडा जो एकदां चवताळला, तो कांहींकेल्या त्याला आंवरेना. तो एकसारखा धांवत थेट **मंकणक**-ऋषीच्या आश्रमाच्या जवळ येऊन पोंचला. यावेळीं तेथें, वल्कलें परिधान करून झाडांला पाणी घालीत असलेली, **मंकणक** ऋषीची कन्या **कदलीगर्भा** त्याच्या दृष्टीस पडली. ऋषीच्या मुलीला उचित असा तो तिचा वेष होता; तरी ती फारच रमणीय दिसत होती. यामुळें तत्काल तिणें राजाचें हृदय इतकें भरगच्च व्यापून टाकलें कीं, त्याच्या जनानखान्यांतल्या सुंदर सुंदर स्त्रियांला राहण्यास तिळाएवढादेखील तेथें अवकाश राहिला नाहीं! फार दूरचा मार्ग क्रमण केल्यामुळें त्याचा घोडा यावेळीं दमून स्वस्थ झाला होता. यामुळें त्या राजाला नेत्ररूपी पात्रांनीं तिचें लावण्यामृत यथेच्छ प्राशन करण्याची उत्तम संधि मिळाली. तो कांहीं वेळ तटस्थ राहून तिच्याकडे एक-

सारखा पहात होता. ज्या ज्या अवयवावर त्याची दृष्टी गेली त्याणें त्याणें त्याचें मन हरण केल्यामुळें राजाला कांहीं वेळ मनच नाहींसें झालें. बराचवेळ या स्थितीचा अनुभव घेऊन कांहींसा स्वस्थ होऊन तो मनांत म्हणाला, 'अहाहा! काय हें सौंदर्य! आणि तें अशा ठिकाणीं असावें काय? **विधात्याची** कृति फारच विलक्षण आहे. तो केव्हां केव्हां उत्तम रत्नें उकिरड्यांत उत्पन्न करितो. तें कसेंही असो. पण ही ऋषिकन्या माझी स्त्री होईल काय? जशी **कण्वाची** कन्या **शकुंतला दुष्यंताला** मिळाली, तशीच ही मला कां प्राप्त होणार नाहीं?'

कामवश झालेला राजा याप्रमाणें आपल्या ठिकाणीं विचार करीत होता; पण त्या अल्लड **कदलीगर्भेच्या** मनांत त्याच्याविषयीं कांहींच आलें नाहीं. घोड्यावर बसलेला कोणी नवखा मनुष्य दृष्टि पडला, ह्मणून तिणें एकवेळ त्याच्याकडे पाहिलें, इतकेंच काय तें. नंतर ती आपल्या कामांत चूर होती. राजा आपल्या मनांत अनेकप्रकारचे मनोरथ करीत होता; तरी जवळ जाऊन तिला विचारण्याची त्याची प्राज्ञा झाली नाहीं. इतक्यांत फुलें, तुळशी, समिधा, दर्भ वगैरे घेऊन **मंकणक** ऋषि बाहेरून आला. त्याला पाहतांच, हाच या कन्येचा पिता असावा, असें समजून राजा तत्काल घोड्यावरून उतरून नम्रतापूर्वक ऋषीच्या पायां पडला. तेव्हां ऋषीनें त्याला आशीर्वाद दिला व तूं कोठला? कोण? कशा करितां आलास? वगैरे विचारल्यावरून राजानें आपलें कुळ, गोत्र, येण्याचें कारण, वगैरे सर्व हकीकत निवेदन केली. कधीं नव्हतला आज आपल्या येथें योग्य अतिथी प्राप्त झाला, ह्मणून **मंकणकाला** मोठा आनंद वाटला. त्याणें त्याला आज आपल्या आश्रमांत राहून आतिथ्य घेण्या विषयीं आज्ञा केली, व राजानेंही ती शिरसा मान्य केली.

आश्रमांत व्यवस्था ठेवणारी काय ती **कदलीगर्भाच** होती. तेव्हां तिला हाक मारून ऋषि म्हणाला, "बाळे, आज हा सन्मान्य अतिथी

आला आहे. तेव्हां याचा यथायोग्य आदरसत्कार कर." याप्रमाणें व्यवस्था झाली. **राजानें** घोड्याला कळावा घालून तेथें चरत सोडला. व आपण पोषाख उतरून स्नानसंध्या वगैरे विधी आटोपला. नंतर ऋषीसहवर्तमान, **कदलीगर्भेनें** शिजवून तयार केललीं कंदमूलादि त्याणें यथेच्छ भक्षण केलीं. नेहमीं एकाच प्रकारचें भोजन कंटाळवाणें होतें. मिष्टान्न खाणाऱ्या राजाला, त्या ऋषीच्या येथला आहार अगदीं बेचव होता, तरी फार मिष्ट लागला. त्यांतून त्याचें मन ठिकाणावर कोठें होतें? त्याच्या सर्व इंद्रियांला अत्यंत मधुर लागलेल्या **कदलीगर्भेनें** शिजविलेले व आपल्या कोमल हस्तानें वाढलेले पदार्थ त्याला अमृतासारखे वाटल्यावांचून कसे राहतील!

असो. भोजन वगैरे झाल्यावर **राजा मंकणकाशीं** इकडच्या तिकडच्या गोष्टी करीत बसला. बोलतां बोलतां सहज ही मुलगी कोणाची, कोण वगैरे त्याला समजून घ्यायचें होतें. तेव्हां **कदलीगर्भेची** गोष्ट निघाल्यावरून राजा मोठ्या नम्रतेनें **मंकणकाला** म्हणाला, "महाराज, मी विचारतों याची क्षमा असावी. ही कन्या खरोखरच अप्रतिमरूपवती आहे. फार काय सांगूं; मी एक मोठा राजा आहें. माझ्या जनानखान्यांत पुष्कळ सुंदर सुंदर स्त्रिया आहेत; पण त्यांला या आपल्या कन्येच्या पायांच्या नखाची देखील सर येणार नाहीं. तें कांही असो. पण मला या आपल्या मुलीविषयीं दुसरीच एक शंका आहे. आपल्या सांगण्यावरून आपण तर अविवाहित आहां असें दिसतें. मग ही आपल्याला कन्या कशी झाली? इतरांविषयीं अशी शंका घेण्याला मुळीं जागाच नसती; पण आपल्यासारखे तपस्वी महात्मे अलौकिक सामर्थ्यानें पाहिजे तें करूं शकतात, म्हणून मी विनंती केली."

**राजानें** याप्रमाणें प्रश्न केला. व त्याचा विनीतपणा पाहून ऋषीलाही स्नेह उत्पन्न झाला; म्हणून त्याणें आपल्या मुलीची उत्पत्ति, तिचें नांव वगैरे सर्व सांगितलें. राजा हावेळपर्यंत तिच्याविषयीं उत्सुक झाला

होता तरी, कदाचित् ही ब्राह्मणकन्या असेल तर आपल्याला हिच्याशीं विवाह करून घेतां येणार नाहीं, म्हणून तो मोठ्या विचारांत पडला होता. ऋषीनें तिची जी हकीकत सांगितली, तीवरून मेनकेच्या भावनेपासून हिची उत्पत्ति आहे, तेव्हां आपल्याला वरण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. असें समजून त्याणें तिच्याविषयीं **मंकणका**जवळ मागणी केली. ऋषीला तिचा विवाह कर्तव्यच होता. व योग्य वर कसा मिळेल याची त्याला काळजी होती. तेव्हां आयता घरबसल्या असा जांवई प्राप्त झाला असून तो त्याचा कां अनादर करील? त्याणें राजाची विनंती मान्य करून त्याचवेळीं आपली कन्या त्याला वाचादत्त केली. व लवकरच उत्तम मुहूर्त पाहून यथाविधि तिचा विवाहही करून दिला. दिव्य स्त्रियांचा व पूर्वींच्या तपस्वी ऋषींचा प्रभाव मोठा विलक्षण होता. जी **मेनका** आपल्या मुलीकडे नुसते डोळे उघडून पाहण्याचें देखील सोडून आपल्याच तोऱ्यांत निघून गेली व जिणें आजपर्यंत आईचें सुख काय असतें त्याची **कदलीगर्भे**ला ओळख देखिल दिली नाहीं; ती यावेळीं तिची आठवण करील असें कोणास वाटेल काय? पण चमत्कार असा झाला कीं, **कदलीगर्भे**चा विवाह होत आहे, हें तिला दिव्य दृष्टीनें समजून आलें. तेव्हां तत्काल ती **मंकणका**च्या आश्रमांत प्राप्त झाली. राजा एकटाच शिकार करीत करीत तेथें आला होता; तेव्हां नवऱ्या मुलीला योग्य अशीं वस्त्रें, अलंकार वगैरे यावेळीं त्याच्याकडून मिळण्याचा संभव नव्हता. **मंकणक** हा तर बोलून चालून जंगलांत राहणारा तापस. तेव्हां **कदलीगर्भे**चा नित्याचा जो थाट होता तोच या लग्नसमारंभांतदेखील राहिला असता; पण ही उणीव **मेनके**नें भरून काढली. अप्सराच ती! तिच्याजवळ कोणत्या गोष्टीची कमतरता असणार? तिणें दिव्य वस्त्रें, अलंकार इत्यादि सर्व साहित्य आणून स्वतः आपल्या हातांनीं **कदलीगर्भेला** अशी सजविली कीं, तो थाट एखाद्या सार्वभौमराजाच्या मुलीलादे-

खील मिळायचा कठीण. **मेनके**बरोबर तिच्या मैत्रिणी दुसऱ्या पुष्कळ अप्सरा आल्या होत्या. त्यामुळें तशा अरण्यांतही तो विवाहसमारंभ मोठ्या थाटाचा झाला. कार्य उरकतांच राजानें **मेनके**ची व ऋषीची आज्ञा घेतली. **मेनके**ला **कदलीगर्भे**च्या वियोगाविषयीं तितकें वाटलें नसेल, कारण तिच्यासारख्या स्त्रियांला ते प्रसंग अगदीं आंगवळणी पडलेले असतात; पण बिचाऱ्या **मंकणका**ची मात्र विलक्षण स्थिती झाली. आधीं त्याच्या लोभाला कोणी पात्र नव्हतें; पुढें **कदलीगर्भा** झाल्यापासून तो सर्व तिच्या एकटीच्याच ठिकाणीं समाविष्ट झाला होता. रात्रंदिवस त्याला काय तो तिचा लळा. अशा स्थितींत एकाएकीं आज तिला दूरदेशीं पाठविण्याचा प्रसंग आल्यावरून त्याला फारच दुःख झालें. तरी विचारानें मन स्थिर करून त्याणें तिला निरोप दिला.

**मंकणका**ला राजगृहांत काय काय खटपटी असतात, कसे अनर्थ होतात, ते मुळींच ठाऊक नव्हते; पण **मेनका** वगैरे अप्सरा त्याविषयीं पूर्ण अभिज्ञ होत्या. त्यांणीं **कदलीगर्भे**वर पुढें कदाचित् कांहीं तरी संकट येईल, अशी कल्पना मनांत आणली. उघडच आहे, स्नेह वाईट गोष्ट प्रथम दाखवीत असतो. हा राजा यावेळीं, केवळ हिच्या रूपाला लुब्ध होऊन हिच्यावर आसक्त झाला आहे; तरी याचें मन दूषित होणार नाहीं, असें कशावरून. याच्या जनानखान्यांत पुष्कळ स्त्रिया असतील. व हा हिच्या नादीं लागला असें पाहून त्या कांहींतरी कुभांडें रचून याचें मन फिरवितील. तेव्हां तशाप्रकारचा प्रसंग आला तर ही बिचारी एकटी तेथें काय करील? व हिचा पक्षपाती तेथें कोण असणार? तेव्हां तशा प्रसंगीं हिला परत या आश्रमांत तरी येतां यावें, अशी कांहींतरी तजवीज करून ठेविली पाहिजे, असा विचार करून त्या अप्सरांनीं **कदलीगर्भे**जवळ पुष्कळशा मोहऱ्या दिल्या, आणि तिला ह्मटलें, "बाई मुली, आतां तुला तर गेलेंच पाहिजे.

हा तुझा पति कुलीन व सत्यवादी आहे असें दिसतें. हा सहसा तुझा त्याग करणार नाहीं. पण कदाचित् दुर्दैवानें तसा प्रसंग आलाच, तर तूं परत आपल्या बापाकडे ये. तुला कोणत्या रस्त्यानें यावें हें समजायचें नाहीं. म्हणून आह्मी या मोहऱ्या तुझ्याजवळ दिल्या आहेत. आतां आपल्या पतीबरोबर जातांना वाटेंत एकसारख्या या मोहऱ्या पेरीत जा. येथून तुझ्या पतीच्या राजधानीपर्यंत बहुत करून सारा प्रदेश अगदीं उजाड आहे. व मध्यंतरी कांहीं वस्ती असली तरी मोहऱ्यांची लागवड त्या प्रदेशांत मुळींच होत नाहीं. जातांना तूं ज्या मोहऱ्या पेरशील त्या उगवून त्यांचीं झाडें पुष्कळ दिवस राहतील, आणि जेव्हां तुला परत यायचें असेल, तेव्हां त्या झाडांची खूण धरून आलीस ह्मणजे थेट येथें येऊन पोंचशील."

याप्रमाणें तिला उपाय सांगून व पतिगृहीं कसें वागावें तें चांगलें शिकवून, **मेनका** इत्यादि अप्सरांनीं व **मंकणकानें** वरचेवर प्रेम पूर्वक तिचे मुके घेऊन, पितृविरहाच्या ऊष्म्यानें तिच्या कोमल अंगाचा दाह न व्हावा म्हणूनच कीं काय प्रेमाश्रूंनीं तिला स्नान घातलें. नंतर राजानें सर्वांचा निरोप घेऊन व प्रिय पत्नीला घोड्यावर आपल्या पुढें घेऊन राजधानीचा मार्ग धरला. वाटेनें जातांना **कदलीगर्भा** एकसारख्या मोहऱ्या पेरीत चालली होती. तिच्या मनाला करमणूक व्हावी म्हणून राजा वनश्री, हरिणादि श्वापदें, सरोवरें इत्यादि मार्गांत जें जें कांहीं दृष्टीस पडे त्याचें सुरस वर्णन करीत होता. त्याच्या शोधाला निघालेली त्याची फौज लवकरच वाटेंत त्याला भेटली. तिच्या सहवर्तमान तो मोठ्या आनंदानें आपल्या राजधानीला जाऊन पोंचला.

नगरींत पोंहचतांच त्याणें **कदलीगर्भे**करितां एक स्वतंत्र महाल तयार करवून त्यांत तिला ठेविलें. व राजकार्य वगैरे चट्सारें सोडून देऊन तो रात्रंदिवस तिच्याशीं विलास करण्यांत निमग्न झाला. प्रधानादिकांशीं ज्या त्याच्या गोष्टी होत, त्यांचादेखील विषय **कदलीगर्भाच** झाली होती.

जनानखान्यांतल्या इतर स्त्रियांकडे त्याणें कधीं ढुंकूनदेखील पाहिलें नाहीं. उघडच आहे, उत्तम वस्तूची प्राप्ती झाल्यावर निकृष्ट वस्तूवर मन कसें जाईल? हें सर्व ठीक झालें; पण याचा परिणाम फार वाईट झाला. संसारांत प्रत्येक मनुष्यानें विचारपूर्वक वर्त्तन केलें पाहिजे. त्यांतून स्त्रियांच्या संबंधानें तर फारच सावधगिरी ठेवली पाहिजे. राजा आणि ज्याला पुष्कळ बायका आहेत तो; या दोघांचीही एकसारखी स्थिती आहे. राजाजवळ अनेक कामदार असतात. त्यांला त्यांच्या त्यांच्या कामगिरीप्रमाणें अधिकार देणें, त्यांची इभ्रत वाढविणें हें त्याणें अवश्य केलें पाहिजे. पण त्यांपैकीं एखाद्या कामदाराला नाकांतला बाल करून ठेविला; तर त्यापासून फार बिघाड होतो. बाकीचे लोक त्याचा हेवादावा करतात. तेव्हां एखाद्या चांगल्या कामदारावर मेहरबानी ठेवायची असली, तर ती मनांत ठेवावी. त्याला पाहिजे तर मोठ्या अधिकारावर चढवावा; पण त्याच्यावर आपला विशेष लोभ आहे असें इतरांच्या नजरेस आणूं नये. याचप्रमाणें ज्याच्या अनेक स्त्रिया असतील त्याणेंही असेंच वागलें पाहिजे. त्याची जी आवडती असेल, तिला पाहिजे तें द्यावें; तिचे आळ पुरवावे; पण आपण तिच्याच नादीं आहें असें दुसऱ्या स्त्रियांच्या लक्षांत न येऊं देतां बाह्यात्कारें सर्वांशीं सारखें वागावें. या कथेचा नायक **दृढवर्मा** हा स्वतः राजा असून त्याच्या बायकाही पुष्कळ होत्या. तेव्हां त्याणें वर सांगितल्याप्रमाणें कामदारांच्या संबंधाचाच नियम जनानखान्याकडे लागू केला असता तर फार चांगलें झालें असतें. पण **कदलीगर्भे**च्या अलौकिक रूपगुणांनीं वेडा झाला ह्मणूनच कीं काय, त्याणें आपलें वर्तन योग्य रितीनें ठेविलें नाहीं. तेव्हां अर्थात् त्याचा परिणाम वाईट व्हायचाच.

**दृढवर्म्या**च्या सर्व स्त्रियांत **वसुमती** नांवाची स्त्री मुख्य होती. तिलाच **महादेवी** अथवा पट्टराणी ह्मणत असत. इतर स्त्रियांला ती

तुच्छ मानीत असे. व त्यांच्याविषयीं जपतही होती. पण यावेळीं तिचेंच नाक खालीं झाल्यामुळें तिला तो आपला ताठा सोडून द्यावा लागला. अर्थात् समदुःखसुखी झालेल्या जनानखान्यांतल्या सर्व राण्या एक झाल्या. व त्यांणीं कोणत्याही रितीनें **कदलीगर्भे**चा आणि राजाचा वियोग होईल, असें करण्याचा निश्चय केला. बाकीच्या राण्यांचें फारसें महत्त्व नव्हतें. व त्यांचें कांहीं चालतही नव्हतें. ह्मणून सर्वांनीं पट्टराणी **वसुमती** हिच्याच विचारावर तें काम सोंपविलें. तिणें अनेक रितीनें प्रयत्न करून पाहिले; पण कांहीं उपयोग होईना. तेव्हां शेवटीं राजाचा मुख्य प्रधान **वीरसेन** नामक होता. त्याला आपल्या मसलतींत घेण्याचा तिणें प्रयत्न केला.

**वीरसेन** हा मोठा हुषार असून स्वामिभक्त होता. राणीनें पूर्वीं अनेकवेळां त्याचीं कामें करून दिलीं होतीं. वस्तुतः यजमानाशीं एकनिष्ठपणें वागणाऱ्या प्रामाणिक प्रधानाच्या कृत्यांत राज्यहितावांचून दुसरें कांहीं असावयाचें नाहीं. तेव्हां त्यांत त्याला **वसुमती**ची रदबदली कशास पाहिजे? तथापि पूर्वकालीं काय आणि आतां काय राजेलोक ह्मटले ह्मणजे बहुत करून स्वच्छंदी, लहरी व अविचारी असे असावयाचेच! **वीरसेनानें** दूरवर विचार करून एखादें काम योजलें असून राजानें विचार नकरतां त्याच्याविषयीं प्रतिकूळ मत दिलें, ह्मणजे तो राणी **वसुमतीची** भीड घालून तिच्याकडून राजाची समजूत करवीत असे. हींच काय तीं तिणें वीरसेनाचीं कामें करून दिलेलीं. त्यांत त्याचें स्वतःचें हित फार थोडेंच होतें; तथापि याबद्दल तो तिचा आभारी होता. यावेळीं राणीनें त्याच्याकडून आपलें ह्मणणें कबूल करून घेण्याकरतां त्याला एकांतीं बोलावून नेला. व त्याचें मोठें गौरव करून, मागच्या सर्व गोष्टींची त्याला आठवण दिली. "अमुक अमुक वेळीं तुह्मी संकटांत पडलां होतां. तेव्हां मी तुमचीं कामें साधून दिलीं आहेत. त्याची तुह्मांला आठवण आहे का? तुह्मी विसरणार नाहीं हें मी पुरतेपणीं सम-

जून आहें. मी तुमचीं पुष्कळ कामें केलीं आहेत. तेव्हां तुम्ही माझें-एक लहानसें काम करायाचें कबूल कराल अशी माझी खात्री आहे."

**वसुमती** ही **वीरसेना**ची धनीनच होती. त्यांतून तिच्याविषयीं त्याची विशेष पूज्यबुद्धी होती. तिणें अशी विनवणी केली; तेव्हां तो कृतज्ञ होऊन ह्मणाला, "राणीसाहेब, मी तर आपला दासच आहें. आपण पुष्कळ वेळां माझी विनंति मान्य केली आहे. तरी या निमित्तांची कांहीं गरज नाहीं. तसें नसलें तरी आपली आज्ञा मला शिरसा मान्य केलीच पाहिजे. आपलें काय काम असेल तें सांगा. माझ्या हातून होण्यासारखें असेल तर तें मी हर प्रयत्नानें सिद्ध करून देईन."

**वीरसेनाला वसुमती**चा हेतू काय आहे तें कळलें नव्हतें. ह्मणून तो मोकळ्या मनानें तिचें काम करण्याचें कबूल करून चुकला. जनानखान्यांत ही धुसपूस फार दिवसांपासून चालली होती. तरी मोठमोठ्या राजकारणांत निमग्न असलेला **वीरसेन** तिकडे कशाला लक्ष्य देईल? त्याणें करतों असें कबूल केलें असें समजून **वसुमती** हळूच ह्मणाली, "दिवाणजी, आतांशा आमची काय दुर्दशा झाली आहे ती तुह्माला माहीत नाहीं का? यजमानांनीं ती कोठली एका तापसाची पोरगी ( **कदलीगर्भा** ) आणली आहे. आणि रात्रंदिवस तिच्या नादांत असतात. आज कित्येक दिवस झाले मला त्यांचें दर्शन देखील झालें नाहीं. मी पट्टराणी असून माझी ही दशा. मग बाकीच्या राण्यांची काय झाली असेल ती तुम्हीच पहा. अशा स्थितींत जिवंत राहून काय उपयोग? कुत्र्यासारखें पोट जाळावें, आणि खुशाल या उदासवाण्या घरांत काळ कंठावा! मला तर बाई, मरण येईल तर बरें असें झालें आहे. तुमच्यासारखे प्रधान हितकर्त्ते असून आमची अशी दशा व्हावी काय? आह्मी न सांगतां तुमच्याकडून कांहीं तरी उपाय होईल असें वाटत होतें. पण आमच्या ग्रहदशेनें आजपर्यंत तुमचें इकडे लक्ष्यच गेलें नाहीं. असो, झालें तें झालें; पण आतां तरी

कांहीं तजवीज करा. काय पाहिजे तें करा; पण ती आमची सवत कोणत्याही रितीनें नाहींशी होईल, असें करा म्हणजे झालें. कोठली मेली चांडाळीण आली कोणास ठाऊक? तिणें आमचे जसे वनवास केले तसेच तिलाही भोगायला लावा म्हणजे डोळ्यांचें पारणें फिटेल!"

राणीचें हें भाषण ऐकून **वीरसेन** अगदीं थक्क झाला. तिचे विचार इतके क्रूर असतील असें त्याला वाटलें नव्हतें. तो म्हणाला, "बाई साहेब, माझ्यासारख्या स्वामिभक्त व पापभीरू सेवकाला असली कामगिरी सांगूं नका. 'होण्यासारखें असेल तर करीन' अशी मी प्रथमच विनंती केली आहे. प्रत्यक्ष आपल्या धन्याच्या प्रियपत्नीचा नाश किंवा तिच्याशीं त्यांचा वियोग करणें, ही गोष्ट माझ्या हातून कधींही होणार नाहीं. आपण मला हें असलें क्रूर काम कसें सांगितलें; याचेंच मला मोठें आश्चर्य वाटतें. **बौद्ध**धर्मी व कौटाळ्या तापसी स्त्रियांचा हा विषय आहे. नेहमीं अनेकप्रकारचीं कपटें, जादूटोणा वगैरे करणाऱ्या व तशाचप्रकारच्या लोकांशीं सहवास ठेवणाऱ्या त्या स्त्रिया मात्र असलीं घातपाताचीं कामें करतात. बाकी सन्मार्गानें जाणारा व ऐहिक आणि पारलौकिक शुभाशुभांचा विचार करणारा दुसरा कोणीही असें अकार्य करणार नाहीं. त्या द्वाड स्त्रिया, तापसवेषाचें ढोंग करून लोकांच्या घरोघर फिरत असतात. व बिचारे भोळे भाविक लोक त्यांच्या वेषावरून त्यांच्याविषयीं संशय न घेतां त्यांला खुशाल आपल्या घरीं येऊं जाऊं देतात. असें झालें म्हणजे त्या चांडाळणी अमुक एक काम करावें, आणि अमुक न करावें याचा विधिनिषेध न बाळगतां, काय करतात आणि काय न करतात, याचा कांहीं नेम राहत नाहीं!"

राणी **वसुमती** तितकी दुष्ट स्वभावाची नव्हती; तथापि यावेळीं सवतीमत्सरानें तिचें मन दूषित झालें होतें. **कदलीगर्भे**चा कोणत्याही रितीनें नाश करावयाचा असा तिचा निश्चयच झाला होता. प्रधान **वीरसेन** आपला मिंदा आहे. तेव्हां आपण सांगितलेलें काम तो अवश्य

करील, अशी तिची समजूत होती. ह्मणून तिणें मन मोकळें करून आपला हेतू त्याला कळविला. पण त्याणें वर सांगितल्याप्रमाणें तिचें सांगणें अमान्य केलें. व त्या कृत्याची फार निंदाही केली. ती ऐकतांच राणीला अतिशय लाज वाटली. झर्कन् तिच्या मनांतला भ्रम उतरून—'अरेरे! आपण मोठा वेडेपणा केला. याच्या (वीरसेनाच्या) मनाची पुरती परीक्षा केल्यावांचून आपण एकदम याला आपला हेतू कळविला हें फार वाईट झालें,' असें तिला वाटलें. पण करते काय? तोंडावाटें ते शब्द निघून गेले. लहान असो किंवा मोठा असो; श्रीमान् असो कीं दरिद्री असो; धनी असो किंवा चाकर असो; अकार्य हें कोणालाही लज्जास्पद झाल्यावांचून राहणार नाहीं. चोराला जशी सावाची साहजिक भीती असते; तशी अकार्य करूं इच्छिणाराला चांगल्या मनुष्याची किंवा त्याच्या विरुद्ध जाणाराची सहजच भीती वाटते. असो.

राणी **वसुमती** याप्रमाणें शरमली; तरी तिणें मोठ्या शहाणपणानें लगेच आपली बाजू सांवरून घेतली. मनांतील हेतू बाहेर न दाखवितां व आपल्याला त्याच्याविषयीं आतां तिरस्कार उत्पन्न झाला आहे, असें दाखवून ती **वीरसेनाला** ह्मणाली, "अग बाई! तें असें वाईट काम आहे? असें असलें तर जळो मेलें तें. तसें निंद्य काम करून मला काय करायचें आहे. मी आपली सहज बोललें."

इत्यादि प्रकारें बोलून तिणें, आपल्या मनांत तसें कांहीं करावयाचें नाहीं असें दाखवून **वीरसेनाला** आपल्याविषयीं संशय न रहावा; ह्मणून गोड गोड भाषण केलें. व ती तिची मसलत बरीच उपयोगींही पडली. आपल्या बोलण्यावरून हिला पश्चात्ताप झाला आहे, अशी **वीरसेनाची** समजूत झाली. म्हणून त्याणें तिच्या दुष्ट कृत्याला प्रतिबंध करण्याविषयीं प्रयत्न करण्याचेंही मनांत आणलें नाहीं. नंतर आणखी कांहींवेळ इकडच्यातिकडच्या गोष्टी बोलून राणीनें **वीरसेनाला** निरोप दिला.

---

# बृहत्कथासागर.

## भाग चवथा.

तर्जयन्निव विघ्नौघान् नमितोन्नमितेन यः ।
मुहुर्विभाति सततं स पायाद्वो गजाननः ॥ १ ॥

**वीरसेनानें वसुमतीचें** काम केलें नाहीं; तथापि त्याच्या भाषणापासून तिचा चांगलाच कार्यभाग झाला. 'बुद्धतापसी अशाप्रकारचीं भयंकर कृत्यें करीत असतात'; असें त्याच्या बोलण्यांत आलें त्याची राणीनें पक्की आठवण ठेविली. आणि **वीरसेन** निघून जातांच ती आपल्याशींच ह्मणाली, मेला मोठा सत्पुरुष झाला आहे. असल्या बोलण्यांनीं माझें मन कसें शांत होईल? ज्याचें काळीज करपलें असेल त्यालाच तीं दुःखें ठाऊक. या मेल्याला वेदान्त सांगायला काय कठीण आहे! असा विचार करून तत्काल तिणें आपल्या परम विश्वासू दासीला पाठवून **सौदामिनी** नांवाच्या एका प्रसिद्ध बुद्धतापसीला बोलावून आणलें.

**भरतखंडांत** यावेळीं **बौद्ध**धर्म चहूंकडे पसरलेला होता. लहान खेड्यापासून तों मोठ्या शहरापर्यंत सर्व ठिकाणीं **बौद्ध**भिक्षू व भिक्षुकी रहात होत्या. त्यामुळें राणी **वसुमती**ला आपला हेतू सिद्ध करून देणारी दुष्ट तापसी मिळण्यास मुळींच कठीण पडलें नाहीं. **सौदामिनी**ही त्या शहरांत ज्या **बौद्ध**भिक्षुकी रहात होत्या; त्यांत मोठी नामांकित असून जादूटोणा, मंत्रतंत्र, जारणमारण वगैरेच्या थापा देण्याच्या कामांत ती मोठी पटाईत होती. दासीनें तिला फार मोठ्या लाभाची आशा दाखवून; राणीनें बोलाविलें आहे असें सांगितलें. तेव्हां तिला अतिशय आनंद झाला. तत्काल ती राजवाड्यांत राणीजवळ येऊन पोंचली. आधींच स्त्रिया मायाळू व भाविक असतात. तशांतून त्या कार्यवादू

असल्या; ह्मणजे मग तर कांहीं बोलायासच नको. **वसुमतीनें** त्या तापसीचा इतका सत्कार केला कीं; त्यायोगानें तिचा अंतरात्मा अत्यंत प्रसन्न झाला. नंतर तिणें प्रश्न केल्यावरून राणीनें आपल्याला कोणतें दुःख प्राप्त झालें आहे; त्याची मुळापासून सर्व हकीकत निवेदन करून; त्याचा परिहार करण्याविषयीं काय केलें पाहिजे, तेंही त्या **सौदामिनी**ला सांगितलें. व तिच्या पायांवर मस्तक ठेवून कोणत्याही रितीनें या दुःखांतून आपण मला मुक्त करावें; अशी तिची प्रार्थना केली.

ज्यांचे विचार वाईट असतात, अशा मनुष्यांला—आपला त्यांत कांहीं संबंध नसतांही—दुसऱ्याचा नाश करण्याविषयीं प्रयत्न करावा असें वाटतें. मग राणी **वसुमती**सारखीनें हातांपायांपडून प्रार्थना केलेली. व तिचें काम झालें असतां जिला फार मोठा लाभ व्हायचा, असें असतां त्या दुष्ट तापसीला तें घोर कर्म करण्याविषयीं किती स्फुरण येईल; तें कांहीं सांगावयास नको. द्रव्यलोभाला गुंतलेली ती चांडाळीण **सौदामिनी** राणीच्या डोळ्यांतील आसवें पुसून तिचें समाधान करून ह्मणाली, "राणीसाहेब, अहो, आपण इतक्या दुःखी कां झालां? या तुमच्या कामाचें मला कांहींच कठीण वाटत नाहीं. मी हें सहज साधून देईन! अनेकप्रकारचे जारण मारणादिक पुष्कळ प्रयोग मला माहित आहेत. मोठमोठीं बिकट कामें आजपर्यंत माझ्या हातून किती झालीं असतील; त्यांची मलादेखील आठवण नाहीं! तेव्हां तुह्मी त्याबद्दल कांहीं काळजी करू नका. स्वस्थ रहा. लवकरच तुमचा हेतू पूर्ण होईल!"

इत्यादि प्रकारें राणीचें समाधान करून व आपल्या हातून हें काम खचित होईल; अशी तिची खातरी करून ती कौटाळीण तापसी तेथून निघाली. **वसुमती**कडून यावेळीं तिला फारसा लाभ झाला नव्हता; पण काम झाल्यावर एक लक्ष रुपये देण्याचें राणीनें तिला वचन दिलें होतें. व 'जन्मभर आपण तुमच्या आज्ञेंत राहीन', असेंही सांगितलें होतें. तेव्हां **सौदामिनी**ला मोठा आनंद वाटावा हें

अगदीं साहजिकच आहे. राजवाड्यांतून आपल्या मठांत पोंहचेपर्यंत तिच्या मनांत अनेक आनंदाच्या लहरी येत होत्या. हळूहळू तिची स्वारी आपल्या त्या लहानशा मठिकेंत जाऊन पोंचली. नंतर आनंदाचा बहर कांहीं वेळानें अंमळ शांत झाला. तेव्हां आपल्याला एवढा मोठा लाभ व्हावयाचा आहे; पण तो केव्हां होणार व त्याबद्दल काय केलें पाहिजे हे विचार तिच्या मनांत घोळूं लागले. कसें झालें तरी कसाबाला देखील प्राण्यांचा घात करतेवेळीं अंमळ कठीण वाटतें. मग तिला वाटल्यावांचून कसें राहील? **कदलीगर्भे**ला ठार केली पाहिजे ही गोष्ट तिच्या मनांत येतांच; ती भ्यालल्यासारखी होऊन आपल्याशींच म्हणाली, अरेरे! किती वाईट गोष्ट ही! ही मेली विषयोपभोगाची आशा कोणाला फसविल्यावांचून राहिली आहे! कारण, त्या आशेनेंच मी मघां राणीजवळ एकदम असें भयंकर कृत्य करण्याची प्रतिज्ञा केली. मी तिला पुष्कळ थापा दिल्या; तरी जादूनें किंवा इतर कोणत्याही रितीनें तिच्या सवतीचा ( **कदलीगर्भे**चा ) हटकून घात करण्याइतकें माझ्या अंगीं सामर्थ्य नाहीं. तशांतून जारणमारणादिक कपटें इतर ठिकाणांप्रमाणें राजाच्या घरीं चालविणें फार कठीण आहे. राजेलोक म्हटले ह्मणजे ते सत्ताधारी असतात. तेव्हां कदाचित् हें कृत्य त्यांच्या नजरेस येईल; तर ते पारिपत्य केल्यावांचून राहणार नाहींत. ह्या सगळ्या गोष्टी मनांत आणल्या ह्मणजे मी मोठी चूक केली असें वाटतें. मी राणीजवळ तिचें काम करण्याचें कबूल न केलें असतें तर बरें झालें असतें; पण हें आतां मनांत आणून काय उपयोग? बोलल्याप्रमाणें तें काम मला केलेंच पाहिजे. नाहींपेक्षां तिकडूनही फजिती होण्याचा प्रसंग येईल. तें एक असो; पण आपल्याला एवढी मोठी रक्कम दुसऱ्या कोणत्या रितीनें मिळणार? मी तापसी झालें ह्मणून काय झालें, द्रव्याची मला गरज आहेच. आणि कांहीं तरी अकार्य केल्यावांचून मोठा लाभ होईल; असें कधींच होणार

नाहीं. नाहींतर दररोजची आपली भिक्षा ही चाललीच आहे. लोकांच्या एथून मागून आणावें आणि पोटाची गार भरावी. असें करीत राहावें; त्यापेक्षां अकार्य करूनदेखील एकदम पुष्कळ द्रव्य मिळवावें हें कांहीं वाईट नाहीं. मग खुशाल दानधर्म करून पूर्वी झालेल्या पापाचा परिहार पाहिजे तर करावा. तें कसेंही असो. एकंदरींत राणीला वचन दिल्याप्रमाणें; तिचें दुःख नाहींसें करण्याविषयीं आपल्याला प्रयत्न केलाच पाहिजे, हो बरें पण तें होणार कसें? त्याला कोणी तरी हुषार मनुष्य साथी पाहिजे. आपल्याला त्यांतलें कांहींच समजत नाहीं.

**सौदामिनी** याप्रमाणें विचार करीत आहे. इतक्यांत तिला एक न्हावी—जो तिचा परम मित्र होता, त्याची आठवण झाली. तेव्हां उमेदींत येऊन ती आपल्याशींच म्हणाली, वाहवा! मला बरी आठवण झाली. आमचा तो **कूटदास** नांवाचा न्हावी या कामांत मोठा हुषार आहे. आपली आणि त्याची फार दिवसांची मैत्री आहे. तो मात्र हें काम खचित करील. आपल्याला जें मिळणार त्यांतलें थोडेंसें त्यालाही द्यावें म्हणजे झालें. असा विचार मनांत येतांच **सौदामिनी** तेथें बसली नाहीं. तत्काल तिणें आपल्या मठीचें दार लावून घेऊन त्या न्हाव्याच्या घराची वाट धरली. आणि त्याला भेटून मूळापासून सर्व हकीकत सांगितली. व पुढें होणाऱ्या लाभाची त्याला आशा दाखविली.

पक्ष्यांत कावळा, श्वापदांत कोल्हा आणि मनुष्यांत न्हावी हे मोठे धूर्त असतात, हें प्रसिद्धच आहे. **कूटदास** हा बराच वयोवृद्ध असून राजदरबारांत वागलेला; अनेक खटपटी केलेला व मोठा हुषार अशा प्रकारचा होता. **सौदामिनीनें** सांगितलेली हकीकत ऐकून तो मनांत म्हणाला, "दैवानेंच मला आज हें मोठें घबाड मिळवून दिलेंसें वाटतें. ही तापसी बेटी मूर्ख आहे. स्त्रियांचा स्वभाव घातकी असतो. त्याप्रमाणें ही त्या राजस्त्रियेचा (**कदलीगर्भेचा**) घात करावा म्हणते; पण खरोखर त्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपण या

कामांत कोणाच्याही प्राणावर घाला घालू नये. राणी **वसुमती**चा हेतू तर पुरवावा; पण त्या **कदलीगर्भे**चा जीवही रक्षण करावा. आम्ही येथें जादूबिदू केली तर राजाला किंवा त्याच्या प्रधानादिकांला कांहीं समजायचें नाहीं हें खरें; पण त्या **कदलीगर्भे**च्या बापाला समजल्यावांचून राहणार नाहीं. ती आपल्या पित्याची फार लाडकी आहे. व तो एक ऋषि असून मोठा तपस्वी आहे, तेव्हां दिव्यदृष्टीनें त्याला हें आमचें दुष्ट कृत्य कदाचित् कां दिसणार नाहीं? आणि तसें झालें म्हणजे आमचें कपट उघड होऊन सर्वस्वीं घात होईल. या करितां आपण असें करावें कीं, तूर्त **राजाचा** आणि त्या **कदलीगर्भे**चा वियोग होईल असें करावें. राणी **वसुमती**ला, तिला मारून काय करावयाचें आहे. कोणीकडून राजानें तिचा नाद सोडावा; ऐवढेंच तिला इष्ट असलें पाहिजे. तसें झालें म्हणजे आम्ही राणीची कामगिरी बजाविली असें होईल. अर्थात् तिच्याकडून खुशाल मोठ मोठीं इनामें उपटायला कांहीं हरकत नाहीं. तिला पाहिजे तशी धमकी देऊन आम्ही तिला खूप लुबाडूं. यद्यपि ती आमची धनीण आहे; तथापि एका वाईट कामांत तिणें आमचें साहाय्य घेतलें आहे. तेव्हां कुत्सित गोष्टींत साहाय्य करणाऱ्या चाकराचें धन्याला चाकर व्हावेंच लागतें! या प्रमाणें कांहीं दिवस राजाचा आणि त्या **कदलीगर्भे**चा बिघाड करून आपण खूप द्रव्य मिळवावें. आणि नंतर राजाला ही गोष्ट सांगून आपण त्याचा आणि **कदलीगर्भे**चा पुन्हां मिलाफ करून द्यावा. असें झालें म्हणजे राजाची आपल्यावर बहाल मर्जी होईल. व ती ऋषिकन्या **कदलीगर्भा**ही आमची आभारी होईल. अर्थात् मग त्या दोघांकडून आपल्याला लाभ होईल तो निराळाच. आणि असें केलें म्हणजे आपल्या हातून पाप होणार नाहीं. व पैसाही पुष्कळ मिळेल! ही मूर्ख तापसी अविचारानें त्या ऋषिकन्येचा घात करावा म्हणते, पण तसें केल्यानें कायतो राणी **वसुमती**कडून लाभ होईल

तेवढाच. बाकी कांहीं मिळायचें नाहीं. शिवाय मोठें पाप लागेल तें निराळेंच. आणि कदाचित् ती गोष्ट उघडकीस आली तर प्राण जाण्याचा प्रसंग! याकरितां माझ्यासारख्या शहाण्या मनुष्यानें आपल्या शहाणपणाला बट्टा न लागेल असेंच काम केलें पाहिजे; व थोड्याशा प्रयत्नापासून मोठा लाभ करून तर घेतलाच पाहिजे.

असा विचार करून **कूटदास सौदामिनी**ला ह्मणाला, "बाई, तूं सांगतेस तें सर्व खरें आहे. आणि मी तसें करीनही; पण त्या **कदलीगर्भे**चा बाप मोठा तपस्वी आहे. आह्मी कांहींतरी जादू करून राजाची ही नवी बायको मारली तर तें योग्य होणार नाहीं. कदाचित्, राजाला ही गोष्ट समजली तर तो आह्मा सर्वांचा शिरच्छेद करील. स्त्रीहत्येचें पातकही लागेल. व तो दिव्यदृष्टी ऋषि आह्मांला शाप देईल. याकरितां मला असें वाटतें कीं; या कामांत असला भयंकर उपाय योजूं नये. बुद्धिबलानें कांहीं तरी युक्ति काढून राजाचा आणि त्या **कदलीगर्भे**चा वियोग करावा ह्मणजे झालें. तसें झालें ह्मणजे राणी **वसुमती**चें काम होईल. व तिच्यापासून जें आपल्याला मिळायचें तेंही मिळेल. आतां ही गोष्ट कशी होईल, असें तुला वाटेल; पण त्यांत कांहीं फारसें कठीण नाहीं. हें तुझें काम तर मी सहज करीन. माझी बुद्धी अशी आहे कीं; तिच्यायोगानें मी जें पाहिजे तें साधीन. माझ्या चातुर्याविषयीं तुला एक लहानशी गोष्ट सांगतों ती ऐकून घे. ह्मणजे तुझी खातरी होईल.

हा आमचा राजा **दृढवर्मा**, याचा बाप स्वभावानें मोठा वाईट होता. तो मोठा विषयी असून परस्त्रीचा अभिलाष करणें याचें त्याला कांहींच वाटत नव्हतें. त्यावेळीं मी त्याची चाकरी करीत होतों. माझी चाकरी ह्मटली ह्मणजे त्याची हजामत करणें हीच होय. पुढें असें झालें कीं; एकेदिवशीं तो राजा सड्या स्वारीनिशीं घोड्यावर बसून बाहेर निघाला आहे, अशावेळीं ही आमची घरवाली (बायको) कोठें त्याच्या

दृष्टी पडली. आतां हिचे केंस पिकले आहेत. अंगावर सुरकुत्या पडल्या आहेत. यामुळें ही अगदीं खप्पड दिसते. पण त्यावेळीं ही भरज्वानींत होती. हिचें सुंदर रूप पाहतांच, त्या कामी राजाची दृष्टी हिच्यावर आसक्त झाली. तत्काल त्याणें आपल्या बरोबरच्या लोकां-जवळ चौकशी केली. तेव्हां ही आपल्या न्हाव्याची अर्थात् माझी बायको आहे, असें त्याला समजलें. मग काय विचारतां? त्याणें बाहेर जायचें सोडून थेट आमच्या घराकडे घोडा फिरविला. कामाला वेळ काळ वगैरेचा कांहीं विचार रहात नाहीं. "बेटा न्हावी तो काय? त्याची कसली पर्वा? त्यांतून तो आपला चाकरच आहे." असें बोलून तो दुष्ट राजा माझ्या बायकोच्या पाठोपाठ थेट आमच्या घरांत शिरला. आणि यथेच्छ तिचा उपभोग करून चालता झाला. दुर्दैवानें त्याचवेळीं मी कोठें बाहेर गेलों होतों तो परत आलों. पण मला घरांत कोण जाऊं देतें? चाकर झाला ह्मणून काय झालें. त्याला, स्वतः त्याची अमर्यादा केली तर एकवेळ पुरवेल; पण त्याच्या बायकोचा अपमान त्याच्यानें पाहवणार नाहीं. मला त्या राजाचें कृत्य फार असह्य झालें. पण निरुपायास्तव मीं तें तसेंच सहन केलें. व त्यादिवशीं आपण कोठें बाहेरगांवीं गेलों होतों, व झालेली गोष्ट आपणास मुळींच माहित नाहीं; असें दाखविण्याकरतां तो दिवस व रात्र मीं दुसऱ्या ठिकाणीं राहून काढली.

दुसऱ्यादिवशीं सकाळीं गांवाला जाऊन परत येतात त्याप्रमाणें मी आपल्या घरीं गेलों. माझी समजूत अशी होती कीं; झालेली गोष्ट माझ्या बायकोच्या खुषीनें झाली नसेल. निरुपायास्तव ती राजाला अनुकूळ झाली असली, तरी मनापासून तिला तें कृत्य आवडलें नसेल. पण पाहतों तों सारा प्रकार माझ्या समजुतीच्या अगदीं विरुद्ध दिसला. मीं लक्ष्यपूर्वक पाहिलें तों माझ्या बायकोची चर्या बदलल्यासारखी दिसली. उघडच आहे, गरीब न्हाव्याची बायको, तिला मोहित होऊन

प्रत्यक्ष राजा जेव्हां तिचीं आर्जवें करूं लागला तेव्हां तिला अभिमान कां न चढेल? मीं घरांतली हकीकत कशी काय आहे? ह्मणून विचारिलें, तेव्हां मोठ्या ताठ्यानें झालेली हकीकत तिणें सर्व मला सांगितली. तिणें आपल्या बोलण्यांत माझा पुष्कळ पाणउतारा केला. व माझ्याविषयीं आपल्याला फारशी परवाही नाहीं असें दाखविलें. मला तो तिचा ताठा बिलकूल सहन झाला नाहीं. खरोखर माझ्या मनाची स्थिती त्यावेळीं कशी झाली होती; तिचें यथार्थ वर्णन करणें फार कठीण आहे. राजानें आपल्या बायकोवर हात टाकला या गोष्टीचा मला त्वेष आला होता, बायकोची मजवर फार प्रीति आहे असें मी समजत होतों, त्याचा निकाल झाल्यावरून खेद झाला होता व तिचा तो तोरा पाहून ईर्ष्या उत्पन्न झाली होती. तशा स्थितींत बायकोला असें नव्हे असें ह्मणावें; तर ती राजाला सांगून आपल्याला मारून टाकील कीं काय; याचें भय वाटत होतें. अशा मोठ्या कचाट्यांत पडल्यावरून मी फार अस्वस्थ झालों होतों. इकडे राजाला तर तिचा विशेष नादच लागला. पहिल्या दिवशीं झालेली गोष्ट माझ्या डोळ्यांआड तरी झाली होती; पण दुसऱ्या दिवशीं मी घरीं असतांनाच त्याची स्वारी आली. माझ्याकडून आपल्याला प्रतिबंध होईल; याची त्याला मुळींच भीती नव्हती. ह्मणून तो निःशंकपणें खुशाल माझ्या स्त्रीशीं रममाण होऊं लागला. अर्थात् माझें काळीज करपत होतें तरी मला त्यावेळीं उगीच राहणें भाग पडलें. तेव्हांपासून, तो येतो असें दृष्टीस पडलें ह्मणजे मी आपला मुकाट्यानें दुसरीकडे जात होतों! वस्तुतः प्रत्यक्ष आपला चाकर, त्यांतून न्हावी, अशाच्या स्त्रीवर डोळा ठेवावा; हें त्या राजाला लज्जास्पद नव्हतें काय? पण ज्यांचा स्वभाव वाईट व जे ऐश्वर्याच्या व अधिकाराच्या मदानें उन्मत्त झालेले अशा पुरुषांला विचार कसला? वाऱ्यानें भडकलेल्या वणव्याला—गवत किंवा अरण्य याचा—कांहींच सुमार रहात नाहीं. जें मिळेल त्याला तो वणवा जसा जाळून टाकतो, तसा त्या

उन्मत्त पुरुषाला कोणत्या स्त्रीचा अभिलाष करावा आणि कोणतीचा करूं नये; याचा कांहींच विचार रहात नाहीं! असो.

माझ्याकडून, त्याचें निवारण करण्याविषयीं जेवढ्या कांहीं युक्ती करवल्या तेवढ्या मीं केल्या; पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं कांहींतरी चमत्कारिक तडजोड काढावी; ह्मणून मीं हळूहळू आपला आहार कमी केला. पोटभर अन्न खात नसल्यामुळें अर्थात् मी अगदीं अशक्त झालों. दिवसें दिवस माझी प्रकृति फारच क्षीण दिसूं लागली. प्रतिदिवशीं राजाजवळ मला गेलें पाहिजे होतें; पण बळेंच घेतलेल्या त्या दुखण्याचें निमित्त करून, कांहीं दिवस मी मुळींच गेलों नाहीं. नंतर, घेतलेल्या सोंगाची चांगली बतावणी होईल असें वाटलें तेव्हां एक दिवस आपलें हडप घेऊन राजाची हजामत करायला गेलों. वस्तारेबिस्तारे पाजळून मी त्याच्या जवळ गेलों तेव्हां, अत्यंत कृश व पांढरा फटिक झालेला असून वरचेवर ज्याचे श्वास निघताहेत, अशा मला वांकड्या दृष्टीनें पाहून; कांहीं हेतू मनांत आणून तो राजा मला ह्मणाला, "अरे बेट्या, तूं असा कां झालास? तुला कांहीं रोगबीग झाला आहे का? खरें काय असेल तें सांग."

माझी अवस्था पाहून, आपण बायको बळकावली ह्मणून याची अशी अवस्था झाली, असें राजाच्या मनांत आलें असावें; व आपल्या त्या दुष्ट कृत्याचा अभिमान आणि त्यासंबंधानें माझ्या विषयीं तिरस्कार यांचेंही त्यांत मिश्रण झालें असावें, असें मला वाटलें. त्याच्या पहिल्या प्रश्नाला मीं कांहींच उत्तर दिलें नाहीं; पण वरचेवर तो आग्रहपूर्वक विचारूं लागला तेव्हां—एकांतीं सांगतों महाराज, असें मीं ह्मटलें. तत्काळ त्यानें जवळच्या हुजऱ्याला दूर जायला सांगितलें. नंतर मी हळूच त्याला ह्मणालों, "सरकार काय सांगूं? मला या पायांकडे सांगण्याला मोठी लाज वाटते; पण हुकूम मोडतां येत नाहीं ह्मणून सांगतों. माझी बायको डाकिनी निघाली! प्रतिदिवशीं मी निजलों ह्मणजे

ती माझें आंग चोखून आंतलीं आंतडीं बाहेर काढते आणि पुष्कळ वेळ तीं चघळून जशासतशीं पुन्हां आंत घालते! यामुळें आंतला सर्व अन्नरस नाहींसा होतो. ह्मणून मी हा असा अस्थिचर्म झालों आहें. त्यांतून माझ्यासारख्या गरिबाचे येथें विशेष शक्ति येण्यासारखे उत्तम पदार्थ तरी कोठून असणार? जी कांहीं भाजीभाकर खातों; तिचा रस ती सटवी ओढून घेते. यामुळें माझी अशी दशा झाली आहे. हें कोणाला सांगून तरी काय उपयोग?"

याप्रमाणें माझें भाषण ऐकून राजाला शंका उत्पन्न झाली. बराच वेळ आपल्याशीं विचार करून तो मला ह्मणाला, "अरे, तूं हें काय सांगतोस? आणि हें अगदीं खरें आहे? खरोखरच ती डाकिनी आहे कारे?" यावर मीं पुन्हां—खरोखर ती डाकिनी आहे, असें सांगितलें. तेव्हां त्याला मोठा विचार पडला. त्याला माझें सारें बोलणें खरें वाटलें. नंतर, आपण तिच्यावर आसक्त झालों आहों व गोड गोड अन्न खाऊन आपलें शरीर चांगलें पुष्ट आहे, तेव्हां कदाचित् ती डाकिनी आपलींही आंतडीं चोखून घेईल असें वाटल्या वरून; त्याणें युक्तीनें या गोष्टीची शहानिशा करून घेण्याचा विचार केला. त्यादिवशीं मला तेथेंच जेवण देण्याविषयीं त्याणें हुकूम केला. नंतर माझ्या घरकरणीच्या संबंधाच्या आणखी बऱ्याच गोष्टी राजानें विचारल्या व मींही त्याचा तो ग्रह विशेष मजबूत होईल अशाच रितीनें त्या त्यास सांगितल्या.

याप्रमाणें मीं युक्तीनें राजाच्या मनांत विकल्प उत्पन्न करून; आपलें अर्धें काम पुरें केलें. आतां बायकोला असेंच कांहीं तरी सांगून तिच्या मनांत विकल्प उत्पन्न करण्याचें राहिलें. तें करण्याकरितां, राजवाड्यांत घाईघाईनें दोन घांस खाऊन तसाच मी परत आपल्या घराकडे आलों. राजाचें प्रीतिपात्र झाल्यापासून आमची घरवाली आमच्याशीं फारशी सलोख्यानें वागत नव्हती व मीही तिच्याशीं अधिक बोलत नव्हतों; पण त्यादिवशीं मीं मुद्दाम तिला अनुकूळ करून घेण्याचा प्रयत्न केला.

राजवाड्यांतून घरीं आलों तो प्रथम तिच्याजवळ जाऊन बसलों, आणि बळेंच डोळ्यांतून पाणी काढलें. कशी झाली तरी बायकोच ती ! मला पाहून तिला फार वाईट वाटलें. तिणें "काय झालें?" ह्मणून विचारलें. तेव्हां बराचवेळ आढेवेढे घेऊन मी तिला ह्मणालों; प्रिये, काय सांगूं? तुझ्याजवळ सांगायला मला कांहीं परकेपणा नाहीं; पण ही गोष्ट बाहेर मात्र फोडूं नकोस. नाहींतर माझा घात होईल. काय करावें, या आपल्या राजाला मूळव्याध किंवा तसलाच दुसरा कांहीं विकार झाला आहे. मूळव्याधीचे मोड येतात; पण याला त्याठिकाणीं वज्रासारखे दांत बाहेर आले आहेत ! लोकलज्जेस्तव राजा तें कोणाला सांगत नाहीं. आणि मी हजामत करायला गेलों ह्मणजे मला ते मोड कापून काढायला सांगतो. आजपर्यंत माझे किती वस्तारे मोडले याचा कांहीं ठिकाण नाहीं. आजच्या आज तीन हत्यारें अगदीं कामांतून गेलीं. असें जर वरचे-वर होऊं लागलें तर नवे नवे वस्तारे आणावे कोठून? ह्मणून मी रडतों. आमचा पोट भरण्याचा मुख्य रोजगार काय तो हाच, आणि त्याची तर अशी दशा झाली ! ह्मणून मला रडूं आलें. दुसरें कांहीं नाहीं.

बायकोला मीं याप्रमाणें हकीकत सांगितली ती तिणें मुकाट्यानें ऐकून घेतली. त्यावर तिणें कांहींच उत्तर दिलें नाहीं. वरचेवर वस्तारे मोडतील व त्यायोगानें माझें नुकसान होऊन मी दरिद्री होईन व त्या मुळें आपल्याला कठीण पडेल; याची तिला मुळींच काळजी नव्हती. कारण प्रत्यक्ष राजाची ती प्रीतिपात्र झालेली; मग तिला पोटापाण्याची कसली काळजी असणार? पण माझ्या सांगण्याचा दुसरा एक परिणाम झाला. प्रत्येक मनुष्याला जिज्ञासा उत्पन्न झाली ह्मणजे ती अनावर होत असते. राजाला जो रोग झाला आहे ह्मणून मीं सांगितलें तो खरोखरच तसा आहे कीं काय? हें पहावें असें तिच्या मनांत आल्याचें अनुमानावरून मला समजलें. तेव्हां मी आपलें काम झालें असें समजून खूष झालों.

तापसी बाई, मी वर सांगितल्याप्रमाणें दोघांला जे दोन मंत्र दिले होते ते खरोखरच असंभाव्य होते. कोणींतरी कधीं कोणाची आंतडीं चोखलीं आहेत का? किंवा मूळव्याधीच्या ठिकाणीं भयंकर दांत आलेले कोणीं ऐकले तरी आहेत का? पण त्या दोघांलाही त्याची प्रचिती पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली! तो तर प्रत्यक्ष राजाच! व माझी बायको हुषार होती, तरी बायकांचें शहाणपण तें कितीसें? त्यांला आंजारून गोंजारून युक्तीनें विनवण्या करणारा व गोष्ट बनवून सांगणारा कोणी भेटला मात्र पाहिजे. तो भेटल्यावर फसविण्यास वेळ तो कितीसा लागणार? असो.

याप्रमाणें दोघांचें कान फुंकून मी आतां पुढें काय होतें त्याची वाट पाहत बसलों. नंतर लवकरच सूर्य अस्ताला गेला. हळूहळू रात्र पडली व राजेसाहेबांचा येण्याचा वेळ झाला. तेव्हां, स्वारी नित्याप्रमाणें माझ्या घरांत शिरून त्यांणीं आमच्या स्त्रीशीं बराचवेळ विलास केले. व दिवसा मीं जें त्याला सांगितलें होतें; त्याची प्रचिती पाहण्याकरतां बळेंच आपल्यास झोंप आली असें दाखवून राजानें सुस्त निजल्याचें सोंग घेतलें. त्याला जशी माझ्या सांगण्याची आठवण होती व त्याचा खरेपणा पाहण्याविषयीं तो उत्कंठित झाला होता; तशीच माझ्या बायकोचीही स्थिती झाली होती. राजाला गाढ झोंप लागली असें पाहून तिणें हलकेच मूळव्याधीच्याठिकाणीं, त्याला खरोखरच दांत आले आहेत कीं काय? हें पाहण्याकरितां हळूहळू आपला हात तेथपर्यंत पोंचविला! मग काय विचारतां? माझें सांगणें खरें असा त्याला अनुभव आला. तेव्हां तत्काल तो भयभीत होऊन उठला, व "अरेरे! अरे बापरे!! ही खरोखर डाकिनी रे डाकिनी!" असें ह्मणत एकदम चालता झाला.

राजाप्रमाणें इकडे माझ्या बायकोचीही खातरी झाली. तिला असें वाटलें कीं; जर त्याला दांत आले नसते तर एकदम असें घाबरें होण्याचें कांहीं कारण नव्हतें. तें आपलें मर्म छपविण्याकरतांच तो घाबरा

होऊन निघून गेला! तात्पर्य, मीं जी युक्ति योजली तिचा चांगलाच उपयोग झाला. त्या दिवसापासून राजानें माझ्या बायकोचें नांव देखील घेतलें नाहीं. व तिचेंही त्याच्यावरचें मन उतरून गेलें. राजाची मर्जी तिच्यावर बसल्यामुळें ती पूर्वी फार चढून गेली होती; पण आतां तो संबंध तुटतांच ती ताळ्यावर आली. व माझ्याशीं आर्जवानें वागूं लागली. पूर्वी तिणें—"तुझा धंदा हलकट आहे, तुझें घरच चांगलें नाहीं, तुझ्या घरीं मला कांहींच सुख लागत नाहीं;" अशा अनेकरितीनें माझा छळवाद आरंभला होता. पण आतां तें सर्व सोडून ती असल्यांत मोठ्या संतोषानें माझ्यावरच भरीभार ठेवून वागूं लागली. तापसी बाई, याप्रमाणें आपल्या विलक्षण बुद्धिसामर्थ्यानें मीं त्या दुष्ट राजाच्या तावडींतून आपली बायको सोडवून घेतली. तेव्हां तूं सांगितलेलें काम माझ्या हातून होईल किंवा नाहीं याचा तूंच विचार करून पहा.

याप्रमाणें आपल्या शहाणपणाची तारीफ करून, तो धूर्त न्हावी त्या तापसीला पुनः म्हणाला, "बाई, तुझा इच्छित हेतू मोठ्या शहाणपणानें सिद्धीस नेला पाहिजे. आतां त्याविषयीं काय युक्ति योजावी व तिची योजना माझ्या मनांत कशी आली आहे ती तुला सांगतों ऐक. प्रथम, अत्यंत विश्वासाचा असून राजाच्या अंतःपुरांत राहणारा असा कोणीतरी पोक्त मनुष्य आपण अनुकूळ करून घ्यावा, आणि त्याच्याकडून राणी **कदलीगर्भा** ही डाकिनी आहे असें राजाला एकांतीं सांगवावें. तो सांगणारा मनुष्य **कदलीगर्भे**चाही विश्वासूक आहे असें राजाला वाटेल अशाप्रकारचा असला पाहिजे. आतां तसा मनुष्य आपल्याला कसा मिळेल याविषयीं काळजी करावयास नको. ती **कदलीगर्भा** एका जंगली मनुष्याची मुलगी आहे. तिच्या माहेराहून आलेला एकदेखील मनुष्य तिच्या जवळ नाहीं. सांप्रत जे तिच्या जवळ नोकर आहेत ते सारे येथलेच आहेत. लाभाच्या आशेनें ते तिच्याशीं विश्वासूकपणानें वागत असतील; पण तिच्या

जिव्हाळ्याचें असें त्यांत कोणीच नाहीं. तेव्हां त्यांतल्या एखाद्याला मोठा लाभ होण्याची आशा दाखविली ह्मणजे तो सहज फुटेल व त्याच्या द्वारें आमचें कार्य होईल. परकी मनुष्य लोभाला गुंतून काय काय करणार नाहीं?

याप्रमाणें राजाचे कान भरून त्याला आधीं **कदलीगर्भे**विषयीं साशंक करावा. आणि माणसाच्या हातांचीं, पायांचीं वगैरे हाडें युक्तीनें रात्रीं त्या **कदलीगर्भे**च्या महालांत ठेववावीं. प्रातःकालीं सहजच तीं राजाच्या दृष्टीस पडतील. व त्यावरून ती राणी जादूगीर आहे अशी त्याची आपोआप खातरी होईल. मग अर्थात् तो भयभीत होऊन तिचा नाद सोडील. राजेलोकांना आपल्या जिवाचें फार भय असतें. ते जादू, मंत्रतंत्र यांला फार भितात. तेव्हां याप्रमाणें तजवीज केली ह्मणजे त्याला **कदलीगर्भा** नकोशी होईल. व तिचा बिघाड झाला ह्मणजे, राणी **वसुमती** सुखी होईल. अर्थात् तुला तिच्याकडून मोठा लाभ होईल. आणि तुला कांहीं मिळालें ह्मणजे त्यांत आह्मांला वांटेकरी केल्यावांचून तूं राहणार नाहींस हें तर आहेच! तेव्हां एकंदरींत मी सांगतों अशी तजवीज करावी; ह्मणजे आपलें काम होईल."

याप्रमाणें त्या नापिकाचें बोलणें ऐकून ती दुष्ट तापसी उमेदींत आली. हावेळपर्यंत, आपलें काम होईल किंवा नाहीं; याविषयीं जी तिच्या पोटांत धास्ती होती ती आतां नाहींशी झाली. **कूटदासानें** सांगितलेली तजवीज अवश्यमेव कार्यसिद्धी करणारी आहे असें तिला वाटलें. नंतर—"तूं सांगतोस त्याप्रमाणेंच करावें. तुझ्यापेक्षां मला बायकोमनुष्याला अधिक काय समजतें? तुला जें बरें दिसेल तें कर, पण कसेंही करून राणीचें काम लवकर होऊंदे ह्मणजे झालें," असें सांगून तिणें त्याचा निरोप घेतला. ती परत आपल्या मठीकडे न जातां लौकर लौकर राणी **वसुमती**ला ही हकीकत सांगायला गेली. त्या तापसीला यावेळीं इतकी कांहीं गडबड झाली

होती कीं, ती मसलत तिच्या पोटांत मावेनाशी झाली. तिणें **वसुमतीला** आपला आणि त्या धूर्त न्हाव्याचा काय बेत ठरला आहे तें सर्व सांगितलें. आणि, **कदलीगर्भे**च्या विश्वासांतला असून राजाला मान्य होण्यासारखा कोणी तरी अंतःपुरांतला नोकर वश करून घेऊन; त्याच्याकडून राजाचें मन दूषित करण्याचा प्रयत्न करण्याविषयीं सांगितलें. खरोखर, ह्या जगांत जीं जीं दुष्ट मनुष्यें दिसतात तीं तीं जन्मापासूनच तशीं असतात असें नाहीं; तर बहुतकरून दुष्टांच्या संगतीनें तीं तशाप्रकारचीं बनतात. राणी **वसुमती**सारख्या सुशील स्त्रीला असें भलतेंच कुभांड रचण्याची बुद्धी सुचावी, हा केवळ दुःसंगतीचा परिणाम आहे. याकरतां प्रत्येक मनुष्यानें ज्याची संगती करावयाची अथवा ज्याच्याजवळ हितगूज सांगावयाचें त्याची पुरी परीक्षा करून मग तसें केलें पाहिजे. असो. त्या खव्याळ तापसीनें जी मसलत सांगितली ती राणी **वसुमतीला** फार पसंत पडली. तिणें तत्काल ओंजळभर मोहोरा त्या कवटाळणीच्या ओच्यांत टाकल्या. व "काम फत्ते झाल्यावर बोलल्याप्रमाणें मी तुह्मां सर्वांला खूष करीन," असें सांगून व वरचेवर तिला आपणास भेटण्याविषयीं आणाशपथा घालून निरोप दिला. ती तापसी निघून जातांच राणीनें **कौसल्य**नांवाचा एक विश्वासू खवास होता त्याला बोलावून आणला. त्याला त्याचवेळीं कांहीं बक्षीस देऊन पुन्हां मोठें बक्षीस मिळण्याची आशा लावली. व ही गुप्त गोष्ट फोडणार नाहीं याबद्दल त्याच्याकडून पक्की खातरी करून घेऊन, त्या धूर्त न्हाव्यानें सांगितल्याप्रमाणें राजाचें मन दूषित करण्याविषयीं प्रयत्न करण्यास त्यास सांगितलें.

बिचाऱ्या **कदलीगर्भे**चें जिव्हाळ्याचें असें कोणीच तेथें नव्हतें, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हा **कौसल्य** तिच्या तैनातींत असून ती त्याला विशेष विश्वासूक असें समजत होती. त्याणेंच द्रव्यलोभाला गुंतून तिचा घात करण्याचा प्रयत्न सुरू केला! एकेदिवशीं **कदलीगर्भा**

रात्रीं स्नानास गेली आहे व राजा एकटाच तिच्या महालांत आहे असें पाहून त्या दुष्ट खवासानें हळूच राजाला ती ( **कदलीगर्भा** ) डाकिनी आहे. व ती अनेकप्रकारचीं जादू वगैरे कृत्यें करते असें सांगितलें. दुसऱ्या कोणी मनुष्यानें सांगितलें असतें तर त्याला तें कदाचित् खरें वाटलें नसतें. पण **कौसल्य** हा तिचा अगदीं प्रीतींतला व नेहमीं जवळ राहणारा नोकर असून त्याणें सांगितलें तेव्हां यांत कांहीं तरी खरें असावें असें राजास वाटलें. इकडे, याविषयींचा कसा खुलासा होईल? या विचारांत राजा घोटाळत आहे तों दुसरीकडे, जादू करणाऱ्या लोकांला अवश्य लागणारे कांहीं पदार्थ ह्मणजे—मनुष्यांचीं हाडें, रक्त, लिंबें, सुया, शेंदूर, सुरा इत्यादि; सहज राजाच्या दृष्टीस पडतील अशी त्याणें तजवीज ठेविली.

यावेळीं राजाचें मन अस्वस्थ झालें होतें. तो खवासानें सांगितल्या गोष्टीचा प्रत्यय कसा घ्यावा? याचा विचार करीत इकडे तिकडे फिरत होता. फिरतां फिरतां सहज ते पदार्थ त्याला दिसले. तेव्हां तर त्याची पक्कीच खातरी झाली. मग काय विचारतां? राजेलोक ह्मटले ह्मणजे बहुतकरून लहरी असायचे. स्वस्थपणानें कोणत्याही गोष्टीचा विचार करण्याइतकें मानसिक धैर्य त्यांला कोठून असणार? **कदलीगर्भा** प्रत्यक्ष त्याच्या जवळ आहे, रात्रंदिवस दोघेंही एकेच ठिकाणीं रहात आहेत, त्यांतून तिचें वर्त्तन किती शुद्ध व सरळ आहे हें सर्व माहित असतांही राजाचें मन तिच्याविषयीं दूषित झालें! त्याणें ती खरोखरच डाकिनी आहे असें समजून तत्काल तिचा त्याग केला!

जसा तो पूर्वी रात्रंदिवस तिच्यावर आसक्त झाला होता तसाच सांप्रत तिच्याविषयीं अगदीं निरिच्छ झाला. त्याणें तिचा त्याग केला त्याघटकेपासून तिचें नांवदेखील घ्यायचें सोडलें. अर्थात् राजेसाहेबांच्या प्रीतीचा ओघ पूर्ववत् आपल्या जनानखान्याकडे वळला. त्यायोगानें राणी **वसुमतीला** किती हर्ष झाला याचें वर्णनदेखील करतां येत

नाहीं. ज्या दुष्ट प्रव्राजिकेच्या मसलतीनें ही गोष्ट घडली तिला तर **वसुमतीनें** न्याहाल केली. तिनें जें जें मागितलें तें तें राणीनें दिलें. राणीकडून त्या दुष्ट तापसीला प्रतिदिवशीं कांहींतरी नवा नजराणा मिळतच होता. तापसीनें आपला मित्र जो **कूटदास** त्याला त्याचा वांटेकरी करून त्या दोघांनींही त्या वेड्या राणीला यथेच्छ लुटण्याची सुरवात केली! उघडच आहे. श्रीमंतांचा पैसा बहुतकरून अशा लोकांच्याच वांट्यास जाणारा असतो.

इकडे, बिचाऱ्या **कदलीगर्भेनें** बरेच दिवस तेथें दुःखांत काढले. राजा एकवेळ तिच्या महालांतून गेला तो परत मुळींच आला नाहीं. तरी; आज येईल, उद्यां येईल, दोन दिवस आपल्या पहिल्या बायकांच्या सहवासांत राहिला ह्मणून काय झालें. नेहमीं आपल्याकडेच त्याणें असावें अशी तरी आपण कां इच्छा करावी. त्याला साऱ्या स्त्रिया सारख्याच. सर्वांलाही पतिसमागमाचें सुख लाभलेंच पाहिजे; इत्यादि प्रकारें आपल्या मनाची समजूत करून ती त्याच्या भेटीची आशा करीत राहिली. पण फार दिवस झाले तरी त्याणें आपल्याकडे ढुंकून देखील पाहिलें नाहीं. तेव्हां आतां त्याला आपण नकोशी झालें, अशी जेव्हां तिच्या मनाची खातरी झाली तेव्हां मात्र ती निराश झाली. नवऱ्याच्या येथून तोंड काळें करून माहेरीं जाणें याची बायकांला मोठी लाज वाटते. ह्मणून ती तेथेंच दिवस काढण्याचा विचार करीत होती; पण राजेसाहेबांच्या मर्जींतून उतरतांच तिच्याकडे कोण पहाणार? चहुंकडून अभिश्राप ऐकूं येऊं लागले. ज्यांणीं त्यांणीं निंदा करावी; अपमान करावा; असें होऊं लागल्यामुळें तिला बापाकडे जाणें भाग पडलें. एकेदिवशीं ती अवेळीं कोणास न कळवितां आपल्या महालांतून बाहेर पडली. व ज्या रस्त्यानें आली होती, त्याच रस्त्यानें ती माहेराकडे निघाली. खुणेकरतां येतेवेळीं तिणें ज्या मोहऱ्या पेरल्या होत्या त्यांचीं मोठमोठीं झाडें बनलीं होतीं. त्यांवरून माग

काढीत काढीत ती थेट आपल्या बापाच्या आश्रमांत येऊन पोंचली. मुलगी एकाएकीं दृष्टीस पडतांच **मंकणका**ला प्रथम मोठा आनंद झाला. पण तिच्या बरोबर कांहीं परिवार नाहीं, अन्नपाण्यावांचून व्याकूळ झालेली, व दुःखानें आणि अपमानानें निस्तेज झालेली, अशी तिची स्थिती पाहून **मंकणका**ला फार वाईट वाटलें. हिच्या हातून कांहीं तरी वाईट वर्तन झालें असेल ह्मणून राजानें हिला आपल्या घरांतून काढून दिलें असावें, अशी शंका आल्यावरून तो कांहींवेळ स्तब्ध बसला. नंतर तपाच्या सामर्थ्यानें दिव्यदृष्टीनें त्याणें झालेली सर्व हकीकत जेव्हां समजून घेतली, तेव्हां त्याचें मन शुद्ध झालें. व तत्काल प्रेमाचे पाझर फुटून त्याचा गळा भरून आला. नंतर **कदली-गर्भे**ला प्रेमपूर्वक आपल्या मांडीवर बसवून त्याणें तिचें समाधान केलें.

आहार न मिळाल्यामुळें भुकेनें तिचे प्राण डोळ्याकडे आले होते. **मंकणका**नें तिला कंद मूळें वगैरे खायला घालून तो दिवस विश्रांति घेण्यांत घालविला. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालचा आपला नित्य नेम आटपून **कदलीगर्भे**सहवर्तमान तो ऋषि राजा **दृढवर्मा** याच्या नगरी-कडे निघाला. लौकरच जांवयाचे येथें पोंहचून त्याणें स्नेहपूर्वक त्याला दोन गोष्टी सांगितल्या. आपल्या मुलीचा त्याग केला यांत स्वतः जांव-याचा कांहीं अपराध नाहीं ; असें त्याला समजून आलें होतें. ह्मणून **मंकणका**नें त्याच्यावर रोष काढला नाहीं. राजा **दृढवर्मा**ही शिष्याप्रमाणें नम्रपणें त्याची आज्ञा मान्य करण्यास तयार झाला होता, तरी त्याच्या मनांत आलेली शंका गेली नव्हती. हें समजून **मंकणका**नें झालेला सर्व वृत्तांत त्याला सांगितला. व राणी **वसुमती**नें सवतीमत्सर करून हें सारें कपटनाटक केलें आहे अशी **दृढवर्म्या**ची त्याणें खातरी केली.

**कूटदास** न्हावी हा मोठा धूर्त होता हें वर सांगितलेंच आहे. राजा व राणी **वसुमती** या दोघांचाही आपण हितकर्ता व्हावें, असा त्याणें पूर्वींच बेत केला होता. **कदलीगर्भे**च्या संबंधानें राजवाड्यांत

काय काय होत आहे तें समजून घेण्याविषयीं तो एकसारखा टपलेलाच होता. **मंकणक** ऋषि आला व त्याणें सारें कपट उघड केलें हें समजतांच तो स्वतः **दृढवर्म**राजाजवळ गेला. आणि ऋषीच्या देखत झालेलें इत्थंभूत वर्तमान सांगून ह्मणाला, "महाराज, माझ्या हातून ही गोष्ट झाली खरी; पण मला याची क्षमा असावी मी कपटयुक्ति योजून जादूच्या निमित्तानें आपल्या धाकट्या राणीसाहेब यांचा आणि आपला वियोग करण्याचा प्रयत्न केला. व थोरल्या राणीसाहेब आपल्या जिवावर अगदीं उदार झाल्या होत्या त्यांच्या मनासारखें करून त्यांना खूष केलें. यावरून मीं जें केलें त्यांत माझा हेतू चांगला होता किंवा नांहीं याचा सरकारच विचार करतील. मीं असें केलें नसतें तर थोरल्या राणीसाहेब खरोखर आत्महत्या करून घेत्या."

याप्रमाणें त्या नापितानें सर्व गोष्टी आपण होऊन सांगितल्या तेव्हां **मंकणकानें** जें सांगितलें त्याविषयीं राजाची पुर्ती खातरी झाली. प्रत्यक्ष अनुभव आल्यावरून **कदलीगर्भे**विषयीं आलेली शंका नाहींशी झाल्यामुळें त्याणें प्रेमपूर्वक तिचा स्वीकार केला. मुलीवर आलेला आळ गेला व जांवयानें तिला घेतली, हें पाहून **मंकणकाला** फार आनंद झाला. राजानें दूरवर त्याला पोंचवायला जाऊन आपली निष्ठा व्यक्त करून दाखविली. नंतर त्याला आशीर्वाद देऊन ऋषि परत आपल्या आश्रमांत गेला. इकडे त्या धूर्त नापिताचें चांगलेंच काम साधलें. व हा आपला मोठा इमानी चाकर आहे; असें समजून राजानें त्याला पुष्कळ बक्षीस दिलें. उघडच आहे, थोरांच्या ऐश्वर्याचे वांटेकरी बहुतकरून धूर्तच असतात. असो. याप्रमाणें आलेलें किटाळ जाऊन राजाची **कदलीगर्भे**वर पूर्वीप्रमाणें मर्जी बसली. व तीं उभयतां खुशाल आनंदांत दिवस घालवूं लागलीं. त्या दिवसापासून राणी **वसुमती** हिच्यावर **दृढवर्म**राजाची फारच इतराजी झाली व **कदलीगर्भे**वर निःसीम प्रीति बसली.

ही कथा सांगून **सोमप्रभा** म्हणाली, "गडे **कलिंगसेने**, सवती अशाप्रकारचीं अनेक कुभांडें रचतात. खोटेंच दोष उत्पन्न करितात. म्हणून मला फार काळजी वाटते. तूं अद्याप कुमारी आहेस. लग्नाचा मुहूर्त सहा महिने दूर आहे. पाहिजे तेथें व पाहिजे त्या वेषानें जाण्यास समर्थ असे देव तुझ्याविषयीं टपत आहेत. तेव्हां पुढें कसें होईल हें माझ्यानें कांहीं सांगवत नाहीं. आतां दुसरा कांहीं एक उपाय नाहीं. लग्नाचा मुहूर्त येईपर्यंत तूं मोठ्या सावधगिरीनें सर्वप्रकारें आपलें आपणच रक्षण कर. तूं या सर्व त्रैलोक्यांत एक रत्न असून तें **वत्सराजाला** आपलें आपणच अर्पण केलें आहेस. म्हणून मी तुला सांगतें, कीं हा तुझ्या रूपगुणादिकांचा जो उत्कर्ष आहे तोच तुझा वैरी आहे. आतां माझ्यानें वरचेवर तुझ्याकडे येववणार नाहीं. सांप्रत तूं आपल्या पतीच्या मंदिरांत आहेस. म्हणून मला येण्याचा प्रतिबंध आहे. कारण, आपल्या सखीच्या नवऱ्याच्या घरीं साध्वी स्त्रिया सहसा जात नाहींत. आजच मला माझ्या पतीनें नको म्हणून सांगितलें होतें; पण आजच्या पुरती त्यांची आज्ञा घेऊन मी येथें आलें. पतीला न कळतां येथें यावें तर तेंही होण्यासारखें नाहीं. कारण, तो दिव्यदृष्टी आहे. त्याला कदाचित् दिसेल तर मोठा अनर्थ होईल. तुझ्यावर माझा अत्यंत लोभ असल्यामुळें मी आज तुझा शेवटचा निरोप घेण्याकरतां त्याच्या परवानगीनें कशी तरी आलें. तर आतां मला निरोप दे. तुझ्या भेटीवांचून माझें येथें कांहींएक काम नाहीं. मी आतां घरीं जातें. इकडे येण्याविषयीं आणखी एकवेळ मी आपल्या पतीला विनंती करून पाहीन. त्याणें जर आज्ञा दिली, तर लाजबीज एका बाजूला ठेवून मी तुझ्याजवळ येत जाईन. नाहीं तर माझा काय उपाय?" याप्रमाणें **कलिंगसेनेला** सांगून, जिच्या गालावरून अश्रूंचे ओघळ चालले आहेत, अशी **सोमप्रभा** राजकन्या **कलिंगसेना** हिला कडकडून मिठी मारून बसली. तिणें फारवेळ सखीच्या भेटीचें सुख

अनुभवलें. व नंतर तिचें समाधान करून ती **मयासुराची** कन्या **सोमप्रभा** आपल्या भर्त्याच्या घराकडे निघून गेली.

याप्रमाणें जिणें आपला देश, आप्तसंबंधी, आईबाप वगैरे सर्वांचा त्याग केला आहे व प्रियसखी **सोमप्रभा** हिचें जिला वरचेवर स्मरण होत आहे, अशी **कलिंगसेना** कळपांतून चुकलेल्या हरिणीप्रमाणें अस्वस्थ झाली. **वत्सराजाशीं** विवाह व्हावा या आशेवर तिणें घरादाराचा त्याग करून परदेशांत अनोळखी ठिकाणीं येण्याचें धाडस केलें. पण तोही मुहूर्ताची अडचण येऊन लांबणीवर पडला. यामुळें क्षणोक्षणीं तिच्या मनांत अनेक तरंग येऊं लागले. मुहूर्त लांबणीवर टाकणाऱ्या जोश्यांच्या नांवानें ती बोटें मोडूं लागली. इकडे **वत्सराजालाही** त्यांच्याविषयीं विशेष असूया उत्पन्न झाली. एकंदरींत त्याचा अगदीं हिरमोड झाल्यासारखा झाला. राजकार्याकडे तर त्याचें मुळींच लक्ष्य लागलें नाहीं. तो दिवस त्याणें कसातरी घालविला, आणि रात्रीं राणी **वासवदत्ता** हिच्या महालांत गेला. आपण **कलिंगसेनेशीं** विवाह करून घेण्यास तयार झालों आहों, हें वर्तमान राणीला खचित समजलें असेल व त्याबद्दल ती आपल्याला आज घालून पाडून बोलेल, असंतोष दाखवील, असें कांहीं तरी आज होणार अशी राजाच्या मनांत शंका होती. पण **यौगंधरायणानें वासवदत्तेला** जो मंत्र दिला होता त्याच्या योगानें राजाला वाटत होतें तसें कांहींच झालें नाहीं.

**वत्सराज** जेव्हां महालांत आला तेव्हां, जणूं काय **कलिंगसेनेच्या** विवाहाची गोष्ट आपल्याला माहितच नाहीं, असें दाखवून राणीनें पूर्वीप्रमाणें त्याच्याशीं मोठ्या संतोषानें वर्तन केलें. या दिवशीं तिणें विशेष जो आदर उपचार केला तो नेहमींपेक्षां कांहीं अधिकच होता असें ह्मटलें तरी चालेल. ती तिची निर्विकार स्थिती पाहून राजाला मोठा अचंबा वाटला. तो मनांत ह्मणाला, **कलिंगसेनेचा** वृत्तांत

हिला खास कळल्यावांचून तर राहिला नाहीं. असें असून ही आज अगदीं निर्विकार आहे हें काय? कदाचित् मी तिच्याशीं लग्न करून घेणारच हें हिला अद्याप कळलें नसलें तर कोणास ठाऊक? याकरितां आपण मुद्दाम तें सांगून हिची परीक्षा पहावी. असा विचार करून **वत्सराज वासवदत्ते**ला ह्मणाला, "प्रिये, **कलिंगसेना** नांवाची राजकन्या मला वरण्याकरितां आपण होऊन येथें आली आहे, हें तुला कळलें आहे का?"

हा प्रश्न ऐकून आपली चर्या बिलकूल न बदलूं देतां **वासवदत्ता** ह्मणाली, "होय, तें मला केव्हांच समजलें. पण त्यापासून मला मोठा आनंद झाला आहे. ती केवळ राजकन्या नव्हे, साक्षात् लक्ष्मीच आपल्या घरीं आली आहे, असें समजलें पाहिजे. आपण तिच्याशीं विवाह करून घेतला, ह्मणजे मुलीच्या ओढ्यानें तिचा बाप **कलिंगदत्त** ह्याही आपला हितकर्ता होईल. मीं असें ऐकलें आहे कीं, तिचा बाप हा एक मोठा बलाढ्य राजा आहे. तो आपल्याला वश झाला ह्मणजे अर्थात् सारी पृथ्वी आपल्या सत्तेंत राहील. स्वतः माझ्याविषयीं जर ह्मणाल, तर आपल्याला ज्यापासून सुख होईल व आपला ज्यानें उत्कर्ष होईल त्यापासून मला सुख होणारच आहे. हें ह्मणजे आपल्याला मीं आतां सांगितलें पाहिजे असें नाहीं. यापूर्वीं असे (विवाहाचे) प्रसंग आले त्यावेळीं मी कशी वागलें तें आपल्याला माहितच आहे. दुसरें असें आहे कीं, **कलिंगसेने**शीं लग्न करून घेतलें तर त्यापासून माझा मोठेपणाच आहे. दुसरे शेंकडों राजे ज्यांच्याविषयीं सारखी लाळ घोटीत आहेत अशा सुंदर राजकन्या आपण होऊन माझ्या प्रियभर्त्याला वरायला येतात, तेव्हां मी धन्य नाहीं काय? आणखी पाहिजे तितक्या स्त्रिया झाल्या तरी माझा मान आहे तो आहेच. तेव्हां **कलिंगसेने**चा हेतू अवश्य पूर्ण करावा. मला त्यापासून सर्वप्रकारें संतोषच आहे."

याप्रमाणें **यौगंधरायणानें** पढवून ठेविलेल्या राणी **वासवदत्ते**चें

अनुकूल भाषण ऐकून **वत्सराजाला** मनापासून संतोष झाला. नंतर तिच्यासहवर्तमान आणखी इकडच्या तिकडच्या गोष्टी करून यथेच्छ मद्य प्राशन करून विलास करीत होत्साता राजा त्या रात्रीं तेथेंच राहिला. लवकरच उभयतांलाही गाढ झोंप लागली. मध्यरात्र उलटून गेल्यावर राजा एकाएकीं जागा झाला. थोड्यावेळानें त्याणें बराच प्रयत्न केला पण पुन्हां झोंप मुळींच आली नाहीं. तेव्हां तो एकटाच विचार करीत बसला. **वत्सराजानें** आणखी पुष्कळ बायका केल्या होत्या. व सांप्रत **कलिंगसेने**विषयीं तयारी चालली होती. असें होतें तरी त्याची खरी प्रीति **वासवदत्ते**वरच होती. चैनीकरतां तो दुसऱ्या बायकांच्या नादांत असे. तरी **वासवदत्ते**ला अप्रसन्न करावी ही गोष्ट मनापासून त्याला इष्ट वाटत नव्हती. राणीनें **कलिंगसेने**च्या स्वयंवराविषयीं आपली पूर्ण संमति दाखविली होती तरी याचें पुढें कसें होईल, याविषयीं राजाला फिकीर पडली होती. तो आपल्याशींच ह्मणाला, ही राणी ( **वासवदत्ता** ) खरोखर मोठ्या उदार मनाची आहे. ही नेहमीं माझ्याशीं अनुकूळ वागते. **कलिंगसेने**सारख्या नांवाजलेल्या सुंदर स्त्रीला देखील आपली सवत करून घेण्यास ही तयार झाली तेव्हां आतां काय बाकी राहिलें. पण या बिचारीच्यानें ती सवत कशी साहिली जाईल हें मात्र सांगवत नाहीं. **पद्मावती**शीं विवाह केला त्यावेळीं हिची काय स्थिती झाली होती ! सुदैवानें हिनें प्राणत्याग केला नाहीं एवढेंच काय तें. तेव्हां **कलिंगसेने**च्या स्वयंवरापासून हिचें जर कांहीं अनिष्ट झालें तर आपला सर्वस्वीं नाश होईल. माझा पुत्र, सासूसासरे, मेव्हणे, आप्तसंबंधी वगैरे सर्वांला काय तो हिचा टेका आहे. **पद्मावती**देखील हिच्यावरच अवलंबून आहे. फार काय सांगावें. सारें राज्यच हिच्या आधारावर आहे, ह्मटलें तर कांहीं चिंता नाहीं. आज ही मला आपली संमति देते ; पण पुढें कठीण पडेल. अद्याप कांहीं संबंध घडला नाहीं तोंच त्या **कलिंगसेनेनें** मला वेड लावलें आहे. मग

लग्न झाल्यावर तर मी रात्रंदिवस तिच्या नादांत दंग होईन. तेव्हां हिच्यानें तें कसें सहन करवेल? अर्थात् मोठा अनर्थ उत्पन्न झाल्या-वांचून राहणार नाहीं. याकरितां **कलिंगसेनेशीं** आपण विवाह करून घ्यावा किंवा काय याची मोठी पंचाईतच आहे.

**वत्सराज** याप्रमाणें फार वेळ आलोचन करीत बसला होता. इत-क्यांत नित्यनियमाची वेळ झाल्यावरून तो बिछान्याचा त्याग करून तेथून निघाला. स्नानसंध्या, देवदेवतार्चन इत्यादि नित्यनेम आटप-ल्यावर आवश्यक राजकार्यें पाहून त्याणें भोजन केलें. नंतर वाम-कुक्षी करून आणखी कांहीं कामकाज पाहून तिसऱ्या प्रहराच्या सुमारास तो **पद्मावती**च्या महालांत गेला. तेथेंही त्याला **वासवदत्ते-**प्रमाणेंच तिची परीक्षा पहायची होती. **यौगंधरायणा**च्या सांगण्यावरून **वासवदत्तेनें** तिला पूर्वींच शिकवून ठेविलें होतें. ह्मणून राजा येतांच नित्यापेक्षां विशेष त्याचा आदर सन्मान करून जसें **वासवदत्तेनें** त्याला सांगितलें तसेंच **पद्मावतीनें**ही **कलिंगसेने**च्या विवाहाविषयीं आपलें अनुमत दिलें. नंतर राजानें ती रात्र तेथेंच पान, भोजन, क्रीडा, शयन इत्यादिकांनीं मोठ्या आनंदांत घालविली.

दुसऱ्या दिवशीं उभयतां राण्यांनीं आपलें पूर्ण अनुमोदन दिलें, ही गोष्ट राजानें **यौगंधरायणाला** सांगितली. व दोघींचाही अगदीं एक विचार, एकप्रकारचेंच भाषण, मनाची स्थितीही एकसारखीच असें असण्याचें कारण काय, असा प्रश्न केला. यावेळच्या त्याच्या भाषणावरून **कलिंगसेनेशीं** विवाह करून घेण्याबद्दल पूर्वीं जी त्याची विशेष आतुरता दिसत होती ती आतां अंमळ शिथिल झाली आहे; व तिच्याशीं विवाह करून घ्यावा किंवा न घ्यावा याविषयीं त्याला विचार पडला आहे; हें **यौगंधरायणा**च्या लक्ष्यांत आल्यावरून त्याला अंमळ बरें वाटलें. कोणत्यावेळीं कसें बोलावें हें तर त्याला सांगा-यला नकोच होतें. यावेळीं आपण कांहीं प्रतिकूळ बोललों तर त्याचा

उपयोग होईल, असें समजून **यौगंधरायण** ह्मणाला, "महाराज, त्या दोघी राण्यांनीं आपल्याला कदाचित् अनुमत दिलें असेल; पण तें मनापासून दिलें नसावें असें वाटतें. त्यांनीं वरकांती गोड गोड भाषण केलें असेल; पण त्यांच्या मनांतला हेतू मोठा भयंकर असावा असें दिसतें. त्या कांहीं प्रतिकूळ बोलल्या असत्या तर तें बरें होतें. अनुकूळ बोलल्या हेंच वाईट. यावरून मला तर असें वाटतें कीं; त्यांनीं प्राणत्याग करण्याचा पक्का निश्चय केला असावा. ह्मणूनच त्या अशा गोड बोलल्या. पति अन्य स्त्रीवर आसक्त झाला अथवा परलोकवासी झाला तर दोहोंचेंही स्त्रियांला सारखेंच दुःख वाटतें. तशा प्रसंगीं बहुतकरून त्यांचा मरण्याचा निश्चय असतो. आणि मग त्या दैन्य मुळींच दाखवीत नाहींत. सर्वत्र निस्पृह होऊन मोठ्या गंभीरपणानें पतीला अनुकूल अशाच त्या वागतात. साध्वी स्त्रियांचें दृढ प्रेम खंडित झालें तर तें त्यांना कधींही सहन होत नाहीं. याविषयीं उदाहरणार्थ **श्रुतसेनाची** कथा सांगतों ती ऐकून घ्यावी महाराज.

दक्षिण देशांत **गोकर्ण**[१] नांवाच्या शहरांत **श्रुतसेन** नावानें प्रख्यात मोठा कुलीन व विद्यासंपन्न असा एक राजा होता. त्याला बाकी सर्व गोष्टी अनुकूल असल्यामुळें दुसऱ्या कशाचीही चिंता नव्हती. आपल्याला अनुरूप अशी स्त्री हा काळपर्यंत मिळाली नाहीं, याचीच कायती त्याला काळजी होती. याप्रमाणें तो राजा स्त्रीविषयीं चिंता करीत असतां एकेदिवशीं तो आपल्या सभेंत बसला आहे; व बायकोच्याच संबंधाच्या कांहीं गोष्टी चालल्या आहेत अशा प्रसंगीं, गोष्टीवर

---

१—सांप्रत दक्षिणेंत समुद्रातिरीं गोकर्ण नावांचें एक स्थान प्रसिद्ध आहे. हें फार प्राचीन असून पुराणादिकांत पुष्कळठिकाणीं याच्या नांवाचा उल्लेख आहे. तरी तें एक राजधानीचें शहर होतें असें कोठेंही आढळत नाहीं. जेथें तेथें क्षेत्र ह्मणून त्याची प्रसिद्धी आहे. येथें मुळांत गोकर्णपुर असें ह्मटलें आहे तेव्हां तें कदाचित् दुसरें एकादें असेल तर कोणास ठाऊक?

गोष्ट निघतां निघतां अग्निशर्मा नांवाचा ब्राह्मण—जो पुष्कळ तीर्थयात्रा करून नुकताच आला होता तो—राजाला म्हणाला, "महाराज, मी तीर्थयात्रेला गेलों होतों. त्यांत अनेक गोष्टी माझ्या पाहण्यांत आल्या; पण त्यांत जे दोन चमत्कार मीं पाहिले त्यांणीं अद्याप माझें मन थक्क करून सोडलें आहे. यात्रा करतां करतां मी **पंचतीर्थी** या नावानें प्रसिद्ध असलेल्या ठिकाणीं गेलों. जेथें पांच अप्सरा ऋषींच्या शापानें सुसरी होऊन पडल्या होत्या, व ज्यांचा तीर्थयात्रेला गेलेल्या अर्जुनानें उद्धार केला त्या ठिकाणीं मी गेलों होतों. तेथें पांच तीर्थें आहेत ह्मणूनच त्याला पंचतीर्थी ह्मणतात. तेथें स्नान करून पांच रात्री उपवास करून मी राहिलों. तेथें पंचरात्र उपवास केला असतां साक्षात् नारायणाचें अनुचरत्व मिळतें, असें त्यांचें माहात्म्य वर्णन केलें आहे. तेथला तीर्थविधि आटपून मी तेथून पुढें निघालों. वनश्रीची शोभा पहात पहात मी चाललों आहें; तों

---

१—या पंचतीर्थीच्या संबंधानें महाभारत आदिपर्वांत अध्याय २१६ व २१७ यांत सविस्तर कथा वर्णन केली आहे. अर्जुन तीर्थयात्रा करीत असतां दक्षिण समुद्राच्या किनाऱ्यावरचीं तीर्थें करीत करीत तो या पंचतीर्थीवर आला. तेथें तापसांनीं नको नको ह्मटलें असतांही—अगस्त्य, सौभद्र, पौलोम, कारंधम आणि भारद्वाजीय—या नांवाच्या त्या पांच तीर्थांपैकीं सौभद्र तीर्थांत तो स्नान करायला उतरला. तेथें वर्गा, सौरभेयी, समीची, बुद्बुदा आणि लता नांवाच्या पांच अप्सरा पूर्वीं ऋषिशापानें त्या पांच तीर्थांत पांच सुसरी होऊन पडल्या होत्या. त्यांपैकीं सुसर झालेल्या वर्गा नांवाच्या अप्सरेनें अर्जुनाचा पाय धरला. तरी त्याणें तिला तशीच वर ओढून काढली. तेव्हां तत्काळ ती पूर्वरूपाला प्राप्त झाली. नंतर तिणें आपल्याला शाप वगैरे कसा झाला तें सांगून, 'जो तुह्माला पाण्याच्या वर ओढून काढील त्याच्यापासून तुह्मी शापमुक्त व्हाल' असा त्याच ऋषीनें उःशाप दिला होता, ह्मणून आपण मुक्त झालें असें सांगून बाकीच्या चौघी अप्सरांचा उद्धार करण्याविषयीं विनंती केली. व त्याप्रमाणें अर्जुनानेंही त्या सर्वांला शापमुक्त केलें. ही पंचतीर्थी सांप्रत कोणत्या नांवानें प्रसिद्ध आहे; तें बरोबर समजत नाही. भारतांत जें वर्णन केलें आहे, त्यावरून ही दक्षिणसमुद्राच्या किनाऱ्यावर होती यांत कांहीं संशय नाहीं. त्यांला पंचतीर्थी, अप्सरस्तीर्थें, नारीतीर्थें इत्यादि अनेक नांवें दिलेलीं आहेत.

भांगरानें जमीन उकरीत असून त्यांतच चैनीनें गात आहे असा एक शेतकरी एका शेतांत मीं पाहिला. इतक्यांत त्या वाटेनें एक संन्याशी आला. व त्याणें त्याला 'हा मार्ग कोणीकडे जातो?' ह्मणून विचारिलें. शेतकरी आपल्या गाण्याच्या नादांत चूर झाला होता. संन्याशानें पुनःपुन्हां विचारलें; तरी त्याणें तें ऐकलेंदेखील नाहीं. तेव्हां—ह्या बेऱ्यानें आपला अपमान केला, असें समजून स्वामिमहाराज लाल झाले. त्यांणीं त्याला बरेच वाग्बाण मारले. तेव्हां गाण्याचा नाद सोडून तो शेतकरी त्या संन्याशाला ह्मणाला, "अहो, तुह्मी सर्व कर्मांचा न्यास करून संन्याशी झालां. हीं भगवीं वस्त्रें अंगावर घेतलीं. तीर्थयात्रा करीत फिरतां आहां. इतकें सगळें केलें; तरी तुह्माला धर्माच्या स्वरूपाचा एक तुकडादेखील समजला नाहीं असें वाटतें! अहो मला विद्या नाहीं, अक्षर नाहीं, या बैलांपैकींच मी एक दोन पायांचा बैल असें ह्मटलें तरी हरकत नाहीं. इतका मी अडाणी असूनही मला जें धर्माचें सार समजलें आहे, त्यांतलें तुह्माला कांहींच समजलें नाहीं हा मोठा चमत्कार आहे बुवा! महाराज, मीं असें ह्मटलें ह्मणून रागावू नका. आह्मा अडाणी लोकांची बोली अशीच असावयाची. आह्माला तें तुमचें ठाकठीक बोलणें कोठून येणार?"

तो संन्याशी ज्ञानाच्या गर्वानें फुगलेला होता तरी त्याला त्या शेतकऱ्यानें एकदम तसें भाषण केलें याचें मोठें आश्चर्य वाटलें. हा काय ह्मणतो आहे तें समजून तरी घ्यावें, असा विचार करून कौतुकानें संन्याशी त्याला ह्मणाला, "अरे बाबा, मला धर्माचें कांहीं ज्ञान नाहीं असें ह्मणतोस तें कदाचित् अगदीं खरें असेल. त्याच्याबद्दल तुझ्याशीं वाद घालीत बसण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. पण तूं आपल्याला धर्माचें सार समजलें असें जें सांगितलेंस, तें काय तें कृपा करून सांग."

संन्याशानें याप्रमाणें प्रश्न केला तेव्हां तो शेतकरी त्याला ह्मणाला,

"अहो महाराज, मला काय समजलें आहे तें तुह्माला सांगतों. पण तुह्मी येथें उन्हांत मात्र उभे राहूं नका. ही पहा येथें थंड सावली आहे येथें बसा. आणि अंमळ स्वस्थ व्हा ह्मणजे मी तुह्माला काय तें सगळें सांगतों." त्या संन्याशानें ही त्याची विनंती मान्य केली. तेव्हां नांगराला जुंपलेले बैल सोडून तो शेतकरी स्वामीजवळ येऊन बसला, आणि त्याला नमस्कार करून ह्मणाला, "स्वामिमहाराज, ह्या प्रदेशांत तिघे ब्राह्मण सख्खे बंधु आहेत. एकाचें नांव **ब्रह्मदत्त**, दुसऱ्याचें **सोमदत्त** आणि तिसरा मोठा पुण्यवान् **विष्णुदत्त. विष्णुदत्त** हा सर्वांत लहान. त्याच्या दोघां थोरल्या बंधूंनीं बायका केल्या आहेत; पण धाकट्याचें मात्र अद्याप लग्न झालें नाहीं. झालें नाहीं ह्मणजे त्यानें करून घेतलें नाहीं असें कां ह्मणाना. तो आपला तसाच राहून, दोघे थोरले बंधू जें सांगतील तें करून त्यांच्या येथला एक बंदा गुलाम झाला आहे. त्या भटजींचीं शेतें माझ्याकडेच लागणीला आहेत. तो **विष्णुदत्त** माझ्या बरोबर कधींमधीं शेतकाम करीत असतो. त्याला राग हा कसला तो मुळीं ठाऊक देखील नाहीं. तशा माणसाचें मोल जाणणारे लोक थोडेच असतात. त्याचा तसा स्वभाव पाहिला, तेव्हां थोरल्या भावांनीं त्याला मूर्ख व मिळमिळीत, किंवा अजागळ ह्मणाना बापडे, असा ठरविला. खरें विचाराल तर स्वामिबुवा मी तुह्माला काय सांगूं? तो मोठा देवमाणूस. त्याला लचांड फचांड कांहींच ठाऊक नाहीं. कपट तर त्याला शिवलेंदेखील नसेल. पण काय सांगावें महाराज, त्याच्यावर मोठा वाईट प्रसंग आला. एकेदिवशीं त्याच्या दोघी भावजयांनीं त्याच्यावर डोळा ठेवला. पण तो कसला ऐकतो त्यांला? त्यानें—'तुह्मी माझ्या मातोश्री आहां' असें सांगून त्यांला नमस्कार करून मुकाट्यानें तेथून पाय काढला.

तसल्या बायका मोठ्या कवटाळ्या असतात. त्या बिचाऱ्यानें नाहीं म्हणून सांगितलें तें त्यांना आवडलें नाहीं. त्यांणीं उलट त्याच्यावरच कुभांड रचून—'तुमचा धाकटा भाऊ आमची इच्छा करितो' असें

आपापल्या नवऱ्यांस सांगितलें. तेव्हां त्या दोघांनीं तरी कांहीं विचार करायचा होता. पण ते पडले बाईलवेडे. त्यांणीं आपापल्या बायकांचें सांगणें खरें मानून त्या गरिबावर दांत ठेवला! तें तसें व्हायचेंच. लबाड बायकांनीं भुरळ घातलेल्या पुरुषांला खरें किंवा खोटें मुळींच कांहीं समजत नाहीं. त्या दोघांही भावांनीं कोणीकडून तरी त्या **विष्णुदत्ताला** अगदीं नाहींसा करून टाकण्याचा इरादा धरला. नंतर एकेदिवशीं त्यांच्या शेतांत एक मोठें वारूळ होतें, तें त्याला खणून काढावयास सांगितलें. त्यांचा असा हेतू होता कीं, तो वारूळ खणूं लागला ह्मणजे त्यांत सर्प निघेल व तो त्याला चावेल. अर्थात् त्याचा नाश होईल!

याप्रमाणें मनांत दुष्ट हेतू धरून त्यांणीं त्याला तें काम सांगितलें. तरी त्याणें त्याच्याबद्दल कांहींच शंका काढली नाहीं. तो मुकाट्यानें कुदळीनें तें वारूळ खणूं लागला. तें पाहून मला त्याची फार दया आली. मीं त्याला—तूं हें खणू नको. येथें एक मोठा कृष्ण सर्प आहे. तो तुला खाईल,—असें सांगितलें. तथापि त्यानें मुळींच ऐकलें नाहीं. जें कांहीं होणार असेल तें होईल—असें ह्मणून आपला घात व्हावा, अशी इच्छा करणाऱ्याही वडील बंधूंची आज्ञा मोडूं नये, ह्मणून तो तें वारूळ खणूं लागला. खणतां खणतां मोहोरांनीं भरलेली एक घागर त्याला तेथें मिळाली. खरोखर त्याठिकाणीं काळाकुट्ट मोठा भुजंग असलेला मीं केव्हां केव्हां पाहिला होता; पण यावेळीं तो कोठें गेला कोणास ठाऊक? साधूपुरुषाला त्याचा धर्म नेहमीं सोबत देत असतो. भावांनीं त्याचा जीव जाण्याचें ह्मणून जें काम त्याला सांगितलें होतें त्यापासूनच त्याला ती मोहोरांची घागर मिळाली! ती पाहतांच लौकर लौकर त्याणें मला तेथें बोलावून नेलें. तो मनुष्य इतका भोळा होता कीं, मी नको ह्मणून सांगितलें असतांही त्याणें ती घागर नेऊन आपल्या त्या दुष्ट भावांला दिली. त्याची त्यां-

च्यावर भक्तिच मोठी बळकट होती. मीं सांगितलें तरी त्याच्या मनांत मुळींच पाप आलें नाहीं.

याप्रमाणें त्या बिचाऱ्या भोळ्या भावार्थ्यानें तो द्रव्याचा ठेवा नेऊन दिला. तेव्हां तरी त्याचे भाऊ—भाऊ कसले चांडाळ कां ह्मणाना—प्रसन्न व्हावेत कीं नाहीं; पण महाराज तुह्माला काय सांगूं; सारेंच उलटें झालें. 'याणें आपल्याला हा ठेवा आणून दिला; पण पुन्हां कदाचित् हा मागेल तर. हा वेडगळ आहे, तेव्हां एखाद्याच्या नादीं लागून याणें मागेंपुढें प्रयत्न केला तर उगाच लचांड होईल' ह्मणून त्या कसाबांनीं त्यांतल्याच थोड्याशा मोहरा देऊन एका सुताराकरवीं त्याचे हात आणि पाय छाटून टाकविले! तसें झालें ह्मणजे तो कोठें जाणार नाहीं आणि येणार नाहींसें त्यांला वाटलें.

महाराज, त्या सत्पुरुषाची शांति व बंधुस्नेह कितीतरी आपल्याला सांगूं. प्रत्यक्ष त्याचे हातपाय तोडले तरी त्याणें एक अवाक्षर तोंडावाटे काढलें नाहीं. पूर्वीप्रमाणें खुशाल आनंदांत तो राहिला; पण ह्या त्याच्या सद्वर्तनानें प्रसन्न झालेल्या धर्मानें लौकरच त्याचे हात आणि पाय पूर्वीप्रमाणें जशासतसे झाले! हा काय लहानसान चमत्कार! मी तुह्माला हावेळपर्यंत जी हकीकत सांगितली तिचा हेतु काय तो तुमच्या ध्यानांत आला ना? अहो, भावांनीं त्याचे हातपाय तोडले; तरी तो त्यांच्यावर रागावला नाहीं ह्मणूनच त्याचे ते होते तसे पुन्हां झाले. ही गोष्ट जेव्हां मी प्रत्यक्ष पाहिली तेव्हां, राग सोडावा ह्मणजे सर्व कांहीं प्राप्त होतें असा माझ्या मनाचा पक्का निश्चय झाला. व तेव्हांपासून त्या रागाला मी आपल्या अंगांत तिळभरदेखील जागा दिली नाहीं. तेव्हां तुह्मी एवढे मोठे तपस्वी, संन्याशी, विद्वान् असे असूनही अद्याप हा दुष्ट राग सोडला नाहीं ह्मणून मी, धर्माचा एक तुकडादेखील माहीत नाहीं, असें ह्मटलें. व मी क्रोध वर्ज केला आहे ह्मणून आपल्याला धर्माचें सार समजलें आहे असें ह्मटलें.

क्रोधाचा त्याग करण्यानेंच स्वर्गलोक जिंकला जातो. याची प्रचीति आतांच पाहिजे तर मी तुह्माला दाखवितों." असें बोलून त्या शेतकऱ्यानें तत्काल ध्यानस्थ बसल्यासारखें करून तो संन्याशी पहात असतां आपल्या शरीराचा त्याग केला. व दिव्य विमानांत बसून तो शेतकरी तत्काल स्वर्गास गेला." ही गोष्ट सांगून **अग्निशर्मा श्रुतसेन** राजाला ह्मणाला, "महाराज, मीं जे दोन चमत्कार पाहिले ह्मणून सांगितलें त्यांपैकींच हा एक. आतां दुसरा आपल्याला सांगतों तो ऐकावा."

असें सांगून **अग्निशर्मा** ह्मणाला, "महाराज, वर सांगितलेला चमत्कार पाहून चकित होऊन मी तसाच पुढें समुद्राच्या काठाकाठानें तीर्थयात्रा करीत निघालों. कांहीं दिवसांनीं **वसंतसेन** नामक राजाच्या राज्यांत प्राप्त झालों. नंतर त्याच्या मुख्य राजधानींत गेलों. तेथें आमच्यासारख्या अभ्यागत किंवा यात्रेकरू लोकांच्या सोईकरितां राजानें जें मोठें अन्नसत्र घातलें आहे त्यांतच मीं आपला डेरा दिला. खांद्यावरची पडशीबिडशी ठेवून मीं स्नान संध्या वगैरे नित्य नेम आटोपला. इतक्यांत जेवणाची वेळ झाली. तेथल्या अधिकाऱ्यांनीं मला भोजनास उठा असें ह्मटलें. तेव्हां तांब्या पंचपात्री घेऊन मी जेवणाच्या ठिकाणीं जाण्याची जी जवळची वाट होती, त्या वाटेनें जाऊं लागलों. तेव्हां तो अधिकारी ह्मणाला, "भटजी, या वाटेनें जाऊ नका. येथें आमच्या महाराजांची कन्या विद्युल्लता बसली आहे. तुमची तर गोष्ट असू द्या; पण 'वरि दिसति सकळिका शिरा ज्याच्या' असा एखादा मोठा ऋषिदेखील तिला पाहील तर तत्काल कामदेवाच्या बाणांनीं व्यथित होऊन त्याला उन्माद होईल! अर्थात् तो मेल्यावांचून राहणार नाहीं. असें आहे ह्मणून तुह्मांला सांगतों कीं, तुह्मी इकडून न जातां त्या पलीकडच्या वाटेनें जा." हें त्याचें सांगणें ऐकून मी तेथेंच उभा राहिलों. मीं ह्मटलें; अहो, तुह्मी तुमच्या राजकन्येच्या रूपाची एवढी तारीफ करतां; पण मला त्यांत कांहीं

फारसें नवल वाटत नाहीं. साक्षात् देवलोकींचा **मदनच** असे आमचे **श्रुतसेन** महाराज यांला मी नेहमीं पहात असतों. जेव्हां त्यांची स्वारी एखाद्या उत्साहाच्या किंवा शिकारीच्या निमित्तानें बाहेर निघते, तेव्हां जवळचे लोक व चोपदार वगैरे, कुलस्त्रियांला एका बाजूस करतात. कारण कदाचित् राजाचें सौंदर्य पाहून त्यांचें मन चलबिचल होईल, याची त्यांना शंका असते. बहुतकरून कोणतीही विवाहित स्त्री त्यांच्या दृष्टीसमोर न येण्याविषयीं सक्त बंदोबस्त असतो. तेव्हां तुमच्या राजकन्येला पाहून मला उन्माद होईल याविषयीं तुह्मी बिलकूल शंका घेऊ नका.

याप्रमाणें जेव्हां मी ठांसून बोललों, तेव्हां तो अधिकारी चकित झाला. वस्तुतः त्यावेळीं राजकन्या तेथें नव्हती. त्यांणीं मुद्दामच ती युक्ति केली होती, असें मग माझ्या लक्षांत आलें. महाराज तुमच्या सौंदर्याची ख्याति **वसंतसेन** राजापर्यंत गेली होती. व तेव्हांपासूनच आपली मुलगी तुह्मांला द्यावी, असें खास त्याच्या मनांत आलें असावें. तथापि क्षत्रियांच्या धर्माप्रमाणें आपण होऊन आमची मुलगी घ्या, असें ह्मणणें अंमळ कठीण व कदाचित् तुह्मी अनादर केला, तर मग मोठीच शर्मेची गोष्ट होईल, ह्मणून परभारें तो योग आणण्याकरितां त्याणें ही युक्ति केली असावी. सत्रांत देशदेशांतराचे पांथस्थ नेहमी यायचेच. मला जसें त्या अधिकाऱ्यानें राजकन्येविषयीं सांगितलें, तसेंच कोणी नवा आला ह्मणजे त्याला तो सांगत असेसें वाटतें. तुमचें रूप ज्याणें पाहिलें असेल तो त्या राजकन्येला पाहून उन्मत्त होणार नाहीं. व तो मीं जसा ठासून जबाब दिला तसा कदाचित् देईल. व तसें झालें ह्मणजे त्याला ती मुलगी दाखवून त्याच्याकरवीं महाराजांचें मन वळवावें, असा कांहीं त्यांचा बेत असावा असें मला वाटलें. कारण त्यादिवशीं मी एकटाच नव्हतों, आणखी पुष्कळ अभ्यागत भोजनास आले होते. मीं जेव्हां त्या अधिकाऱ्याला दम दिला तेव्हां तत्काळ

त्याणें मोठ्या सन्मानानें मला तेथें बसवून घेऊन राजाच्या पुरोहिताला सूचना पाठविली. तो येतांच त्या दोघांनीं मला खुद्द राजाच्या जेवणाच्या ठिकाणीं एका रत्नखचित पाटावर नेऊन बसविलें. आणि बिचाऱ्या इतर अतिथींला तेथेंच त्या सत्रांत जेवणास नेलें, यावरून मी तसें अनुमान केलें. असो. मी तेथें जाऊन बसलों इतक्यांत राजेसाहेबांची स्वारी आली. त्यांणीं संप्रदायाप्रमाणें माझा आदरसत्कार केला. नंतर, जिच्याकरतां हा एवढा प्रयत्न चालला होता ती विद्युल्लताही तेथें आली. बापाच्या सांगण्यावरून तिणें मला नमस्कार केला. नंतर इतर खाशी मंडळी येऊन राजासहवर्तमान आह्मी सर्व भोजनास बसलों. महाराज, त्या कन्येचें रूप मी आपल्या जवळ काय वर्णन करूं! माझी दृष्टी एकसारखी तिच्याकडे लागली होती. जेवण आटपतांच तिचें दर्शन व्हायचें नाहीं, ह्मणून मीं त्याविषयीं आपलें भोजन कितीतरी लांबविलें याचा कांहीं ठिकाण नाहीं. साऱ्या जगाला मोहित करणारी, व कामदेवाचें वसतिस्थान असें सुंदर शरीर धारण करणारी ती एक मोहक मंत्रविद्याच कीं काय, असें मला वाटलें. जरी मीं आपलें मन निश्चयानें सांवरून धरिलें होतें, तरी तिच्या दर्शनानें त्याला क्षोभ झाला. आपल्या हातून भलतीच कांहीं चूक न होवो, ह्मणून सांवरतां सांवरतां माझी अगदीं त्रेधा उडाली. वस्तुतः माझें मन तिच्याविषयीं अगदीं शुद्ध होतें; तथापि त्या वस्तूचा प्रभावच तसा विलक्षण! त्याला मी तरी काय करूं? असो. फार वेळ मोठा प्रयत्न करून मीं एकदाचें आपल्या मनाला ठिकाणावर आणलें. तेव्हां माझ्या मनांत ती महाराजांची स्त्री व्हावी असे विचार आले; पण लगेच मला त्यापासून मोठा अनर्थ होण्याचाही संभव दिसला. तशी सौंदर्याची खाण आपल्याला मिळाली, ह्मणजे आपण सारावेळ तिच्या नादांत राहून राज्यकारभार अगदीं विसरून जाल; ह्मणून आपल्याला ती गोष्ट सांगूंनये असें मला वाटलें. तरी पुन्हां असा विचार केला कीं, काय पाहिजे तें होवो; पण ही हकीकत

आपल्याला सांगितल्यावांचून राहूनये. तसें न केलें तर कदाचित् पूर्वीं **उन्मादिनी** आणि **देवसेन** यांची जशी अवस्था झाली होती तसें होईल असेंही मला वाटलें. **उन्मादिनी**[1]ची कथा आपल्याला माहित असेलच. जसा तो धार्मिक राजा **देवसेन उन्मादिनी**करतां प्राणत्याग करताझाला तसा कदाचित् यागोष्टीचा वाईट परिणाम होईल, व त्यामुळें राजद्रोह केल्याचें पातक लागेल, ह्मणून मीं हा वृत्तांत आपल्याला निवेदन केला. यावर जशी मर्जी असेल त्याप्रमाणें पुढची तजवीज करावी."

जणूं काय कामराजाची आज्ञाच, असें **अग्निशर्म्याचें** तें भाषण ऐकून राजा **श्रुतसेन** याचें मन त्या **विद्युल्लतेनें** हरण केलें. त्याणें तत्काळ त्याच ब्राम्हणाला, त्याच्याबरोबर आणखी परिवार देऊन दक्षिणसमुद्राच्या तीरावर **वसंतसेन** राजाकडे त्या **विद्युल्लतेबद्दल** मागणी करण्याकरितां रवाना केला. **अग्निशर्मा** स्वतः मोठा चतुर होता. व देशाटन इत्यादिकांनीं त्याला पुष्कळ अनुभव आले होते. **श्रुतसेन**-राजाच्या आज्ञेप्रमाणें तो **विद्युल्लतेच्या** बापाकडे गेला. आणि त्याणें त्याला आपल्या राजाचा हेतू कळविला. **वसंतसेन** त्याबद्दल आढेवेढे कशास घेणार ? कारण **श्रुतसेनाला** आपली कन्या द्यावी ह्मणून त्याचा-सारखा प्रयत्नच चालला होता. सुदैवानें तो योग आपोआप घडून आल्यामुळें त्यानें मोठ्या आनंदानें ती मागणी कबूल केली. आणि बरोबर जाणते जाणते लोक व इतर परिवार वगैरे देऊन राजा **वसंतसेनानें वि-द्युल्लतेला श्रुतसेनाकडे** रवाना केली. **अग्निशर्मा**ब्राह्मण त्या दोघांच्याही विश्वासाला पात्र झाला होता. त्याणें वाटेंत मोठ्या बेताबातानें उत्तम बंदोबस्त ठेवून **विद्युल्लतेला श्रुतसेन** राजाजवळ आणून प्रविष्ट केली. नंतर शुभ मुहूर्त पाहून उभयतांचा विवाह मोठ्या समारंभानें झाला. आपल्या मनाजोगती स्त्री मिळाल्यामुळें राजाला फार आनंद झाला.

---

१–ही कथा पूर्वी–भाग २ रा पृष्ठ १९पासून २२ पर्यंत वर्णन केली आहे ती तेथें पहावी.

ज्या अग्निशर्म्याच्या प्रयत्नानें हा योग घडून आला, त्याला राजानें केवळ आपलें राज्य मात्र दिलें नाहीं इतकेंच काय तें. बाकी त्याला कोणतीही वस्तु अलभ्य नाहीं असें करून सोडलें !

राजा श्रुतसेनाची त्या स्त्रीवर इतकी विलक्षण प्रीति बसली कीं, त्याच्या शरीराशीं तिच्या देहाचा क्षणभरदेखील वियोग सहन होत नाहीं असें झालें. सूर्याची प्रभा[1] जशी सार्वकाळ त्याला चिकटून असते तशी विद्युल्लता राजाला चिकटून असत होती. अशा स्थितींत आपल्या स्वरूपाचा मोठा गर्व वाहणारी मातृदत्ता नांवाची, एका मोठ्या संपन्न सावकाराची मुलगी श्रुतसेन राजाच्या सौंदर्याची तारिफ ऐकून स्वयंवराकरितां त्याच्याजवळ प्राप्त झाली. वस्तुतः राजाला यावेळीं एका विद्युल्लतेवांचून जगांतील साऱ्या स्त्रिया केवळ कस्पटाप्रमाणें वाटत होत्या. दुसरीकडे त्याची दृष्टी मुळींच ठरत नव्हती. तथापि यावेळीं त्याला आपल्या इच्छेविरुद्ध, त्या सावकाराच्या कन्येशीं विवाह करून घेणें भाग पडलें. कारण स्वयंवराकरितां आलेली व जिच्या अंगीं म्हणण्यासारखा कोणताही दोष नाहीं, अशा कन्येचा अनादर करणें हा मोठा अधर्म आहे, असें धर्मशास्त्रकारांनीं वर्णन केलें आहे. राजाला तिची मुळींच इच्छा नव्हती, तरी केवळ अधर्म न व्हावा ह्मणूनच त्याणें मातृदत्तेशीं स्वयंवर केला.

इच्छा नसतांही असा प्रकार घडून आला; पण त्याचा परिणाम फार वाईट झाला. कधीं ध्यानींमनींदेखील नसलेली गोष्ट एकाएकीं घडून आली; हें पहातांच विद्युल्लतेला जें असह्य दुःख झालें त्याच्यायोगानें तिचें काळीज फुटून ती तत्काळ प्राणास मुकली! इकडे, विवाहसमारंभांतलीं मांगलिक चिन्हें ज्याच्या अंगावर तशींच आहेत, असा

---

१—प्रभा हा शब्द सामान्यतः कांतीचा वाचक आहे. पौराणिकांनीं सूर्याची, प्रभा या नांवाची एक बायको कल्पना केली आहे! हा स्त्रीत्वाचा आरोप सूर्याच्या कांतीवरच केला आहे, हें निराळें सांगावयास नको.

राजा **श्रुतसेन** धावऱ्या धावऱ्यां **विद्युल्लते**च्या महालांत प्राप्त झाला. तों प्रेत होऊन पडली होती; तरी त्याला तिचें आलिंगन अप्रिय वाटलें नाहीं. तिचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन तो करुण विलाप करूं लागला. प्रधानादिकांनीं त्याचें समाधान करण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला. नुकताच जिच्याशीं विवाह झाला होता त्या **मातृदत्ते**नेंही राजाचें मन आपल्याकडे ओढून घेण्याकरितां शिकस्त केली; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. तो आपल्या प्रिय पत्नीकरतां विलाप करीत होत्साता तसाच तिच्या पाठोपाठ परलोकास निघून गेला! नंतर त्या बिचाऱ्या **मातृदत्ते**ला कोण विचारणार? लोकांचे अभिश्राप ऐकत बसण्यापेक्षां मरून जाणें चांगलें, असा विचार करून तिणें तत्काल राजाच्या प्रेताबरोबर अग्नींत प्रवेश केला. **श्रुतसेन**राजा मरण पावला हें समजतांच शत्रूंनीं हल्ला करून सारी वाताहत करून सोडली. याप्रमाणें एका स्त्रीच्या निमित्तानें त्या सर्व राज्याचा नाश झाला!"

ही कथा सांगून **यौगंधरायण** म्हणाला, "महाराज, विशेषप्रकारचें प्रेम एकाएकीं खंडित केलें तर तें फार दुःसह होतें. त्यांतून मनाची मोठी गंभीर अशा राणी **वासवदत्ते**शीं प्रसंग आहे. तिच्या प्रेमाचा भंग झाला तर तो फार अनर्थावह होईल. जसा **विद्युल्लते**नें आपल्या जिवाचा नाश करून घेतला, तसें झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं. महाराज, मी आपल्याला खरोखर सांगतों, जर या **कलिंग-सेने**शीं आपण विवाह करून घ्याल तर राणी **वासवदत्ता** प्राणत्याग केल्यावांचून राहणार नाहीं हें खचित समजा. तिणें तसें केलें ह्मणजे **पद्मावती**ही जीव ठेवणार नाहीं. कारण, त्या दोघींचा अगदीं एक जीव आहे. नंतर मातृवियोगदुःखानें युवराज **नरवाहनदत्त** याची अवस्था काय होईल ती आपणच मनांत आणा. आणि अशी दुःखकारक गोष्ट झाली ह्मणजे स्वतः आपल्याला कशी सहन होईल? खरोखर मला तर वाटतें कीं, आपल्याच्यानें क्षणभरदेखील सहन करवणार नाहीं.

तेव्हां एकंदरींत **कलिंगसेने**शीं विवाह करण्याच्या निमित्तानें एकाएकीं सर्वस्वनाश होणार. **वासवदत्ता** आणि **पद्मावती** यांणीं आपल्याला मोठ्या गंभीरपणानें **कलिंगसेने**च्या विवाहाविषयीं जें सांगितलें त्यावरूनच नाहीं का आपल्या मनाची खातरी होत? प्राणाची आशा असेल तोंपर्यंत अनिष्ट प्रसंग टाळण्याविषयीं हृदय अस्वस्थ होतें; पण एकदां जिवाची आशा सुटली कीं, त्याला अतिशय गाढपणा येतो, हें मीं आपल्याला सांगितलें पाहिजे असें नाहीं. याकरितां माझी अशी विनंती आहे कीं, महाराजांनीं स्वार्थ पहावा. पशूपक्ष्यांलादेखील कोणत्यायोगानें आपलें हित होईल, तें समजतें. मग आपल्या सारख्या बुद्धिवंताला कां समजणार नाहीं?"

**यौगंधरायणानें** काळवेळ पाहून जें योग्य भाषण केलें, तें **वत्सराजा**च्यानें अमान्य करवलें नाहीं. पुढचा अनर्थ मूर्तिमंत त्याला दिसूं लागला. अर्थात् त्याचें मन स्थिर होऊन विचारावर आलें. बराच वेळ स्तब्ध राहून तो **यौगंधरायणा**ला ह्मणाला, "मित्रा, तूं सांगतोस तसेंच खरें. यापासून आपला सर्वस्वनाश होणार आहे यांत कांहीं संशय नाहीं. तेव्हां **कलिंगसेने**शीं विवाह करून घेण्यांत माझा काय अर्थ आहे? मुहूर्त लांबणीवर टाकला हें जोश्यांनीं फार चांगलें केलें. पण ज्यापेक्षां ती स्वयंवराकरितां आली आहे त्यापेक्षां तिचा त्याग केला असतां अधर्म कितीसा होईल याचाही विचार केला पाहिजे. तें कसेंही असो. एकंदरींत **कलिंगसेने**चा स्वीकार करावा किंवा न करावा याचा नीट विचार केला पाहिजे हें खरें आहे."

राजाचे याप्रकारचे विचार ऐकून **यौगंधरायण** मनांत खूष झाला. तो ह्मणाला, माझ्या मनाप्रमाणें कार्यभाग बहुतकरून सिद्ध झाल्यासारखा आहे. उपायरूपी उदकाचें सेचन केलेली; देश आणि काल यांनीं वाढविलेली; नीतिरूपी मोठी वेल कोणत्या फळाला प्रसवणार नाहीं? एकंदरींत चांगलेंच फल येईल अशी आतां बळकट आशा धरायला

जागा झाली. असा विचार करीत होत्साता तो प्रधान **यौगंधरायण** राजाला नमस्कार करून स्वस्थानीं निघून गेला.

यावेळीं **वत्सराजाचें** राज्य समुद्राला व **हिमालयाला** जाऊन ठेपलें होतें. तेव्हां एवढ्या मोठ्या विस्तृत राज्यांत किती कारस्थानें चालली असतील, किती खटपटी होत असतील व त्यांचा बंदोबस्त करण्याबद्दल किती काळजी वाहिली पाहिजे, हें येथें सांगावयास नको. पण आमचे रंगेले कथानायक **वत्सराज** यांला तिकडची वार्ताही नव्हती. त्याला सांप्रत मोठ्या महत्त्वाचा विषय काय तो ती **कलिंगसेना** झाली होती. तिच्याशीं लग्न व्हावें; हें तर त्याच्या मनापासून होतें; पण **यौगंधरायणानें** जे भावि अनर्थ सुचविले होते तेही त्याच्या डोळ्यांपुढें उभे रहात असत, यामुळें त्याची मोठी त्रेधा उडाली होती. पुढें कसें करावें याविषयीं अनेक विचार त्याच्या मनांत घोळत होते. **यौगंधरायण** निघून गेला तरी **वत्सराजाची** स्वारी त्या नादांतच होती. कांहीं वेळ अशा स्थितींत गेल्यावर—राणी **वासवदत्तेनें** आपल्या हेतूविरुद्ध चकार शब्द काढला नाहीं; व आपली पूर्ण संमति दाखविली हें काय आहे, त्याची पुनरपि चांगली एकवेळ छान करावी ह्मणून स्वारी हळूच तिच्या महालांत गेली. **यौगंधरायणानें** जें तिला शिकवून ठेविलें होतें तें तिणें पक्कें ध्यानांत धरिलें होतें. राजा आला, तेव्हां तिणें त्याचा यथायोग्य आदरसत्कार करून आपली मनोवृत्ति उल्हासित आहे असें दाखविलें. पण तें खरें नसून बळेंच केलेलें आहे अशी राजाची समजूत झाली होती; ह्मणून त्याला त्यापासून कांहीं समाधान वाटलें नाहीं. उलट तो विशेष दुःखितच झाला.

नंतर **वासवदत्तेचें** समाधान करीत होत्साता राजा तिला ह्मणाला, "प्रिये, यावेळची तुझी ही वृत्ति माझी चिंता वाढवीत आहे. तुला हसतमुख पाहून मला जें समाधान वाटावें तें उलट दुःख वाटतें. तूं यावेळीं रागावली असतीस तर मी फार खूप झालों असतों. एकंदरींत या तुझ्या ओढून-

ताणून आणलेल्या आनंदीवृत्तीनें माझें मन फारच अस्वस्थ होत आहे. हे हरिणाक्षि, मी तुझ्या अशा विनवण्या कां करतों हें तूं जाणतच असशील. उदक जसें कमलाचें जीवन तशी तुझी प्रीती हें माझें जीवन आहे. तुला ठाऊक नाहीं का? कीं, मी दुसऱ्या कोणात्याही स्त्रीचें नांव घ्यायला मनापासून उत्सुक नाहीं. असें असून ही **कलिंगसेना** मुद्दाम आपण होऊन माझ्याकडे चालत आली याला मीं काय करावें? आतां माझी मोठी पंचाईत झाली आहे. स्वयंवराविषयीं प्रार्थना करणाऱ्या स्त्रीचा अव्हेर केला तर त्यापासून मोठा अधर्म घडणार आहे. तो एक असो; पण ती कदाचित् मला शाप देईल तर मग काय करावें? निष्कृत्रिम प्रेम ठेवणाऱ्या साध्वी स्त्रियांचा शाप खोटा कसा होईल? ब्रह्मचर्य धारण करून रहात असतां स्वेच्छेनें **रंभा**[1]नांवाची अप्सरा स्वयमेव वरण्यास प्राप्त झाली असून ती तिची विनंती मान्य केली नाहीं, ह्मणून तिणें 'तूं नपुंसक होशील' असा **अर्जुनास** शाप दिला होता. तो शाप त्याणें **विराट**राजाच्या येथें एक वर्षपर्यंत अज्ञातवासांत असतां आश्चर्यकारक स्त्रीरूप धारण करून कसातरी घालविला, हें तूं ऐकलें नाहींस काय? ह्मणूनच **कलिंगसेना** येथें आली, तेव्हां भयानें मीं तिचा अनादर केला नाहीं. तथापि एकंदरींत तुझी मर्जी पाहिल्यावांचून यासंबंधानें मी कांहीं एक बोलूं इच्छित नाहीं. मी तिला अद्याप निश्चयात्मक असें कांहींच सांगितलें नाहीं." इत्यादिप्रकारें अनेक गोड गोड गोष्टी सांगून राजानें **वासवदत्ते**चा खेद परिहार करण्याचा प्रयत्न केला.

नंतर, ज्यांत राग (प्रेम) आहे अशा ह्रदयाप्रमाणेंच तिणें जें आपलें उच्छिष्ट मद्य दिलें, त्याच्या द्वारें तिच्या मनांतला हेतू मोठा भयंकर आहे, असें त्याला समजून आलें. ह्मणून आणखी समाधान करण्याकरतां राजा त्या रात्रीं तिच्याच महालांत राहिला. **यौगंधरायणानें**

---

१—ही कथा महाभारतांत वनपर्वांत आहे. तेथें रंभेबद्दल उर्वशीचें नांव आहे.

दूरवर विचार करून मोठ्या पोक्त बुद्धीनें आपलें मन वळविण्याविषयीं जो प्रयत्न केला, त्याविषयीं राजाला फार संतोष वाटला. **वासबदत्ते**-सहवर्तमान अनेकप्रकारचे विलास करण्यांत त्याणें ती रात्र घालविली.

इकडे **यौगंधरायणानें योगेश्वर**नांवाचा ब्रह्मराक्षस **कलिंगसेने**चा गुप्त वृत्तांत समजून घेण्याकरतां नेमला होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तो तिचा वांकडा पाय पडल्याचें प्रत्यक्ष पाहून त्याच रात्रीं **यौगंधरायणा**ला येऊन भेटला. तेव्हां 'मित्रा, कसें काय? तुला जें काम सांगितलें होतें तें सिद्ध झालें काय?' असा त्याने प्रश्न केल्या-वरून **योगेश्वर** ह्मणाला, "तुझ्या आज्ञेप्रमाणें मी इतके दिवस अगदीं डोळ्यांत तेल घालून **कलिंगसेने**च्या महालांत आंत बाहेर आजूबाजूला चहूंकडे एकसारखा पहात राहिलों होतों; पण दिव्य अथवा मनुष्य यांतून कोणीही पुरुष तेथें आल्याचा माझ्या दृष्टीस पडला नाहीं. आज मात्र मी आकाशांत, अस्पष्ट असा कांहीं अकस्मात् शब्द ऐकला. ती वेळ प्रदोषकाळची होती. मी तिच्या महालाच्या अगा-शीच्या जवळच दडून राहिलों होतों. तो शब्द कोणाचा होता, हें जाणण्याविषयीं मी आपलीविद्या योजली; पण तिचा कांहीं प्रभाव चालला नाहीं. तेव्हां विचार करतां करतां माझ्या लक्ष्यांत असें आलें कीं, **कलिंगसेने**च्या लावण्याला लुब्ध होऊन तिच्या भोंवतीं आकाशांत घिरट्या घालणाऱ्या कोणातरी दिव्यप्रभावी पुरुषाचा तो शब्द असावा. ह्मणूनच माझी मंत्रविद्या त्याच्यावर जाण्यास समर्थ होत नाहीं. असें जेव्हां माझ्या मनांत आलें, तेव्हां तेथेंच राहून लक्ष्यपूर्वक पहावें असा मीं निश्चय केला. कारण हुषार मनुष्य रात्रीं जागा राहून पहात असतां त्याला दुसऱ्याचें छिद्र मिळणें फारसें कठीण नाहीं. त्यांतून स्वर्गींचे लोक तिची ( **कलिंगसेने**ची ) इच्छा करीत आहेत, हें तूं मला सांगितलें होतेंस. व **सोमप्रभा** नांवाची तिची सखी याचसंबंधानें बोलत असतां प्रत्यक्ष मीं ऐकलें

होतें. ह्मणून मी आज तिच्यावर अगदीं एकसारखी नजर ठेवून राहिलों आहें. हावेळपर्यंत झालेली हकीकत तुला सांगायला येथें आलों. यावेळीं मी येथें आहें तरी तिच्याकडे काय काय होत आहे, तें सर्व मला प्रत्यक्ष दिसत आहे. ह्मणून मी येथें आल्याबद्दल तूं कांहीं काळजी करूं नकोस. बहुतकरून तुझा हेतू पूर्ण होईल असें वाटतें. बरें आतां तें असो; मी तुला दुसरेंच कांहीं विचारणार आहें तें सांग. आज तिसऱ्या प्रहरीं राजाचें आणि तुझें बोलणें चाललें होतें त्यावेळीं 'पशुपक्ष्यांला देखील आपलें हित कोणत्या योगानें होईल हें समजतें' असें जें तूं ह्मटलेंस, तें मीं ऐकिलें. मी त्यावेळीं तेथें अलक्षित राहिलों होतों. तेव्हां त्याविषयीं कांहीं निदर्शन असेल तर मला सांग."

याप्रमाणें **योगेश्वरानें** प्रश्न केला. तो ऐकून **यौगंधरायण** त्याची पाठ थोपटून ह्मणाला, "मित्रा, यासंबंधाची एक प्राचीन कथा आहे, ती तुला मी सांगतों. **विदिशा** नामक नगरीच्या बाहेर अतिशय मोठें एक वडाचें झाड पूर्वीं होतें. त्या विशाळ वृक्षावर मुंगस, घुबड, मांजर आणि उंदीर असे चार प्राणी निरनिराळ्या ठिकाणीं आपलीं घरटीं करून रहात होते. उंदीर आणि मुंगस या दोघांचीं त्या झाडाच्या मुळांत निरनिराळ्या ठिकाणीं दोन बिळें होतीं. त्यांत त्यांणीं आपला डेरा ठेवला होता. मांजर त्याच्या खोडाच्या वर दोन फांद्या दोहोंकडे झाल्या होत्या, त्या ठिकाणीं असलेल्या ढोलींत रहात होतें. घुबडानें सर्वांच्या वर ह्मणजे त्या झाडाच्या शेंड्यावर आपलें घरटें केलें होतें. तें अशा करतां कीं, तेथें दुसऱ्या कोणाचाही प्रवेश होऊं नये. याप्रमाणें ते चौघे प्राणी तेथें रहात होते; पण त्यांचा परस्परांशीं संबंध मोठा चमत्कारिक होता. घुबड, मांजर आणि मुंगस यातिघांलाही उंदीर वध्य होता. ह्मणजे ते त्याला मारून खाऊं शकतील असे होते. मांजर—घुबड, उंदीर आणि मुंगस या तिघांलाही खाण्यास समर्थ होतें. अर्थात् मांजरच त्या सर्वांत निर्भय होतें, हें उघड

आहे. आपण याच्या तावडींत सांपडूं, तर हें आपल्याला खाऊन टाकील, या भयानें उंदीर आणि मुंगस हे दोघेही दिवसभर आपापल्या बिळांतच बसून राहत असत. आहार शोधण्याकरितां त्याणीं रात्रीं बाहेर पडावें. घुबड तर बोलून चालून दिवाभीतच. त्यानें रात्रींच संचार करायचा. मांजराची स्वारी मात्र दिवसा आणि रात्रीं खुशाल निर्भयपणें फिरत होती. त्या झाडाच्या शेजारींच जवाचीं मोठीं मोठीं शेतें होतीं. त्यांत उंदीर पकडण्याकरितां तें फिरत असे. आसपास जे इतर प्राणी रहात होते, तेही आपापल्या जिवाचा बचाव होण्याविषयीं विशेष सावधगिरी ठेवून आहाराकरतां योग्य वेळीं संचार करीत असत.

याप्रमाणें एकमेकाविषयीं बिलकूल गाफल न राहणारे ते चौघेही प्राणी त्या विशाळ वृक्षावर वास्तव्य करीत असतां, एके दिवशीं एक पारधी फिरत फिरत तेथें आला. त्या चौघांही प्राण्यांत शिकारी लोकांना महत्त्वाचा वाटण्यासारखा एकही नव्हता. पारध्याला बाकीच्या तिघांचा कांहींच पत्ता लागला नाहीं; पण मांजराचीं पावलें उमटलीं होतीं, त्यावरून यावेळीं तें जवळच्या शेतांत गेलें असावें, असें त्याणें ताडलें. शिकारी लोक रानमांजराला मारीत असतात. तेव्हां पारध्यानें मांजर परत येण्याच्या वाटेवर आपलें जाळें पसरून ठेवलें. कदाचित् तें दुसऱ्या वाटेनें जाईल म्हणून, त्या शेताच्या सभोंवतीं त्याणें आपले फांस लावले. आणि तो घराकडे निघून गेला. वस्तुतः यावेळीं मांजर शेतांत गेलेलें नसून तें आपल्या ढोलींतच होतें. तेव्हां त्या फांसे पारध्याचा प्रयत्न कदाचित् व्यर्थ झाला असता; पण दुर्दैवानें प्रेरणा केल्यामुळें व नित्य त्या शेतांत जाऊन उंदीर मारण्याची त्याला चट लागली होती यामुळें, रात्र पडतांच मांजर आपल्या ढोलींतून निघून शेतांत गेलें. अर्थात् पारध्यानें लावलेल्या फांसांत त्याला पडावें लागलें. इतक्यांत उंदीरही आहाराकरितां बाहेर निघाला. आपला हाडवैरी अर्थात् मांजर फांसांत सांपडलेलें पाहून, तो आनंदानें

नाचूं लागला. कांहीं वेळ आपल्या शत्रूची दुर्दशा पाहून खूष होऊन उंदरानें ती वाट सोडली, आणि दुसऱ्या वाटेनें तो शेतांत शिरणार इतक्यांत घुबड आणि मुंगस हे दोघे दुरून त्याच्या दृष्टीस पडले. बिचारा उंदीर हा त्या तिघांचाही भक्ष्यच होता. व मांजराच्या भयानें ते दोघे अस्वस्थ होते. यावेळीं मांजर जाळ्यांत सांपडलें आहे, तेव्हां आपण त्याच्यावर झडप घातली असतां कांहीं हरकत नाहीं, असें त्यांच्या मनांत आलें. उंदीर बराच दूर होता तरी त्या दोघांचा तो इरादा पाहून तो मनांत ह्मणाला, यावेळीं मोठ्या शहाणपणानें वागलें पाहिजे. हे तिघेही आपले शत्रूच आहेत. घुबड आणि मुंगस या दोघांलाही भयप्रद अशा या मांजराचा आश्रय केला; तर या वैऱ्यांच्या तावडींतून आपण सुटूं. पण मांजरच आपल्याला मारून टाकील तर काय करावें! हा शत्रु जाळ्यांत सांपडला आहे, तरी मी त्याच्या तडाक्यांत सांपडलों तर एका सपाट्यांत मला मारण्यास तो समर्थ आहे. बरें या मांजराला सोडून दूर जावें; तर हा घुबड आणि हें मुंगस दोघेही मला मारतील. एकंदरींत यावेळीं मी या शत्रूंच्या संकटांत सांपडलों आहें. आतां काय करावें, आणि कोठें जावें हें कांहीं लक्ष्यांत येत नाहीं. बरें पण यावेळीं मांजराचाच आपण आश्रय केला, तर आपला बचाव होणार नाहीं काय? कारण, सांप्रत हा शत्रू संकटांत पडलेला आहे. आणि माझ्या हातून याची सुटका होण्यासारखी आहे. तेव्हां आपल्या सुटकेकरतां तरी हा माझें रक्षण करील यांत कांहीं संशय नाहीं. हा ज्या जाळ्यांत सांपडला आहे तें माझ्यावांचून दुसऱ्या कोणालाही तोडतां येणार नाहीं, हें ह्मणजे याच्या लक्ष्यांत नसेल, अशी गोष्टच होणार नाहीं. तेव्हां एकंदरींत मांजराचाच आश्रय करावा हें चांगलें.

असा विचार करून उंदीर हळूच त्याच्या जवळ गेला, आणि प्रेमपूर्वक ह्मणाला, "दादा, कसें झालें तरी तुह्मी आह्मी एकेठिकाणीं

राहणारे आहों. आपलें उभयतांचें बंधुत्वाचें नातें सिद्ध आहे. मा झ्यापेक्षां वयानें व सामर्थ्यानें, अधिक असल्यामुळें तुह्मी वडील व मी धाकटा. यावेळीं तुमची अशी अवस्था पाहून मला अतिशय दुःख झालें आहे, म्हणून मीं हे तुमचे पाश तोडून टाकतों. जरी तुह्मी माझे शत्रू आहां तरी तुमचें मन फार उदार आहे व मीही अगदीं सरळ स्वभावाचा आहें. तेव्हां शत्रुत्व एकीकडे राहून आह्मां उभयतांचा सांप्रत सख्यसंबंध होण्यास कांहीं हरकत नाहीं. तथापि मी फार भित्रा असल्यामुळें तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास बसत नाहीं; कारण अद्याप तुमचें मन कसें आहे तें पुरते पणीं कळलें नाहीं."

उंदीर जवळ आलेला पाहतांच मांजराचे दांत शिवशिवूं लागले. फटकाऱ्यासरशीं त्याला मारून टाकावा असें वाटलें; पण यावेळीं तसें करतां येत नव्हतें. उंदरानें स्नेहपूर्वक सांगितलें, तें ऐकून मांजर त्याला ह्मणालें, "बाबा, माझ्यावर खुशाल विश्वास ठेव. ज्यापेक्षां तूं यावेळीं मला प्राणदान करणार आहेस; त्यापेक्षां मी तुझ्यावर कसा हात टाकीन. तूं माझा जिवलग मित्र आहेस. माझ्याविषयीं आतां बिलकूल संशय ठेवूं नकोस."

कार्यवशात् उभयतांची मैत्री होते ती अशा रितीनें. यावेळीं मांजराची उंदराला व उंदराची मांजराला अत्यंत गरज होती. अर्थात् ते उभयतांचे हाडवैरी असतांही आपापल्या हिताकरतां मित्र बनले! तत्काल उंदीर मांजराच्या पोटाखालीं जाऊन बसला. अर्थात् मुंगस आणि घुबड या दोघांसही निराश होऊन चालतें व्हावें लागलें. ते दोन शत्रू तेथून गेले; तेव्हां उंदराला अंमळ बरें वाटलें. जरी तो यावेळीं मांजराच्या दाढेंत होता; तरी जाळ्यांतून सुटेपर्यंत, त्याच्याविषयीं भय बाळगण्याचें कांहीं प्रयोजन राहिलें नव्हतें. कारण उंदराला यावेळीं तो मारील तर त्यालाही मरावें लागणार! अशी संधि होती म्हणून उंदीर खुशाल नाचूं लागला. मांजराला, आतां पारधी येईल

आणि तो आपला जीव घेईल याचें मोठें भय पडलें होतें. ह्मणून तो वरचेवर उंदराला ह्मणे, "मित्रा, अरे रात्र आतां बहुत करून सरल्या सारखीच आहे. लौकर लौकर पाश तोडशील तर बरें होईल. मेहरबानी करून आतां जलदी कर."

याप्रमाणें मांजराची एकसारखी त्वष्टी लागली होती; तरी उंदीर हळूहळूच पाश तोडीत होता. उगीच करकर दांत वाजवावे आणखी कांहीं चेष्टा कराव्या, पाश फार कठीण आहेत ह्मणावें, असें करून तो वेळ काढीत होता. पारधी यावा, आणि मग आपण याला पुरता मोकळा करावा, असा त्याचा इरादा होता. इतक्यांत रात्र खलास होऊन सूर्योदयाची वेळ आली. इकडे पारधीही जवळ जवळ येऊन पोंचला. मांजर वरचेवर उंदराची प्रार्थना करीतच होतें. तेव्हां पारधी अगदीं जवळ येऊन पोंचतांच; उंदरानें जो एक फांस बाकी ठेवला होता, तो तोडून मांजराला मोकळें केलें. मांजरानें जरी त्याच्याशीं मैत्री केली होती; तरी ती केवळ कार्या पुरतीच होती. जे कार्यवशात् मित्र होतात ते, तें सरतांच तत्काल शत्रू बनण्याला वेळ लागत नाहीं, ही गोष्ट उंदीर जाणून होता. ह्मणूनच त्याणें इतका वेळ लावला. पारध्याला समोर पाहून आपल्यावर झडप घालण्याची मांजराला छाती होणार नाहीं असें समजूनच त्याणें ती युक्ति केली होती. व ती चांगलीच साधली. उंदरानें शेवटचा फांस तोडला मात्र, मग मांजरानें पळभर देखील विलंब लावला नाहीं. तें जीव घेऊन सुसाट पळत सुटलें! इकडे उंदीरही तेथल्या तेथेंच एका बिळांत शिरला. अर्थात् त्याच्या जिवावरचें संकट निवृत्त झालें. आपलें जाळें तुटलें, व पारधही मिळाली नाहीं, म्हणून खिन्न झालेला पारधी मुकाट्यानें बोटें मोडीत चालता झाला. नंतर जिकडे तिकडे निर्भय झालें असें पाहून उंदीरही आपल्या बिळांत जाऊन खुशाल आनंदांत राहिला.

दुष्टांवर कितीही उपकार केले तरी त्यांच्या मनाला कांहीं त्याच्या-

बद्दल लाजलज्जा देखील वाटत नाहीं. ते उपकार करणाऱ्याचाच घात करण्यास तयार असतात! याप्रमाणें मांजराला उंदरानें जिवावरच्या संकटांतून सोडविलें; तरी त्याणें आपला स्वभाव सोडला नाहीं. हातांत आलेलें आपलें भक्ष्य गेलें, याची त्याला फार चटपट लागली! तो उंदराच्या बिळाजवळ जाऊन ह्मणाला, "मित्रा, अरे अंमळ बाहेर ये. तूं माझ्यावर उपकार केलेस. त्या तुला एकवेळ स्नेहपूर्वक आलिंगन तरी देऊं दे." यावर उंदीर ह्मणाला, "दादा, आतां खुशाल आपण आपल्या जागीं चलावें. तुमची आमची मैत्री तर आहेच; पण ती आपापल्या ठिकाणीं राहूनच चालायची. तुह्मी प्रेमालिंगन देणार तें आपल्या मनांत द्या. आणि मीही पण तसेंच करतों. तुमचें शरीर केवढें आणि माझें केवढें. दोघांनीं एकमेकांला मिठी मारिली, तर ती काय आंगभर होणार आहे? तुमच्या एका तोंडालाच मी पुरणार नाहीं. तेव्हां स्नेह असेल तो मनांतल्या मनांत ठेवा ह्मणजे झालें! प्रसंगाच्या निमित्तानें शत्रूही मित्र होतात; पण ती त्यांची मैत्री कायमची नव्हे, ही गोष्ट तुह्माला ठाऊकच असेल. मग उगाच कशाला खटपट करतां? तुमचा हेतू पूर्ण होण्याची कांहीं आशा नाहीं." असें सांगून उंदीर बोलेनासा झाला. तेव्हां हिरमुसल्यासारखें होऊन मांजराला परत जावें लागलें."

ही कथा सांगून **यौगंधरायण योगेश्वराला** ह्मणाला, "मित्रा, तूं ही गोष्ट लक्ष्यपूर्वक ऐकलीसना? एक नाहीं दोन, तिघे शत्रू आ पसरून बसले असतांही केवळ आपल्या बुद्धीच्या जोरावर उंदरानें—तिर्यग्योनी असूनही,—आपलें हित साधलें. मग मनुष्यांला तसें करतां येईल किंवा नाहीं याविषयीं काय सांगावें? मी त्यावेळीं आमच्या राजाला सांगितलें तें हेंच. राणी **वासवदत्तेचें** रक्षण करून आपलें काम मोठ्या चातुर्यानें साधावें, अशीच मीं त्याला विनंती केली. खरें ह्मणशील तर प्रत्येक कामांत बुद्धि हाच एक उत्तम मित्र आहे. पराक्र-

भाचा उपयोग होत नाहीं असें नाहीं, पण बुद्धीसारखें सर्वत्र त्याणें काम होत नाहीं. याविषयींही तुला मी एक कथा सांगतों, ती ऐक.

**श्रावस्ती** नांवाच्या प्रसिद्ध नगरांत **प्रसेनजित्** नांवाचा पूर्वीं एक राजा होता. त्याच्या कारकिर्दींत त्या शहरांत कोणी एक अपूर्व फिरस्ता ब्राह्मण येऊन पोंचला. तो ब्राह्मण असतांही शूद्राच्या घरचें अन्न खात असे. तेथें आल्यावर त्याची आणि एका सधन वाण्याची गांठ पडली. वाण्याला तो मोठा गुणी आहे असें वाटलें. व्यापारी लोक बहुतकरून साधूसंत, अतीथअभ्यागत, यांचा परामर्श घेत असतात. त्याप्रमाणें वाण्यानें त्याच्या जेवणाखाणाची वगैरे व्यवस्था करून त्याला एका ब्राह्मणाचे घरीं नेऊन ठेवला. प्रतिदिवशीं तो वाणी शिधासामग्री दक्षिणा वगैरे त्याला आणून पोंचवीत असे. एकटा मनुष्य खाणार किती? त्या अभ्यागत भटजीचें जेवण भागून घरधनी भटजीच्या घरीं सामानसुमानाची खूप गर्दी झाली. हळूहळू व्यापारी लोकांत प्रसिद्धी झाल्यावरून इतर व्यापाऱ्यांकडूनही पुष्कळ लाभ होऊं लागला. तो अभ्यागत ब्राह्मण मोठा कृपण होता. तो पूर्वीं शूद्राच्या येथलें अन्न खात होता याचें कारणही कृपणत्वच. गांठचा पैसा बिलकूल मोडायचा नाहीं असा त्याचा नियम होता. वाणीलोकांत जेव्हां त्याचें प्रस्थ वाढलें, तेव्हां दररोज त्याला मोठी प्राप्ति होऊं लागली. सामानसुमान मिळे तें विकून वगैरे त्याणें लौकरच एकहजार होन जमविले.

द्रव्य जवळ नव्हतें तोंपर्यंत त्याला फारशी काळजी नव्हती. पुंजी जमली तेव्हां त्याचा कांहींतरी बंदोबस्त केला पाहिजे, ह्मणून त्या लोभी ब्राह्मणानें जंगलांत एका निर्जन ठिकाणीं जाऊन तें पुरून ठेविलें. प्रतिदिवशीं पहाटेस शौचाच्या निमित्तानें जाऊन, तो ती जागा पाहून येत असे. असें करतां करतां बरेच दिवस गेले. इकडे त्याचा लाभही दिवसें दिवस वाढत होता; पण त्याच्या दुर्दैवानें मध्यें अकस्मात् घाला

घातला. एकेदिवशीं नित्याप्रमाणें तो ती जागा पाहायला गेला असतां तों उकरलेली असून माती अस्ताव्यस्त पडली आहे, व आंत आपलें डबोलेंही नाहीं असें त्याणें पाहिलें. मग काय विचारतां? कृपणच तो. कृपणाचें वित्त आणि त्याचा आत्मा हे दोन नसतात. त्याला मरणप्राय दुःख झालें. त्यावेळीं त्याचें हृदयच उदास झालें असें नाहीं; साऱ्या दिशा अगदीं शून्य झाल्या. अनिवार दुःखानें पीडित होऊन छाती बडवीत बडवीत, ज्या ब्राह्मणाचे घरीं त्याचें बिऱ्हाड होतें तेथें तो आला. व झालेला प्रकार त्यानें घरधन्याला कळविला.

घरधन्यानें रितीप्रमाणें त्याला चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या; तथापि त्या कृपणाचा खेद दूर झाला नाहीं. त्याणें तेथून जवळच एक तीर्थ होतें तेथें प्रयाण केलें. व तीर्थाच्या कांठावर आसन घालून खाणेंपिणें वगैरे वर्ज करून प्राणत्याग करण्याचा निश्चय केला. हावेळपर्यंत झालेली हकीकत त्याचा अन्नदाता जो वैश्य त्याला माहित नव्हती. त्याणें घरधन्याला—बुवा साहेब कोठें गेले?—ह्मणून विचारल्यावरून त्याणें जेव्हां झालेला प्रकार सांगितला, तेव्हां तो फार दुःखित होऊन दुसऱ्या आणखी कांहीं वाण्यांला बरोबर घेऊन जेथें तो धनलोभी प्राणत्याग करायला बसला होता, त्या ठिकाणीं आला. भटजीबुवांची ती स्थिती पाहून तो सावकार ह्मणाला, "भटजी महाराज, आपण हें काय आरंभलें आहे? केवळ द्रव्याकरतां आपण मरायला तयार झालां हा कोण अविचार! वळीव पावसाप्रमाणें द्रव्य अकस्मात् येतें व तसेंच निघूनही जातें. या गोष्टी आपल्यासारख्याला आह्मीं काय सांगाव्यात? नीट विचार करा. मिळायचें असलें तर आणखी नाहीं का द्रव्य मिळणार? झालें तें झालें. त्याच्याबद्दल खेद न करतां आपण परत चला."

इत्यादिप्रकारें त्या व दुसऱ्या वाण्यांनीं पुष्कळ समजावून सांगितलें; तरी त्या ब्राह्मणानें मरण्याचा निश्चय सोडला नाहीं. उघ-

ऊन आहे. कृपणाला द्रव्याची गठडी प्राणापेक्षांही अधिक असते. असो. हें वर्तमान राजा **प्रसेनजित्** याच्या कानांवर गेलें. आपल्या राज्यांत बिचाऱ्या गरीब ब्राह्मणाचें सर्वस्व चोरांनीं नेलें, व त्याकरतां तो आतां प्राणत्याग करणार, हें ऐकून राजाला फार वाईट वाटलें. कांहीं निवडक मंडळी बरोबर घेऊन तो तत्काल त्या तीर्थाच्या कांठीं प्राप्त झाला. आणि—एकंदर द्रव्य किती होतें, तें कोठें ठेविलें होतें, कधीं ठेविलें होतें, वगैरे चोरीच्या संबंधाची विशेष माहिती त्याच्या कडून त्याणें विचारून घेतली, आणि त्याला ह्मटलें, "भटजीबुवा, तुह्मी ज्या ठिकाणीं ते होन पुरून ठेविले होते, त्या ठिकाणीं कांहीं निशाणी असली तर सांगा, ह्मणजे तपास करून पाहूं."

यावर ब्राह्मण ह्मणाला, "दुसरी तर कांहीं निशाणी नाहीं; पण अरण्यांत ज्या ठिकाणीं मी तें द्रव्य पुरून ठेविलें होतें त्या ठिकाणीं एक लहानसें झाड आहे. एवढीच कायती खूण. याशिवाय दुसरें कांहीं नाहीं." हें ऐकून राजानें—आपण तुमचें द्रव्य शोधून आणवून देतों. कदाचित् नच मिळालें तर मी आपल्या खजिन्यांतून तितके होन तुह्मांस देववीन; पण व्यर्थ प्राणत्याग मात्र करूं नका, असें खात्रीपूर्वक सांगितल्यावरून ब्राह्मणानें तो आपला निश्चय सोडला. व जीव देत नाहीं, असें त्याणें राजाजवळही कबूल केलें. याप्रमाणें मरणाच्या उद्योगापासून राजानें त्याला निवृत्त केला तरी; न जाणों हा साहसी मनुष्य काय करील कोणास ठाऊक; अशी शंका आल्यावरून त्यानें त्या ब्राह्मणाला, त्याचा अन्नदाता जो वैश्य त्याच्या हातीं दिला. व मोठ्या हुषारीनें त्याचें रक्षण करण्याविषयीं ताकीद देऊन राजा नगरांत निघून गेला.

तेथें गेल्यावर चोरीचा पत्ता लावण्याकडे राजाचें सारें लक्ष्य लागलें. बहुतकरून जंगलांत फिरणाऱ्या लांकूडतोड्यांनीं किंवा औषधी शोधून आणणारांनीं ब्राह्मणाचा ठेवा उपटला असावा, असें त्याच्या लक्ष्यांत आलें. म्हणून त्याणें त्यादिवशीं बळेंच, आपलें डोकें दुखत आहे असें सांगून

चोपदाराकरवीं शहरांतल्या सर्व वैद्यांला बोलावून आणविलें. मुख्य मुख्य वैद्य होते ते राजवाड्यांत आले. तरी बारीक सारीक मंडळी मात्र कोठें दिसली नाहीं. म्हणून कोतवालाकरवीं राजानें शहरभर दवंडी पिटविली कीं, ज्या कोणत्याही मनुष्याला—मग तो वैद्यगिरीचा पेषा करीत असो किंवा नसो—-औषधी माहित असेल त्याणें राजवाड्यांत हजर व्हावें. असें कळविल्यावरून झाडून सारे लोक राजाजवळ आले. तेव्हां—तुमच्या माहितीचे रोगी या गांवांत किती आहेत? व ते कोण कोण आहेत? त्यांना औषधें कोण कोण देत असतात? व तीं कसलीं देतात? याप्रमाणें प्रत्येक वैद्याला एकीकडे नेऊन राजानें विचारावें व तेथून परभारें त्याला घालवून द्यावें, असा क्रम सुरू केला. तेव्हां प्रत्येकाला जें जें माहित होतें तें तें त्याणें सांगितलें. असें होतां होतां त्यांपैकींच एक वैद्य ह्मणाला, "महाराज, **मातृदत्त** नांवाचा सावकार अजारी असून त्याला मी औषध देत असतों. पहिल्या औषधानें गुण आला नाहीं ह्मणून मीं त्याला **नागबला** ( लहान **चिकणा** ) घ्यावयास सांगितली आहे. त्याला आज दुसराच दिवस आहे."

हें ऐकण्याबरोबर राजाचें काम झालें. त्याणें तत्काल त्या **मातृदत्त** नामक सावकाराच्या भावाला बोलावून आणला. आणि 'तुह्मांला **नागबला** कोणीं आणून दिली?' म्हणून विचारलें. त्या सावकारानें 'आपल्या घरच्या गड्यानें आणून दिली' म्हणून सांगितलें. तेव्हां त्या गड्यालाच ब्राह्मणाचा ठेवा मिळाला असावा, असें समजून तत्काल राजानें त्याला आपल्यासमोर आणविला. व अंमळ धमकी देऊन 'तूं **नागबला** आणण्याकरितां ज्या झाडाखालीं खंटलेंस तेथें तुला ठेवा मिळाला आहे तो मुकाट्यानें आणून दे. नाहीं पेक्षां आतांच सुळावर चढवितों,' असें सांगतांच भयभीत झालेल्या त्या सावकाराच्या गड्यानें तत्काल भटजीबुवाच्या होनांची थैली राजाच्यापुढें आणून हजर केली! नंतर राजानें त्या गड्याला कांहीं इनाम देऊन रवाना केलें,

व तेथल्या तेथें भटजीबुवाला बोलावून त्याचे होन त्याला दिले. मग काय विचारतां? जणूं काय गेलेले प्राणच परत आले आहेत! असा तो लोभी ब्राह्मण ठेवा मिळाल्यामुळें फार संतुष्ट होऊन राजाची स्तुती करीत व त्याला अनेक आशीर्वाद देत स्वस्थानीं गेला."

याप्रमाणें कथा सांगून **यौगंधरायण** ब्रह्मराक्षसाला ह्मणाला, "**प्रसेनजित्** राजानें आपल्या चातुर्यानें, झाडाच्या मुळांत ठेवलेला ब्राह्मणाचा ठेवा कोणीं काढला या गोष्टीचा पत्ता लावून तो त्याचा त्याला मिळवून दिला. **नागबला** ही औषधी ज्याठिकाणीं ठेवा ठेवलेला असेल त्याठिकाणींच उगवते, हें त्या राजाला माहित होतें. यावरून बुद्धी ही सार्वकाल प्रत्येक गोष्टींत प्रधान आहे, असें तुला वाटत नाहीं काय? बुद्धी पराक्रमाला देखील हटविते. आतां मीं जी तुला गोष्ट सांगितली तशाठिकाणीं पराक्रमाचा काय उपयोग आहे? एखादा अविचारी राजा असता, तर त्यानें व्यर्थ पुष्कळांचे जीव मात्र घेतले असते. निरपराधी लोकांना बंदींत टाकलें असतें. तरी त्यापासून चोरीचा पत्ता लागला असता काय? तसेंच सांप्रत तुला मीं जें काम सांगितलें आहे, त्यांतही पराक्रमाचा कांहीं उपयोग नसून केवळ बुद्धीनेंच तें साध्य केलें पाहिजे. याकरितां मित्रा **योगेश्वरा**! तूं त्या **कलिंगसेने**चा कांहींतरी दोष समजून येईल अशाप्रकारची चातुर्याची युक्ती योजून माझी मसलत सिद्ध कर. ही गोष्ट फारशी कठीण नाहीं. देव, दैत्य, गंधर्व, विद्याधर इत्यादि तिच्यावर लुब्ध झाले आहेत, हें पूर्वीं मीं तुला सांगितलेंच आहे. आणि कालच्या रात्रीं तूं आकाशांत कोणाचासा अवाजही ऐकला आहेस. यावरून तुला माझ्या सांगण्याचा थोडा अनुभव आलाच आहे. तिचा कांहींतरी दोष उघडकीस येईल; तर आमच्यावर जें एक संकट आलें आहे तें टळेल, व तिचेंही अकल्याण होणार नाहीं. **वत्सराजाला** वरायचें हा जो तिचा हेतू तो मात्र सिद्ध व्हायचा नाहीं; तथापि तिला योग्य पतीचा लाभ

होणारच आहे. व याप्रमाणें झालें ह्मणजे आह्मीं कांहीं अधर्म केला असेंही होणार नाहीं!"

उदारबुद्धी **यौगंधरायण** याणें याप्रमाणें सांगितलेलें ऐकून. संतुष्ट झालेला ब्रह्मराक्षस **योगेश्वर** त्याला ह्मणाला, "देवांचा प्रधान **बृहस्पति** या वांचून राजनीतीमध्यें तुझ्यासारखा दुसरा कोण प्रवीण आहे? या राज्यरूपी वृक्षावर तूं नीतिरूप अमृताची वृष्टी करीत आहेस ह्मणूनच दिवसें दिवस तो जोरानें वाढत असून सफलही झाला आहे. आतां मला जी तूं कामागिरी सांगितली आहेस; ती मी आपल्या शहाणपणाप्रमाणें मनापासून बजाविण्याविषयीं सारखा प्रयत्न करितों आहें. माझी सर्व बुद्धी व माझी शक्ती खर्च करून, त्या **कलिंगसेने**चें गुप्त वृत्त समजून घेतों. तूं कांहीं काळजी करूं नकोस." असें सांगून **योगेश्वर यौगंधरायणा**चा निरोप घेऊन **कलिंगसेने**च्या महालाकडे गेला.

इकडे **कलिंगसेना** नेहमीं **वत्सराजा**विषयीं अतिशय उत्कंठित होऊन तळमळत होती. तिचा महाल **वत्सराजा**च्या महालाच्या जवळच होता. राजा गच्चीवर क्रीडा करीत असला ह्मणजे ती आपल्या महालाच्या गच्चीवर उभी राहून एकसारखी त्याच्याकडे पहात असे. त्याच्या दर्शनापासून तिला विशेष सुख तर होत नव्हतेंच; पण उलट अधिक संताप मात्र होत असे. तिच्या अंगांत कामज्वर भरला असतां तिच्या सख्या कमळांचे देंठ, कमलिनींचीं पानें, चंदनाची उटी वगैरे शीतल उपचार करीत; पण त्या पासून तिला मुळींच सुख वाटत नव्हतें.

**मदनवेग** नांवाचा विद्याधर तिला पाहून कामशरानें व्यथित झाला होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. **कलिंगसेने**ची प्राप्ती होत नाहीं ह्मणून त्याणें **शंकराचें** आराधन केलें. व त्या पासून त्याला वरही मिळाला. तथापि, **कलिंगसेने**चें मन दुसऱ्यावर, अर्थात् **वत्सराजा**वर आसक्त झालें असून ती देशांतरीं ह्मणजे **वत्सराजा**च्या

येथें असल्यामुळें त्याला सहज मिळण्यासारखी नव्हती. तरी कोण-त्याही रीतीनें तिला आपण वरावें, असा निश्चय करून तो विद्याधर **मदनवेग** नित्य रात्रीं **कलिंगसेने**च्या महालाच्या भोंवतीं फिरत होता. कांहींतरीं संधी मिळतांच आपण आपला हेतू पूर्ण करून घ्यावा, असा त्याचा इरादा होता. याप्रमाणें बरेच दिवस गेले; तरी त्याला कांहीं सवड मिळाली नाहीं. एकेदिवशीं **महादेवानें** दिलेल्या वरदानाची आठवण करून **मदनवेगानें वत्सराजाचें रूप** अगदीं हुबेहुब घेतलें. तो विद्याधरच होता. तेव्हां त्याला तसें करण्यास अशक्य काय? असो.

याप्रमाणें **वत्सराजाचें** रूप घेतलेला तो विद्याधर **कलिंगसेने**च्या महालाच्या दारांत येऊन पोंचला. रात्रीच्यावेळीं एकाएकीं राजाची स्वारी आली तेव्हां, **कलिंगसेने**चा वियोग कंठवत नसल्यामुळें प्रधा-नादिकांला न कळवितां गुप्तपणें स्वारी आली असावी; असें समजून दरवाजावरच्या शिपायांनीं मोठ्या नम्रतेनें मुजरा करून त्याला आंत नेऊन पोंचविला. विद्येच्या सामर्थ्यानें हुबेहुब राजाचें रूप घेतलेला तो विद्याधर त्यांना कसा ओळखतां येईल? **मदनवेग** थेट **कलिंगसे-ने**च्या जवळ गेऊन पोंचला, तेव्हां तीही एकाएकीं उठून उभी रा-हिली. व अंमळ भयभीत झाल्यामुळें तिच्या अंगाला कंपही सुटला. तशांत थोडी व्याकुळही झाली. तिच्या अंगावरचे दागिने आपल्या अवाजानें—'अग, हा तो ( **वत्सराज** ) नव्हे. उगीच कां उठ-लेस?' ह्मणून तिचें निवारणच करीत आहेत कीं काय! अशी ती मान खालीं घालून त्या कपटी विद्याधरापुढें उभी राहिली.

**वत्सराजाचें** रूप धारण करणाऱ्या त्या **मदनवेगानें** हळूच ति-च्याशीं लाडीगोडीनें बोलण्याचा उपक्रम काढून आपल्या विषयीं तिच्या मनांत विश्वास उत्पन्न केला. व सहा महिनेपर्यंत आपल्या-च्याने दम धरवत नाहीं; ह्मणून कोणाला न कळवितां आलों, इत्यादि प्रकारची बतावणी करून त्याणें त्या भोळ्या स्त्रीला फसविलें. व

तिच्याशीं तत्काल गांधर्व विवाह करून तिला आपली स्त्रीही करून घेतली! हा प्रकार घडला त्याचवेळीं, आपल्या सामर्थ्यानें अदृश्य रूप घेतलेला **योगेश्वर, कलिंगसेने**च्या महालांत प्राप्त झाला. त्याला प्रथमच त्या विद्याधराची ओळख पटली नाहीं, यामुळें तो खिन्न झाला. कारण **यौगंधरायणानें** त्याला **वत्सराजा**वांचून अन्य पुरुषाशीं तिचा समागम घडेल तर तो पाहून आपणास कळविण्याविषयीं सांगितलें होतें. असें असून स्वतः **वत्सराजानेंच** तिच्याशीं गांधर्व विवाह लावून घेतला, हें पाहतांच आपला सर्व प्रयत्न व्यर्थ गेला; असें त्याला वाटलें. आणि तो तत्काल तेथून निघून **यौगंधरायणा**ला येऊन भेटला. 'प्रधानजी, स्वतः **वत्सराजानेंच** तिचें पाणिग्रहण केलें तेव्हां माझा काय उपाय?' असें त्याणें मोठ्या दुःखानें त्याला सांगितलें.

**योगेश्वरानें** तसें सांगितलें; तरी **यौगंधरायणा**ला ती गोष्ट खरी वाटली नाहीं. तो ह्मणाला, "अरे, तूं असें सांगतोस; पण यांत कांहीं तरी कपट असावें असें दिसतें. देव, गंधर्व, विद्याधर इत्यादिकांपैकीं कोणीतरी **वत्सराजाचें** रूप घेऊन आला असावा. पण इतकें कशाला. तूं असाच **वासवदत्ते**च्या महालांत जा. राजा आज तेथेंच असेल. ह्मणजे काय तो खुलासा होईल." हें ऐकून **योगेश्वर** लगेंच **वासवदत्ते**च्या महालांत गेला तों तेथें **वत्सराज** तिच्याशीं क्रीडा करीत होता. त्याला पाहतांच **योगेश्वरा**चा जीव अंमळ स्वस्थ जाहला. तो तसाच परत **यौगंधरायणा**कडे आला व त्याला **वत्सराज वासवदत्ते**जवळ असल्याचें त्यानें कळविलें. तेव्हां त्यालाही फार आनंद झाला. नंतर त्याणें **योगेश्वरा**ला तत्काल परत **कलिंगसेने**च्या महालाकडे पाठविलें. व 'ज्या पुरुषानें तिचें पाणिग्रहण केलें; तो कांहीं वेळ विलास करून श्रम झाले ह्मणजे सुस्त निजेल. व त्यावेळीं त्याचें खरें रूप आपोआप प्रकट होईल; त्यावरून तो कोण आहे, तें नीट ओळखून तूं मला येऊन कळीव,' असें त्याणें त्या ब्रह्मराक्षसास सांगितलें.

इकडे **वत्सराजाचें** रूप धारण करणारा **मदनवेग**, फार दिवस तो जिच्याविषयीं उत्कंठित होता; जिच्याकरितां त्याणें शंकराचें आराधन केलें व कित्येक दिवस व रात्रीच्या रात्री तिच्या महालाभोंवती घिरट्या घातल्या; अशा त्या **कलिंगसेनेची** प्राप्ती झाल्यामुळें आनंदित होत्साता; फार वेळ तिच्याशीं क्रीडा करून जणूं काय आपण कृतकृत्य झालों असें समजून तो सुस्त झोंपीं गेला. अर्थात् **कलिंगसेनाही**, चिरकाल शेंकडों मनोरथांनीं वरलेल्या त्या प्रियपतीच्या समागमानें संतुष्ट होत्साती आपल्याला कृतकृत्य मानून इतके दिवसांच्या जाग्रणांचें पारणें फेडावें म्हणूनच कीं काय, सुखानें निजली. निजायचे-वेळीं त्या कपटी **मदनवेगाचें** खरें रूप प्रकट झालें होतें; पण तें तिच्या पाहण्यांत आलें नाहीं. इकडे तिच्या वर्तनावर दृष्टी ठेवून बसलेल्या **योगेश्वराला** मात्र तें प्रत्यक्ष गोचर झालें. ज्याच्या तळव्यांवर छत्र आणि ध्वज यांचीं चिन्हें आहेत व ज्यांला मळ[1] बिलकूल लागलेला नाहीं, ज्याच्या शरीरांत कांहीं देवांचीं व कांहीं मनुष्यांचीं लक्षणें दिसत आहेत, झोंपेच्या अधीन झाल्यामुळें विद्या स्तब्ध होऊन ज्याचें खरें रूप प्रकट झालें आहे, अशा त्या विद्याधराला पाहून आनंदित झालेला **योगेश्वर यौगंधरायणाकडे** जाऊन त्याला म्हणाला, "प्रधानजी! अहो आपलें कार्य झालें! माझ्या सारख्या अडाण्याला तें कांहीं समजत नाहीं. तुम्ही मोठे नीतिशास्त्रज्ञ आहां. तुह्माला तें समजेल. पण जें कार्य सिद्ध होणें परम कठीण होतें; तें तुमच्या मसलतीनें आज सिद्ध झालें. खरेंच आहे. सूर्यावांचून आकाशाचा किंवा उदकावांचून सरोवराचा जसा कांहीं उपयोग नाहीं. तसा मसलतीवांचून राज्याचा काय उपयोग? आणि सत्यावांचून वाणीचें तरी काय प्रयो-

---

१—मळ लागावा कसा? विद्याधर असल्यामुळें तो अंतरिक्ष गमन करणारा होता. अर्थात् त्याच्या पायांला जमिनीचा स्पर्श नसल्यामुळें मळ लागण्याचा मुळींच संभव नव्हता.

जन ? असो. तुह्मीं सांगितलेलें काम माझ्या हातून झालें, यामुळें मी मोठा धन्य झालों आहें. **कलिंगसेने**च्या पलंगावर यावेळीं एक पुरुष निजला आहे. त्याच्या शरिरांत कांहीं देवांचीं व कांहीं मनुष्यांचीं लक्षणें दिसत आहेत. तो कोण, काय, वगैरे मला कांहीं माहित नाहीं. पण तो **वत्सराज** नसून दुसरा कोणी तरी देवयोनींपैकीं असावा, आणि त्याणें तिला भ्रष्ट केली, हें तर प्रत्यक्ष मीं पाहिलेंच आहे. तेव्हां एकंदरींत पुढें काय करायचें तें तुह्मी पाहून घ्या. माझें काम झालें. आतां मी निरोप घेतों."

**यौगंधरायणाला योगेश्वराचें** तितकेंच साहाय्य पाहिजे होतें. ह्मणून कृतकार्य झालेल्या त्या आपल्या मित्राला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन **यौगंधरायणानें** त्याला निरोप दिला, तेव्हां तो तत्काळ तेथून निघून गेला. यावेळीं रात्र बहूतकरून सरत आली होती. प्रातःकालचें कृत्य आटपून **यौगंधरायण वत्सराजा**च्या भेटीला गेला. जरी त्याला, राजाला ती गोष्ट सांगण्याची हुटहुटी लागली होती ; तरी त्याणें एकदम तें वर्तमान सांगितलें नाहीं. कारण तसें केलें तर राजाला कदाचित् संशय येईल. आणि तो भलतेंच कांहीं तरी मनांत आणील, म्हणून प्रथम इतर अनेक गोष्टी त्यानें काढल्या. बोलतां बोलतां **वत्सराजानें**च **कलिंगसेने**विषयीं उपक्रम काढून तिच्यासंबंधानें आतां काय करावें ? असें विचारलें. तेव्हां **यौगंधरायण** ह्मणाला, "महाराज, आपण तिच्याविषयीं इतकी काळजी घेतां त्याचें कांहीं योग्य कारण दिसत नाहीं. ती तर अगदीं स्वच्छंदी आहे. ती आपल्याला पाणिग्रहण करण्यास मुळींच योग्य नाहीं. ती आपल्या बापाच्या घरांतून निघाली ती प्रथम राजा **प्रसेनजित्** याला पाहण्याकरतां **श्रावस्तींत** गेली होती. तो म्हातारा आहे असें दिसल्यामुळें त्याच्यावरून तिचें मन उडालें. तुमच्या रूपाला लुब्ध होऊन ती येथें प्राप्त झाली हें खरें ; तरी प्रथमपासून तिचें तुमच्यावर मन होतें, असें मुळींच नाहीं. बरें तेंही असो.

पण ती आतां तरी चांगल्या वर्तनानें कोठें वागत आहे? स्वेच्छेनें दुसऱ्या पुरुषाचा संगही करते. तेव्हां आपण तिच्याविषयीं इतकी काळजी कां घेतां हें समजत नाहीं?"

**यौगंधरायणानें** असें सांगितलें; तरी राजाला तें खरें वाटलें नाहीं. त्याचें तिच्याविषयीं अगदीं निष्कृत्रिम प्रेम होतें. तो म्हणाला, "छेछेः! असें उगीच भलतेंच काय बोलतोस? ती कुलीन राजकन्या आहे. ती असें कसें वर्तन करील. त्यांतून मी तिला ज्या ठिकाणीं ठेवली आहे, तेथें प्रवेश करण्याची कोणा पुरुषाची छाती होईल? ह्मणून तूं सांगतोस तें मला बिलकूल खरें वाटत नाहीं."

हें ऐकून बुद्धिमान् **यौगंधरायण** मोठ्या जोरानें ह्मणाला, "महाराज, माझें सांगणें आपल्याला खरें वाटत नाहीं यांत फारसें कांहीं आश्चर्य नाहीं. प्रीती ही दोषांवर दृष्टी जाऊं देत नाहीं. पण मी आजच रात्रीं प्रत्यक्ष आपल्याला दाखवितों ह्मणजे झालें कीं नाहीं. समक्ष पाहिल्यावर तरी आपण मान्य कराल ना? सिद्ध, गंधर्व इत्यादि दिव्यपुरुष तिच्याविषयीं लुब्ध झाले आहेत हें मी आपल्याला पूर्वीं निवेदन केलेंच होतें. आपल्या भयानें मनुष्यांपैकीं कोणी त्या महालांत प्रवेश करण्यास समर्थ नाहीं हें खरें आहे; तथापि देवादिकांला प्रतिबंध करण्याचें कोणाचें सामर्थ्य आहे? पण तें कसेंही असो. आज रात्रीं माझ्या बरोबर आपण तेथें चलावें, ह्मणजे काय तें प्रत्यक्ष दिसून येईल!"

याप्रमाणें उभयतांचा संवाद झाला. राजानें रात्रीं **कलिंगसेनेच्या** महालांत जावयाचें कबूल केलें. नंतर **यौगंधरायण** तेथून निघून **वासवदत्तेला** भेटावयास गेला. **पद्मावतीशीं** विवाह करावयाच्या वेळीं, तिच्यावांचून आतां यापुढें राजाचा दुसऱ्या कोणाशींच विवाह होऊं देणार नाहीं, अशी जी त्याणें पूर्वीं प्रतिज्ञा केली होती, ती खरी करण्याविषयीं **वासवदत्तेनें** त्याला आठवण दिली होती. त्याप्रमाणें आपली प्रतिज्ञा खरी झाली, म्हणून आनंदित झालेला **यौगंधरायण**

**वासवदत्ते**ला म्हणाला, "देवि, आपल्याला मीं पूर्वीं वचन दिलें होतें तें आज पूर्ण झालें!" असें सांगून त्याणें **कलिंगसेने**चा सर्व वृत्तांत निवेदन केला. तेव्हां, **वासवदत्ता** त्याची अतिशय आभारी होऊन म्हणाली, "तुह्मी राजकार्यधुरंधरच आहां. तुमच्यासारखे पुरुष जसें बोलतात, तसेंच आचरणही करीत असतात. तुह्मी मला जें शिकवून ठेविलें होतें, त्या प्रमाणेंच मी आजपर्यंत वागलें. व त्याचा परिणामही चांगला झाला. असो, प्रत्येक कामांत तुह्मी असेच विजयी व्हाल." असें सांगून तिणें त्याला निरोप दिला.

तो दिवस मोठ्या कष्टानें राजाला काढावा लागला. कारण, **कलिंगसेने**वर त्याचें तसेंच विलक्षण प्रेम होतें. तिच्या हातून अयोग्य वर्तन झालें, हें ऐकून त्याला फार वाईट वाटलें व त्यामुळें आपला अपमानही झाला, असें त्याच्या मनांत आलें. कारण, **कलिंगसेने**सारखी मोठी कुलीन व दिव्य रूपवती स्त्री आपल्याला वरण्याविषयीं प्राप्त झाली, याबद्दल त्याला जो मोठा अभिमान वाटत होता; तो **यौगंधरायणा**च्या सांगण्यावरून खंडित झाला. असो, एकदां कधीं रात्र होईल व केव्हां आपण प्रत्यक्ष पाहूं; असें त्याला झालें होतें. हळूहळू सूर्यास्त होऊन रात्रही झाली. तेव्हां राजा **यौगंधरायणा**ची वाट पहात बसला. नंतर मध्यरात्रीच्या सुमारास जिकडे तिकडे सामसूम झालें आहे, असें पाहून **यौगंधरायणा**सहवर्तमान राजा **कलिंगसेने**च्या महालांत गेला. दरवाजावर पहारेकरी होते. त्यांणीं त्याला प्रतिबंध केला नाहीं हें उघडच आहे. राजा थेट महालांत गेला तों तेथें, **कलिंगसेना वत्सराजाचें** रूप घेऊन आलेल्या **मदनवेग** नामक विद्याधराशीं यथेच्छ क्रीडा करून श्रांत झाल्यामुळें, उभयतां सुस्त निजलीं होतीं. यावेळीं तो विद्याधरही आपल्या पूर्वरूपांत होता. **यौगंधरायणा**सहवर्तमान राजा पलंगाजवळ गेला. आणि त्या पुरुषाला पाहिलें. तेव्हां त्याला इतका राग आला कीं,

तत्काळ तरवार उपसून त्याणें त्याच्यावर प्रहार केला! पण तो पडला विद्याधर. तो राजाच्या हातून कसा मरणार? तितक्यांतले तितक्यांत सावध होऊन् तो झट्कन आकाशांत निघून गेला. इकडे क्षणमात्रांत **कलिंगसेना**ही जागी झाली. ती जागी झाली, असें पाहतांच **वत्सराज** एका बाजूला आड उभा राहिला.

बिछान्यावर कोणींच नाहीं असें पाहून **कलिंगसेना** दुःखित होऊन म्हणाली, "आपण आम्हीं जागा होऊन मला निजलेली तशीच येथें टाकून **वत्सराज** कसा गेला? अरे देवा! मी अगदीं बेसावध निजलें!" हे तिचे उद्गार ऐकून **यौगंधरायण वत्सराजा**ला म्हणाला, "नीट ऐका महाराज. जो पुरुष हिच्या बिछान्यावर निजला होता त्याणें तुमचें रूप घेऊन हिला भ्रष्ट केली. वस्तुतः ही गोष्ट मला मुळींच समजली नसती; पण योगसामर्थ्यानें हा सर्व वृत्तांत प्रत्यक्ष दिसला. व ह्मणूनच मी साक्षात् तो पुरुष तुह्माला दाखविला. त्याचा प्रभाव दिव्य असल्यामुळें तो तुह्माला मारण्यास शक्य होणार नाहीं."

**कलिंगसेना** खरोखरच **वत्सराजा**वर अनुरक्त होती. **मदनवेग** विद्याधरानें तिच्याशीं विवाह केला; तरी ती **वत्सराजा**लाच आपण वरलें असें समजत होती. व त्याप्रमाणेंच तिचे स्वाभाविक उद्गारहीं निघाले. ते ऐकून व नंतर **यौगंधरायणा**नें उघड करून सांगितलें त्यावरून **वत्सराजा**चा राग अंमळ शांत झाला. कारण, हावेळपर्यंत, परपुरुषावर हिचें मन आसक्त आहे, अशी त्याची समजूत झाली होती; पण आतां—कोणी दुष्टानें कपटानें हिला फसविलें, असें तो समजला. नंतर **यौगंधरायणा**सहवर्तमान तो तिच्या पलंगा जवळ गेला. त्या दोघांलाही पाहतांच तत्काल ती पलंगाखालीं उतरली, आणि यथायोग्य उभयतांचा तिणें सत्कार केला. राजाला म्हणाली, "आर्यपुत्र, आतांच बाहेर जाणें झालें होतें, आणि इतक्यांत पुनः प्रधानजीसह परत येणें झालें, ते इतक्या जलदीनें स्वारी कोठें गेली होती?" हें

ऐकून **यौगंधरायण** तिला ह्मणाला, "बाई **कलिंगसेने, वत्सराजाचें** रूप घेणाऱ्या दुसऱ्या कोणीं तरी तुला फसवून तुझ्याशीं विवाह केला. या माझ्या यजमानानें खरोखरच तुझ्याशीं अद्याप लग्न लावलें नाहीं."

हें विपरीत भाषण ऐकतांच, जणूं काय काळजावर कठोर बाणांचा प्रहार झाला आहे, अशी ती अत्यंत दुःख व शोक इत्यादिकांनीं भ्रांत झाली. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा सारख्या वाहूं लागल्या. कांहीं वेळानें ती **वत्सराजाला** ह्मणाली, "महाराज, गांधर्वविधीनें प्रत्यक्ष आपण माझ्याशीं लग्न लावलें असूनही त्याचें आपल्याला विस्मरण झालें काय? पूर्वी **दुष्यंत**राजानें **शकुंतले**चें पाणिग्रहण केलें असूनही त्याला त्याचें जसें विस्मरण झालें होतें, तसेंच आपल्यालाही झालेंसें वाटतें!"

हें ऐकून राजालाही फार वाईट वाटलें. तो ह्मणाला, "खरोखर मीं तुझें पाणिग्रहण केलें नाहीं. तुझ्या महालांत मी आतांच काय तो आलों. यांत एक अक्षरही खोटें नाहीं." यावेळीं **वत्सराजाची** स्थिती कांहीं चमत्कारिक झाली होती. दया आणि प्रीति या दोन विकारांनीं त्याचें मन घेरलें होतें. यामुळें **कलिंगसेने**प्रमाणेंच त्याचेही डोळे भरून आले. ती स्थिती पाहून **यौगंधरायणानें**—चला आपण येथें राहूं नका, असें सांगून राजाचा हात धरून तो त्याला बळेंच राजवाड्यांत घेऊन गेला. उघडच आहे त्याचें काम होतें तें झालें.

---

१—दुष्यंत आणि शकुंतला यांची कथा सर्वत्र प्रसिद्धच आहे. तेव्हां तिच्यासंबंधानें येथें कांहीं लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. यांत ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट इतकीच आहे कीं, 'गांधर्वविधीनें विवाह करूनही दुष्यंताला त्याचें विस्मरण झालें,' असें मुळांत वर्णन केलें आहे. यावरून मूळ ग्रंथ अर्थात् बृहत्कथा ही कालिदासाच्या शाकुंतलानंतर झाली असावी, हें उघड होतें. कारण ही कथा मुळीं महाभारतांत वर्णन केली आहे, तरी तेथें राजाला शकुंतलेच्या पाणिग्रहणाचें विस्मरण झालें होतें, असें वर्णन केलेलें नसून लोकापवाद येऊं नये ह्मणून त्याणें थोडा वेळ मुद्दाम तिचा छळवाद केला, असें सांगितलें आहे. लग्नाचें विस्मरण झाल्याचें कालिदासकवीनेंच आपल्या शाकुंतलांत वर्णन केलें आहे.

मग तो आणखी पंचाईत करीत कशाला बसेल? प्रीतिवश झाल्या-मुळें—देवांनीं उपभोग घेतला ह्मणून कांहीं हरकत नाहीं. व तोही आपल्याच वेषानें घेतला आहे. तेव्हां हिला वरण्यास कांहीं हरकत नाहीं, असें जाणून राजानें तिचा स्वीकार केला तर काय करावें याचें त्याला भय वाटलें असावें.

प्रधानासहवर्त्तमान, राजा तिला उत्तर न देतां निघून गेला. तेव्हां, आपल्या कळपांतून चुकलेल्या हरिणीप्रमाणें जिणें आप्त, इष्ट, मित्र इत्यादिकांचा त्याग केला आहे अशा त्या **कालिंगसेने**ची झालेली अवस्था काय वर्णन करावी! तिचा सर्वस्वीं भरिभार काय तो **वत्सराजा**वर होता. व त्याच्याच करितां तिणें सर्वांला सोडून इकडे येण्याचें साहस केलें होतें. आतां जो प्रसंग झाला त्यावरून **वत्सराज**तर सर्वस्वीं आपल्याला अंत-रला, तेव्हां आतां काय करावें या विचारांत ती पडली. संभोगाच्या योगानें, ज्याचीं पानें विगलित झालीं आहेत अशा विकळ मुखरूपी कमलाला धारण करणारी, अस्ताव्यस्त झालेले केश हीच जिच्यावर गुंजारव करणारी भ्रमरावलि, अशी हत्तीनें मर्दन केलेल्या कमलिनीप्रमाणें ती **कालिंगसेना** अगदीं निस्तेज झाली. जिचा कन्याभाव नष्ट झाला आहे, व आतां पुढें काय करावें हें जिला सुचत नाहीं, अशी ती सुस्कारा सोडून आकाशाकडे पाहून दीनस्वरानें म्हणाली, "ज्या कोणी पुरुषानें **वत्सराजा**चें रूप धारण करून माझ्याशीं विवाह केला, त्याणें कृपा करून आतां प्रकट व्हावें. तोच माझा विवाहित पति व मीच त्याची धर्मपत्नी हें अगदीं सत्य आहे."

हे तिच्या तोंडचे शब्द ऐकतांच दिव्य अलंकार धारण करणारा सुंदर विद्याधरांचा अधिपति तो **मदनवेग** तत्काल आकाशांतून खालीं उतरला. **कलिंगसेने**ला त्याची मुळींच ओळख नव्हती. तिणें—'आ-पण कोण व कोठून आलां' ह्मणून विचारलें. तेव्हां तो म्हणाला, "हे सुंदरि, माझें नांव **मदनवेग**. मी विद्याधरांत मुख्य आहें. पूर्वीं तूं

आपल्या बापाच्या येथें असतां मीं तुला पाहिलें. आणि दुसऱ्या कोणत्याही उपायानें तुझी प्राप्ती होण्याचा संभव न दिसल्यावरून तप करून **श्रीशंकराचें** आराधन केलें. आणि त्याच्यापासून तुझा लाभ घडवून देणारा वर मिळविला. तथापि तुझें मन **वत्सराजावर** आसक्त आहे, असें पाहून त्याच्याशीं तुझें लग्न होण्यापूर्वींच मीं त्याचें रूप घेऊन युक्तीनें तुझ्याशीं आपला संबंध घडवून आणला. प्रिये, **कलिंगसेने**, जें कांहीं मीं केलें तें चांगलें किंवा वाईट याचा आतां विचार करूं नकोस. झालेली गोष्ट पुन्हां येत नाहीं. तुझ्यावर माझें मन अत्यंत आसक्त झालें असल्यामुळें मीं तसें कपट केलें. तथापि त्याचा परिणाम चांगलाच होणार आहे. झाल्या अपराधाची क्षमा करून आतां तूं जें बोललीस तेंच खरें कर, इतकेंच माझें मागणें आहे."

**मदनवेगाचें** हें भाषण ऐकून **कलिंगसेने**ला अंमळ समाधान वाटलें. दोहोंकडूनही आपण फसतों कीं काय, अशी तिला हावेळपर्यंत शंका होती. स्त्रिया आणि पुरुष यांच्या प्रीतीचा संबंध मोठा चमत्कारिक असतो. ज्या पुरुषाची कधीं भेट नाहीं, किंवा ज्याचें नांव देखील कधीं ऐकण्यांत आलेलें नाहीं असा कां असेना; पण त्याचा समागम घडला कीं पुरे. स्त्रीला तत्काल त्याचा ओढा लागतो! याप्रमाणेंच पुरुषालाही स्त्रीचा ओढा लागतो. तात्पर्य पूर्वींचा कांहींएक संबंध नसतां केवळ क्षणिक शरीरसंबंधानें ते उभयतां परस्परांचे जिवलग मित्र बनतात. व त्या समागमाची आशा तुटली कीं, ते परस्परांचे शत्रु किंवा उदासीनही होतात. सांप्रत **कलिंगसेने**ची अशीच अवस्था झाली होती. इतके दिवस ती **वत्सराजा**करितां तळमळत होती. आप्त, गण, गोत वगैरे सर्व त्याच्याच करितां तिणें सोडले. असें होतें तथापि आतां त्याच्या प्राप्तीची आशा नाहीं. असें होतांच तत्काल तिचें मन त्याच्याकडून मागें हटलें. अर्थात् आतां त्याणें **मदनवेगा**चा आश्रय केला. असो, त्या विद्याधरानें आपल्या प्रियपत्नीचें

अनेकप्रकारें समाधान केलें. व आपल्यावर तिचा पुरता विश्वास बसेल असें करून तिला कोणत्याही प्रकारें अडचण पडूं नये म्हणून असंख्य द्रव्य दिलें. तिणेंही सर्वप्रकारें हा आपल्याला योग्य आहे, असें समजून त्याच्यावरच दृढ पतिप्रेम ठेवलें. नंतर उभयतांत कांहीं-वेळ गोष्टी झाल्या. व पुन्हां आपण येतों, असें सांगून तो विद्याधर स्वस्थानीं निघून गेला. त्याणें तिला बरोबर नेलें असतें; पण तो दिव्यलोकांत राहणारा असल्यामुळें **कलिंगसेने**चा तेथें प्रवेश हो-ण्याचा संभव नव्हता. **कलिंगसेने**नेंही असा विचार केला कीं, आ-पण बापाचें घर मुद्दाम सोडून आलों तेव्हां परत तेथें जाणें हें योग्य नाहीं. भर्त्याच्या घरीं जावें, तर तेथें मनुष्यशरीरानें प्रवेश व्हावयाचा नाहीं. तेव्हां यावेळीं आपण आहों त्याचठिकाणीं रहावें, असा तिणें निश्चय केला. व ती गोष्ट तिचा पती **मदनवेग** यालाही मान्य झाली.

याप्रमाणें जिच्याकरितां **वत्सराज** तळमळत होता व त्याचा प्रधान **यौगंधरायण** अनेक युक्ति व मसलती योजून राजाशीं जिचा समागम न होऊं देण्याविषयीं प्रयत्न करीत होता; जिच्याबद्दल राणी **वासवदत्ता** व **पद्मावती** उदासीन झाल्या असून कसेंही करून हें अरिष्ट टळावें, असे देवाधर्माला नवस करीत होत्या; जिनें स्वतः **वत्सराजाच्या** प्राप्तीकरतां आईबाप, सोयरेधायरे व त्यांच्याबरोबरच लोकलज्जेचादे-खील त्याग करून परदेशांत परक्याठिकाणीं येण्याचें साहस केलें; व जी क्षणोक्षणीं त्याच्या समागमाविषयीं उत्कंठित होत होती; त्या **कलिंगसेने**चा आणि **वत्सराजा**चा कायमचा वियोग झाला! **यौगं-धरायणा**ची मसलत सिद्ध झाली. **वासवदत्ता** आणि **पद्मावती** यां-च्यावरचें अरिष्ट टळलें. असा योग ईश्वरीसंकेतानें व **यौगंधरायणाच्या** प्रयत्नानें आपोआप घडून आला, यामुळें जिकडेतिकडे स्वस्थता झाली. पण **वत्सराजा**च्या मनाला मात्र विलक्षण चटका लागला होता. **कलिंगसेने**च्या संबंधानें त्यानें आजपर्यंत जे अनेक मनोरथ केले होते

ते सारे व्यर्थ गेले. त्या रात्रीं जो प्रसंग झाला त्या क्षणापासूनच **कलिंगसेनेचें** मन **वत्सराजावरून** उडून गेलें. या जन्मांत आतां आपल्याला तो पुरुष प्राप्त होणार नाहीं व कदाचित् झाला तरी त्याचा स्वीकार करतां येणार नाहीं, असें समजून त्या धर्मशील **कलिंगसेनेनें** त्याच्या संबंधाच्या सर्व इच्छा व मनोरथ यांवर पाणी सोडलें! ती एकनिष्ठ व पातिव्रताधर्मानें वागणारी असल्यामुळें, **मदनवेगावर** पूर्वी तिची प्रीती नव्हती; तरी दैवानें तो आपल्याला पती करून दिला आहे, तेव्हां सर्वभावेंकरून त्याच्याच सेवेंत तत्पर असावें, असें समजून ती त्या विद्याधरावरच निष्ठा ठेवून राहिली होती. तोही विद्याधर असल्यामुळें **वत्सराजा**पेक्षां रूप, गुण, ऐश्वर्य इत्यादिकांनीं संपन्न असून तरुण व स्त्रियांला प्रिय वाटण्यासारखा होता. तेव्हां **कलिंगसेने**ला **वत्सराज** मिळाला नाहीं, म्हणून दुःख करण्याचें कांहींच कारण नव्हतें. त्या उभयतांच्या समागमांत उणीव काय ती एवढीच होती कीं, सारा दिवस त्या दोघांचा एकत्र सहवास होत नव्हता. **मदनवेग** नियमितवेळीं **कलिंगसेने**ला भेट देत होता. व तो तिच्यावांचून इतर कोणच्याही मनुष्याच्या दृष्टीस पडत नसे. यामुळें स्वभावतःच दुसऱ्यावर दोषारोप करणाऱ्या लोकांनीं तर **कलिंगसेने**वर नाहीं नाहीं ते आरोप आणले होते. बहुतकरून सर्वलोक तिला बटकीसारखी स्वेच्छ व्यवहार करणारी, असें मानीत असत! तथापि **कलिंगसेने**ला त्याचें वर्तमानदेखील नव्हतें. व ती लोक आपल्याला काय ह्मणतात, याविषयीं कधीं चौकशीही करीत नव्हती. उघडच आहे, ज्याचें वर्तन शुद्ध व सरळ असेल, तो लोकांच्या बडबडीची परवा कशास ठेवील? असो.

**कलिंगसेना** आनंदांत होती; पण इकडे **वत्सराज** मात्र तळमळत होता. त्याला हातीं आलेलें रत्न गेलें याबद्दल अतिशय विषाद व औदासीन्य वाटत होतें. त्यांतच कधीं कधीं विलक्षणप्रकारचा आवेशही

येत असे. ज्या विद्याधरानें कपटवेष घेऊन तिला वरलें, त्याला मारून ठार करावा असें त्याला वाटे! एकेदिवशीं तो एकटाच आपल्या महालांत **कलिंगसेने**विषयीं उत्कंठित होऊन विचार करीत असतां त्याचा तो आवेश फारच अनावर झाला. तेव्हां तत्काल तरवार हातांत घेऊन तो एकटाच तिच्या महालांत गेला. तो विद्याधर मिळेल तर त्याला ठार करावा व **कलिंगसेने**चा बलात्कारानें संभोग करावा, असा भयंकर इरादा धरून तो निघाला होता! कामाच्या अधीन झालेला **वत्सराज** अपरात्रीं **कलिंगसेने**च्या महालांत, ती ज्या ठिकाणीं निजली होती त्या ठिकाणीं येऊन पोंचला. सुदैवानें त्यावेळीं तेथें तिचा पती **मदनवेग** जवळ नव्हता, हें एक बरें झालें. नाहींतर भलताच कांहींतरी परिणाम झाला असता. एकाएकीं राजा आपल्याजवळ आला, हें पाहतांच चकित होऊन मोठ्या धिमेपणानें तिणें त्याचा योग्य आदरसत्कार केला. व अशा अवेळीं दर्शनाचा लाभ देण्याचें कारण विचारलें.

जर तिच्या मनांत वाईट हेतू असता तर ती तेव्हांच राजाच्या आगमनाविषयीं विशेष विचार न करतां त्याला अनुकूल झाली असती; पण **कलिंगसेना** पडली साध्वी. अशा अपरात्रीं स्वारी आली आहे, तेव्हां कांहींतरी अयोग्य हेतू धरूनच आली असेल, असें ती तेव्हांच समजली. तिणें त्याचा जो आदरमान केला तो अगदीं शुद्ध व सरळपणानें केला. त्यांत प्रीतीचा अंश मुळींच नव्हता. केवळ तो एक मोठा राजा आहे व आपण त्याच्या आश्रयास आहें असें समजूनच तिणें त्याला मान दिला. नाहींतर अपरात्रीं आल्याबद्दल ती त्याच्यावर रागें भरल्यावांचून कधींच राहिली नसती. कामी पुरुषाला काय बोलावें, आणि काय न बोलावें, याचा विचार मुळींच राहत नाहीं. तिणें आपल्याशीं कसें वर्तन केलें तें पाहूनच **वत्सराजानें** आपल्या मनांत समजायचें होतें. पण विवेकाला यावेळीं रजा मिळाल्यावरून त्याला तें कसें सुचणार! त्याणें **कलिंगसेनेशीं**

लाडीगोडीचें बोलणें लावून तिचें मन वळविण्याचा प्रयत्न सुरू केला. तेव्हां—'मी दुसऱ्याची स्त्री झालें आहें. तुमच्या सारख्या धर्मिष्ठ राजांनीं लोकांना धर्मानें वागण्याविषयीं उपदेश करावा व त्याकामीं त्यांना साह्य करावें. असें असून आपण परस्त्रीवर इच्छा ठेवतां हें अगदीं अयोग्य आहे.' असें सांगून तिणें त्याच्या विनवणीचा तिरस्कार केला.

आर्जवें करून ती वश होत नाहीं, असें पाहून कामांध झालेल्या राजानें तिच्यावर बलात्कार करण्याचा हेतू दर्शविला. व रागानें लाल होऊन ह्मणाला, "पुरे पुरे! ठाऊक आहे तुझें पातिव्रत्य. एक सोडून दोन, दोन सोडून तीन असे पुरुष तुझ्या प्रीतीला पात्र झाले आहेत. तेव्हां तूं कुलस्त्री नसून केवळ बटीक आहेस. बटकीचा मी समागम केला, तर त्यांत परस्त्रीसमागमाचा दोष मला मुळींच लागणार नाहीं. तेव्हां मुकाट्यानें मी सांगतों तें मान्य कर. फुकाचा पातिव्रत्याचा दंभ दाखवूं नकोस."

राजानें याप्रमाणें अत्यंत निंद्य असें भाषण केलें; तरी **कलिंगसेनेनें** मुकाट्यानें तें ऐकून घेऊन क्षणभर विचार केला. तिच्यासारख्या मोठ्या राजकन्येला—कोणत्याही रितीनें वाईट वर्तन न करतां—निंद्य दूषण देऊन बटीक ह्मणणें व तेंही **वत्सराजा** सारख्याच्या तोंडावाटें ऐकण्याचा प्रसंग येणें हें किती दुःखास्पद आहे, हें सांगावयासच नको. पण बिचारी करते काय, ती शांतपणानें राजाला ह्मणाली,

१—पहिला प्रसेनजित्, दुसरा वत्सराज आणि तिसरा मदनवेग विद्याधर मिळून तीन पुरुष झाले, असा वत्सराजाच्या बोलण्याचा अभिप्राय. मुळांत "तृतीयपुरुषप्राप्त्या" असें आहे. ह्मणजे तिसऱ्या पुरुषाला तूं प्राप्त झाली आहेस ह्मणून बटीक आहेस, असें ह्मटलें आहे. यावरून दोन पुरुषांपर्यंत अधर्म होत नाहीं, असें व्यक्त होतें. एक दोन आणि तीन हे शब्द संख्यावाचक आहेत. साध्वी ह्मणजे जिला बहुत पुरुषांचा समागम झाला नसेल ती—असें धर्मशास्त्रकारांचें मत आहे. बहुत्व हें एक व दोन या शब्दांत समाविष्ट होत नसून तीन या संख्यावाचक शब्दांत त्याचा समावेश होतो. यावरून स्त्रियांचा पुनर्विवाह करावा, असें ह्मणणाऱ्या लोकांस हें वाक्य चांगलेंच आधारभूत आहे असें दिसतें.

"महाराज, आपण समर्थ आहां. थोर आहां. व मी परदेशी असून आपल्या आश्रयाला आहें. तेव्हां आपण हवेंतसें बोललां तरी मला ऐकून घेणें भाग आहे. पण अंमळ विचार कराल, तर यावेळीं आपण फारच अयोग्य व निंद्य शब्दांचा उच्चार केला, हें आपल्याला शोभत नाहीं. आपण जो दोष दिला तो अगदीं खोटा आहे. मी केवळ तुह्मालाच वरण्याकरितां घरांतून निघालें. वाटेंत **प्रसेनजित्** राजाला मी पाहिला ही गोष्ट खरी आहे. तथापि त्याला वरावें असें माझ्या मनांत कधींच आलें नव्हतें. तो किती वाईट आहे, हें दाखविण्याकरितां माझ्या मैत्रीणीनें दुरून तो माझ्या नजरेखालीं आणला, एवढेंच काय तें. मी येथें आल्यावर **मदनवेग**नामक विद्याधरानें कपट करून तुमच्या वेषानें फसवून मला वरलें. यावरून माझा तो **मदनवेग** हा एकच काय तो भर्ता आहे. असें असतां तुह्मी मला बटीक ह्मटलें हें योग्य आहे काय? असो. आज तुमच्या तोंडांतून असे शब्द ऐकावे लागले, याचा बोल दुसऱ्या कोणावर न ठेवतां तो मी आपल्यावरच घेतें. आईबापादिकांला सोडून स्वेच्छ वागणाऱ्या स्त्रियांला अशाच विपत्ति प्राप्त होतात. मग अविवाहित मुलीवर येतील यांत आश्चर्य काय? 'शकून वाईट आहे, याकरितां तूं तसें करूं नको,' असें माझ्या सखीनें मला सांगितलें असतांही मी तुह्माला विनंती करण्याकरितां दूत पाठविला. त्या माझ्या अविचाराचें हें फळ मला प्राप्त झालें. ईश्वरी इच्छेनें जसें व्हायचें होतें तसेंच झालें. कोणत्याही वस्तूवर अधिक आस्था ठेवली ह्मणजे ती मुळींच मिळेनाशी होते. आतां कृपा करून आपण यावज्जन्म माझ्यावर पापदृष्टि ठेवूं नये. व मीही आपल्यावर तसा भाव ठेवणार नाहीं. जरी याठिकाणीं मी अगदीं दीन झालें आहें; तुमच्या तावडींतून मला सोडविणारा यावेळीं येथें कोणी नाहीं; तरी मी तुह्माला प्राप्त होईन असें समजूं नका. तुह्मी जर माझ्या अंगाला शिवाल तर खरोखर मी प्राणत्याग केल्यावांचून राहणार नाहीं. कुलीन स्त्री भर्त्याला

फसवून परपुरुषाचा समागम कशी करील बरें? महाराज, आपण नीट विचार करा. आणि विचारानें मनाला स्थिर करा. आपण रसिक आहां. स्त्री ही एक सुकुमार फूल आहे असें समजा. जसें फुलाला चुरडण्यापासून कांहीं उपयोग होत नाहीं. तें नाहींसें मात्र होतें. तसाच स्त्रीवर बलात्कार करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. याविषयीं मी तुह्माला एक लहानशी गोष्ट सांगतें ती लक्ष्य देऊन ऐका.

पूर्वी **चेदि** नांवाच्या देशांत **इंद्रदत्त** नामक राजा होता. त्यानें आपल्या पापाचा क्षय व्हावा, याकरितां एक मोठा तलाव व त्याच्याच कांठीं, जणूं काय आपल्या कीर्तीचा ध्वज उभा करावा ह्मणूनच एक देवालय बांधलें होतें. हें मानवी शरीर क्षणभंगुर असून यशरूपी शरीर मात्र अजरामर आहे. तेव्हां तें कायम ठेवावें ह्मणून **इंद्रदत्त** राजानें तें मोठें कृत्य केलें होतें. भक्तिपूर्वक प्रतिदिवशीं राजा त्या तळ्यावर स्नान करीत असून देवाचें पूजन व दर्शन वगैरे करीत असे. हळूहळू त्या शहरांतले सर्वलोक त्याठिकाणीं येऊं लागले. सांजसकाळ तेथें लोकांचा मोठा मेळा जमत असे. एकेदिवशीं तीर्थस्नानाकरितां आलेली एक मोठ्या सावकाराची स्त्री राजाच्या दृष्टीस पडली. तिचा पति व्यापाराकरितां परदेशीं गेलेला होता. स्वच्छ कांतिरूपी अमृतानें जिच्यावर अभिषेक केला आहे, सुंदर वस्त्र जिणें परिधान केलें आहे, आधींच रूपानें अप्रतिम असून बहुमोल दागिन्यांनीं जी सुशोभित आहे, अशी ती स्त्री जणूं काय कामराजाची जंगम राजधानीच, अशी दिसत होती. तिला पाहून राजा तत्काल आसक्तहृदय झाला. तुझ्या योगानें आपण सारें विश्व जिंकूं ह्मणूनच कीं काय; प्रीतिपूर्वक पंचबाण जो **मदन** त्याणें आपले दोन्ही भाते जिच्या पायांवर ठेवले आहेत अशा त्या स्त्रीनें राजाचें मन तत्काल हरण केलें. तथापि त्या ठिकाणीं बहुजनसमाज असल्यामुळें राजाला आपली दुष्ट वासना पूर्ण करून घेण्याची सवड मिळाली नाहीं.

ती स्त्री मोठी साध्वी होती. राजा आपल्याठिकाणीं तिच्यावर आसक्त झाला; तरी तिच्या तें ध्यानींमनींदेखील नव्हतें. तिणें आपल्या बरोबरच्या इतर स्त्रियांबरोबर त्या तीर्थांत स्नान केलें, व देवाचें दर्शन वगैरे घेऊन ती परत आपल्या घरीं जाण्यास निघाली. इकडे राजा तिच्या जाण्याची वाटच पहात बसला होता. ती तेथून निघतांच तो हळूहळू तिच्या मागून निघाला. व ती कोणत्या घरांत जाते, तें नीट पाहून तसाच पुढें राजवाड्यांत गेला. दिवसभर त्याला चैन कोठून असणार! कसा तरी त्याणें तो दिवस काढला. व रात्र होतांच त्या सावकाराच्या स्त्रीच्या घराचा शोध काढून कामवश झालेला राजा रात्रीच्या प्रसंगीं एकदम तिच्या घरांत शिरला. त्याला पाहतांच ती अतिशय भयभीत झाली. तथापि यावेळीं अस्वस्थ होऊन कांहीं उपयोग नाहीं असें समजून धीर धरून ती त्याला ह्मणाली, "महाराज, आपण आमचें पालन करणारे राजे आहां, अर्थात् आह्मी आपलीं लेंकरें आहों. असें असून आपण परस्त्रीच्या अंगावर हात टाकण्याकरतां आलां हें अगदीं अयोग्य आहे." याप्रमाणें तिणें समजुतीच्या चार गोष्टी सांगितल्या. पण खवळलेल्या भुतासारख्या अविचारी कामानें घेरलेल्या राजाला तिच्या बोलण्याचा विचार करण्यास वेळ कोठें होता? "बळजबरीनें मला स्पर्श करशील, तर तुला मोठाअधर्म लागेल. व मी आतांच्या आतां मरून जाईन. आपल्या शीलाला दोष लागलेला कधींही सहन करणार नाहीं." असें तिणें पायांपडून सांगितलें. तरी त्या अविचारी राक्षसानें तिच्या अंगावर हात टाकला! तेव्हां पातिव्रत्याचा भंग होत आहे या भीतीनें तिचें हृदय तत्काल फुटून ती धाडकन् खालीं पडली. हें पाहून त्या बैलाला (राजाला) थोडासा विचार आला. हां हां ह्मणतां जिकडे तिकडे लोकांचा गलबलाट सुरू झाला. तेव्हां अत्यंत लज्जित होऊन तो तत्काल तेथून निघून गेला. व जणूं काय त्या साध्वीच्या शापानें ज्याच्या आयुष्याची राख रां-

गोळी झाली आहे, असा तो राजा **इंद्रदत्त** क्षय लागून थोड्याच दिवसांनीं मरण पावला!"

अशी कथा सांगून मोठ्या नम्रतेनें **कलिंगसेना** पुन्हां राजाला ह्मणाली, "याकरितां मी आपल्याला हात जोडून प्रार्थना करतें. आपण अधर्म करूं नका. आणि माझे प्राण घेण्याची बुद्धीही आपल्याला न होवो. मी येथें आपल्या आश्रयाला राहिलें आहें; पण इतउत्तर आपल्याकडून याप्रकारचा उपसर्ग कधींही व्हायचा नाहीं; असें आपण वचन द्याल तरच मी येथें राहीन. नाहींपेक्षां मी आतांच दुसरीकडे निघून जातें. मी सांगतें या गोष्टीचा आपण नीट विचार करा." याप्रमाणें **कलिंगसेनेचें** दृढ निश्चयाचें भाषण ऐकून, **वत्सराजाचें** मन तत्काल उतरलें. व त्याला आपल्या वर्तनाची फार लाज वाटली. तो धर्मज्ञ होता; तरी कामादिक विकार मोठे अनावर असून ते कोणत्यावेळीं कसें वर्तन करायला लावतील, याचा कांहीं नियम नसतो. **वत्सराज** शुद्धीवर येऊन ह्मणाला, "राजकन्ये, मी तुला जें अयोग्य भाषण केलें त्याची क्षमा कर. तूं आपल्या भर्त्यासहवर्तमान खुशाल येथें रहा. आजपासून मी तुला यासंबंधानें एक अक्षरदेखील बोलणार नाहीं. माझ्याबद्दल तूं कांहींएक शंका मनांत आणूं नकोस. मी सर्वप्रकारें तुझा साहाय्यकर्त्ताच आहें असें समज." याप्रमाणें **कलिंगसेनेचें** समाधान करून व तिच्या मनाची पक्की खातरी करून **वत्सराज** तेथून निघाला. व तिच्याविषयीं त्याणें आशेचा अंकूरदेखील आपल्या मनांत ठेवला नाहीं.

इकडे नित्याप्रमाणें **मदनवेगाची** ती येण्याची वेळच होती. **वत्सराजाशीं** आपल्या स्त्रीचा कांहीं संवाद चालला आहे, असें पाहून तो अदृश्यरूपानें आकाशांत ऐकत राहिला होता. पातिव्रत्याला उचित असें **कलिंगसेनेचें** वर्तन पाहून त्याला फारच संतोष झाला. राजा महालांतून बाहेर पडतांच तो खालीं उतरला. आणि **कलिंगसेनेला**

शाबासकी देऊन ह्मणाला, "प्रिये, फार चांगलें वर्तन केलेंस. जर तूं असें न केलें असतेंस तर तुझें अकल्याण झालें असतें. कारण तुझ्या अंगाला **वत्सराजा**चा स्पर्श झाल्याचें मी कधींही सहन केलें नसतें. आज सहजासहजीं तुझ्याविषयीं माझ्या मनाची खातरी होण्याचा हा प्रसंग आला हें फार चांगलेंच झालें." असें सांगून त्याणें **कलिंगसेनेचें** मोठें गौरव केलें. ती रात्र तिच्या सहवर्तमान विलासांत घालवून पहांटेस तो आपल्या स्थानीं निघून गेला. याप्रमाणें प्रतिदिवशीं **मदनवेग** नियमितवेळीं येऊन जात असे. विद्याधर पती मिळाल्यामुळें मनुष्यपणांत दिव्यभोग व दिव्यसुख याचा अनुभव घेतहोत्साती **कलिंगसेना** मोठ्या आनंदांत तेथें राहूं लागली.

इकडे **वत्सराजानें कलिंगसेने**चा नाद अगदीं सोडून दिला. **यौगंधरायणानें** जें सांगितलें होतें, त्याची आठवण होऊन **कलिंगसेनेशीं** विवाह झाला नाहीं याबद्दल दुःख न होतां त्याला आनंदच वाटला. आपली राणी, राज्य, तसाच पुत्र या सर्वांचा **कलिंगसेने**च्या पायीं नाश होणार होता. तो झाला नाहीं; तेव्हां जणूं काय तीं आपल्याला पुन्हां मिळालींच असें राजानें मानलें. तिकडे राणी **वासवदत्ता** व **यौगंधरायण** आणि **पद्मावती** यांलाही फार आनंद झाला. त्यांणीं मसलत रूपिणी जी कल्पवल्ली लाविली होती, ती सफल झाली.

वर सांगितल्याप्रमाणें **कलिंगसेना कौशांबी**नगरींत **वत्सराजा**च्या आश्रयाखालीं सुखानें रहात असतां बरेच दिवस गेले. हळूहळू **कलिंगसेने**ची चर्या बदलत चालली. तिच्या मुखकमलावर पांढुरकी दिसूं लागली. तिला डोहाळे लागले. गर्भिणी असल्यामुळें गर्भार स्त्रीला व्हायचीं तीं सर्व चिन्हें झालीं. तिच्या स्तनांचे अग्रभाग काळे होऊन तटतटीत फुगले. जणूं काय मदरूपी मोहरेनें लांच्छित केलेले कामाचे निधानकुंभच, असे ते शोभूं लागले. याप्रमाणें आपली स्त्री गर्भिणी झाली असें पाहून तो विद्याधर **मदनवेग** तिच्या हनुवटीला

ह्मात लावून प्रेमपूर्वक ह्मणाला, ' प्रिये **कलिंगसेने**, आज तुला अप्रिय वाटण्यासारखी गोष्ट सांगायचें माझ्या वाट्यास आलें आहे. दिव्य लोकांत राहणाऱ्या आह्मा विद्याधरादिलोकांचा हा एक निर्बंध आहे. आह्मी मनुष्यजातीच्या स्त्रीचा स्वीकार करतों; तरी ती गर्भिणी होतांच तिचा त्याग करावा असा आमचा नियम आहे. आह्मांपैकीं कोणा स्त्रीला मनुष्यापासून गर्भ राहिला; किंवा आमच्यापासून मानवी स्त्रीला गर्भ राहिला; तरी त्याचा त्याग करायचा हा आमचा निर्बंधच आहे. **विश्वामित्रा**पासून धारण केलेला गर्भ **कण्वऋषी**च्या आश्रमांत **मेनका**नामक अप्सरेनें टाकला होता, हें तूं ऐकलेंच असशील. इतिहासांत **शकुंतला** ह्मणून जी प्रसिद्ध आहे ती त्या गर्भापासूनच झालेली. तूं पूर्वजन्मीची अप्सराच होतीस. अविचाराचें वर्तन केल्यावरून **इंद्रानें** तुला शाप दिला, व त्यापासून सांप्रत तुला मनुष्य देह धारण करावा लागला आहे. आणि त्या शापामुळेंच तुला—साध्वी असतांही—लोकांकडून बटीक बटीक ह्मणून घ्यावें लागतें आहे. ह्या करतां तूं ह्या तुझ्या गर्भांत जें मूल आहे त्याचें यथायोग्य रक्षण कर. तुला सोडून जाणें हें मला योग्य वाटत नाहीं; तथापि आमच्या नियमाप्रमाणें तसें केलेंच पाहिजे. त्याला उपाय नाहीं. मी स्वस्थानीं जात आहें तरी ज्यावेळीं तूं माझें स्मरण करशील, त्यावेळीं तत्काल मी तुला भेटून तुझें कार्य करीन. यांत किमपि अंतर होणार नाहीं."

हें ऐकतांच **कलिंगसेने**ला अतिशय दुःख झालें. दिव्य लोकांत राहणारांचा हा असा नियम असल्याचें पूर्वीं तिला मुळींच माहित नव्हतें. दैव एखाद्या मनुष्यावर अडचणी घालूं लागलें, ह्मणजे त्या किती व कशा घालतें याचा कांहीं नियम नाहीं. बिचाऱ्या **कलिंगसेने**ची काय स्थिती झाली आहे पहा! आईबाप, आप्तसंबंधी, स्वदेश या सर्वांला तर ती आधींच अंतरली होती. आणि ज्याच्याकरतां इतकें केलें तो तर सर्वस्वींच अंतरला. नवरा मिळाला तो बाकी सर्व गुणांनीं

चांगला पण नियमितवेळींच काय ती त्याची भेट व्हायची. तरी त्या-लाही ती राजीच होती. पण आतां तीही भेटीचा योग नाहींसा झाला. मग समागमाची तर वार्ताच नको. तशांतून आजपर्यंत सडी होती; ती आतां गर्भार झाली होती. असें एकामागून एक आपल्या इच्छेवि-रुद्ध घडून आल्यामुळें **कलिंगसेनेला** फार वाईट वाटलें. तिच्या डोळ्यां-तून अश्रुधारा वाहूं लागल्या. तथापि, निरुपाय आहे, असें समजून ती कांहीं एक विरुद्ध बोलली नाहीं. **मदनवेगाचीही** अशीच अवस्था झाली होती; पण देवांच्या नियमाप्रमाणें त्याला तसें केलेंच पाहिजे होतें. म्हणून त्याणें अनेकरितीनें तिची समजूत केली, व तिला पुष्कळ धन दिलें. आणि आपलें मन तिच्याकडे ठेवून तो मोठ्या संकटानें स्वलोकीं निघून गेला.

इकडे **कलिंगसेना** अपत्याची आशा हीच कोणी एक सखी, तिला धरून **वत्सराजाच्या** भुजच्छायेचा आश्रय करून राहिली होती. याच समयास—नेत्राग्नीनें दग्ध झालेला आपला पती शरीर धारण केलेला आपणाला प्राप्त व्हावा, म्हणून **शंकराचें** आराधन करीत असलेली **मदनाची** स्त्री जी **रती**, तिला भगवान् **अंबिकापती** याणें प्रसन्न होऊन वर दिला. तो असा कीं, 'पूर्वी दग्ध झालेला तुझा पती सांप्रत **वत्सराजाच्या** घरीं जन्मास आला आहे. **नरवाहनदत्त** असें त्याचें नांव प्रसिद्ध आहे. माझी त्याणें अवज्ञा केली म्हणून त्याला योनि-

---

१—प्राचीन पौराणग्रंथकर्त्यांनीं काम ही एक देवता मानली आहे. अर्थात् त्याला शरीर असून रती नांवाची त्याची एक स्त्री मानली आहे. महादेव दीर्घकाल तप करीत बसला असतां कामानें त्याला वश करून घेण्याचा प्रयत्न केल्यावरून शंकराला राग आला. अर्थात् त्याच्या दोन्ही भोंवयाच्या मध्यभागीं अग्निमय जो तिसरा नेत्र आहे तो प्रदीप्त होऊन, त्याच्या तेजानें तत्काल मदनाचें भस्म झालें! ही कथा भारत व ब्रह्मांड इत्यादि पुराणें यांत पुष्कळठिकाणीं सविस्तर वर्णन केली आहे. कालिदासकवीनें आ-पल्या कुमारसंभवनामक काव्याच्या ३ ऱ्या आणि ४ थ्या सर्गांत हा भाग फारच सुर-सरितीनें वर्णन केला आहे.

संपर्क भोगावा लागला. तूं माझें आराधन केलें आहेस म्हणून—मनुष्यलोकांत तुला रहावें लागेल; तथापि—योनिसंबंध होणार नाहीं. अंगसहित तुझा पती **नरवाहनदत्त** याच्याशीं तुझा समागम होईल.' **रती**ला याप्रमाणें आज्ञा करून भगवान् **शंकर** प्रजापतीला ह्मणाला, "**वत्सराजा**च्या येथें **कलिंगसेना**नामक जी राजकन्या रहात आहे; ती लौकरच प्रसूत होईल. तिला दिव्य पुरुष अर्थात् **मदनवेग**नामक विद्याधर याच्यापासून पुत्रच होणार आहे. तर, तूं असें कर कीं, तिला जो पुत्र होईल तो मायेच्या बलानें तेथून नकळत उचलून ने, आणि त्याच्याठिकाणीं या **रती**ला नेऊन ठेव. तूं हिला मनुष्यकन्येचें स्वरूप देऊन याप्रमाणें व्यवस्था करशील त्यावेळीं हिची दिव्य तनु आपोआप नाहींशी होईल."

याप्रमाणें आज्ञा करून, भगवान् **शंकर** तेथल्यातेथेंच अदृश्य झाला. व ईश्वराची आज्ञा शिरसा मान्य करून **ब्रह्मदेव** स्वस्थानीं निघून गेला. इकडे **कौशांबी** नगरींत **कलिंगसेने**ची बाळंत होण्याची वेळ आली. तिच्या उदरांत असलेला पुत्र जमिनीवर पडला न पडला इतक्यांत, दाया वगैरे सर्वांच्या नेत्रांवर मायेची झापड घालून **ब्रह्मदेवानें** तत्काल तो पुत्र उचलून घेतला व लहान मुलीचा वेष घेतलेली रती कोणाला नकळत तेथें ठेवली, आणि तो निघून गेला. क्षणमात्रानें डोळे उघडून पाहतात, तों ती कन्या सर्वांच्या दृष्टीस पडली. मुलगा झाला होता, हें मुळींच कोणाला समजलें नाहीं. भरदिवसा अर्थात् अवेळीं, प्रतिपदेच्या चंद्रलेखेप्रमाणें मोठी तेजिष्ठ असून अत्यंत सूक्ष्म व कोमल,

---

१—श्रीकृष्णाच्या चरित्रांत जें वर्णन केलें आहे, त्याचें हें अनुकरण असावें असें वाटतें. कृष्णाचा वडील पुत्र प्रद्युम्न हा मदनाचा अवतार असें वर्णन केलेलें असून त्याची स्त्री रती ही मायावती हें नांव धारण करून शंबरासुराच्या घरीं मुत्पाकावर मुख्य अधिकारीण होऊन राहिली होती. प्रद्युम्नानें त्याचा वध केला; तेव्हां त्या उभयतांचा समागम होऊन तिच्यासहवर्तमान तो द्वारकेंत आल्याची सविस्तर कथा श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधांत वर्णन केली आहे.

आपल्या कांतीनें बाळंत घर प्रकाशित करून रत्नदीपशिखांला अलौकिक तेजानें लज्जित व निस्तेज करीत आहे कीं काय, अशा त्या अनुपम मुलीला पाहून **कलिंगसेने**ला पुत्रजन्मापेक्षांही अतिशय आनंद झाला. व त्याबद्दल तिणें फारच मोठा समारंभ करविला.

**कलिंगसेने**ला तशी सर्वोत्तम कन्या झाली असल्याचें वर्त्तमान ऐकून **वत्सराज, वासवदत्ता, पद्मावती, यौगंधरायण, रुमण्वान** इत्यादिक तिच्याच संबंधाच्या गोष्टी बोलत होते. जणूं काय ईश्वरानेंच प्रेरणा केली आहे, असा **वत्सराज** बोलतां बोलतां सहज **यौगंधरायणा**समक्ष **वासवदत्ते**ला ह्मणाला, "देवि, मी तुला खरेंच सांगतों. ती **कलिंगसेना** कोणी सामान्य स्त्री नसून शापभ्रष्ट झालेली ती कोणी तरी दिव्य स्त्री असावी असें मला वाटतें. यामुळें तिला जी आतां मुलगी झाली आहे, तीही दिव्यच असली पाहिजे. नाहींतर असें आश्चर्यकारक रूप कोठून प्राप्त होणार? मला असें वाटतें कीं, आपला मुलगा हाही दिव्यच आहे. तेव्हां **कलिंगसेने**ची मुलगी आपल्या पुत्राला बायको करून देण्यास योग्य आहे. हीच आपल्या **नरवाहनदत्ता**ची पट्टराणी होईल. तिच्यावांचून त्याच्या जोगती दुसरी कोणीच मिळणार नाहीं."

हें ऐकून **वासवदत्ते**ला कसेंसेंच वाटलें. **कलिंगसेना** ही कुलशीलादिकेंकरून **वासवदत्ते**हून कोणत्याही प्रकारें कमी नव्हती. रूपानें तर ती **वासवदत्ते**ला लाजवीतच होती. तथापि दुर्दैवानें लोकांकडून बटीक ह्मणून घ्यायचें तिच्या कपाळीं आलें होतें. त्यांतून **वासवदत्ते**चा तर तिच्याशीं हेवा असलाच पाहिजे. राजाच्या ह्मणण्याचा तिरस्कार करून आढ्यतेनें ती ह्मणाली, "महाराज, आपण हें एकाएकीं भलतेंच काय बोलतां? पितृकुल आणि मातृकुल या दोहोंकडूनही अत्यंत शुद्ध व मान्य असा हा तुमचा मुलगा कोठें! आणि त्या बटकीच्या (**कलिंगसेने**च्या) पोटीं जन्मास आलेली ती पोर कोठें! कशास

कांहीं संबंध आहे का? असली मुलगी करायची ती काय, कुलीन राजांच्या मुली मिळत नाहींत ह्मणून वाटतें?"

हें ऐकून राजाला वाईट वाटलें. तो ठांसून ह्मणाला, "तूं काय पाहिजे ते ह्मण. पण यावेळीं माझ्या तोंडांतून जे शब्द निघाले ते मी स्वतः बोललों नाहीं. कोणीतरी माझ्या हृदयांत शिरून तो माझ्याकडून बोलवीत आहे असें मला वाटतें. **कलिंगसेने**ची कन्या हीच **नरवाहनदत्ता**ची पूर्वजन्मींची स्त्री अशी वाणी आकाशांतून माझ्या कानावर येत आहे, असें वाटतें. आतां **कलिंगसेने**ला तूं जो दोष दिलास तोतर अगदींच खोटा आहे. खरोखर ती मोठी पतिव्रता असून साध्वी स्त्रियांला उचित असेंच वर्तन करणारी आहे. कांहीं पूर्वीचें पाप तिच्या पदरीं होतें, ह्मणून विनाकारण तिला लोकांकडून बटीक असें ह्मणून घ्यावें लागतें, यास कांहीं उपाय नाहीं!"

राजाचें हें भाषण ऐकून मुख्य प्रधान **यौगंधरायण** म्हणाला, "महाराज, आपण सांगितलें तें खरें आहे. मला अशी गोष्ट समजली आहे कीं, **मदनाची स्त्री रती** हिणें आपल्या पतीचा समागम व्हावा ह्मणून **शंकराचें** आराधन केलें होतें. त्यावरून—'तुझा पती मनुष्य-लोकांत जन्मास येईल, तेव्हां तूंही मनुष्यरूप धारण कर. ह्मणजे तुह्मां उभयतांचा समागम होईल,' असा **महादेवानें रती**ला वर दिला होता. आपला पुत्र कुमार **नरवाहनदत्त** हा **कामा**चा अवतार आहे, हें आकाशवाणीनें त्याच्या जन्माच्या वेळीं सांगितलेंच होतें. त्याप्रमाणें **कलिंगसेने**ची कन्या ही प्रत्यक्ष **रतीच** आहे, असें मला तिचें बाळंतपण करणाऱ्या दाईनें एकांतीं सांगितलें आहे. ती ह्मणाली, '**कलिंगसेने**ला बाळंतपणाच्या तिडका येऊं लागल्या तेव्हां युक्तीनें तो गर्भ बाहेर काढला. त्यावेळीं तो खरोखर पुत्र होता; पण इतक्यांत अगदीं त्याच्या उलट, ह्मणजे मुलाच्या ठिकाणीं मुलगी झाल्याचें मी पाहिलें! हा चमत्कार कसा झाला व कोणीं केला हें मुळींच कांहीं समजलें नाहीं.

कांहीं नवल विशेष घडलें, तर आपल्याला कळविण्याविषयीं पूर्वी आपण सांगितलें होतें; ह्मणून मी ही हकीकत आपल्याला सांगितली,' असें ती दाई ह्मणाली. या गोष्टीची मला चांगली आठवण आहे. यावरून मला असें वाटतें कीं, ती **रतीच** **शंकराच्या** आज्ञेनें अयोनिसंभव कन्या झाली असावी. व देवांनीं मायेच्या योगानें, **कलिंगसेने**चा गर्भ चोरून त्या ठिकाणीं तिची योजना केली असावी. तेव्हां **कामाचा** अवतार जो आपला पुत्र त्याची तीच स्त्री आहे यांत कांहीं संशय नाहीं. आतां यासंबंधानें एका यक्षाची कथा मला आठवली ती सांगतों.

**विरूपाक्ष** नांवाचा एक यक्ष **कुबेराचा** सेवक होता. तो लाखों निधींच्या[1] रक्षकांवरचा मुख्य होता. **मथुरानगरीच्या** बाहेरच्या प्रदेशांत जे द्रव्याचे ठेवे होते, त्यांचें रक्षण करण्याकरितां त्याणें एक यक्ष नेमला होता. तो दगडाच्या खांबाप्रमाणें अचल राहून सारा दिवस आपली कामगिरी बजावीत होता. त्याच **मथुरा** नगरींत एक **पाशुपत**[2]-संप्रदायांतला मोठा मांत्रिक ब्राह्मण रहात होता. एकेदिवशीं जमिनींतला ठेवा शोधून खणून नेण्याकरितां खोरीं कुदळीं वगैरे घेतलेले कांहीं लोक बरोबर घेऊन, तो ब्राह्मण रात्रीं बाहेर निघाला. त्याणें आपल्या हातांत मनुष्याच्या वसेंत भिजविलेला एक मोठा पलिता घेतला होता. ज्याठिकाणीं द्रव्याचा ठेवा होता त्याठिकाणीं येऊन पोंचतांच

---

१—निधी ह्मणजे ठेवा. प्राचीन ग्रंथकारांची अशी समजूत आहे कीं, या पृथ्वींत ठिकठिकाणीं द्रव्यांचे संचय पुरून ठेविलेले आहेत. व त्यांवर पाहरा करणारे यक्षनांवाचे उपदेव आहेत. या जगांत जेवढें म्हणून द्रव्य आहे, त्याचा मुख्य अधिपती कुबेर. त्याणें ठिकठिकाणीं आपले चाकर, अर्थात् यक्ष हे रक्षक नेमले आहेत. कोणी तें द्रव्य काढून घेण्यास येईल तर ते यक्ष त्याला मारतात, किंवा एकंदरींत घेऊं देत नाहींत.

२—पाशुपत या नांवाचा मांत्रिकलोकांचा एक मुख्य संप्रदाय आहे. पशुपती ह्मणजे शिव हा त्यांची मुख्य देवता असल्यावरून त्यांला पाशुपत ह्मणतात. याच नांवाचे द्वैतवादी असून शैव असे एक मतवादी आहेत. त्यांस 'नकुलीशपाशुपत' असें ह्मणतात. त्यांच्या दर्शनाचे ग्रंथ अद्याप फारसे उपलब्ध झालेले नाहींत. माधवाचार्यांच्या सर्वदर्शनसंग्रह नामक ग्रंथांत त्यांच्या मताचा सारांश दिला आहे.

त्याच्या हातांतला तो दिवा एकाएकीं खालीं पडला. अर्थात् तेथें द्रव्य आहे असें समजून बरोबरच्या सोबत्यांसह तो खणूं लागला.

तेथें त्या निधीचें रक्षणकरण्याकरितां ह्मणून ज्या यक्षाची योजना केली होती, तो धांवत धांवत आपला मुख्य अधिकारी जो **विरूपाक्ष** त्याच्या जवळ गेला, आणि इत्थंभूत वर्तमान त्याला कळविलें. तें ऐकतांच **विरूपाक्ष** रागावून त्याला ह्मणाला, "अरे मूर्खा, मला विचारतोस काय? ते क्षुद्र लोक जे खणायाला आले आहेत त्यांला तत्काल मारून टाक. आणि कोणत्याही प्रकारें तें निधान त्यांच्या हातीं न लागेल असें कर ह्मणजे झालें." यजमानाची याप्रमाणें आज्ञा होतांच यक्ष परत त्या ठिकाणीं आला. आणि ठेवा काढून घेण्याविषयीं प्रयत्न करणाऱ्या सर्व ब्राह्मणांस, त्यांचे मनोरथ पूर्ण होण्यापूर्वींच त्याणें ठार मारून टाकलें. वस्तुतः त्यांला मारण्याचें त्याला कांहीं कारण नव्हतें. भय दाखवून किंवा दुसऱ्या कोणत्यातरी रितीनें प्रयत्न केला असता तर त्यांला पळवून लावतां आलें असतें; पण त्या अविचाऱ्यानें विनाकारण त्यांचे जीव घेतले!

हें वर्तमान धनपती जो **कुबेर** त्याच्या कानांवर जातांच त्याला मोठा राग आला. तो **विरूपाक्षा**ला बोलवून आणून म्हणाला, "अरे चांडाळा, कांहीं विचार न करतां एक नव्हे, दोन नव्हे, अनेक ब्रह्महत्या तूं कशा करविल्यास? बिचारे दरिद्री लोक द्रव्याच्या आशेनें कोणतें कर्म करणार नाहींत बरें! पण तशांला मारावें हें विहित आहे काय? अनेकतऱ्हेचीं विघ्नें करून त्यांला द्रव्य काढून घेण्याच्या ठिकाणाहून

---

१—जमिनींत असलेलें द्रव्य उमगण्यास हा एक मार्ग आहे. कोणी कोणी एकप्रकारचें अंजन तयार करून तें कांचेला लावून त्यांतून पाहिलें असतां, जो पायाळू असेल—ह्मणजे आईच्या पोटांतून बाहेर येतांना ज्याचे पायच प्रथम बाहेर आले असतील, त्याला जमिनींतील द्रव्य दिसतें असें ह्मणतात. मंत्रशास्त्रांत याविषयीं दुसरेही अनेक उपाय सांगितले आहेत. माणसाच्या वसेचा दिवा तयार करून हातांत घ्यावा, तो ज्याठिकाणीं खालीं पडेल, तेथें द्रव्य आहे असें जाणावें. व हें भूमिगत द्रव्य समजण्याचें मुख्य लक्षण आहे असें मानतात.

पळवून लावावें; पण त्यांचा जीव घेणें हें कांहीं योग्य नाहीं. असो. ज्यापेक्षां तूं केवळ अविचारानें असें भयंकर कृत्य केलेंस. त्यापेक्षां या दुष्कृताला अनुरूप असा दंड तुला झालाच पाहिजे. तूं ह्या दुष्कृताचरणानें मनुष्ययोनींत उत्पन्न हो. हा तुला शाप घे!" असें सांगून **कुबेरानें** त्याला **मर्त्य**लोकांत ढकलून देवविलें. **धनदा**चा शाप कधींच खोटा व्हावयाचा नाहीं. त्याच्या आज्ञेप्रमाणें **विरूपाक्षा**ला पृथ्वीवर जन्म घ्यावें लागलें. तो, एका अग्रहाराचा अधिपती असलेल्या ब्राह्मणाच्या घरीं जन्मास आला.

इकडे तो **विरूपाक्ष** शापानें मनुष्यलोकांत आला. तेव्हां त्याची **स्त्री** यक्षिणी **कुबेरा**ची प्रार्थना करून ह्मणाली, "महाराज, ज्या ठिकाणीं माझ्या भर्त्याला आपण टाकलें आहे, त्याच ठिकाणीं मलाही टाकण्याचा अनुग्रह करावा. मी त्यांच्यावांचून क्षणभर देखील जीवंत राहण्यास समर्थ नाहीं." याप्रमाणें त्यासाध्वी **स्त्रीनें** प्रार्थना केल्यावरून **कुबेरा**ला दया आली. तो तिला ह्मणाला, "तुला अशी शिक्षादेण्यासारखा तुझ्या हातून कांहीं अपराध झालेला नाहीं. तथापि तूं आपणहोऊन विनंती करतेस, म्हणून मी तुला मनुष्यलोकांत पाठवितों. तुझा पती मृत्युलोकांत एका ब्राह्मणाच्या घरीं जन्मास आला आहे. त्याच्याच येथें तूंही जा. तूं त्याच्या दासीची मुलगी होशील. तुझ्याकडून कांहीं पाप घडलेलें नाहीं, म्हणून तुला योनि संबंध होणार नाहीं. तूं अयोनिजा उत्पन्न होऊन आपल्या पतीचा सहवास पावशील. व तुझ्याच पुण्यानें तो तुझा भर्ता शापापासून मुक्त होऊन पुन्हां माझ्याजवळ प्राप्त होईल."

याप्रमाणें **कुबेरा**च्या आज्ञेनें ती पतिव्रता यक्षिणी **विरूपाक्ष** ज्या ब्राह्मणाच्या येथें जन्मास आला होता त्याच्या कुळंबिणीच्या दारांत अमानुषी कन्या होऊन पडली. अकस्मात् विलक्षण रूपवती अशी ती मुलगी पडलेली पाहून दासीला फार आनंद झाला. तिनें तत्काल

ती कन्या आपल्या यजमानाला दाखविली. त्या मुलीला पाहतांच तो ब्राह्मण ह्मणाला, "ही कोणी सामान्य मुलगी नव्हे. ही दिव्य कन्या आहे. माझा आत्मा मला असेंच सांगत आहे. आण आण पाहूं तिला. निःशंकपणें माझ्याजवळ दे! माझ्या पुत्राची बायको होण्यास हीच मुलगी योग्य आहे, असें मला वाटतें." असें सांगून ब्राह्मणानें ती आपल्या मांडीवर घेतली. व कांहींवेळ प्रेमपूर्वक तिचें लालन करून परत दासीजवळ दिली.

नंतर त्या ब्राह्मणाचा मुलगा व ती दिव्य मुलगी हीं दोघेंही अनुक्रमानें वाढत गेलीं. त्यांचें बसणें, उठणें, खेळणें वगैरे सर्व एकेच ठिकाणीं होत असल्यामुळें एकमेकांवर त्यांची प्रीति बळकट बसली. नंतर तीं प्रौढ झाल्यावर ब्राह्मणानें त्या दोघांचा विवाह लावून दिला. तेव्हां, जरी त्यांना आपल्या पूर्वजन्माचें स्मरण नव्हतें; तरी आपण आज विरहांतून उत्तीर्ण झालों असें त्यांस वाटत होतें. नंतर पुष्कळ दिवसपर्यंत तीं उभयतां स्त्रीपुरुषें मोठ्या आनंदांत **मर्त्यलोकसंबंधी** अनेक विषयांचा उपभोग करीत होतीं. त्या साध्वी स्त्रीच्या पवित्र आचरणरूप तपानें तिचा पती जो **विरूपाक्ष** त्याच्या पापाचा क्षय होऊन स्त्रीसहवर्तमान तो देहांतीं आपल्या स्थानाला प्राप्त झाला." याप्रमाणें कथा सांगून **यौगंधरायण** ह्मणाला, "अशाप्रकारें अनेक दिव्य स्त्रीपुरुष—कांहीं अपराध त्यांच्या पदरीं नसतां—विशेषप्रकारच्या कारणामुळें मनुष्य लोकांत येतात. व ते अयोनिसंभव असतात. जशी त्या यक्षाची स्त्री गर्भवास भोगल्यावांचून जन्मास आली; तशीच ह्या **कलिंगसेने**ची ही कन्या कोणीतरी दिव्य स्त्री असेल. तशा दिव्य स्त्रियांच्या कुळाचा विचार कशाला करायला पाहिजे? त्यांचें दिव्यत्व हेंच कुलीनपणाची साक्ष देणारें आहे. याकरितां महाराज, माझी अशी विनंती आहे कीं, **कलिंगसेने**ची मुलगी आपण सून करून घ्यावी. तिच्याविषयीं आपल्याला विशेष विचार करण्याचें कारण मुळींच नाहीं."

**यौगंधरायण** हा एक नावाडीच होता. तो जिकडे फिरवील तिकडे **वत्सराज**रूपी नौका जात असे. पण तोही असा होता कीं, भलत्याच ठिकाणीं तिला नेण्याविषयीं त्याच्याकडून कधींही प्रयत्न होत नसे. **वासवदत्तेनें कलिंगसेने**च्या मुलीविषयीं प्रथम तिरस्कार दर्शविला; पण **यौगंधरायणानें** समजून सांगतांच तिलाही ती गोष्ट मान्य झाली. तात्पर्य त्या बैठकीस **कलिंगसेने**ची मुलगी आपल्या **नरवाहनदत्ता**ला करावी, असा त्या सर्वांचा एक विचार झाला नंतर मुख्य प्रधान **यौगंधरायण** राजाचा निरोप घेऊन आपल्या घरीं निघून गेला. त्याच्या मागून बाकीची मंडळीही हळूहळू गेली. तेव्हां **वत्सराज वासवदत्तेसह** यथेच्छ मद्य प्राशन करून गाणें बजावणें, हास्यविनोद वगैरे लीला करण्यांत त्यानें तो दिवस सुखांत घालविला.

इकडे **कलिंगसेनेची** मुलगी दिवसें दिवस वाढत चालली होती. तिला पूर्वजन्माचें हळूहळू विस्मरण होऊन गेलें. मानवी शरीराचा तसाच कांहीं विक्षलण योग आहे. त्याचा स्वीकार होतांच मागचें शरीर कितीही उत्तम असलें, तरी त्याचा विसर पडून जें प्राप्त झालें असेल त्याचाच लोभ जडतो. त्याप्रमाणें **कलिंगसेने**च्या मुलीचा, तिणें स्वीकार केलेल्या देहावर विशेष अभिनिवेश उत्पन्न होत गेला. ती **मदनवेग**नामक विद्याधराची मुलगी म्हणून तिला **मदनमंचुका** असें तिच्या आईनें व इतर लोकांनीं नांव ठेवलें. बापाचें तर तिला कधीं दर्शनच नव्हतें; पण आई **कलिंगसेना** ही मात्र प्राणापेक्षांही अत्यंत प्रीतीनें तिला वाढवीत होती. तिणें सर्व उत्तम स्त्रियांचें रूप, जणूं काय हिरावून घेतलें आहे असें वाटत होतें. नाहीं तर तिच्या पुढें त्या सर्व कुरूप कां दिसल्या असत्या? **वत्सराज** वारंवार त्या मुलीला भेटत असे. पण राणी **वासवदत्तेनें** मात्र पुष्कळ दिवस तिला पाहिली नव्हती. स्त्रियांला स्वभावतःच मुलीची फार आवड असते. त्यांतून जो तो त्या **मदनमंचुके**ची फारच तारीफ करीत असे. कोणीं तिच्या

सौंदर्याचें कौतुक वर्णन करावें, कोणीं तिच्या बोबड्या भाषणाचें, कोणी तिच्या खेळाचें, असें ज्याणीं त्याणीं तिचें वर्णन केलेलें ऐकून **वासव-दत्ते**लाही त्या मुलीला एकवेळ पहावी, असें वाटलें. तिणें आपली मुख्य दासी **कांचनमाला** हिला **कलिंगसेने**कडे पाठवून **मदनमंचुके**ला मुद्दाम आपल्याजवळ आणविलें.

यावेळीं **राजा, राणी, पद्मावती** वगैरे मंडळी एकेच टिकाणीं बसली होती. **मदनमंचुके**ची विशेष सवयींची जी दासी होती तिणें तिला कडेवर घेऊन **वासवदत्ते**जवळ आणली. तेथें बसलेली सर्व मंडळी अपरिचित असल्यामुळें पोरस्वभावाप्रमाणें ती दाईच्या कडेवरून कांहीं केल्या खालीं उतरेना. तिच्या मानेंत तोंड घालून **मदनमंचुका** भ्यालल्यासारखी दाईच्या कडेवरच राहिली होती. **वासवदत्ते**ला खरो-खर त्या मुलीला पाहतांच पान्हा फुटल्यासारखें झालें. "बेटा अशी इकडे ये, कशी गुणाची आहे, माझें सोनें तें, ये ये अशी इकडे ये," म्हणून तिला आपल्या मांडीवर घेण्याविषयीं तिणें पुष्कळ प्रयत्न केला. सर्वांनीं आपापल्या परी खटपट केली. पण ती दाईला सोडून मुळींच खालीं उतरली नाहीं. जणूं काय दीपशिखाच अशा त्या मुलीचें तेजिष्ठ व यापूर्वीं कधीं न पाहिलेलें असे रूप पाहून, ही प्रत्यक्ष **रती**-चाच अवतार आहे, असें कोणाला वाटलें नसेल? यावेळीं राणी **वासवदत्तेनें नरवाहनदत्ता**लाही तेथें आणविला. जगाच्या नेत्रांला आनंददायक असा तो पुत्र केवळ आईबापांच्याच नव्हे, तर सर्वांच्या डोळ्यांला अतिशय सुख व समाधान देत होता. ज्याचें मुखकमल प्रफु-ल्लित आहे, असा तो राजपुत्र **नरवाहनदत्त,** पद्माकर ( ज्यांत पु-ष्कळ कमलें उगवलीं आहेत असा तलाव ) जसा सूर्याची प्रभा पाहून आनंदित होतो, तसा त्या **मदनमंचुके**ला पाहून आनंदित झाला. तीही, नेत्रांला सुख देणाऱ्या त्या राजपुत्राकडे प्रफुल्लित वदनानें अव-लोकन करीत असतां, जशी चकोरी चंद्राला पाहून अतृप्त होते, तशी

अतृप्तच राहिली. असो. ती मुलगी फार लाजत होती तरी **पद्मावतीनें** बळेंच तिला ओढून घेतली. व पाळीपाळीनें प्रत्येकानें तिला खेळविली. नंतर राजानें—'ही घे आपली सून' ह्मणून तिला **वासवदत्तेच्या** मांडीवर बसविली. याप्रमाणें बराचवेळ कौतुक करून **मदनमंचुकेला** परत तिच्या आईकडे पाठविली.

**नरवाहनदत्त** व **मदनमंचुका** ह्या उभयतांची दृष्टादृष्ट झाली, त्या दिवसापासून—ते दोघेही वयानें लहान होते तरी—त्यांची परस्परांवर विलक्षण प्रीति बसली. जरी ते कांहींवेळ निरनिराळ्या ठिकाणीं असले; तरी त्यांचें मन परस्परांच्या ठिकाणीं बांधल्यासारखें झालें होतें. यावेळीं तीं उभयतांहीं लग्न करण्याच्या योग्य वयांत आलीं नव्हतीं. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांचा विवाहसंबंध व्हायचा असा पक्का निश्चय झाला होता. व तो संबंध प्रत्यक्ष देवांनींच ठरविला आहे, तेव्हां त्यांत कांहींएक फेरबदल होणार नाहीं; असें समजून राजा एव्हांपासूनच त्याच्या तयारीस लागला होता. राजाच्या मनांत ती गोष्ट पक्केपणीं वसत आहे; असें पाहून व त्याचे त्या संबंधाचे उद्गार ऐकून **कलिंगसेनेला** फारच आनंद झाला. तिणें **नरवाहनदत्तावर** जांवयाची प्रीति धरून त्याच्यावर विशेष लोभ ठेवला.

**मदनमंचुका** व **नरवाहनदत्त** हे दोघेही दिवसें दिवस वाढत होते. तों तों त्यांचा विवाहकालही अगदीं जवळ येऊन पोंचत गेला. **नरवाहनदत्त** अविवाहित असेपर्यंत राजाजवळच रहायचा. पण पुढें त्याला स्वतंत्र महाल वगैरे राहण्याची व्यवस्था अवश्य करून दिली पाहिजे असें समजून **वत्सराजानें** प्रधानादिकांची सल्ला घेऊन, हुबेहुब आपल्या महालासारखाच त्यालाही एक राजमहाल तयार करून ठेवला. त्यांत सर्वप्रकारची सोय केली होती. आवश्यक व चैनीच्या वगैरे अनेक उत्तमोत्तम वस्तू त्यांत ठेवल्या.

नंतर लवकरच सर्व लोकांनीं **नरवाहनदत्ताच्या** गुणांची विशेष

तारीफ करून यौवराज्याचा अभिषेक करावा असा आग्रह केल्यावरून राजानें तो समारंभ करण्याची तयारी कराविली. नगर जिकडे तिकडे अलंकृत केलें. निरनिराळ्या देवतांच्या स्थानांत पूजा अर्चा वगैरे उत्सव सुरू केले. मोठमोठे सावकार, विद्वान् व तपस्वी ब्राह्मण, सरदार, मानकरी, आप्तसंबंधी, मांडलिक राजे वगैरे सर्वांला आमंत्रणें पाठविलीं. नियमित उत्तम मुहूर्तावर यौवराज्याचा अभिषेक करण्याची सिद्धता झाली. स्वतः **वत्सराजानें** आनंदाश्रुजलानें ज्या सद्गुणी पुत्राच्या मस्तकावर प्रथम अभिषेक केला होता त्यावरच वैदिक मंत्रांनीं अभिमंत्रित अशा पवित्र तीर्थोदकानें तपस्वी ब्राह्मणांनीं मंगलकारक आभिषेक केला. अभिषेकोदकानें त्याचें मुखकमल स्वच्छ धुतलें, त्याच्या योगानें केवळ तेंच निर्मळ झालें असें नाहीं, तर सर्व दिशांचीं मुखेंही निर्मळ झालीं. मंगलकारक पुष्पें व इतर वस्तु **वासवदत्तादि** मातृवर्गानें त्याच्या मस्तकावर टाकल्या. त्याचवेळीं आकाशांतूनही दिव्य पुष्पांची वृष्टी त्याच्या मस्तकावर पडली. देवांच्या दुंदुभीच्या अवाजाची स्पर्धा धरूनच कीं काय, वाद्यांचा गजर चहूंकडे इतका पसरला कीं, त्याणें आकाशही नादविलें. अभिषेक झाल्यावर सर्वांनीं यथायोग्य नजर नजराणे वगैरे केले. यावेळीं तेथें जमलेल्या लोकांपैकीं वडील माणसें व ब्राह्मणादिक पूज्यवर्ग यांवांचून सर्वांनीं त्याला नमस्कार केला. तो आपल्याच प्रभावानें सर्वांपेक्षांही श्रेष्ठतर झाला.

याप्रमाणें सर्व विधि व शिष्टाचार वगैरे झाल्यावर **वत्सराजानें** आपल्या पुत्राला त्याचे लहानपणचे खेळगडी, अर्थात् आपल्या प्रधानांचे पुत्र यांला सचिव नेमून दिले. **यौगंधरायणा**चा पुत्र **मरुभूति** याला **नरवाहनदत्ता**चा मुख्य प्रधान नेमला. **रुमण्वाना**चा पुत्र **हरिशिख** याला सेनापति नेमला. **वसंतका**चा पुत्र **तपंतक** याला नर्मसचिव अर्थात् खुषमस्कऱ्या नेमला. तसाच आपला चोपदार जो **इत्यक** त्याचा मुलगा **गोमुख** याला युवराजाचा चोपदार नेमला. पूर्वीं सांगि-

तलेले **पिंगलिकेचे** दोघे पुत्र **वैश्वानर** आणि **शांतिसोम** यांला पुरोहित नेमलें. याप्रमाणें सचिवांची वगैरे नेमणूक केली त्यावेळीं आकाशांतून प्रथम पुष्पवृष्टि होऊन नंतर—"हे ह्या तुझ्या पुत्राचे मंत्री, याचे सर्व अर्थ सिद्ध करून देतील. या सर्वांत **गोमुख** हा याचा विशेष प्रिय होईल. जणूं काय उभयतांचा एकच जीव आहे अशा रितीनें हे वर्तन करतील!" याप्रमाणें आकाशवाणी झाली. ती ऐकून राजा फारच हर्ष पावला. नंतर त्या समारंभाला आलेल्या लहानथोर सर्व लोकांचा—वस्त्रें, अलंकार इत्यादि देऊन राजानें यथायोग्य सत्कार केला. त्याणें आपल्या आश्रितांवर देणग्यांची इतकी वृष्टि केली कीं, बिचाऱ्या दरिद्र या शब्दाच्या अर्थाची तेथें संगतीच नाहींशी झाली! वाऱ्यानें फडफड वाजणाऱ्या पताकांच्या परंपरा याणीं जणूं काय नर्तकी आणि चारण यांच्या द्वारें राजा सर्वांला—'या आणि सत्कार करून घ्या' असें ह्मणतच आहे असें वाटलें.

**नरवाहनदत्त** हा पुढें विद्याधरांचा राजा होणार हें तर ठरलेंच होतें; पण तें विद्याधरांच्या राजाचें ऐश्वर्य यावेळींच त्याला प्राप्त झालें आहे कीं काय असें सर्वांला वाटलें. **मदनवेगानें**[1] अप्रत्यक्ष रितीनें आपल्या जांवयाला अनेक उत्तम उत्तम वस्तू अर्पण केल्या. **कलिंगसेना** आपल्या जांवयाच्या त्या उत्सवांत **वासवदत्ता, पद्मावती, प्रियदर्शिका** इत्यादि राजस्त्रियांसह हर्षानें मिरवत होती. जणूं काय त्या निरनिराळ्या शक्तीच एकत्र होऊन तेथें वावरत आहेत असें प्रेक्षकांला वाटलें. त्या आनंदकारक प्रसंगाच्यावेळीं वाऱ्यानें हालत असलेल्या वेली व बागेंतील वृक्ष इत्यादि अचेतन देखील नृत्य करीत आहेत, असें दिसत होतें; मग सचेतन मनुष्यांनीं नृत्य केलें असेल यांत आश्चर्य काय. असो. याप्रमाणें ज्याला यौवराज्याचा अभिषेक झाला आहे, असा राजपुत्र **नरवाहनदत्त**

---

१—याविषयीं मागें भाग दुसरा पृ. २९२ पासून ३०७ पर्यंत कथा सांगितली आहे ती ध्यानांत आणावी.

याला जयशाली हत्तीवर बसवून त्याची मिवरणूक काढली. ज्यावेळीं त्याची स्वारी नगरांतून निघाली. त्यावेळीं काळे, पांढरे व लाल अशा निरनिराळ्या रंगाचे प्रफुल्लित नेत्र हीच कोणी एक त्या त्या रंगाचीं कमलें, यांहीं नगरवासी स्त्रियांनीं त्याच्यावर एकसारखी वृष्टी केली. लाह्या व फुलें यांचा तर अभिषेकच होत होता. पूज्य देवतांचीं स्थानें पहात पहात व प्रजाजनांचें आशीर्वाद घेत घेत सूत, मागध, बंदी इत्यादिकांनीं ज्याचें यश वर्णन केलें आहे, असा युवराज **नरवाहनदत्त** मोठ्या समारंभानें त्याच्याकरितां म्हणून जो महाल मुद्दाम तयार केला होता, त्यांत प्रवेश करता झाला. तेथें उत्तम उत्तम भक्ष्य पदार्थ, तसेच पेय पदार्थ **कलिंगसेनेनें** मुद्दाम आपल्या जांवयाकरतां म्हणून पाठविले होते. ते इतके उत्तम होते कीं, **नरवाहनदत्ताला** ते आपल्या ऐश्वर्याहून अधिक वाटले. जांवयाच्या प्रीतीस्तव तिणें त्यादिवशीं **नरवाहनदत्ताचे** प्रधान, त्याचे मित्र व सेवक इत्यादिकांला बहुमोल वस्त्रें व अलंकार दिले. याप्रमाणें ते दिवस अमृताच्या आस्वादापेक्षांहीं अत्यंत गोड वाटणाऱ्या त्या उत्सवांत गेले. **वत्सराज** इत्यादिकांला त्या आनंदापुढें खाण्यापिण्याची देखील शुद्धी नाहींशी झाली.

नंतर, आतां आपल्या मुलीचें लग्न लवकरच होणार आहे तेव्हां या संबंधानें पुढें कसें काय करावयाचें त्याचा विचार आपली मैत्रीण जी **सोमप्रभा** तिच्या विचारानें करावा, असें **कलिंगसेनेच्या** मनांत आलें आणि तिणें तिची आठवण केली. यावेळीं रात्र पडली होती. केवळ स्मरण करण्यावांचून **सोमप्रभेला** बोलविण्याचें **कलिंगसेने** जवळ दुसरें कांहींच साधन नव्हतें. तें करतांच **सोमप्रभेचा** पती **नलकूबर** याला तत्काल तें समजलें. तो दिव्य ज्ञानी होता. तो लगेच **सोमप्रभेला** ह्मणाला, “प्रिये, तुझी मैत्रीण **कलिंगसेना** भेटीविषयीं उत्सुक होऊन यावेळीं तुझी आठवण करीत आहे. तर तूं तेथें जाऊन

तिला भेट. ती बहुतकरून तुझ्या कडून एखादा दिव्य बगीचा व महाल वगैरे आपल्या मुलीकरतां तयार करून घ्यावा अशी इच्छा करते आहे असें वाटतें. तर तो तिचा हेतू तूं पूर्ण कर." असें सांगून **नलकूबरानें कलिंगसेने**ची मुलगी व तिचा जांवई यांच्या संबंधाच्या पूर्वीं झालेल्या व पुढें होणाऱ्या सर्व गोष्टी तिला सांगितल्या. व तत्काल तिला **कलिंगसेने**कडे रवाना केली.

त्या दोघींची मैत्री फारच दृढ होती. बहुत दिवस परस्परांला भेटीची उत्कंठा लागली होती. दोघीही एकेठिकाणीं मिळतांच उभयतांनीं परस्परांच्या गळ्याला मिठ्या घातल्या. प्रीतीचा अनावर वेग आल्यामुळें दोघींच्याही तोंडावाटे थोडावेळ एक अक्षर देखील निघालें नाहीं. नंतर मन स्थिर करून त्यांनीं परस्परांला कुशल प्रश्न वगैरे केले. **सोमप्रभा कलिंगसेने**ला ह्मणाली, "गडे, मोठ्या ऐश्वर्यवान् विद्याधरानें तुझें पाणिग्रहण केलें. **शंकरा**च्या अनुग्रहानें तुझ्या घरीं **रतीनें** अवतार धारण केला. **कामा**चा अवतार **वत्सराजा**चे पोटीं जन्म घेतलेला जो **नरवाहनदत्त** त्याची पूर्वजन्मींची जी स्त्री ती तुझी मुलगी झाली आहे. तुझा जांवई **नरवाहनदत्त** याच्या सर्व स्त्रियांत तुझी मुलगी मुख्य पट्टराणी होणार, व तो दिव्य कल्पपर्यंत विद्याधरांचें राज्य करणार. स्वतः तूंही पूर्वजन्मींची अप्सरा असून **इंद्रा**च्या शापानें मृत्युलोकांत येऊन पडली आहेस. तरी तुझें अवशिष्ट कार्य झालें ह्मणजे तूं शापापासून मुक्त होणार. या सगळ्या गोष्टी आजच, दिव्य ज्ञानी अशा माझ्या भर्त्यानें मला सांगितल्या. तेव्हां तूं आतां कांहीं चिंता करूं नकोस. पुढें उत्तरोत्तर तुझें कल्याणच होणार आहे. आतां तुझ्या इच्छेप्रमाणें मी एक दिव्य बाग व त्यांत उत्तम महाल उत्पन्न करितें. भूलोकांत तर नाहींच; पण पातालांत किंवा स्वर्गलोकांतही तशा प्रकारची जागा दुसरी कोठें मिळणार नाहीं." असें सांगून **सोमप्रभेनें** आपल्या मायेच्या सामर्थ्यानें दिव्य बगीचा उत्पन्न केला. तो बाग,

त्यांतला रमणीय महाल व अनेक करमणुकीचीं स्थळें वगैरे, तत्काल आपली प्रियसखी जी **कलिंगसेना** हिला दाखवून, अतिशय आश्चर्ययुक्त व आनंदित झालेल्या तिचा निरोप घेऊन **सोमप्रभा**, पुन्हा तिच्या भेटीविषयीं उत्कंठित होत्साती सूर्योदयापूर्वी तेथून निघून गेली.

इकडे लवकरच सूर्योदय झाला. दशदिशा स्वच्छ झाल्यावर **कौशांबी** नगरींतले लोक बाहेर पाहतात तों **सोमप्रभेनें** निर्माण केलेलें तें दिव्य उद्यान त्यांच्या दृष्टीस पडलें. जणू काय स्वर्गांतलें **नंदनवन**च खालीं तुटून पडलें आहे. असा तो बाग व महाल पाहून कोणाला आश्चर्य वाटलें नाहीं! राजवाड्यांतले लोक तो चमत्कार पाहून चकित होत्साते धांवत धांवत **वत्सराजा**ला सांगण्याकरितां गेले. राजा, राणी, युवराज, व त्यांचा परिवार हे सर्व तो चमत्कार पाहण्याविषयीं उत्सुक होऊन तत्काल त्या बागेजवळ आले. ज्यांत निरंतर पुष्पें आणि फलें येणारे असे अनेक वृक्ष आहेत, नानाप्रकारच्या रत्नांनीं खचित असे ज्याचे स्तंभ आहेत; असा त्या बागेंतला तो दिव्य महाल, अनेक प्रकारच्या चित्रविचित्र रमणीय भूमी, विहार स्थलें, सुंदर तळ्या, सोन्याच्या रंगाचे पक्षी, दिव्य पुष्पांचा सुगंध वाहणारा वायु ज्या मध्यें सर्वत्र संचार करीत आहे असें तें उद्यान पाहून भूलोकांत दुसरा एक स्वर्गच उत्पन्न झाला कीं काय, असें वाटलें. काल मध्यरात्र होई पर्यंत येथें कांहीं नव्हतें. आणि आज अकस्मात् हें कोठून आलें! हें जाणण्याची सर्वांला मोठी उत्कंठा लागली. आलेल्या मंडळीचें आदरातिथ्य करण्यांत मग्न झालेल्या **कलिंगसेनेला** **वत्सराजानें**—'हें अद्भुत कृत्य कोणीं केलें? व कसें झालें?' म्हणून प्रश्न केला; तेव्हां ती सर्व लोक ऐकत असतां राजाला म्हणाली, "महाराज, **विश्वकर्म्या**चा अवतार **मय** नामक एक प्रमुख दैत्य आहे. ज्यानें तुमचा पूर्वज राजा **युधिष्ठिर** याची रम्य व अद्भुत सभा तयार केली. व **इंद्राची सुधर्मा**नामक

१—या विषयीं भाग तिसरा पृ० २८० पहा.

सभा हीही त्याणेंच केली. त्या **मयासुराची सोमप्रभा** नांवाची मुलगी असून तिची आणि माझी फारच मैत्री आहे. ती गेल्यारात्रीं मला भेटायला येथें आली होती. तिणें माझ्या प्रीतीस्तव माझी मुलगी **मदनमंचुका** हिला राहण्याकरितां, हें रमणीय उद्यान आपल्या मायेनें निर्माण केलें." असें सांगून **कलिंगसेनेनें** पूर्वीं झालेल्या व पुढें होणाऱ्या ज्या गोष्टी **सोमप्रभेनें** तिला सांगितल्या होत्या, त्या राजाला सर्व निवेदन केल्या. याप्रमाणें तिणें जी हकीकत सांगितली, तिचा आणि प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीचा परस्पर मेळ असल्याचें पाहून सर्वलोकांचा संशय समूळ नाहींसा झाला. व त्यांला अतिशय आनंद झाला.

**वत्सराज, वासवदत्ता**दिराण्या व आपला पुत्र आणि इतर मंडळी यांसह त्यादिवशीं **कलिंगसेनेचा** उत्तम पाहुणचार घेत होत्साता तेथेंच राहिला. दुसऱ्यादिवशीं **कलिंगसेनेचा** निरोप घेऊन सर्व मंडळीसह राजा परत आपल्या वाड्यांत जाण्यास निघाला. वाटेंत एक दिव्य मंदिर रस्त्यावरच होतें. देवदर्शन केल्यावांचून पुढें जाऊं नये, ह्मणून राजा आपल्या परिवारासह देवाला नमस्कार करीत आहे इतक्यांत— उत्तम वस्त्रें, अलंकार वगैरे धारण केलेल्या अनेक सुंदर स्त्रिया तेथें दृष्टीस पडल्या. "तुह्मी कोण? व येथें कशाकरतां आलां?" ह्मणून राजानें विचारिलें, तेव्हां त्या स्त्रिया ह्मणाल्या, "आह्मी चौदा विद्या आणि चौसष्ट कला आहोंत. तुझ्या पुत्राच्या शरीरांत राहण्याकारितां येथें प्राप्त झालों आहों. आतां त्याच्या शरीरांत प्रवेश करितों," असें सांगून त्या तत्काल अदृश्य झाल्या. हा चमत्कार पाहून राजाला फारच विस्मय वाटला. राजवाड्यांत गेल्यावर ही गोष्ट राजानें **वासवदत्ता** व सर्व प्रधान वगैरे यांना सांगितली. तेव्हां ते आनंदित होऊन, हा देवतांचा अनुग्रह आहे असें मानते झाले.

ही गोष्ट होऊन गेल्यावर कांहीं दिवसांनीं राजानें—त्याची प्रचीती पाहण्याकरितां—'**नरवाहनदत्त** जवळ असतांना **घोषवती**वीणा वाज-

वावी' असें **वासवदत्तेला** सांगितलें होतें. त्याप्रमाणें ती वाजवीत असतां राजपुत्र **नरवाहनदत्त** मोठ्या नम्रतेनें **वासवदत्तेला** ह्मणाला, "अग आई, हें तुझें बीन बरोबर लागलें नाहीं. यांत बेसुर ऐकूं येतो." हें ऐकून त्याची परीक्षा पाहण्याकरितां **वत्सराज** ह्मणाला, "बाळा, तूंच हें बीन घे, आणि वाजव पाहूं कसें तें." असें ह्मटलें तेव्हां **वासवदत्तेच्या** हातांतलें बीन घेऊन **नरवाहनदत्त** वाजवूं लागला. त्याची तारीफ कोठवर करावी! त्याच्या त्या बिनानें प्रत्यक्ष गंधर्व देखील विस्मित झाले. राजाची तर पुरतीच खात्री होऊन गेली. देवतांच्या अनुग्रहानें सर्व विद्या आणि कला ज्याला प्राप्त झाल्या आहेत, त्याला बीन वाजविणें काय अगाध आहे! याप्रमाणेंच दुसरे कांहीं समय पाहून **वत्सराजानें** सर्वेही विद्या आणि कला यांच्या संबंधानें आपल्या पुत्राची परीक्षा पाहिली; पण ज्यांत त्यांत त्याचें अपूर्व कौशलच दिसून आलें.

आपला मुलगा तर कांहीं शिकविल्या सवरल्यावांचून सर्वगुणसंपन्न झाला. पण सुनेला शिकवून तयार केली पाहिजे. असा विचार करून राजानें **मदनमंचुकेला** प्रथम नृत्य व वाद्यें वाजाविणें हें शिकविण्यास प्रारंभ केला. तीही प्रत्यक्ष **रतीचाच** अवतार होती. तिला शिक्षण हें केवळ निमित्तमात्र होतें. राजानें जें शिकवावें त्याहून ती विशेषप्रकारें त्याचा विस्तार करून दाखवीत असे. अनुक्रमानें राजा आणि राणी या दोघांनीं **मदनमंचुकेला** उपयुक्त सर्व कला शिकविल्या.

दिवसेंदिवस ती तारुण्याच्या बहरांत येत होती. शुक्लपक्षांतल्या चंद्रिकेप्रमाणें जशी जशी तिची तनू पूर्ण होत जाऊं लागली, तसा तसा **नरवाहनदत्तरूपी** समुद्र क्षुब्ध होऊं लागला. ती गात असतां, नृत्य करीत असतां, कांहीं पाठ करीत असतां, अनेक प्रकारचे अभिनय करीत असतां, प्रेमपूर्वक तिच्याकडे अवलोकन करून त्या राजपुत्राचें मन फारच रमत असे. अमृतमय अशा चंद्राप्रमाणें क्षणभर त्याचें

दर्शन न झालें तर तीही प्रभातकालीं दंवाच्या बिंदूनीं आर्द्र झालेल्या कमलिनीप्रमाणें साश्रुनेत्र होत असे. नेहमीं **नरवाहनदत्ताला मदनमंचुकेचें** मुख पाहिल्यावांचून राहवत नव्हतें, ह्मणून तो त्या बागेंत जात येत असे. तेथें गेला ह्मणजे जांवईबुवाचें **कलिंगसेनेनें** फारच कौतुक करावें. **मदनमंचुकाही** त्यावेळीं जवळ असे. तिच्याकडे वांकड्या दृष्टीनें पहात पहात तो पुष्कळ वेळ तेथें बसे. आपल्या यजमानाचें मन येथें रमतें असें पाहून **गोमुखानें** गोष्टीवर गोष्ट काढून तेथें त्याला गुंतवून ठेवावें. **कलिंगसेनाही** वरचेवर कांहीं तरी गोष्टी काढून त्याला तेथें बसवून घेई. **गोमुख** आपल्या मनांत जो हेतू आहे, त्याला अनुकूल वागतो असें पाहून **नरवाहनदत्ताला** त्याच्या विषयीं फार संतोष वाटे. उघडच आहे. यजमानाच्या मनांत काय आलें, हें जाणून त्याला अनुकूल वर्तन करणें हेंच त्याच्या प्रसन्नतेचें मुख्य साधन आहे.

**मदनमंचुका** त्या बागेंतल्या संगीतगृहांत नृत्य करूं लागली. ह्मणजे—मोठ मोठ्या चारणादिकांला लाजविणारा **नरवाहनदत्त** तिच्या बरोबर गाई, वाद्यें वाजवी, व टाळ धरी. अशा रितीनें तो तिचें साह्य करीत असे.

तो राजपुत्र सर्व विद्या आणि कला यांत फारच नामांकित झाला होता. त्याचा लौकिक ऐकून देशदेशांतराहून मोठ मोठे पंडित, हत्तीवर बसणारे, घोड्यांवर बसणारे, रथांवर बसणारे, शस्त्रास्त्रें जाणणारे, चितारी, पुस्तकलेखक इत्यादि अनेक विद्याकलाभिज्ञ लोक त्याच्याशीं सामना करण्याकरितां येत असत. त्यांला हरविण्याकरितां अनेकांनीं अनेकप्रकारें खटपटी केल्या. पण जो कोणी सामना करायला येईल, त्याला पराभूत केल्यावांचून त्यानें जाऊंच दिलें नाहीं. विद्यांनीं ज्याला स्वयंवरानें वरलें आहे, अशा **नरवाहनदत्ताचे**, लहानपणच्या अनेक क्रीडा करण्यांत ते दिवस मोठ्या आनंदांत गेले.

एकेदिवशीं युवराज **नरवाहनदत्त** आपली प्रिया **मदनमंचुका** हिच्यासहवर्तमान सर्व प्रधानांला बरोबर घेऊन **नागवन**नांवाच्या बागेंत क्रीडा करण्याकरितां गेला. ही सर्व मंडळी तेथें जाऊन क्रीडा करीत असतां **गोमुखा**चा सूड घेण्याकरितां कोणी एक वाण्याची तरुण स्त्री तेथें आली. तिचें **गोमुखा**वर मन बसलें होतें. पण परस्त्रीला आपण स्पर्श करीत नाहीं, असें सांगून त्याणें तिचा धिक्कार केला. स्त्रिया ह्या अनुकूल असल्या तर देवी, नाहींतर राक्षसणी होतात, हें तर प्रसिद्धच आहे. त्या वाण्याच्या दुष्ट स्त्रीनें **गोमुखा**ला ठार करावा म्हणून, विषमिश्रित सरबत तयार करून आणलें होतें! ती स्त्री आपल्यावर फार रागावली आहे, व युक्तीप्रयुक्तीनें नाश करण्याविषयीं टपली असल्याचें तिच्या एका मैत्रिणीकडून **गोमुखा**ला समजलें होतें. म्हणून तो सावध होता. तिणें बाह्यात्कारीं प्रेम दाखवून सरबत घेण्याविषयीं फारच आग्रह केला; तरी **गोमुखा**नें त्याचा स्वीकार केला नाहीं. त्या तिच्या कृत्यावरून **गोमुखा**ला फार वाईट वाटलें. व एकंदरींत स्त्रियांविषयीं त्याचा ग्रहच विलक्षण झाला. तो सर्वांची निंदा करीत होत्साता ह्मणाला, "शिव! शिव!! ह्या बायका कितीतरी भयंकर! ब्रह्मदेवानें आधीं साहस उत्पन्न करून मग स्त्रियांला उत्पन्न केलें असावें. स्वभावतः त्यांना कोणतेंही कर्म करण्यास अयोग्य असें मुळींच वाटत नाहीं. मला तर असें वाटतें कीं, विधात्यानें स्त्री म्हणून जें हें एक उत्पन्न केलें आहे, तें अमृत आणि विष या परस्परविरुद्ध गुणांच्या दोन वस्तूंनीं घडविलें असावें. स्त्री जर अनुरक्त असेल तर अमृतासारखी गोड आणि विरक्त झाली तर विषापेक्षांही घातक! वरून जिचा मुखवटा सुरेख दिसतो आहे; जिची आकृति मधुर, कोमल व रमणीय दिसते आहे; अशा स्त्रीच्या मनांत भयंकर पातक करायचा गुप्त इरादा आहे हें कोणाला कसें समजावें! जिच्या तोंडाशीं फुललेलीं हजारों कमलें असून आंत भयंकर सुसर बसली आहे, अशा पुष्करणी-

सारखी दुष्ट स्त्री, वरून ओळखतां येत नाहीं. सुंदर गुणरूपी चक्रांनीं प्रेरणा केलेली, आपल्या भर्त्याची स्तुती ऐकून आनंद पावणारी, उत्तम स्त्री, ही सूर्याच्या स्वच्छ प्रभेप्रमाणें आकाशांतूनच पडते असें मानलें पाहिजे. दुसऱ्या पुरुषावर जिचें मन गेलें आहे, अतएव जी नवऱ्यावर विरक्त झाली आहे, ती दुष्ट स्त्री विषारी सर्पिणीप्रमाणें भर्त्याचा घातच करते!

याविषयीं मी अशी एक प्राचीन गोष्ट ऐकली आहे कीं, एका गांवांत शत्रुघ्न नांवाचा कोणी एक मनुष्य रहात होता. त्याची स्त्री अट्टल व्यभिचारिणी होती. एकेदिवशीं तो कोठें बाहेर गेला होता तो संध्याकाळीं परत घरीं आला. घरीं येऊन पहातो तों त्याची बायको जाराला घेऊन खुशाल चैन करीत बसली आहे. घरांत त्या दोघांचे यथेच्छ विलास चालले आहेत, असें समजून कांहीं विशेष हालचाल न करतां शत्रुघ्न हळूच युक्तीनें मागच्या वाटेनें आंत शिरला. आणि तत्काल त्याणें तरवारीनें त्या आपल्या स्त्रीच्या जाराच्या डोक्याचीं दोन शकलें केलीं! यावेळीं तिनसांज झाली होती. अंमळ रात्र झाली, ह्मणजे त्या जाराच्या प्रेताची विल्हेवाट लावावी, असा इरादा धरून शत्रुघ्नानें दार लावून घेऊन बायकोला खोलींत कोंडून ठेवलें. कारण, कदाचित् ती बाहेर जाऊन आरडाओरड करील, असें त्याला वाटलें होतें. या संधींत, रात्रीचे रात्र उतरण्यास जागा शोधीत शोधीत एक मुशाफर त्याच्या घरीं आला. जरी यावेळीं शत्रुघ्नाचें मन स्थीर नव्हतें; तरी त्याणें त्या पांथाला उतरण्यास सांगितलें. नंतर, त्याचा कांहीं फराळ वगैरे झाल्यावर घडलेली सर्व हकीकत सांगून त्याला त्याणें अनुकूल करून घेतला. आणि दोघांनीं मिळून तें जाराचें प्रेत उचलून घेऊन कोणाला नकळत गांवाच्या बाहेर एका शून्य प्रदेशांत नेलें. तेथें एक मोठी खोल विहीर होती. तिच्या कांठीं जाऊन शत्रुघ्न आतां तें प्रेत आंत टाकणार, इतक्यांत पाठोपाठ

आलेल्या त्या स्त्रीनें हळूच येऊन त्याच्या कंबरेंत अशी एक जोरानें लाथ मारली कीं, त्या प्रेताबरोबर बिचारा तोही धाडकन् विहीरींत पडला! तेव्हां स्त्रियांचीं कर्में किती भयंकर आहेत याचें कोठवर वर्णन करावें! व्यभिचारिणी स्त्री कोणकोणचें वाईट कर्म करणार नाहीं? पाहिजे तें करील. एकंदरींत शहाण्या पुरुषानें स्त्रियांविषयीं फार सावध असावें, हेंच योग्य आहे."

**गोमुख** हा ह्मणजे मोठा पोक्त अनुभवी मनुष्य होता असें नाहीं. तो तरणा बाण्ड व अगदीं अननुभवी पोर होता. तरी त्याणें स्त्रियांच्या वर्तनाची याप्रमाणें फार निंदा केली ती ऐकून त्याच्या मित्रांला मोठें आश्चर्य वाटलें. नंतर **नरवाहनदत्ता**सह सर्व मंडळी तेथें स्नान वगैरे करून नागांची पूजा करून सायंकाळीं परत आपल्या घरीं गेले. दुसऱ्या दिवशीं आपल्या प्रधानांची परीक्षा पहावी असें **नरवाहनदत्ता**च्या मनांत आलें. स्वतः त्याला सर्व कांहीं माहीत होतें; तरी अजाणत्याचें सोंग घेऊन—'राजनीतीचे मुख्य मुख्य विषय कोणते?' म्हणून त्याणें त्यांला प्रश्न केला. तेव्हां ते म्हणाले, "युवराज, तुह्मी तर सर्वज्ञच आहां. तथापि ज्यापेक्षां आपण प्रश्न केला; त्यापेक्षां यथामति आह्मी राजनीतीचें सार सांगतों तें ऐकून घ्यावें." असें सांगून आपआपल्यांत प्रथम नीट विचार करून ते म्हणाले, "राजानें प्रथम इतर घोड्यांवर बसण्याचा अभ्यास करण्यापूर्वी इंद्रियरूपी घोड्यांवर बसून त्यांला वश करून घ्यावें. नंतर, बाहेरच्या शत्रूंला जिकण्यापूर्वी काम क्रोध इत्यादि आभ्यंतर शत्रूंला जिंकून आपल्या कह्यांत आणावे. प्रथम आपल्यालाच आपण जिंकावें. मग दुसऱ्या शत्रूंला जिंकण्याचा प्रयत्न करावा. जो स्वतः अजितात्मा असेल, तो इतर शत्रूंला कसा वश करून घेईल? नंतर आपल्या देशांत जन्मलेले असून, तेथेंच राहणारे, सर्वशास्त्रज्ञ, युद्धादिकलांत प्रवीण, राजनीतींत कुशल, निर्लोभी व स्वामिभक्त इत्यादि गुणांनीं विशिष्ट असे प्रधान नेमावे. अथर्ववेदासंबंधी

मंत्र तंत्र जाणणारा व राजकार्यांविषयीं दक्ष असा तपस्वी पुरोहित करावा. भय, लोभ, धर्म, काम इत्यादिकांत ज्यांची पुरती परीक्षा घेतली असेल असे मुख्य मुख्य कामदार त्यांच्या त्यांच्या योग्य अशा कामांवर नेमावे. त्यांचें अंतरंग नेहमीं समजून घेत असावें. वेळोवेळ ते जी सल्ला देतील ती खरी आहे किंवा द्वेषयुक्त आहे, किंवा स्नेहपूर्वक दिलेली आहे, अथवा त्यांत कांहीं त्यांचा स्वार्थ साधायचा आहे; याची नीट परीक्षा करावी. त्यांला आपआपसांत एकमेकांवर घालून त्यापासून खरा मतलब कायतो काढून घ्यावा. तो मनुष्य अल्प कां असेना; त्यानें खरें सांगितलें असेल तर त्याबद्दल आभार मानावे. खोटें सांगणाराला दंड करावा. गुप्त संचार करणारे हेर नेमून आपले कामदारलोक काय काय करतात तें नेहमीं पहात असावें. याप्रमाणें—ज्याच्या दृष्टीवर भाग्याचें, मदाचें किंवा व्यसनाचें पटल आलेलें नाहीं, अशा राजानें स्वतः सर्व कार्य पाहून, राज्याचा नाश करणारे कंटक समूळ उपटून टाकून, खजिना व सैन्य यांचें बळ संपादन करून, पक्क्या पायावर राज्याची स्थापना करावी. नंतर उत्साह, प्रभुत्व आणि मसलत या तीन मुख्य शक्तींचा आश्रय करून आपल्या आणि शत्रूंच्या बळाबळाचा विचार करून परदेश जिंकावे. आपले हितकारी व शास्त्रज्ञ असून मोठे प्रौढ अशा लोकांशीं नेहमीं मसलत करीत असावी. त्या सर्वांच्या मतानें एखादी गोष्ट निश्चित झाली; तरी स्वतः आपण साधक बाधक सर्व दृष्टीनें तिच्याविषयीं विचार करून पहावा. साम, दान, दंड आणि भेद असे मुख्य चार उपाय आहेत. त्यांचा योग्यवेळीं उपयोग करावा. आपल्या रयतेचा योगक्षेम चालण्याची नेहमीं काळजी घ्यावी. कोणाशीं सख्य अथवा कलह करणें तें दूरवर विचार करून करावें. याप्रमाणें नेहमीं सावध राहणारा व आपल्या आणि परकीय देशाविषयीं सतत बारीक माहिती मिळविणारा असा प्रतापी राजा सार्वकाळ विजयीच होतो. तो कधींही हरला जात नाहीं. याच्या विरूद्ध

ह्मणजे—जो स्वतः अज्ञान; कामानें किंवा लोभानें आंधळा झालेला; अशा राजाला धूर्त व लबाड लोक खोटा मार्ग दाखवून एखाद्या खाड्यांत घालून खुशाल त्याला लुटीत असतात. धूर्तांनीं घेरलेल्या राजाजवळ दुसरा पुरुष कितीही शहणा असला, तरी त्याला मुळींच सवड मिळत नाहीं. शेतकऱ्यांनीं मजबूत कुंपण घातलेल्या शेतांत दुसऱ्याला कसें शिरतां येईल? ते लबाड लोक एकांतीं त्याच्या पोटांत शिरून गोड गोड गोष्टी सांगून त्याला वश करून घेतात. याप्रमाणें त्याला, शहाणा व मूर्ख प्रामाणिक व लबाड इत्यादिकांत काय विशेष आहे, तें नीट समजेनासें झालें ह्मणजे मूढत्वाला कंटाळलेली राज्यश्री त्याला सोडून पळून जाते. या करितां राजानें जितात्मा असावें. नेहमीं त्याचा दंड उभारलेला असावा; तथापि तारतम्य पाहिल्यावांचून त्याची योजना करूं नये. अशा रितीनें वर्तन करणाऱ्या भूपतीवर प्रजेचा विश्वास व प्रीति बसते. अर्थात् तो लक्ष्मीच्या विलासाला पात्र होतो. याविषयीं उदाहरणार्थ एक लहानशी गोष्ट सांगतों ती ऐकावी महाराज.

पूर्वीं **शूरसेन** नांवाचा राजा **कांतिपुरांत** राज्य करीत होता. त्याचा सर्व भरिभार काय तो कामदारलोकांवरच असे. स्वतः त्याला आपल्या राज्यांत काय चाललें आहे, हें मुळींच माहित नव्हतें! अर्थात् त्याच्या सचिवांनीं त्याला कळसूत्री बाहुल्यासारखें करून ठेवलें होतें. ते आपल्या मनास वाटेल तसा खुशाल कारभार चालवीत असत. जो कोणी **शूरसेन**राजाची मनापासून सेवा करील त्याला राजानें कांहीं देण्याविषयीं आग्रह केला तरी एक गवताची काडीदेखील देत नसत. पण जो त्यांच्या मनाप्रमाणें वागेल त्याला ते पाहिजे त्या देणग्या देत होते. भलत्याच एखाद्या अयोग्य मनुष्याची राजाजवळ शिफारस करून त्याला त्यांणीं मोठमोठ्या देणग्या देववाव्या. व कोणीं योग्य मनुष्याला राजानें दे म्हटलें तरी देऊं नये! याप्रमाणें तें प्रधानांचेंच राज्य चाललें होतें.

राजा **शूरसेन** हा ह्मणजे इतका मूर्ख होता असें नाहीं; तथापि भोळेपणानें त्याणें आपल्या प्रधानमंडळीवर वाजवीपेक्षां फाजील विश्वास ठेवला त्यामुळें ते चढून गेले. पण जेव्हां सर्वांचा एक जूट होऊन त्यांणीं राजाचें कांहींच चालेनासें केलें; तेव्हां **शूरसेन** राजाच्या लक्ष्यांत ती गोष्ट आली. साऱ्या धूर्तांची एक गट्टी जमून हे आपल्याला फसविताहेत हें तो समजला. पण ते सर्व बलाढ्य झाले होते. त्यांना हांकून लावण्याचें तर राजाला सामर्थ्य नव्हतेंच; पण कदाचित् तेच आपल्याला धुडकावून देतील कीं काय, अशी त्याला भीति होती! ह्मणून त्याणें नीट विचार करून प्रथम प्रधानांची गट्टी फोडण्याविषयीं प्रयत्न चालविला. एकाला एकांतीं बोलावून नेऊन त्याच्याशीं कांहीं कानमंत्र करून, दुसरा प्रधान तुझी निंदा करतो असें हळूच सांगावें. दुसऱ्याला तिसऱ्याच्या विरुद्ध गोष्टी सांगाव्या, याप्रमाणें त्याणें कामदार लोकांत परस्पर कलह सुरू केला. अर्थात् त्यांची जी एक जूट होती ती फुटून ते एकमेकांची निंदा करूं लागले. भेद हा मोठा प्रबल आहे. तो कसलाही बलाढ्य शत्रू असला तरी त्याला निर्बळ करून टाकतो! त्याप्रमाणें कामदारांची फुटाफूट होतांच ते निर्बळ झाले. अर्थात् राजाला विशेष जोर आला. तेव्हां त्याणें या कामावरचा त्या कामावर, या ठिकाणचा त्या ठिकाणीं, अशा रितीनें कितीकांची अदलाबदल केली. जे फारच लबाड आहेत असें वाटलें त्यांना शिक्षा दिल्या. आणि इमानी होते, त्यांना मोठ्या पदवीवर चढविलें. अशी व्यवस्था करून आपली सत्ता दृढ करून घेतली व दुसऱ्यांकडून फसवून न घेतां **शूरसेन** राजानें उत्तमप्रकारें आपलें राज्य चालविलें.

याप्रमाणेंच **हरिसिंह** नांवाचा एक राजा होता. त्याला नीतीचीं मूलतत्वें फार उत्तमप्रकारें अवगत होतीं. तो प्रथम एक सामान्य राजांपैकीं होता. तथापि शहाणपणाच्या जोरावर व भक्तिमान् आणि ज्ञात्या प्रधानांच्या साह्यानें व उत्तमोत्तम मजबूत किल्ले, मोठा खजिना

आणि प्रजेची राजनिष्ठा यांच्या जोरावर अनेक पराक्रम करून मोठा प्रवल राजा झाला. शेवटीं प्रत्यक्ष सार्वभौमराजाशीं त्याचा सामना झाला; तरी त्यांत त्याचा पराभव झाला नाहीं. तेव्हां तात्पर्य इतकेंच कीं, प्रत्येक कार्याचा दूरवर विचार करणें व सावधपणानें यथायोग्य राज्य हांकणें, हेंच राजनीतींतलें मुख्य सार आहे. याहून अधिक तें काय? आमच्या अल्प समजुतीला जें कांहीं योग्य वाटलें तें आह्मी सांगितलें. योग्यायोग्याचा विचार करण्यास आपण समर्थच आहां." असें बोलून **गोमुखादिक** बालसचिव स्तब्ध बसले. त्यांणीं खरो-खरीचें राजनीतीचें सार होतें, तेंच सांगितलें. तेव्हां तें **नरवाहनद-त्ताला** अमान्य कां होणार? त्याणें त्यांच्या वचनावर विश्वास ठेवून "पुरुषाचें मुख्य कर्त्तव्य प्रत्येक गोष्टीचें चिंतन करणें हें आहे; तथापि दैव अचिंत्य आहे" असें ह्मटलें.

नंतर त्या आपल्या प्रधानांसहवर्तमान, येण्यास विलंब लागल्यामुळें उत्कंठित झालेली, प्रिया **मदनमंचुका** हिला भेटावयास गेला. जांव-ईबुवाची स्वारी येतांच **कलिंगसेनेनें** नेहमींप्रमाणें त्याला आसनावर बसवून योग्य आदर सन्मान केला. आणि विस्मित होत्साती ती **गोमु-खाला** ह्मणाली, "राजपुत्र **नरवाहनदत्त** अर्थात् तुमचा यजमान, याला यायला आज फार विलंब लागला, म्हणून उत्सुक होऊन त्याची वाट पहात बसलेली **मदनमंचुका** माझ्यासह गच्चीवर चढली होती. इत-क्यांत एकाएकीं आकाशांतून एक दिव्य पुरुष तेथें खालीं उतरला. त्याच्या डोक्यावर मुकुट होता. हातांत तरवार होती. तो दिव्य आ-कृतीचा पुरुष मला ह्मणाला, "माझें नांव **मानसवेग**. मी विद्याधरांचा राजा आहें. तूंही पूर्वजन्मींची अप्सरा आहेस. त्यावेळचें तुझें नांव **सुरभिदत्ता**. शापानें तूं **स्वर्गा**पासून भ्रष्ट झालीस. ही तुझी मुलगी **मदनमंचुका** हीही दिव्यस्त्रीच आहे. कांहीं कारणावरून ही मृत्यु-लोकीं आली आहे. एकंदरींत तुह्माउभयतांच्या संबंधाच्या सर्व गोष्टी

मला माहित आहेत. ज्यापेक्षां तुह्मी दोघीही दिव्य आहां, त्यापेक्षां तुमचा आमचा शरीरसंबंध होणें योग्य आहे. म्हणून एवढी ही तुझी कन्या मला दे. हा संबंध अगदीं बरोबरीचा होणार आहे." याप्रमाणें त्या विद्याधरानें माझ्याजवळ मागणी केली. तेव्हां त्याच्या त्या अविचारीपणाचें मला हंसूं आलें. मी त्याला ह्मणालें, "अहो, आपण भलतीच वस्तू मागतां हें काय? या माझ्या मुलीचा भर्त्ता **नरवाहनदत्त**, जो तुह्मा सर्वांचा पुढें चक्रवर्ती होणार आहे, तो देवांनीं निर्माण केला आहे. तेव्हां ही तुह्माला कशी मिळेल?"

याप्रमाणें माझ्याकडून उत्तर मिळतांच तो, दुःखाचा एक सुस्कारा सोडून—**मदनमंचुके**च्या डोळ्यांला त्रास उत्पन्न करणारा अकालीं उदय पावलेला विजेचा लोळच कीं काय असा, तत्काळ आकाशांत निघून गेला. अशी आज एक चमत्कारिक गोष्ट घडली. तेव्हां हें काय आहे? तें मला कांहीं समजलें नाहीं." यावर **गोमुख** म्हणाला, "हे आमचे यजमान ( **नरवाहनदत्त** ) इहलोकीं जन्मास आले; तेव्हांच आकाशवाणीनें, हे पुढें विद्याधरांचे चक्रवर्ती होणार असें सांगितलें. त्यावरून सर्व विद्याधरांला फार वाईट वाटत आहे. ते कदाचित् भलतें सलतें कांहीं करण्यासदेखील चुकायचे नाहींत. बोलून चालून विद्याधरच ते. त्यांना आवेश, द्वेष वगैरेंची बाधा फार व त्यांचा स्वभावही मोठा घातकी असतो. जो स्वतः बलवान् व समर्थ असेल तशा पुरुषाला कोण प्रतिबंध करूं शकेल! विद्याधर कदाचित् घात करतील म्हणून **शंकारानें** आपले गण या आमच्या यजमानांच्या रक्षणाकरितां नेमले आहेत. ते अदृश्य रूपानें रात्रंदिवस यांच्या बरोबर फिरत असतात. ही गोष्ट खोटी असेल असें समजूं नका. प्रत्यक्ष **नारद**ऋषींच्या मुखानें माझ्या बाबांनींही ऐकली आहे. आणि त्यांणींच मला सांगितली. यावरून हे विद्याधर म्हणून जेवढे आहेत तेवढे सांप्रत आमचे विरोधी आहेत. असें समजून त्यांच्याविषयीं फार सावध असलें पाहिजे."

हें ऐकून **कलिंगसेनेचं** मन भ्‍याभीत झालें. कारण एका विद्याधरानें कसा दगा दिला, याचा तिला स्वतः अनुभव आला होता. ती म्हणाली, "ही हकीकत सांगितलीस हें बरें केलेंस. ते असेच दगा देणारे आहेत. त्यांचा मला पुरता अनुभव आला आहे; पण या तुझ्या सांगण्यावरून मला दुसरीच एक काळजी उत्पन्न झाली. कांहींतरी कपटविद्या करून माझ्याप्रमाणेंच ते या माझ्या **मदनमंचुकेला** फसवितील तर कोणास ठाऊक! तेव्हां तसें कांहीं होण्याच्या पूर्वीच हे राजपुत्र (**नरवाहनदत्त**) तिच्याशीं विवाह करून कां घेत नाहींत? मला वाटतें हें कार्य लवकरच उरकून घेतलें तर चागलें. उगीच दिवसगत करण्यांत काय अर्थ आहे?"

हें ऐकून **गोमुख** इत्यादि बाल प्रधान म्हणाले, "बाईसाहेब, आपण सांगतां तें खरें आहे. पण स्वतः युवराजांच्यानें अथवा आमच्यानें या कामांत घाई करवत नाहीं. कारण वडीलमाणसांजवळ या गोष्टी आह्मी कशा काढाव्यात? या करितां मला असें वाटतें कीं महाराज साहेबांला स्वतः तुह्मींच लग्नाविषयीं निकड लावा ह्मणजे बरें होईल. आमच्या यजमानांची तर तयारीच आहे. तिकडून हुकूम झाला ह्मणजे झालें." हें त्यांचें सांगणें **कलिंगसेने**लाही खरें वाटलें. तिणें आपणच याबद्दल राजाजवळ गोष्ट काढतें, असें त्यांला सांगितलें. नंतर, जिच्याकडे त्याचें मन लागलें आहे, असा **नरवाहनदत्त** त्या **मदनमंचुके**ला पहात होत्साता त्याच बागेंत विहार करीत सारा दिवस तेथेंच राहिला. प्रफुल्लित कमलासारखें जिचें मुख आहे, कुवलयासारखे जिचे नेत्र आहेत, दुपारीच्या फुलासारखे रमणीय जिचे ओंठ आहेत, मंदारपुष्पांच्या गुच्छासारखे जिचे स्तन आहेत, शिरसाच्या फुलासारखें जिचें शरीर कोमल आहे अशी, जणूं काय पुष्पमय आपल्या पांचही बाणांची एकत्र घडविलेली आणि सर्व जगताला जिंकणारी अशी **मदना**ची धनुष्यवल्लीच, अशा त्या मनोहर **मदनमंचुके**ला पाहून

**नरवाहनदत्ताला** वारंवार आनंदाचे उमाळे येत होते. याप्रमाणें तो दिवस विहार करण्यांत घालवून, संध्याकाळीं युवराज व त्याचे प्रधान सर्व आपापल्या घरीं गेले.

**कलिंगसेनेनें गोमुखानें** सांगितलेली हकीकत ऐकिली, तेव्हांपासून तिला मोठी चटपट लागली होती. तिणें दुसऱ्याच दिवशीं **वत्सराजाला** निरोप पाठविला. व नंतर नियमित वेळीं स्वतः आपण त्याच्या भेटीला गेली. आणि कार्य लवकर उरकून घेण्याविषयीं तिणें आग्रहपूर्वक विनंति केली. तेव्हां राजानें त्याप्रमाणें करण्याचें आश्वासन देऊन तिला निरोप दिला. आणि लगेच **यौगंधरायणादिक** प्रधानांला राणी **वासवदत्तेच्या** देखत ह्मणाला, "बुवांनों, आतां तुह्मां सर्वांच्या मनांत काय आहे तें सांगा. ती **कलिंगसेना** तर मुलीच्या लग्नाविषयीं फार निकड लावते आहे. ती स्वतः मोठी साध्वी आहे; तथापि लोक तिला व्यभिचारिणी ह्मणतात. तेव्हां तिची मुलगी केली तर कदाचित् आपल्यालाही दोष देतील. लोकांची मर्जी नेहमीं राखली पाहिजे. प्रत्यक्ष **रामचंद्रानें** देवी**जानकी** शुद्ध असतांही, लोकापवादाला भिऊन अरण्यांत टाकली होती हें तुह्माला ऐकून ठाऊक नाहीं का[1]? तसेंच आपले पूर्वज **भीष्माचार्य** यांणीं मोठा प्रयत्न करून सर्व राजांचा पराभव करून आपला बंधु जो **विचित्रवीर्य** त्याच्याकरतां तिघी मुली

१—रावणाचा वध करून रामचंद्र परत अयोध्येंत येऊन राज्य करीत असतां, लोक आपल्याला बरें वाईट काय म्हणतात, तें समजून घेण्याकरतां रामचंद्र वेषांतर करून अयोध्येंत रात्रीं गुप्त रितीनें फिरत होते. मार्गानें जात असतां—एका परटानें आपली बायको माहेरीं फार दिवस राहिली ह्मणून तिला घरांत घेतली नाहीं. व त्यावेळीं—'रावणाच्या येथें फार दिवस राहिलेल्या सीताबाईला, खुळवेड्या रामानें घेतली; पण आपण तसें कधीं करणार नाहीं,' असें त्याणें ह्मटलेलें रामानें ऐकलें. त्यानंतर दुर्मुख इत्यादि हेरांकडूनही सीतेच्या संबंधानें लोक आपल्याला दोष देतात असें समजल्यावरून, तिला अरण्यांत वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सोडून दिली. ही कथा वाल्मीकिरामायणांत उत्तरकांडांत व भवभूतीच्या उत्तररामचरित्रनाटकांत व इतरही पुराणांत पुष्कळ ठिकाणीं वर्णन केली आहे.

जिंकून आणल्या होत्या. मग त्यांपैकीं वडील मुलगी अंबा हिणें पूर्वीं दुसऱ्या पुरुषाला वरला आहे, असें समजल्यावरून तिचा त्यांणीं त्याग केला नाहीं काय? वस्तुतः कलिंगसेनेनें कांहीं व्यभिचार केला आहे असें दिसत नाहीं. तथापि प्रथम ती आपण होऊन मला वरण्याकरितां आली असून तसें न होतां मध्येंच मदनवेगनामक विद्याधरानें तिला वरली. ह्मणून लोक तिची निंदा करतात. तेव्हां आतां आपण कसें करावें? याचा मला मोठा विचार पडला आहे. नरवाहनदत्ताला तर तिच्या मुलीवांचून क्षणभर गमत नाहीं. त्या उभयतांची एकमेकांवर अत्यंत प्रीति असल्यामुळें त्यांचा वियोग करतां येत नाहीं. आणि लोकापवादाकडेही दुर्लक्ष्य करतां कामा नये. असें असल्यामुळें मी एक तोड काढली आहे. ती तुह्मा सर्वांला पसंत पडेल तर पहा. आपल्या

---

१—काशीच्या राजाच्या—अंबा, अंबिका आणि अंबालिका या नांवाच्या तीन मुली होत्या. त्यांचा स्वयंवर चालला असतां आपला सावत्र बंधू विचित्रवीर्य याच्याकरतां भीष्माचार्यांनें, जमलेल्या सर्व राजांचा पराभव करून त्या तीनही मुली हरण करून हस्तनापुरांत आणल्या. नंतर लग्नाची तयारी झाली. त्यांपैकीं वडील मुलगी अंबा हिणें फार काकुळती येऊन, भीष्माला विनंति केली कीं; 'मी पूर्वी मनापासून शाल्वराजाला वरला आहे. जरी आपण त्याला जिंकून मला आणलें व आतां आपण ज्याच्याशीं माझें लग्न लावून द्याल त्याची मला बायको झालें पाहिजे; तरी माझें मन त्या शाल्वावरच राहील. शरीर आपण जिंकलें तेव्हां त्यावर तुमची सत्ता आहे; पण मनावर नाहीं! याचा कांहीं तरी विचार करा.' हें ऐकून भीष्माला तिची दया आली. व त्याणें शाल्वाकडे जाण्याविषयीं तिला मोकळीक दिली. पण दुर्दैवानें शाल्वराजानेंही तिचा स्वीकार केला नाहीं. तो अभिमानी क्षत्रिय दुसऱ्यानें जिंकून नेलेल्या व मग मेहरबानीनें सोडून दिलेल्या, स्त्रीचा कां स्वीकार करील? त्याणें अव्हेर केला तेव्हां अंबा परत भीष्माकडे येऊन 'आपल्या भावाला मला द्या' ह्मणून विनवण्या करूं लागली; पण भीष्मानें ती गोष्ट मान्य केली नाहीं. अर्थात् ती दोहोंकडूनही भ्रष्ट झाली. तेव्हां रागावून भीष्माचा सूड उगविण्याकरतां तिणें उग्र तपश्चर्या करून महादेवापासून वर मिळविला. आणि शिखंडी या नांवानें द्रुपदराजाच्या पोटीं जन्मास येऊन भीष्माच्या मरणाला ती कारण झाली! ही कथा महाभारताच्या आदिपर्वांत फार संक्षेपानें व उद्योगपर्वांत फार विस्तारानें वर्णन केली आहे.

**नरवाहनदत्तानें** त्या **कलिंगसेनेच्या** मुलीशीं गांधर्व विवाह करावा ह्मणजे झालें. असें केल्यानें लोकापवाद येणार नाहीं. व त्या उभयतांचा मनोभंगही होणार नाहीं. गांधर्व विधीनें हीन जातीच्या मुलीशींदेखील लग्न लावण्याचा आह्मा राजे लोकांना पूर्ण अधिकार आहे. पहा बुवा तुह्माला कसें काय वाटतें तें."

याप्रमाणें **वत्सराजानें** सांगितलें तें ऐकून **यौगंधरायण** म्हणाला, "आपण सांगितलें तें बरें आहे; पण ही अनुचित गोष्ट **कलिंगसेनेला** कशी मान्य होईल? ती व तिची मुलगी दोघीही दिव्य स्त्रिया असल्याचें वरचेवर आपल्या कानांवर आलें आहे. अंतर्ज्ञानी माझा मित्र जो ब्रह्मराक्षस, त्याणेंही मला असेंच सांगितलें आहे. या जन्मीं तर **कलिंगसेना** ही एका मोठ्या सन्मान्य राजाची कन्या आहे. स्वतः तिच्या हातून मुळींच अधर्म घडलेला नाहीं. तेव्हां ती गांधर्वविधी कसा कबूल करील?" या प्रमाणें तेथें भाषणें चाललीं आहेत. इतक्यांत प्रत्यक्ष **महेश्वराच्या** आज्ञेनें प्रकट झालेली दिव्य वाणी आकाशांत ऐकूं आली. "राजा, माझ्या नेत्राग्नीनें दग्ध झालेला जो **मदन** तोच तुझा पुत्र **नरवाहनदत्त. कलिंगसेनेची** मुलगी हीही त्याची पूर्वजन्मींची स्त्री. मीच तिला येथें निर्माण केली आहे. तिणें आराधन करून मला संतुष्ट केल्यावरून मी तिला हें वरदान दिलें आहे. ती **मदनमंचुकाच** त्याची पट्टराणी होणार. तिच्यासहवर्त्तमान तो माझ्या प्रसादानें शत्रूंचा पराभव करून दिव्यकल्पपर्यंत विद्याधरांचें साम्राज्य करील." याप्रमाणें आकाशवाणी ऐकून **वत्सराज** व त्याचे प्रधान वगैरे या सर्वांनीं भक्तिपूर्वक व मोठ्या नम्रतेनें आकाशाकडे दृष्टी करून **शंकराला** नमस्कार केला. आणि त्याच वेळीं आनंदपूर्वक **नरवाहनदत्ताच्या** लग्नाचा निश्चय केला. नंतर **यौगंधरायणाकरवीं** ज्योतिष्यांला बोलवून उत्तम मुहूर्त पाहिला. त्यांणीं दिलेला मुहूर्त जवळच होता. ज्योतिष्यांनीं त्यावेळीं जो कांहीं विचार केला, त्यावरून

मदनमंचुकेचा आणि नरवाहनदत्ताचा थोडे दिवस वियोग होईल. असें त्यांच्या नजरेस आलें, व तें त्यांणीं राजाला कळविलें.

नंतर राजानें आपल्या ऐश्वर्याला शोभेल अशी विवाहाची मोठी जंगी तयारी केली. त्या समारंभाची गडबड केवळ कौशांबी नगरींतच झाली असें नाहीं; तर सर्व पृथ्वीवर झाली असें ह्मटलें तरी चालेल. देशदेशांतराहून आप्त, इष्ट, मित्र, मांडलिक राजे इत्यादिकांच्या स्वाऱ्या येऊन थडकल्या. राजानें सर्वांचा यथायोग्य सन्मान ठेविला होता. लग्नाचा दिवस येतांच मदनमंचुकेचा बाप मदनवेग विद्याधर याणें दिव्य वस्त्रें अलंकार इत्यादिक उत्तम जिनसा मुलीकरितां पाठविल्या. ते दागिने वगैरे घालून मुलीला सजविण्याकरितां स्वतः सोमप्रभा पतीच्या आज्ञेवरून तेथें आली होती. आधींच ती मुलगी सर्वांगसुंदर, तशांतून वस्त्रें अलंकार वगैरे दिव्य, आणि सोमप्रभेसारखी तिला सजविणारी मग काय विचारायचें आहे! कृत्तिका नक्षत्रांत प्रविष्ट झालेल्या चंद्राची कांति त्या मदनमंचुकेच्या शोभेपुढें तुच्छ झाली. अप्सरा इत्यादि दिव्य स्त्रिया शंकराच्या आज्ञेनें तेथें प्राप्त झाल्या होत्या. त्या मदनमंचुकेच्या रूपानें लज्जित झाल्या म्हणूनच कीं काय; हळूच मधुर शब्दानें गाऊं लागल्या. "भगवति, भक्तांवर अनुकंपा करणारे अद्रिकन्ये, तुझा जयजयकार असो! रतीनें जें तप केलें त्याचें तूं स्वतः आज सार्थक केलेंस!" इत्यादि प्रकारचे, सिद्ध चारण गंधर्व इत्यादिकांचे उद्गार व वाद्यांचा घोष आकाशांत होऊं लागला. नंतर नरवाहनदत्त उत्तम पोषाख वगैरे धारण करून विवाहकालीं योग्य अशा वेषानें, मदनमंचुका अलंकृत होऊन ज्या मंडपांत माळ घेऊन उभी होती, त्याठिकाणीं प्राप्त झाला. तेथें हजारों वेदवेत्ते ब्राह्मण मंत्रघोष करीत होते. सुवासिनी स्त्रिया मंगलकारक गाणीं ह्मणत होत्या. त्याठिकाणीं नवरदेवाची स्वारी येऊन पोंचतांच पुरोहितबुवांनीं विवाहविधि सुरू केला. 'सुमुहूर्त सावधान' होऊन बोहल्यावर प्रदीप्त

केलेल्या अग्नीच्या भोंवतीं वधूवरें प्रदक्षिणा घालूं लागलीं. त्यावेळची रमणीय शोभा काय वर्णन करावी! **चंद्रिका** आणि **सूर्य** एकाचवेळीं कनकाचल जो **मेरुपर्वत** त्याच्या पोटीं जोडीनें फिरत असलेले जर दृष्टीस पडतील, तर त्यांची मात्र त्यांला उपमा देतां येईल. त्या लग्नमंडपांत चाललेल्या मंगलकारक वाद्यांच्या ध्वनीला आकाशांतल्या देवांच्या दुंदुभीनीं जसें दडविलें, तसेंच लाजाहोमाच्या वेळीं वधूनें अग्नींत घातलेल्या लाह्यांवर देवांच्या पुष्पवृष्टीचें दडपण पडलें. तो होम वगैरे झाल्यावर **कलिंगसेनेनें** आपल्या जांवयाला सोनें, रुपें, हिरे, माणकें इत्यादिकांचे उत्तम उत्तम अलंकार, वस्त्रें, तशींच पात्रें, अशा असंख्य वस्तू आंदण दिल्या. त्यावेळीं तिनें दिलेलें ऐश्वर्य किती होतें त्याचें काय वर्णन करावें? धनपती जो **कुबेर** तो देखील दरिद्र्यासारखा, यातलें आपल्याला कांहीं मिळेल काय, अशी याचना करायला **कलिंगसेने**-जवळ येईल असें वाटलें! मग बिचाऱ्या राजांची कथा काय? असो.

बहुत दिवस उभयतांच्या मनांत घोळत असलेला तो पाणिग्रहणविधी यथासांग झाला. नंतर ते वधूवर, जेथें हजारों स्त्रियांचा मेळा जमला आहे व ज्याला लोकांच्या निर्मल मनाचीच उपमा देणें योग्य अशा अंतःपुरांत प्रवेश करते झाले. इकडे मोठमोठे सेनापति, सर्व जगांत ज्यांचें शौर्य व ऐश्वर्य प्रख्यात असे बरोबरीचे राजे व मांडलिक, हातांत रत्नांचे नजराणे घेऊन **वत्सराजा**पुढें उभे राहिले. त्यांनीं समुद्राप्रमाणें राजाला रत्नाकर बनविलें. राजानेंही आपल्या आश्रित लोकांवर त्या महोत्सवांत सुवर्णवृष्टी केली. त्यावेळीं आपल्या आईच्या पोटांत असलेल्या मनुष्याला मात्र तो लाभ अंतरला. बाकी सर्वांला त्यांच्या इच्छेहून अधिक लाभ झाला. वेश्या, चारण, गवयी इत्यादिकांचें गाणेंबजावणें जिकडेतिकडे एकसारखें चालू होतें. बंदी भाट उत्तमप्रकारें राजाचें यश वर्णन करीत होते. यामुळें सारा जीवलोक आनंदमय झाला आहे असें वाटत होतें. वाऱ्यानें, पताकारूपी

जिच्या बाहुलता हलविल्या आहेत, व नगरवासी अलंकृत स्त्रियांच्या योगानें जी मंडित झाली आहे, अशी ती **कौशांबी** नगरी त्यावेळीं जणूं काय आनंदानें नृत्य करीत आहे, असें वाटलें. प्रत्येक दिवशीं नवे नवे नाचरंग व नवे नवे उत्सव होत असत. त्यामुळें तो समारंभ फार दिवस वाढत गेला. सर्व लोक आनंदित व पूर्णमनोरथ होत्साते स्वर्गलोकींच्या सुखाचा अनुभव घेत होते.

याप्रमाणें पुष्कळ दिवस चाललेला विवाहसमारंभ आटपला. आपली प्रियपत्नी **मदनमंचुका** हिच्यासहवर्तमान युवराज **नरवाहनदत्त,** पुढें प्राप्त होणाऱ्या उदयाची इच्छा करीत होत्साता, जीवलोकसंबंधी सुखाचा अनुभव घेत आनंदांत राहता झाला. त्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले होते. तो तरुण राजपुत्र, प्राणांपेक्षांही प्रिय अशी प्रिया **मदनमंचुका** व **गोमुख** इत्यादि आपले सचिव, यांसहवर्तमान इच्छेप्रमाणें रहात असतां भ्रमरांच्या गायनानें मनोहर अशाप्रकारच्या **वसंतऋतूचा** समय प्राप्त झाला.

एके दिवशीं, उन्मत्त झालेल्या कोकिलांच्या मंजुळ शब्दांचा ज्यांत ध्वनि होत आहे, व ज्याणें वेलींना नृत्य करायला लाविलें आहे, असा **मलयमारुत** मंद व मधुर भाषणच करीत आहे कीं काय? अशावेळीं, राजपुत्र **नरवाहनदत्त** आपल्या प्रधानांसहवर्तमान शहराबाहेर बागेंत क्रीडा करण्याकरतां गेला. बागेंत पोंचल्यावर आपापल्या इच्छेप्रमाणें ते सर्वही जिकडे तिकडे संचार करूं लागले. युवराज **नरवाहनदत्त** याचा खुषमस्कऱ्या **तपंतक** हा एकटाच त्या बागेंतल्या एका प्रदेशांत पुष्कळ वेळ फिरत होता. तो अकस्मात्, हर्षानें ज्याचे नेत्र प्रफुल्लित झाले आहेत असा, एकाएकीं युवराजाजवळ येऊन ह्मणाला, "यजमानसाहेब! येथून जवळच एक कन्या आकाशांतून उतरून अशोकाच्या झाडाखालीं उभी राहिली आहे. तिच्या बरोबर तिची एक सखी आहे; तिनें मला आपल्याकडे पाठविलें आहे. खरो-

खर तिचें रूप कसें आहे तें मी काय तुह्माला सांगूं! प्रत्यक्ष पहाल तेव्हांच समजून येईल. तिच्या कांतीनें दशदिशा प्रकाशित झाल्या आहेत. तिनें आपल्याला तिकडे बोलाविलें आहे. यावर आपली मर्जी."

**नरवाहनदत्ताच्या** अंगीं बापाचे इतर गुण आले होते, त्या बरोबरच बायकांचा विशेष नाद हाही गुण आला होता. वस्तुतः याला गुण ह्मणण्यापेक्षां दोष म्हणावा असें कोणालाही वाटेल; पण **नरवाहनदत्ताच्या** संबंधानें त्याला दोष म्हणतां येणार नाहीं. नीट विचार करून पाहिलें तर दोष आणि गुण यांचीं स्वरूपें निश्चित नाहींत. स्थळ, काळ आणि वस्तू इत्यादिकांच्या भेदानें दोषाचा गुण व गुणाचा दोष नेहमीं होत असतो. बायकांचें वेड फाजील असणें हें चांगलें नव्हे, पण जो आपल्या कर्तव्यांत किंवा इतर शौर्यादिकांच्या कामांत गाफल न राहतां तें वेड बाळगतो, त्याचा तो दोष नसून उलट गुणच आहे असें म्हटलें पाहिजे. **नरवाहनदत्त** हा असाच होता. अर्थात् बायकांचें वेड हा त्याचा गुण म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. असो. **तपंतकानें** सांगितलेला निरोप ऐकतांच त्याला मोठा आनंद व कौतुक वाटलें. तत्काल तो आपल्या इतर मित्रांसह तिकडे जावयास निघाला. आकाशांतून उतरलेली तरुण कन्या कोण आहे हें पाहण्याची त्याला इतकी गडबड झाली कीं, तो किती वेळांत **अशोकवृक्षाखालीं** गेला हें मुळींच समजलें नाहीं. जिचे नेत्ररूपी भ्रमर अत्यंत चंचल आहेत, जिचे ओंठ आरक्त आहेत, स्तनरूपी गुच्छ भरगच्च आहेत, कमलांतील पिंवळ्या जर्द परागांप्रमाणें जिचा वर्ण गोरा आहे, जणूं काय छाया करून दुसऱ्याचा ताप हरण करणारी व जिनें सुंदर आकृति धारण केली आहे अशी प्रत्यक्ष वनदेवताच, अशी ती तरुण कन्या **नरवाहनदत्ताच्या** मनाला हरण करिती झाली.

युवराजाला पाहतांच ती मोठ्या नम्रतेनें पुढें सामोरी आली. **न-**

**रवाहनदत्ता**नेंही तिचा आनंदपूर्वक स्वीकार केला. नंतर परस्परांचें आगत स्वागत वगैरे होऊन तीं दोघेंही त्या **अशोक**वृक्षाखालीं बसल्यावर **नरवाहनदत्ता**चा अभिप्राय जाणणारा **गोमुख** तिला ह्मणाला, "हे कल्याणकारिणि, मी एकदम तुला प्रश्न करतों, याची क्षमा कर. हें तुझें अकस्मात् झालेलें दर्शनच आह्मांस तसें विचारायाला लावतें आहे. तूं कोण? कोणाची? व येथें तुझें आगमन कां झालें? हें ऐकण्याची मोठी उत्कंठा लागली आहे; तर आपलें वृत्तरूपी अमृत प्राशन करण्याचा आमच्या कानांला लाभ देशील काय?"

हा त्याचा मोठ्या गौलतेचा प्रश्न ऐकून त्या तरुण स्त्रीला मोठा हर्ष झाला. वस्तुतः पाहिलें असतां एकांतीं अशा तरुण मंडळींशीं बोलत बसणें हें कुलीन मुलीला अयोग्यच होतें; व तिलाही त्याबद्दल फार लाज वाटत होती. पण जिचें उल्लंघन करणें अशक्य अशा कामदेवाच्या आज्ञेनें लज्जेला दूर झुगारून दिल्यामुळें, **नरवाहनदत्ता**च्या मुखकमलाकडे प्रेमपूर्वक वांकड्या डोळ्यांनीं वरचेवर पहात होत्साती, ती आपला वृत्तांत विस्तारपूर्वक वर्णन करिती झाली. ती म्हणाली, "या त्रैलोक्यांत प्रख्यात असा **हिमवान्** नांवाचा पर्वत आहे, आकाशाला स्पर्श करणारीं अशीं त्याचीं पुष्कळ शिखरें आहेत, त्यांपैकींच एका रम्य शिखरावर भगवान् **शंकर** वास्तव्य करितो. आणि त्यालाच **कैलास** म्हणतात. चकचकित दिसणाऱ्या अनेक रत्नांच्या कांतीनें शोभणारा; बर्फाचे थर चहूंकडे सांचल्यामुळें **सूर्य**किरणांनीं अत्यंत स्वच्छ दिसणाऱ्या आकाशाचा जणूं काय एक मोठा भागच; असा तो **हिमालय**, एवढाच किंवा असाच आहे असें वर्णन करण्यास कठीण पडतें. केवळ **शंकरा**च्याच प्रसादानें मिळणाऱ्या, जरा आणि मृत्यु यांचें भय नाहींसें करणाऱ्या अनेक सिद्धी आणि औषधी यांची, ज्या पर्वताचीं शिखरें हीं एक निधानेंच आहेत. ज्याच्या निरनिराळ्या प्रदेशांत संचार करणाऱ्या विद्याधरांच्या दिव्य शरीरकांतीनें **अमरां**चा पर्वत जो **मेरू**

त्याच्या शिखरांची शोभाही तुच्छ केली आहे. त्या **हिमाचला**वर **कांचनशृंग** नांवाचें सुवर्णमय नगर आहे. तें आपल्या प्रकाशानें जणूं काय सूर्याचेंच स्थान आहे असें तेजस्वी दिसतें. बहुत योजनें लांब व रुंद, अनेक दिव्य मंदिरांनीं सुशोभित आणि सदा चैनींत राहणाऱ्या लोकांनीं गजबजलेलें, अशा त्या नगरांत **शंकरा**वर दृढ भक्ति ठेवणारा, **हेमप्रभ** नांवाचा विद्याधरांचा राजा वास्तव्य करीत असतो. त्याच्या अनेक स्त्रिया आहेत; पण त्यांत जशी **चंद्राची रोहिणी** तशी **अलंकारप्रभा** नामक पट्टराणी आहे. तो राजा मोठा धार्मिक आहे. तो आपल्या त्या पट्टराणीसह प्रतिदिवशीं प्रातःकाळीं पवित्र तीर्थांत स्नान करतो. **पार्वती**सहवर्तमान भगवान् **महेश्वर** याचें यथाविधि पूजन करतो. नंतर या मनुष्यलोकांत येतो, आणि दरिद्री ब्राह्मणांला प्रतिदिवशीं, रत्नें मिश्रित करून एकलक्ष तोळे सुवर्ण दान करतो. याप्रमाणें हें धर्मकृत्य झालें, म्हणजे परत आपल्या राजधानींत जाऊन राज्यसंबंधीं कामकाज यथान्याय पाहतो. नंतर नियमित खाणें, पिणें वगैरे करीत असतो. त्याचा नित्यक्रम एखाद्या ऋषीप्रमाणें नेमलेला असून तो सार्वकाळ व्रतस्थ असतो.

याप्रमाणें तो धर्माचरण करीत असतां पुष्कळ वर्षें गेलीं. पातक तर तशा पुरुषाला स्पर्श देखील करावयाचें नाहीं. तेव्हां दुसरें कोणतें कारण असेल तें असो; पण त्याला संतति मुळींच जाहली नाहीं. अर्थात् निपुत्रिक असल्याबद्दल त्या राजाला चिंता उत्पन्न झाली. तिच्या योगानें तो सार्वकाळ खिन्न दिसूं लागला. त्याच्या नित्यक्रमांत कांहीं अंतर पडलें नव्हतें; तरी त्याचा चेहरा प्रफुल्लित दिसत नव्हता. आपल्या त्या प्रियपतीची ती अवस्था पाहून, त्याची पट्टराणी **अलंकारप्रभा** हिणें एकांतीं राजाला, खिन्न होण्याचें कारण काय ह्मणून विचारिलें. तेव्हां तो ह्मणाला, "तुला समजत नाही काय? आज मला सर्व गोष्टी अनुकूळ आहेत; धनदौलत अपरंपार आहे; असें अ-

सून पुत्र नाहीं, यामुळें तें सर्व निष्फळ वाटतें! मला दुःख कायतें एका पुत्राचेंच आहे."

यावर राणी ह्मणाली, "हें तर आज फार दिवसांचें आहे. इतके दिवस आपल्याला पुत्राविषयीं खेद वाटला नाहीं, आणि आतांच असे खिन्न झालां याचें कारण काय तें समजत नाहीं."

हें ऐकून राजा ह्मणाला, "तूं ह्मणतेस तें खरें. आपल्याला पुत्र नाहीं याला पुष्कळ वर्षें झालीं; तथापि मला इतके दिवस त्याविषयीं कांहीं वाटलें नव्हतें. पूर्वीं **सत्यवान्** नांवाच्या एका निपुत्रिकाची गोष्ट मीं ऐकली होती, त्याला कित्येक वर्षें झालीं. थोड्या दिवसांपूर्वीं मी विचार करीत बसलों असतां; सहज मला त्या गोष्टीची आठवण झाली. आणि त्यासंबंधानें मनाला जो धक्का बसला त्यापासून मला ही चिंता उत्पन्न झाली. नाहीं तर यापूर्वीं आपल्याला पुत्र नाहीं ही गोष्ट माझ्या स्वप्नांतदेखील आली नाहीं."

हें ऐकून राणी **अलंकारप्रभेनें** ती कथा कशी आहे ती मला सांगा, अशी विनंती केल्यावरून राजा **हेमप्रभ** याणें संक्षेपानें ती तिला सांगितली. तो ह्मणाला, "**चित्रकूट** नांवाच्या नगरींत, ब्राह्मण आणि देव यांची सेवा करण्याविषयीं तत्पर आणि **महीपति** हें ज्याचें अन्वर्थक नांव आहे, असा एक प्रख्यात ब्राह्मण राहत होता. युद्धांत नेहमीं विजयी होणारा **सत्वशील** नांवाचा त्या देशाचा राजा त्याचा परम मित्र होता. राजापासून त्याला दरमहा शंभर मोहरा मिळत होत्या. वस्तुतः तें द्रव्य पुष्कळ होतें; पण तो ब्राह्मण **महीपति** मोठा दाता व उदार असल्यामुळें त्याला तें पुरत नव्हतें. **महीपतीला** पोरबाळ वगैरे कांहीं नव्हतें, यामुळें दानधर्म करून तो अपल्या मनाची करमणूक करीत असे. तो अतिशय उदार असून प्राप्ती थोडी व खर्च फार असें असल्यामुळें पदोपदीं खिन्न होत असे. याचकांनीं तर त्याची पाठच पुरविली होती. एखादा मनुष्य दानधर्म करतो असें

समजलें, ह्मणजे याचकांच्या झुंडीच्या झुंडी त्याच्यावर कोसळतात. त्यांला तारतम्य ह्मणजे कसलें तें मुळींच नसतें. दात्याच्या घरीं आहे किंवा नाहीं, त्याची शक्ति किती आहे, व आपण मागतों काय, याचा विचार न करतां ते एकदम मागत सुटतात!

एकेदिवशीं **महीपती**जवळ एक ब्राह्मण पांचशें मोहरा मागायला आला. त्याणें नम्रतेनें **महीपती**ला आपली हकीकत निवेदन केली. त्या ब्राह्मणाला जितकें द्रव्य पाहिजे होतें तितकें जवळ असतें तर **महीपतीनें** तेव्हांच दिलें असतें. पण पांचशें मोहरा येतील कोठून? त्याला दरमहा काय त्या शंभर मोहरा मिळणार; त्यांतच सगळा कारभार चालवायचा. संग्रह ह्मटला तर या महिन्याची त्या महिन्याला गांठ पडणें मुष्कील. अशा स्थितींत पांचशें मोहरा एकदम येणार कोठून? त्या याचकाचें दैन्य ऐकून आपल्या स्थितीबद्दल **महीपतीला** वैताग आला. तो ह्मणाला, **ब्रह्मदेवानें** मला काय चमत्कारिक स्थितींत जन्म दिला आहे! संसारांत सर्व उमेदीला कारण जो पुत्र तो तर मला मुळींच दिला नाहीं. हें दानधर्माचें व्यसन दिलें आहे, पण त्याला पाहिजे तितकें द्रव्य नाहीं. सुकून वठलेल्या झाडाचें किंवा दगडाचें जन्म चांगलें; पण घरसंसारी असून दरिद्री आणि त्यांतूनही दानाचें व्यसन असलेल्या पुरुषाचें जिणें व्यर्थ आहे! असे उद्गार काढून त्याणें त्या याचकाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. अर्थात् तोही निराश होऊन गेला.

त्या दिवसापासून **महीपतीचें** मन दिवसेंदिवस अधिकाधिक उदास होत गेलें. पण त्याच्या त्या सद्वर्तनानें प्रसन्न झालेल्या दैवाला त्याचें औदासीन्य सहन झालें नाहीं. एकेदिवशीं **महीपति** आपल्या बागेंत संचार करीत असतां अकस्मात् त्याला एक द्रव्याचा मोठा ठेवा सांपडला. तत्काळ त्यानें आपल्या नोकरांना तेथें बोलावून आणून, सोन्याच्या व रत्नांच्या अनेक वस्तु ज्यांत भरल्या आहेत असा

तो ठेवा आपल्या घरांत नेला. मग त्या दिवसापासून त्याची खूप चैन उडाली. जो कोणी त्याच्याकडे मागायला येई, त्याला त्याणें विन्मुख कधींच घालविला नाहीं. नोकरचाकर, आप्त, इष्ट मित्र यांना पुष्कळ द्रव्य देऊन त्याणें सुखी केलें. त्या सात्विक पुरुषाला दैवानें लाभ करून दिला; पण तो त्याच्या दुष्ट दायादांला सहन झाला नाहीं. **महीपती**ची प्राप्ती किती आहे तें सर्वांला माहितच होतें. असें असतां. आलीकडे त्यानें जो एवढा खर्च चालविला आहे, तो कशाच्या आधारावर. अर्थात् त्याला काहीं तरी मोठें घबाड सापडलें असावें. असें समजून त्याच्या दायादांनीं राजाजवळ चहाडी सांगितली. जमिनींत असलेल्या द्रव्यावर मुख्यत्वें राजाची सत्ता हें तर सिद्धच आहे. असें असून **महीपतीनें** मिळालेला ठेवा राजाकडे त्याच्या दरबारांत हजर न करतां आपण घेतला. हा त्याच्यावर अपराध ठेवून राजानें त्याला बोलावूं पाठविलें. हुकुमाप्रमाणें तो सत्वशील **महीपति** दरबारांत हजर झाला. दुसरें कांहीं काम चाललें होतें, ह्मणून चोपदारानें क्षणभर त्याला अंगणांत उभें राहण्यास सांगितलें. 'चालू असलेलें काम पुरें झाल्यावर आपण तुह्मांला सरकाराजवळ घेऊन जातों' असें सांगितल्यावरून, तो बिचारा शांत व निरुपद्रवी **महीपति** तेथेंच अंगणांत उभा राहिला. दैव अनुकूल झालें ह्मणजे तें पाहिजे तेथें पाहिजे तो लाभ करून देतें. **महीपति** अंगणांत रिकामा उभा राहिला होता. त्याच्या हातांत लोखंडाची बिडी घातलेली एक काठी मात्र होती. तिणें तो सहज जमीन उकरीत होता. वरचेवर उकरतां उकरतां त्याला तेथल्या तेथेंच एक तांब्याच्या चंबूचा कांठ दिसला. तेव्हां त्याणें अंमळ जास्त जोरानें खणून तो वर काढला. त्यांत तर सारीं बहुमोल रत्नेंच भरलेलीं होतीं. त्याच्या दुष्ट दायादांनीं एका ठेव्याकरतां त्याच्यावर फिर्याद आणली होती. तों प्रत्यक्ष राजाच्याच अंगणांत त्याला हा दुसरा निधी सांपडला !

निधीचा असा चमत्कार आहे कीं, तो ज्याला लाभायचा असेल त्याच्याच दृष्टी पडतो; दुसऱ्याला मुळींच दिसत नाहीं. **महीपतीला** राजाच्या अंगणांत जो ठेवा मिळाला तो त्याणें हळूच आपल्या बगलेंत घेतला. हें राजाला देऊन तूं त्याला खूष कर, असें सांगण्याकरतां जणूं काय देवानें आपलें हृदयच दिलें आहे, असा तो ठेवा कालेंत घेऊन **महीपति** चोपदाराच्या सूचनेची वाट पहात उभा राहिला आहे, इतक्यांत त्यानें त्याला इषारा केला. त्या बरोबर तो ब्राह्मण राजापुढें हजर झाला. राजानें त्याचा आदरमान वगैरे विशेष न करतां, "भटजीबुवा, तुमच्या हातून फार अयोग्य गोष्ट झाली आहे. भूमिगत द्रव्यावर राजाचा अधिकार असतो हें तुह्माला माहित असून व आमच्याकडून दरमहा तुह्माला योग्य नेमणूक मिळत असतां, जमिनींत सांपडलेला ठेवा तुह्मी छपविला. असो, तुमच्या योग्यतेकडे पाहून मी तुह्माला शिक्षा वगैरे कांहीं करीत नाहीं. मिळालेला तो ठेवा मुकाट्यानें आणून हजर करा ह्मणजे झालें," असा हुकूम केला.

हें ऐकून **महीपति** शांत वृत्तीनें राजाला ह्मणाला, "महाराज, मला निधी मिळाला आहे हें मी मोठ्या आनंदानें कबूल करितों. तो मी आपल्याजवळ हजर केला असता; पण आपण तरी तशाप्रकारचें द्रव्य दानधर्मांतच खर्च करणार. व मीही त्याचा त्याच कामीं उपयोग केला. तें कसेंही असो; हुकुमाप्रमाणें हजर करण्याला मी तयार आहें. पण विनंति एवढीच कीं पूर्वीं मिळालेला निधी हजर करूं किंवा आतां मिळालेला हजर करूं? याविषयीं काय तो हुकूम व्हावा. हें ऐकून राजाला मोठा अचंबा वाटला. याला असे निधी मिळाले आहेत तरी किती, हें कांहीं त्याच्या लक्ष्यांत येईना. तरी 'आतां मिळालेलाच हजर कर,' असें राजानें सांगितलें तेव्हां **महीपतीनें** तत्काल आपल्या काखेंतला चंबू पुढें ठेवला. त्यांतलीं अमोलिक रत्नें पाहून राजाला फारच आश्चर्य वाटलें. त्याणें; "हीं कोठें मिळालीं तें दाखीव" असें सांगित-

त्यावरून **महीपतीनें** त्या कचेरीच्या अंगणांत त्याला तो चंबू मिळाला होता तें स्थळ राजाला दाखविलें. तेथें आणखी थोडें खणतांच दुसरा एक मोठा हांडा मिळाला! तें सर्व द्रव्य राजाला अर्पण करून 'आणखी काय हुकूम आहे?' ह्मणून त्याणें विचारिलें. तेव्हां राजा ह्मणाला, "ब्राह्मणा, तूंच प्रत्यक्ष निधी आहेस! तुला ही सर्व पृथ्वी निधींनीं भरलेली दिसत आहे. जेथें तूं खणशील तेथें तुला निधीच प्राप्त होणार. ही सर्व तुझ्या पुण्याची देणगी आहे. हे तुझे दायाद क्षुद्रबुद्धी असल्यामुळें त्यांनीं उगीच तुझा द्वेष धरून माझ्याजवळ चहाडी केली. व मीही अविचारानें तुला दोष लावला. तर त्याची तूं क्षमा कर. आतां जो तूं मला ठेवा दिलास तेवढ्यावरच मी संतुष्ट आहें. यापूर्वीं तुला जें कांहीं मिळालें असेल; तें तूं खुशाल पाहिजे त्यारितीनें खर्च कर. त्यावर माझी मुळींच सत्ता नाहीं." असें सांगून व त्याचा सत्कार करून राजानें त्याला निरोप दिला. नंतर तो आपल्या घरीं येऊन पोंचला. दान आणि भोग याच्या योगानें द्रव्याचें सार्थक करीत होत्साता, निपुत्रिकपणाचें दुःख व खेद यांचा कसातरी विसर पाडून, सुखानें राहता झाला." अशी कथा सांगून राजा **हेमप्रभ** ह्मणाला, "प्रिये, यथार्थ नांव धारण करणारा, मोठा सत्वशील जो **महीपति** त्याची ही कथा मी तुला सांगितली. आणि त्या सत्वशीलाच्या कथेचीच आठवण होऊन, मला आतांशीं पुत्र नाहीं याची फार चिंता लागली आहे."

याप्रमाणें विद्याधरांचा राजा **हेमप्रभ** याणें सांगितलेलें ऐकून राणी **अलंकारप्रभा** ह्मणाली, "आर्यपुत्र, आपण ह्मटलें तें खरें आहे. सत्वशील पुरुषांचें दैव त्यांना साहाय्य करीत असतें. मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगीं **महीपतीला** तो दुसरा ठेवा कोठून व कसा दिला तो पहा! नाहीं तर त्याची फजिती झाली असती. तेव्हां संकटकालीं त्या सत्वशीलाचें दैवानें जसें साहाय्य केलें तसें तें आपलेंही करील. आपण आपल्या प्रभावानें इच्छित हेतूस प्राप्त व्हाल. याविषयीं उदाहरणा-

करतां मी **विक्रमतुंग** राजाची कथा आपल्याला सांगतें, ती ऐकावी. या पृथ्वीला केवळ अलंकारभूत असें **पाटलिपुत्र** नामक नगर आहे. ज्या शहरांत वस्ती भरगच्च असून ब्राह्मणादि निरनिराळ्या वर्णांची नीट व्यवस्थेनें घरें असल्यामुळें, उत्तम रत्नांचें कोंदण केलेल्या दागिन्यासारखी ती नगरी फार व्यवस्थित दिसते. तेथें पूर्वी **विक्रमतुंग** नांवाचा मोठा सत्वशील राजा होऊन गेला. जो याचकांला दान देण्यांत व शत्रूशीं लढाई करण्यांत कधींहीं पराङ्मुख झाला नाहीं. एकेदिवशीं तो मृगयेकरतां एका गहन अरण्यांत संचार करीत होता. तेथें फिरतां फिरतां एका ठिकाणीं, बेलाच्या पानांचा होम करीत बसलेला एक ब्राह्मण त्याणें पाहिला. त्याला "तूं हें काय करतोस?" ह्मणून विचारावें असें राजाच्या मनांत होतें; तरी यावेळीं त्याचें लक्ष्य शिकारीकडे वेधलें होतें, ह्मणून ब्राह्मणाची चौकशी न करतां तो तसाच पुढें गेला. नंतर—वर उड्या मारणारे, पळणारे, अंगावर धावून येणारे असे हरीण वाघ, सिंह, रानडुकर इत्यादिकांचीं मस्तकें हेच कोणी एक चेंडू त्यांनीं फारवेळ क्रीडा करून राजा मागें परतला. गेलेल्या वाटेनेंच परत आल्यामुळें तो ब्राह्मण पुन्हां त्याच्या दृष्टीस पडला. पूर्वींप्रमाणें यावेळींही त्याचा होम चाललाच होता. राजाला बरेच श्रम झाले होते. व तो ब्राह्मण हें काय चमत्कारिक कर्म करीत आहे, तें समजून घेण्याची जिज्ञासाही उत्पन्न झाली होती. ह्मणून बरोबरच्या लोकांना एकीकडे उभे राहण्यास सांगून, एकटाच आपण त्या ब्राह्मणाच्या होमकुंडाजवळ गेला. नम्रतापूर्वक त्याला नमस्कार करून, "महाराज, आपण हें कोणतें कर्म करीत आहां? याचें नांव काय? व यापासून कोणती फलप्राप्ती होणार? तें कृपा करून सांगा?" ह्मणून त्याणें प्रश्न केला. तेव्हां राजाला आशीर्वाद देऊन तो ब्राह्मण ह्मणाला, "राजन्, मी ब्राह्मण आहें. माझें नांव **नागशर्मा**. मी हा बिल्वहोम करीत आहें. यापासून कोणतें फल प्राप्त

होणार तें अवश्य आहे, तरी तुला सांगतों ऐक. असें पहा ! या बिल्व-होमानें जेव्हां अग्नी प्रसन्न होईल; तेव्हां मी जितकीं बिल्वपत्रें हवन केलीं आहेत, तितकीं सारीं सोन्याचीं होऊन या कुंडांतून बाहेर येतील ! हें याचें फल आहे. नंतर **अग्नी** स्वतः प्रकट होऊन मला इच्छित वर देईल. यापरतें आणखी दुसरें फल तें कोणतें मिळावें ? या बिल्वपत्रांचा होम करीत असतां आज मला पुष्कळ दिवस झाले. माझ्या पदरीं पुण्य अल्प असल्यामुळें भगवान् **अग्नी** अद्याप मला प्रसन्न झाला नाहीं. पहावें आतां तो कधीं अनुग्रह करील तो !"

हें ऐकून राजाला आपणही बिल्वपत्रांचा होम करावा असें वाटलें. तो मोठा धैर्यशाली व दृढनिश्चयी होता. तो ह्मणाला, "असें असेल तर महाराज, त्यांतलें मलाही एक बेलाचें पान द्या. मी हवन करून पाहतों. आतांच **अग्नी** माझ्यावर प्रसन्न होतो आहे कीं नाहीं पहा."

हें त्या राजाचें बोलणें **नागशर्म्या**ला थट्टास्पद वाटलें. तो ह्मणाला, "अरे राजा, तूं कांहीं वेडा तर नाहींस ना? कांहीं नियम घेतलेला नाहींस, स्नान नाहीं, संध्या नाहीं. नुकताच हजारों प्राण्यांला मारून आला आहेस. अशा अपवित्राला तुला **अग्नी** कसारे प्रसन्न होईल ? मी याप्रमाणें नेम धरून बसलों आहें, व अत्यंत पवित्र आहें; तरी वर्षांच्यावर्षें होम करून जो प्रसन्न होत नाहीं, तो एका क्षणांत तुझ्यासारख्या अपवित्रावर कसा प्रसन्न होईल?"

यावर राजा ह्मणाला, "तुह्माला त्याची काय पंचाईत. तुह्मी एक बेलाचें पान माझ्याजवळ द्या ह्मणजे झालें. एका क्षणांत मी तुह्माला काय आश्चर्य दाखवितों तें पहा."

**नागशर्म्या**ला राजाचा तो अगदीं मूर्खपणा वाटला. पण 'कां होईना; आपलें काय गेलें? काय होतें आहे तें पाहूंया तर खरें !' असा विचार करून, कौतुकानें त्यानें एक बिल्वपत्र **विक्रमतुंग** राजाच्या हातावर ठेवलें. तें घेऊन एकाग्र अंतःकरणानें **अग्नी**चें ध्यान करून

राजा दृढ निश्चयानें **अग्नी**ला उद्देशून मनांत ह्मणाला, "भगवन् **अग्ने**, ह्या बिल्वपत्राचा मी होम करीत आहें. याच्यायोगानें जर तूं प्रसन्न न होशील, तर मी आपलें मस्तक तुझ्या ठिकाणीं हवन करीन!" अशी मनांतल्या मनांत प्रार्थना करून दृढ निश्चयानें त्यानें तें बिल्वपत्र अ- ग्नींत हवन केलें. तेव्हां तत्काल भगवान् **यज्ञनारायण** त्या कुंडांतून प्रत्यक्ष प्रकट झाला. त्या राजाच्या दृढ सत्वरूपी वृक्षाचें फलच कीं काय; असें सुवर्णमय बिल्वपत्र हातांत घेऊन **अग्नी विक्रमतुंग** राजाला ह्मणाला, "भूपते, ह्या तुझ्या दृढ सत्वाला पाहून मी संतुष्ट झालों आहें. तर तुला पाहिजे तो वर मागून घे."

स्वतः राजाला **अग्नी**पासून कांहीं मागून घ्यायचें नव्हतें. त्याचें अंतःकरण मोठें उदार होतें. तो **अग्नी**ला नमस्कार करून ह्मणाला, "मला दुसरा कोणता वर पाहिजे? ह्या ब्राह्मणाचे मनोरथ पुरवा ह्मणजे झालें." राजाचें हें उदार वचन ऐकून **अग्नी** फारच प्रसन्न झाला. तो ह्मणाला, "राजा, हा ब्राह्मण मोठा द्रव्यवान् होईल. व तुझेंही भांडार कधीं कमी न होतां उत्तरोत्तर वृद्धी पावत जाईल. आणि सर्व प्रकारें तुझें कल्याण होईल." याप्रमाणें वरदान देऊन **अग्नी** गुप्त होणार; इतक्यांत तो चमत्कार पाहून थक्क झालेला ब्राह्मण **नागशर्मा** **अग्नी**ची प्रार्थना करून ह्मणाला, "भगवन्, हा राजा स्वैच्छ वागणारा; नेमनिष्ठा कसली ती याला माहित देखील नाहीं. त्याणें एक बिल्वपत्र तुला अर्पण केलें, त्याबरोबर तूं प्रसन्न झालास, आणि मी कडकडीत नियम धरून आज इतके दिवस तुझी आराधना करीत आहें; असें असून तूं माझ्यावर अनुग्रह केला नाहींस याचें कारण काय? तेवढें कृपा करून सांग" **अग्नी** ब्राह्मणावरही प्रसन्न झालाच होता. तो हंसत हंसत ह्मणाला, "अरे ब्राह्मणा, या राजाचें सत्व तुला ठाऊक नाहीं? हा मोठा दृढनिश्चयी आहे. यानें प्रार्थना केल्याप्रमाणें जर मी याला दर्शन दिलें नसतें तर तत्काल आपलें मस्तक हवन करण्यास यानें

अगदीं वेळ लावला नसता. अर्थात् तसें होणें इष्ट नव्हतें. ज्याचें सत्व तीव्र असेल, त्याला सर्व सिद्धी लवकर प्राप्त होतात, आणि तुझ्या-सारखे जे मंदसत्व असतील त्यांला सिद्धी मिळण्यास विलंब लागतो." असें सांगून **अग्नी** तेथेंच अदृश्य झाला. नंतर राजाच्या धैर्याची स्तुती करीत होत्साता तो ब्राह्मण **नागशर्मा** त्याचा निरोप घेऊन आपल्या गांवीं गेला. व **अग्नी**च्या कृपेनें वाढतां वाढतां तो मोठा ऐश्व-र्यवान् झाला.

इकडे राजा **विक्रमतुंग**ही बरोबरच्या लोकांनीं ज्याच्या सत्वाची तारीफ केली आहे; असा मोठ्या आनंदानें आपली राजधानी **पाट-लिपुत्र**नगर येथें जाता झाला. त्या राजाचें सत्व फारच वर्णनीय होतें. एके दिवशीं तो कचेरींत बसला असतां **शत्रुंजय** नांवाचा चोपदार हळूच त्याच्या कानांजवळ येऊन म्हणाला, "महाराज, एक ब्राह्मणाचा तरुण मुलगा बाहेर आला आहे, त्याचें नाव **दत्तशर्मा**. तो एकांतीं आपल्याला कांहीं विनंती करणार असें म्हणतो. यावर सरकारचा हुकूम होईल तो." यावर राजानें—'आपण आपल्या महा-लांत जातों. तेथें त्याला घेऊन ये' असा हुकूम केला. व तत्काल राजा आपल्या महालांत निघून गेला. त्याच्या पाठोपाठ **शत्रुंजय**ही त्या ब्राह्मणाला घेऊन गेला. राजानें त्याला नमस्कार केला. आसन दिलें. व "तुमचें काय म्हणणें आहे?" म्हणून विचारलें. तेव्हां तो म्ह-णाला, "महाराज, मला किमया साधली आहे मी एक चूर्ण बन-विलें आहे त्याच्यायोगानें तत्काल तांब्याचें सोनें करतों. माझ्या गुरूनें मला ही युक्ती सांगितली, व नंतर मी तिचा प्रत्यक्ष अनुभवही पाहिला. त्या चूर्णाच्यायोगानें हवें तेवढें उत्तम सोनें होतें."

याप्रमाणें त्या ब्राह्मणानें सांगितल्यावरून राजानें एक तांब्याचा गोळा आणवून त्याचा रस करायला लावला. रस तयार झाल्यावर त्या बटूनें चिमटभर भरभरून तें चूर्ण त्या रसावर टाकलें; पण अदृश्यरूपानें

एक यक्ष मधल्यामध्येंच तें चूर्ण हरण करीत गेल्यामुळें तांब्याचें सोनें झालें नाहीं. तें चूर्ण यक्ष मधल्यामध्यें हरण करतो हें अग्नीच्या कृपेनें राजाला मात्र दृष्टीस पडलें; पण तें त्या बटूला कांहीं समजलें नाहीं. चूर्णाचा संपर्कच झाला नाहीं, तेव्हां अर्थात् तांब्याचें सोनें होणार कसें? एकावर एक असें तीन वेळ त्या बटूनें चूर्ण टाकलें तरी त्याचा श्रम व्यर्थ गेला, ह्मणून तो फार खिन्न झाला. तेव्हां "भटजीबुवा, जरा तें माझ्या हातांत द्या." म्हणून राजानें चूर्णाची एक चिमटी भरून घेऊन त्या तांब्याच्या रसावर टाकली. राजा मोठा तेजस्वी असल्यामुळें त्यानें टाकलेलें चूर्ण यक्षाच्यानें हरण करवलें नाहीं. तो हंसून एकीकडे सरला. अर्थात् चूर्णाचा आणि तांब्याचा संयोग होऊन त्याचें उत्तम सोनें बनलें. हा चमत्कार पाहून विस्मित झालेल्या त्या बटूनें विचारल्यावरून, राजानें, "तूं टाकलेलें चूर्ण यक्ष नेत होता" हें सर्व त्याला सांगितलें. नंतर चूर्ण तयार करण्याची युक्ति त्या बटूपासून समजून घेऊन; राजानें त्याला पुष्कळ द्रव्य दिलें. त्याचा विवाह करविला; घरदारवगैरे देऊन, सर्वप्रकारें त्याला कृतार्थ केला. त्या बटूनें जी चूर्ण करण्याची युक्ति राजाला सांगितली होती, तीप्रमाणें चूर्ण तयार करून त्याणें अपरंपार सोनें केलें. त्या ऐश्वर्यावर स्त्रिया, पुत्र, आप्त, इष्टमित्र इत्यादिकांसह अत्युत्तम भोग भोगीत होत्साता, पुष्कळ दीन अनाथ इत्यादिकांला तो सुखी करता झाला."

अशी कथा सांगून राणी **अलंकारप्रभा** म्हणाली, "या प्रमाणें जे तीव्रसत्व पुरुष असतात, त्यांला भिऊन म्हणा किंवा संतुष्ट होऊन म्हणा **ईश्वर** त्यांचा इष्ट हेतू लवकर पूर्ण करितो. आर्यपुत्र! तुमच्यापेक्षां धीर व सत्वशाली पुरुष दुसरा कोण आहे? दाता तरी तुमच्याहून मोठा दुसरा कोण आहे? तेव्हां आपण असे दुःखित कां होतां? भगवान् **शंकर** आपल्याला पुत्र देईल. त्याचेंच आराधन एकचित्तानें करा ह्मणजे झालें. वृथा शोक करीत बसूं नका." याप्रमाणें

राणी **अलंकारप्रभा** हिच्या मुखांतून निघालेलें गोड भाषण ऐकून विद्याधरांचा राजा **हेमप्रभ** फार संतुष्ट झाला. व त्याणें तिच्या बोलण्यावर पूर्ण विश्वासही ठेवला, आणि **शंकरा**च्या आराधनानें आपल्याला खचित पुत्रप्राप्ति होईल असें त्यानें मानलें. कारण यावेळीं त्याच्या हृदयांत विलक्षण उत्साह प्राप्त झाला होता, त्यावरूनच पुढील कार्याची सिद्धि होईल असें त्याला वाटलें.

नंतर दुसरेदिवशीं राणीसहवर्तमान यथाविधि स्नान करून राजा **हेमप्रभ** भक्तिपूर्वक **शंकराचें** आराधन करिता झाला. नित्याप्रमाणें ब्राह्मणांला नऊ कोटी द्रव्य दान करून भगवान् प्रसन्न होईपर्यंत आहार करायचा नाहीं, असा नियम करून तो **शंकरापुढें** तप करायला बसला. देहाचा त्याग करीन, किंवा **शंकराला** प्रसन्न करून घेईन, यावांचून कधींही राहणार नाहीं, असा त्याणें दृढ निश्चयच केला होता. तप करायला बसलेला राजा **शंकराची** स्तुती करूं लागला. तो ह्मणाला, "भगवन्, शरण आलेल्या **उपमन्यूला** दुग्धसमुद्र सबंद अर्पण केलास, अशा तुला नमस्कार असो! जगाची उत्पत्ति, स्थिति आणि संहार करण्याऱ्या तुला नमस्कार असो! हे **गौरीपते**! आकाशादि अष्टमूर्ति धारण करणाऱ्या तुला नमस्कार असो! नेहमीं प्रसन्न असणारें व अत्यंत शुद्ध असें जें सत्पुरुषाचें मानस ( **मानससरोवर** ) त्यांत राहणाऱ्या हंसा तुला नमस्कार असो! हे **शंभो** दिव्यप्रकाशा, निर्मला तुला नमस्कार असो! हे जलात्मन्, ज्याचे दोष क्षीण झाले आहेत अशाला दर्शन देणाऱ्या, **पार्वती**सहवर्तमान राहणाऱ्या, अद्भुतरूपा, भगवन् तुला नमस्कार असो! अर्ध देहानें **गिरिजेला** धारण करणारा असा असूनही जो केवळ ब्रह्मचारी, इच्छामात्रानें विश्व उत्पन्न करणारा, विश्वमय अशा भगवंता! तुला नमस्कार असो!"

याप्रमाणें शुद्ध अंतःकरणानें भक्तिपूर्वक स्तुती करणाऱ्या राजा **हेमप्रभाच्या** आराधनानें भगवान् **शंकर** लौकरच प्रसन्न झाला. राजानें

तीन दिवस कडकडीत उपोषण करून **शंकराची** सेवा केली होती. तिसऱ्या दिवशीं पहाटेस प्रत्यक्ष दर्शन देऊन भगवान् म्हणाला, "राजा, तूं केलेल्या सेवेनें मी प्रसन्न झालों. वंशवृद्धी करणारा असा पुत्र मी तुला दिला आहे. **गौरीच्या** प्रसादानें तुला एक उत्तम कन्याही होईल. **नरवाहनदत्त** नामक जो तुम्हां विद्याधरांचा पुढें चक्रवर्ती होणार आहे, त्याची, ती तुझी कन्या, स्त्री होईल." याप्रमाणें दृष्टांत देऊन भगवान् **शंकर** अदृश्य झाला. इकडे तो विद्याधर **हेमप्रभ** लवकरच जागा झाला. आणि पहातो तों रात्रही सरली. तत्काळ त्याणें आपली राणी **अलंकारप्रभा** हिला, **शंकरानें** काय दृष्टांत दिला तो सांगितला. **हेमप्रभाला** दृष्टांत झाला त्याच वेळीं राणी **अलंकारप्रभा** हिलाही **गौरीचा** तशाच अर्थाचा दृष्टांत झाला होता. उभयतांच्या स्वप्नांचा परस्पर मेळ झालेला पाहून त्यांना फार आनंद झाला.

नंतर तेथून उठून स्नान वगैरे नित्य नेम करून, राजानें **शंकराची** यथाविधि पूजा केली. नित्यनियमाप्रमाणें ब्राह्मणांला दानें वगैरे देऊन, घेतलेल्या व्रताचें पारणें केलें. व त्याच दिवशीं त्यानें मोठा उत्सव केला. आनंदाला कारण जो पुत्र तो अद्यापि झाला नव्हता; तथापि प्रत्यक्ष **शिवपार्वतींनीं** वर दिला आहे; तेव्हां कन्या व पुत्र झालेच, असें त्याला वाटलें. कांहीं दिवस गेल्यावर राणी **अलंकारप्रभा** गर्भिणी झाली. मद्याचा सुंदर वास ज्याला येत आहे, व गर्भधारणामुळें जें किंचित् पांढरें दिसतें आहे, नेत्ररूपी चंचल भ्रमरांनीं ज्याला रमणीयता आली आहे, अशा आपल्या मुखकमलानें ती राजाला फारच आनंदविती झाली. 'डोहाळ्यांवरून पोरांचीं चिन्हें समजतात.' ही म्हण आबालवृद्धांला माहितच आहे. राणी **अलंकारप्रभा** हिला जे डोहाळे झाले ते असे होते कीं; त्यांवरून पुढें जन्मास येणारें मूल मोठें नांवलौकिकाचें होईल असें वाटत होतें. नंतर नवमास पूर्ण झाल्यावर उत्तम मुहूर्तावर, पूर्व दिशा जशी तेजस्वी सूर्याला प्रसवते; तशी राणी

पुत्राला प्रसवली. तो मुलगा जन्मास आला, तेव्हां त्याच्या साहजिक तेजानें प्रकाशित झालेलें बाळंतघर जिकडे तिकडे लख्ख दिसूं लागले. त्याच्या शरीराची कांति शेंदरासारखी आरक्त दिसूं लागली. तीवरून त्याचा बाप **हेमप्रभ** याणें तो मुलगा शत्रुवंशाला भय उत्पन्न करणारा होईल, असें अनुमान केलें. व त्याप्रमाणें आकाशवाणीही झाली. **हेमप्रभानें** त्याचा मोठा उत्सव करून बाराव्या दिवशीं **वज्रप्रभ** असें त्याचें नांव ठेविलें. तदनंतर तो मुलगा शुक्ल प्रतिपदेच्या **चंद्रा**प्रमाणें, हळू हळू कलांनीं परिपूर्ण होतसाता, जणूं काय आपल्या कुलरूप समुद्राची वृद्धी करण्याकरितां सर्व प्रकारच्या तेजानें परिपूर्ण होत गेला.

या नंतर लवकरच राणी पुन्हां गरोदर झाली. त्यावेळीं साहजिकच तिचें तेज कांहीं विशेष प्रकारचें दिसूं लागलें. स्त्रीला केवळ घरांतलेंच रत्न म्हणतात; पण सुवर्णाच्या आसनावर बसलेली ती आपल्या साऱ्या राज्यांत रत्नासारखी शोभूं लागली. **हेमप्रभ** हा विद्याधरच होता. इच्छामात्रानें पाहिजे तेथें जाणें; पाहिजे ती वस्तू उत्पन्न करणें; ह्या सर्व विद्या त्याला अनुकूल होत्या. **अलंकारप्रभेला** कमलमय विमानांत बसून आकाशांत संचार करावा, असे डोहाळे झाले. तेव्हां तसें विमान तयार करवून राजानें तिचा हेतू पूर्ण केला. याप्रमाणें मोठ्या आनंदांत तिचे गर्भारपणाचे दिवस केव्हांच निघून गेले. नंतर योग्यकाळीं ती प्रसूत होऊन **शंकरानें** सांगितल्याप्रमाणें कन्या झाली. प्रत्यक्ष **गौरी**च्याच प्रसादानें झालेली ती. तिचें वर्णन कोठवर करावें? ती मुलगी जन्मास आली त्यावेळीं 'विद्याधरांचा चक्रवर्ती **नरवाहनदत्त** याची ही स्त्री होणार,' अशी **शंकराच्या** वरदानाला मिळणारी आकाशवाणी झाली. वस्तुतः पुत्रजन्माचाच उत्सव मोठा होता; पण राजानें पुत्रजन्माच्यावेळीं जसा समारंभ केला होता; तसाच यावेळींही केला. पित्यानें त्या मुलीचें **रत्नप्रभा** असें नांव ठेविलें. स्वतः बापानें जिला विद्या आणि कला शिकविल्या आहेत, अशी ती

मुलगी दिवसेंदिवस वाढतच गेली. **रत्नप्रभा** हें तिचें नांव केवळ आई-बापांनीं लाडिकपणानें ठेविलें होतें असें नाहीं; तर खरोखर तिची कांति रत्नासारखीच होती.

आपला पुत्र **वज्रप्रभ** प्रौढ झाला, असें पाहून राजानें त्याचा अनुरूप कन्येशीं विवाह केला. नंतर प्रजेचा अनुराग विशेष आहे, असें पाहून त्याला यौवराज्याचा अभिषेक केला. आजपर्यंत राजा **हेमप्रभ** याला एकट्यालाच राज्याचा भार वाहवा लागत होता. **वज्रप्रभ** युवराज झाल्यावरून राजानें बहुतेक सर्व कारभार हळूहळू त्याच्यावर सोंपविला, व तो स्वस्थतेच्या सुखाचा उपभोग घेऊं लागला. आतां त्याला मुख्यत्वें **रत्नप्रभेच्या** लग्नाचीच काय ती चिंता होती. याशिवाय दुसरी कशाचीही काळजी नव्हती.

एकेदिवशीं तो जवळ बसलेल्या **रत्नप्रभेला** पाहून आपली राणी **अलंकारप्रभा** हिला ह्मणाला, "ही आपली लाडकी. आतां हिच्यावर हळू हळू ममता कमी केली पाहिजे. दुसऱ्याच्या घरीं जाण्याचे हिचे दिवस जवळ आले. तेव्हां तसें न केलें तर एकाएकीं हिचा वियोग फार असह्य वाटेल. देवि, ह्या त्रैलोक्यांत कोठें पाहिलें तरी, मुलगी ह्मटली ह्मणजे ती आपली दुःखाला साधन असायचीच. मग ती कुलाला अलंकारभूत असो; उत्तम रूपवती असो; गुणवती असो; अथवा वाईट असो, व तिचे आईबाप मोठे असोत किंवा गरीब असोत, त्यांला तिची काळजी लागल्यावांचून रहायची नाहीं. खरोखर मला ही स्थिती फार वाईट वाटते. धिक्कार असो या स्थितीला! ही आपली मुलगी सुशिक्षित केली आहे. हिला उपयुक्त सर्व विद्या व कला शिकविल्या आहेत. ही रूपवती आहे, व तरुणही आहे. असें असून या **रत्नप्रभेला** योग्य वर मिळत नाहीं म्हणून मला जें दुःख होत आहे तें कोठवर वर्णन करूं!"

हें ऐकून राणी ह्मणाली, "हें तर खरेंच आहे. मुलीची आईबापांला नेहमीं काळजी वहावी लागतेच. मुलग्याची तितकी वहावी

लागत नाहीं. पण मुलापेक्षां ती आइबापांचा उद्धारही तसाच करते. मुलीच्या व तिच्या संततीच्या पुण्यानें आजपर्यंत पुष्कळांचा उद्धार झाला असल्याचें आपण कथापुराणांत ऐकलें आहे. काळजी काळजी ती काय? लग्न होईपर्यंतच. एकदां नवऱ्याच्या घरीं नांदूं लागली ह्मणजे झालें. मग कसली काळजी करायची?" असें बोलून **रत्नप्रभे**ला मांडीवर घेऊन तिनें तिला कुरवाळली व चुंबन घेऊन ह्मटलें, "या माझ्या बाळेविषयीं आपण कांहीं एक काळजी करायला नको. हिला पाहिजे तसला वर आपोआप घरीं चालून येईल. देवांनीं ही **नरवाहनदत्ता**ची बायको होणार असें पूर्वींच सांगितलें आहे. आणि तोच पुढें आमचा चक्रवर्ती होणार आहे असेंही सांगतात. तेव्हां त्यालाच ही कां देत नाहीं?"

राणीचें हें भाषण ऐकून **हेमप्रभ** पुन्हां ह्मणाला, "तूं ह्मणतेस तें खरें आहे. ज्या मुलीला तो वर प्राप्त होईल ती सर्व स्त्रीजातींत धन्य होईल. तो **नरवाहनदत्त** ह्मणजे प्रत्यक्ष कामाचा अवतार; पण अद्याप त्याला दिव्यत्व प्राप्त झालें नाहीं. पुढें तो आमचा राजा होणार तरी आज मनुष्यच आहे. ह्मणून त्याला विद्याप्राप्ती होऊन दिव्यत्व येण्याची मी वाट पहात आहें. बाकी माझ्या मनांतही त्यालाच द्यायची असा तर केव्हांच निश्चय झाला आहे."

राजा **हेमप्रभ** याप्रमाणें भाषण करीत असतां जणूं काय **मदना**च्या मोहनी घालण्याच्या मंत्रांतले शब्दच अशी, **नरवाहनदत्ता**च्या स्तुतीचीं वाक्यें बापाच्या तोंडचीं ऐकून, तत्काल **रत्नप्रभा** भ्रांत झाल्या सारखी, भुतानें पछाडल्यासारखी, निजल्या सारखी, किंवा चित्रा सारखी शून्य झाली. **नरवाहनदत्ता**नें तिचें चित्त हरण केलें. आपली ती स्थिती आईबापांच्या लक्ष्यांत येऊं नये ह्मणून ती तत्काल त्यांला नमस्कार करून मोठ्या संकटानें तेथून उठून आपल्या अंतःपुरांत गेली. तिला **नरवाहनदत्ता**ची प्राप्ती कशी होईल याची चिंता लागल्यावरून

त्या रात्रीं पुष्कळ वेळ झोंप लागली नाहीं. पहाटेच्या वेळीं—"मुली, उद्यांचा दिवस चांगला आहे; तर **वत्सराजाचा** पुत्र जो तुझा पति होणार, त्याला तूं स्वतः **कौशांबी** नगरींत जाऊन पाहून ये. नंतर तुझा पिता त्याला आपल्या नगरींत आणून स्वयमेव तुझा त्याच्याशीं विवाह करून देईल. मुली, सर्वप्रकारें तुझें कल्याण होईल. तूं कांहीं काळजी करूं नको," असें स्वप्नांत **देवीनें** येऊन सांगितलें. प्रातःकाळ होतांच नित्यनेम आटपून ती आईला भेटायला गेली. रात्रीं **पार्वतीनें** दयाळू होऊन आपल्याला जो दृष्टांत दिला, तो तिणें आईला सांगितला. **अलंकारप्रभेनें** त्या दृष्टांताबद्दल मोठा आनंद मानून 'देवीच्या आज्ञेप्रमाणें स्वतः तूंच जाऊन आपल्या पतीला पाहून ये' ह्मणून तिला सांगितलें.

**रत्नप्रभेला** तें इष्टच होतें. तिणें आईची आज्ञा घेऊन विद्येच्या प्रभावानें, आपली नगरी अर्थात् **कौशांबी** येथें बागेंत क्रीडा करीत असलेल्या पतीला पाहण्याचा निश्चय करून तेथून प्रयाण केलें. आणि लवकरच त्याच्या जवळ येऊन पोंचली. अशी कथा सांगून **रत्नप्रभा** म्हणाली, "आर्यपुत्र, हा वेळपर्यंत जिचें चारित्र आपण ऐकलें ती **रत्नप्रभा** मीच. तुमच्या दर्शनाविषयीं उत्कंठित होऊन येथें आलें आहें, असें समजा. यापुढें काय करायचें तें आपल्याला मी सांगायला नको."

ज्यानें आपल्या माधुर्यापुढें अमृताचाही तिरस्कार केला आहे, असें हें तिचें भाषण ऐकून व पियूषधारेप्रमाणें नेत्रांला आनंद देणारें तिचें तें सुंदर शरीर अवलोकन करून **नरवाहनदत्त ब्रम्हदेवाला** आपल्या मनांत निंदूं लागला. हाय! हाय! विश्वकर्त्यानें माझ्या सर्व आंगभर कान आणि डोळे कां केले नाहींत कोणास ठाऊक? तसें झालें असतें; तर सर्व शरीर धालें असतें. असें त्याला वाटलें! अंमळ स्तब्ध राहून तो त्या विद्याधरकन्येला ह्मणाला, 'हे सुंदरी, मी आज धन्य आहें. माझें जन्म आज सफल झालें. तुझ्यासारखी सर्वगुणसंपन्न स्त्री स्वयमेव स्नेहानें मला वरायला आली; याहून माझ्या भाग्याचा

उत्कर्ष तो दुसरा कोणता?" अगदीं नवथरच ज्यांचें प्रेम एकमेकांवर जडलें आहे; अशा त्या उभयतां स्त्रीपुरुषांचा मोठा खुबीदार व सुरस संवाद चालला आहे; इतक्यांत आकाशांतून येत असलेल्या विद्याधरांच्या सैन्याची गडबड त्यांला विघ्न करणारी झाली. **रत्नप्रभेनें** वर पाहून 'हा पहा माझा बाबा इकडे आला,' असें ह्मटलें. व त्याबरोबरच विद्याधरांचा राजा **हेमप्रभ** अकस्मात् आकाशांतून पुत्रासह एकदम तेथें उतरला. ईश्वरी माया मोठी विलक्षण. तिचा महिमा वर्णन करणें अशक्य आहे. राजा **हेमप्रभाच्या** आणि **नरवाहनदत्ताच्या** नात्याच्या संबंधाला अद्याप ठिकाणच नव्हता; तथापि **हेमप्रभाला** **नरवाहनदत्त** जांवई, व **नरवाहनदत्ताला हेमप्रभ** आपला सासरा, असें वाटून त्यांणीं परस्परांशीं तसेंच वर्तन केलें. **नरवाहनदत्तानें** त्याचें आगतस्वागत करून योग्य सन्मान केला.

हें वर्तमान तिकडे **वत्सराजाला** समजलें. तेव्हां **वासवदत्तेसहवर्तमान** तोही तेथें आला. जांवई आणि श्वशुर यांचा परस्पर आदर मान चालला आहे इतक्यांत प्रधानादिकांसहवर्तमान राजाची स्वारी तेथें येऊन पोंचली. त्यांच्याही परस्पर भेटी झाल्या. व जशी **रत्नप्रभेनें** आपली हकीकत **नरवाहनदत्ताला** सांगितली होती, तशीच **हेमप्रभानें वत्सराजाला** निवेदन केली. आणि तो ह्मणाला, "राजा, मी, आपल्या विद्येच्या प्रभावानें, माझी मुलगी येथें आली आहे, असें जाणलें. व येथें काय वृत्तांत झाला, तोही मला समजला. आतां माझी आपल्याला इतकीच विनंती आहे कीं, आपला व आमचा हा शरीरसंबंध प्रत्यक्ष देवांनीं योजला आहे; तेव्हां तो अवश्य होणारच. तथापि वधूच्या बापानें जसें वर्तावयाचें तसें मला वागलें पाहिजे. आपण मला कृपा करून पदरांत घ्या. **पार्वतीच्या** आज्ञेवरून हा विवाहसमारंभ आतांच झाला पाहिजे. मी आपल्या विद्येनें आतांच्या आतां एक विमान उत्पन्न करतों; तें, पुढें आमचा चक्रवर्ती होणाऱ्या ह्या

माझ्या जांवयाचें नेहमीचें वाहन होईल. आतां विवाहाकरतां आपण आपल्या चिरंजिवाला आमच्या नगरींत येण्याचा अनुग्रह करण्याविषयीं परवानगी द्यावी. आपल्याला त्याचा वियोग सहन व्हायचा नाहीं हें मी जाणतों व ह्मणूनच मी याला फार दिवस तेथें ठेवून घेत नाहीं. सून **रत्नप्रभा** हिच्या सहवर्तमान युवराज परत लवकरच आलेले आपल्या दृष्टीस पडतील."

याप्रमाणें विद्याधरांचा राजा **हेमप्रभ** याणें विनंती केली; ती ऐकून **वत्सराजाला** अतिशय आनंद झाला असेल, हें सांगायलाच नको. **रत्नप्रभेसारखी** सून मिळणार असून त्याबद्दल **हेमप्रभासारखा** व्याही, प्रेमपूर्वक विनंती करीत असतां **वत्सराज** तिचा अव्हेर कां करील? त्याणें **हेमप्रभ** व त्याचा पुत्र **वज्रप्रभ** यांचा यथायोग्य आदर सत्कार करून, युवराज **नरवाहनदत्त** याला त्यांच्या नगरीला जाण्याविषयीं आज्ञा दिली. तेव्हां जांवयाकरितां **हेमप्रभानें** आपल्या विद्येनें तत्काल विमान निर्माण केलें. लज्जेनें जिनें मान खालीं घातली आहे; अशा **रत्नप्रभेसह नरवाहनदत्ताला** प्रथम त्या विमानांत बसवून त्याच्या मागून **गोमुख** इत्यादिक त्याच्या प्रधानांला बसविलें. **वत्सराजानें** जाणारी सर्व मंडळी तरुण आहे, आणि विद्याधरांच्या नगरींत जाणें आहे. तेथला रमणीय देखावा पाहून कदाचित् तिकडेच रमतील. म्हणून त्यांला तेथें यथेच्छ न वागूं देणारा कोणी तरी पोक्त मनुष्य बरोबर द्यावा, म्हणून **यौगंधरायणाला** त्यांच्या बरोबर दिला.

नंतर **वत्सराजाचा** निरोप घेऊन वऱ्हाड्यांसह राजा **हेमप्रभ कांचनशृंगक** नामक आपल्या नगरीला जाऊन पोंचला. **नरवाहनदत्ताला** तें सासऱ्याचें, कांचनमय असल्यामुळें अतिशय चकचाकित दिसणारें नगर पाहून मोठें आश्चर्य वाटलें. रत्नखचित सोन्याच्या भिंतींतून निघणारे अनेक किरणांचे कुंज हेच कोणी एक हात, ते प्रीतिपूर्वक जांवयाला आलीकडे घेण्याकरतां त्या नगरीनें पसरले आहेत कीं काय;

असें वाटूं लागले. असो. याप्रमाणें जांवई व त्याच्या बरोबरची मंडळी घरीं येऊन पोंचतांच **हेमप्रभानें** त्यांची यथायोग्य खाण्यापिण्याची व राहण्याची व्यवस्था करून निश्चित मुहूर्तावर लग्नसमारंभ केला. देव, ब्राह्मण आणि अग्नी यांच्या समक्ष, जशी **क्षीरसमुद्रानें लक्ष्मी विष्णूला** अर्पण केली, तशी **हेमप्रभानें** आपली कन्या **नरवाहनदत्ताला** अर्पण केली. जांवयाला संतोष होण्याकरतां त्याणें रत्नांच्या राशी आंदण दिल्या. दासदासी इत्यादि परिवार किती दिला, याची संख्याच नाहीं. त्या लग्नसमारंभांत राजा **हेमप्रभ** द्रव्याची वृष्टी करूं लागला. तेव्हां घरोघर पताका उभारल्या होत्या; तरी त्यांवर दुसरें आच्छादन घातलें आहे कीं काय; असें वाटूं लागलें. पुष्कळ दिवस तो विवाहसमारंभ चालला होता. प्रतिदिवशीं निरानिराळे दिव्य भोग जांवईबुवाला प्राप्त होत होते. राजा **हेमप्रभाची** एकुलती एक मुलगी, व जांवयाचे सोहाळे पाहण्याचें मोठें कौतुक असें असल्यामुळें, **यौगंधरायणाच्या** मनांत वरात लवकर न्यायची होती, तरी त्याला फार गडबड करणें योग्य वाटलें नाहीं. **नरवाहनदत्त** व त्याच्या बरोबरची मंडळी व मित्र हे आनंदसमुद्रांत पोंहत असल्यामुळें, त्यांना **कौशांबीची** आठवण मुळींच झाली नाहीं. **रत्नप्रभा** आपल्या पतीला प्रतिदिवशीं नवेनवे चमत्कार दाखवीत होती. विद्येच्या सामर्थ्यानें निरानिराळ्या प्रदेशांतील दिव्य तळीं, देवळें, बागा वगैरे ठिकाणीं ती आकाशमार्गानें त्याला घेऊन जात असे.

याप्रमाणें बरेच दिवस सासऱ्याच्या येथें **नरवाहनदत्तानें** चैन उडविली. तेव्हां फार दिवस झाले आतां गेलेंच पाहिजे, असें सांगून **यौगंधरायणानें** हळूच तेथून निघण्याची तयारी करण्यास लावलें. सासूबाईनें ज्याला मंगलस्नान व अलंकार वगैरे घातले आहेत; सासऱ्यानें बरोबरच्या मंडळीसह ज्याचा स्नेहपूर्वक सत्कार केला आहे; असा **नरवाहनदत्त** जाण्यास निघाला. मुलीच्या आणि जांवयाच्या प्रीती-

स्तव राजा व राणी दोघेही त्यांना पोंचविण्याकरितां, आपला पुत्र **वज्रप्रभ** यासह निघाले. सर्व मंडळी विमानांत बसून **कौशांबीनग**-रीच्या जवळ येऊन पोंचली. तेव्हां **वत्सराजाला** पुढें निरोप पाठविला. राजानें आपली नगरी तात्काल जिकडे तिकडे शृंगारून तयार करण्याविषयीं हुकूम केला. आणि पुत्राला घेण्याकरतां स्वतः तो प्रेमानें शहराच्या बाहेर सामोरा आला.

**वासवदत्ता, पद्मावती** इत्यादि राण्यांसहवर्तमान राजा आपली वाट पाहत उभा राहिला आहे असें पाहून **नरवाहनदत्त** तेथेंच विमानांतून खालीं उतरला. नववधूला बरोबर घेऊन त्याणें आपल्या मातापितरांला नमस्कार केला. तेव्हां त्यांणीं त्या विजयी पुत्राला आलिंगन देऊन आशीर्वाद दिला. **हेमप्रभ**, त्याची स्त्री व पुत्र यांचा यथायोग्य सत्कार करून वधूवरांला हत्तीवर बसविलें आणि मोठ्या थाटानें शहरांत वरात नेली. **वत्सराजानें** व **वासवदत्तेनें** व्याही आणि विहीण यांचें फारच गौरव केलें. **मदनमंचुकेचें** लग्नही मोठ्या कडाक्यानें झालें होतें; पण त्यावेळीं वधूपक्षाकडची पुरस्कर्ती पुरुषमंडळी कोणी नसल्यावरून एका अंगानें थोडासा कमीपणा दिसत होता. याशिवाय **कलिंगसेनेवर** लोकापवाद असल्यामुळें, राणीला व कांहीं अंशीं राजालाही तो शरीर-संबंध आपल्या बरोबरीचा आहे असें वाटत नव्हतें. केवळ देवतांची योजना, **मदनमंचुकेचें** रूप व गुण आणि वधूवरांची परस्परांवरची प्रीति यांच्या जोरावरच तो संबंध घडून आला. अर्थात् राजा व राणी यांला आपले सोहाळे व्हावे तसे झाले नाहींत असें वाटत होतें, ते याप्रसंगीं पूर्ण झालें. व्याही व विहीण हे केवळ आपल्या बरोबरीचे इतकेंच नव्हे; तर आपल्यापेक्षांही श्रेष्ठ व प्रीतिपूर्वक, आपल्याला पद-रांत घ्या ह्मणून आलेले, **रत्नप्रभेसारखी** सुंदर मुलगी आणि ऐश्वर्याचा तर कांहीं अंतच नाहीं. असें असल्यावर मग तेथें कोणतें उणें पडणार? तात्पर्य उभयपक्षीं हा विवाहसंबंध फारच आनंदकारक झाला.

राजा **हेमप्रभ** हा कांहींदिवस व्याह्याचा सत्कार घेत होत्साता, जांवई व कन्या यांचें कौतुक पहात आनंदानें **कौशांबी** नगरींत राहिला. जरी त्या प्रेमळ आप्तांचा सहवास सोडून त्याच्यानें जाववत नव्हतें; तरी निरुपायास्तव त्याणें जांवई व व्याही यांचा निरोप घेतला. लाडकी कन्या **रत्नप्रभा** हिला प्रेमाश्रूंनीं वरचेवर अभिषेक करून **अलंकारप्रभेनें,** आईच्या नात्यानें तिला ज्या कांहीं दोन गोष्टी सांगायच्या त्या सांगितल्या आणि तिला **वासवदत्ते**च्या हातांत दिलें. लग्नांतच जें कांहीं सांगायचें तें सांगून झालें होतें; तरी—'आजपर्यंत ही आमची होती. आतां आपली मुलगी आहे असें समजून स्नेहानें हिचें परिपालन करावें;' असें **वासवदत्ते**ला सांगून पतीसह ती घरीं जावयास निघाली. व्याह्याला पोंचवून मंडळी परत आपआपल्या ठिकाणीं गेली. मातापितरांच्या व बंधूच्या वियोगानें जिचें मन खिन्न झालें आहे अशी आपली प्रियपत्नी **रत्नप्रभा** हिच्या मनाला विनोदवीत आणि क्रीडा करीत होत्साता, युवराज **नरवाहनदत्त** मुख्य राणी **मदनमंचुका** व ती नववधू यांसहवर्तमान आनंदांत राहता झाला.

याप्रमाणें, मोठी भाग्यशाली व विद्याधरकुलांत उत्पन्न झालेली नवी स्त्री ज्याला प्राप्त झाली आहे असा युवराज **नरवाहनदत्त,** थोडे दिवस सारावेळ तिच्याच महालांत घालवूं लागला. मुख्य स्त्री **मदनमंचुका** हिच्यावरचें प्रेम कमी झालें होतें असें नाहीं. तथापि **रत्नप्रभे**च्या प्रीतीचा नवा बहर होता. यामुळें तिच्या सहवासांतच त्याचा फार वेळ जाऊं लागला. एकेदिवशीं, तिच्याकरतां स्वतंत्र तयार केलेल्या महालांत युवराज त्या आपल्या प्रियेसह क्रीडा करीत असतां त्याच्या दर्शनाकरितां सकाळींच **गोमुख, हरिशिख** इत्यादि त्याचे प्रधान प्राप्त झाले. ते दरवाजांतून आंत आले आणि आतां महालांत शिरणार, इतक्यांत चोपदारणीनें त्यांला अटकाव केला. 'आपण आल्याची मी आंत खबर देतें. तिकडून परवानगी मिळाल्यावर मग खुशाल आंत जावें,'

असें सांगून त्यांना तेथेंच उभे करून ती युवराजाला कळवायला गेली. त्याणें 'त्यांला येऊं दे' ह्मणून सांगितल्यावरून ती परत बाहेर येऊन त्यांना घेऊन गेली. त्यांचा यथायोग्य आदर सत्कार झाला व सर्व मंडळी आपापल्या आसनावर बसले. नेहमीं येणाऱ्या **गोमुख** इत्यादि प्रधानांला चोपदारणीनें मज्जाव केलें ही गोष्ट **रत्नप्रभेला** चांगली वाटली नाहीं. ती तिला ह्मणाली, "अग **लवंगिके**, आज तुझ्या हातून मोठी चूक झाली. पण हा तुझा पहिलाच अपराध असल्यावरून मी त्याबद्दल तुला शिक्षा करित नाहीं. इतःपर या प्रधानांला येथें येण्याविषयीं कधींच अटकाव करूं नकोस. आर्यपुत्राचे हे केवळ प्रधानच आहेत असें नाहीं; तर मित्र असून त्यांचें दुसरें शरीरच आहेत असें ह्मटलें तरी चालेल. यांच्याशीं कोणत्याही गोष्टींत पडदा ठेवण्याचें कांहीं कारण नाहीं. कदाचित्, तुमच्यायेथें जनानखाना रक्षण करण्याचें काम अशारितीनें करायची चाल असली तर असो बापडो! पण ही तऱ्हा माझ्या मात्र अगदीं कामावर पडायची नाहीं. समजलीस. आजपासून असें करशील तर तुला शिक्षा होईल."

चोपदारणीला असें सांगून आपल्या पतीला म्हणाली, "आर्यपुत्र, सहज प्रसंग आल्यावरून मी आपल्याला सांगतें तें अंमळ ऐकून घ्यावें. कित्येक पुरुष बायकांला मोठ्या बारकाईनें जपत असतात; पण तशा-योगानें त्यांचें रक्षण मुळींच होत नाहीं. सदाचरणाची प्रीति हीच, बायकांला, वाईट मार्गाकडून त्यांचें मन वळवून चांगल्या मार्गानें त्यांस नेणारी आहे. ईर्षेनें किंवा मोहानें कांहीं एक काम होत नाहीं. बाय-कांचें रक्षण करण्याकरतां जाणते जाणते मनुष्य नेमतात, पण खरोखरी त्यांचा जो उत्तम स्वभाव तोच एक जाणता पुरुष आहे. त्याच्या वांचून दुसऱ्या कोणाच्याही हातून त्यांला प्रतिबंध करवणार नाहीं. फार काय सांगूं! स्वभावतःच चपल अशा स्त्रियांला रक्षण करण्यास प्रत्यक्ष **ब्रह्मदेव** देखील समर्थ नाहीं! तुफान झालेली नदी आणि नारी यांना

कोण बरें आवरूं शकेल? याविषयीं मला एक कथा आठवली ती मी आपल्याला सांगतें.

समुद्राच्या मध्यभागीं **रत्नकूट** नांवाचें एक मोठें द्वीप आहे. तेथें मोठा धैर्यशाली व उत्साहवान् असून परम वैष्णव असा एक राजा होता. त्याच्या जवळ अनंत रत्नांचा संग्रह असल्यामुळें **रत्नाधिपति** हें त्यानें यथार्थ नांव धारण केलें होतें. त्याला एक विलक्षण इच्छा उत्पन्न झाली होती. पृथ्वीवर जेवढे म्हणून राजे आहेत त्या सर्वांच्या मुली आपल्या बायका व्हाव्या! व सर्व पृथ्वी आपण जिंकावी! अशी उत्कट इच्छा असल्यावरून ती पूर्ण करण्याकरतां त्याणें उग्र तप करण्यास प्रारंभ केला. भक्तिपूर्वक **विष्णूचें** आराधन करून तो आपला हेतू पूर्ण होण्याविषयीं देवाची प्रार्थना करीत असे. त्याच्या तपानें संतुष्ट होऊन भगवान् प्रत्यक्ष त्याच्या जवळ प्राप्त झाला. आणि—'राजा, ऊठ. मी तुझ्यावर प्रसन्न झालों. आतां मी तुला काय सांगतों आहे तें ऐक. **कलिंग (ओडिसा)** नांवाच्या देशांत एक गंधर्व, ऋषीच्या शापानें हत्तीच्या जन्मास आलेला आहे. त्याचा रंग पांढरा शुभ्र असून **श्वेतरश्मि** या नांवानें तो लोकांत प्रसिद्ध आहे. तुझ्याकरतां मी त्याला स्वप्नांत दर्शन देऊन आज्ञा केली आहे, त्याप्रमाणें तो मोठा हत्ती स्वयमेव आकाशमार्गानें तुझ्या जवळ येऊन तुझें वाहन होऊन राहील. इंद्राच्या ऐरावतासारखा विशाल अशा त्या हत्तीवर बसून तूं आकाशमार्गानें ज्या ज्या राजावर स्वारी करशील तो तो, तुझा प्रभाव अलौकिक आहे असें समजून भयभीत होऊन तुला वश होईल. व ज्या राजावर तूं ज्यावेळीं जाशील त्यावेळीं मी त्याला स्वप्नांत दृष्टांत देऊन कन्यादानरूपी कर तुला देण्यास सांगेन. या रीतीनें तूं सर्व पृथ्वी जिंकशील व तुझ्या अंतःपुरांत ऐंशी हजार सुंदर स्त्रिया राहतील!' याप्रमाणें सांगून भगवान् **विष्णु** गुप्त झाला. नंतर राजानें घेतलेल्या व्रताची सांगता करून त्यादिवशीं पुष्कळ दानधर्म वगैरे केला.

भगवंतानें सांगितल्याप्रमाणें राजा त्या **श्वेतरश्मि** हत्तीची वाट पहात आहे, इतक्यांत दुसऱ्याच दिवशीं तो हत्ती आपण होऊन त्याच्याजवळ प्राप्त झाला. त्याला पाहून राजानें त्या गजराजाची यथाविधी पूजा केली. व शुभ मुहूर्तावर त्याच्यावर स्वारी करून तो दिग्विजयाला निघाला. ज्या ज्या राजावर तो चाल करून जाई, तो तो शरण येऊन आपल्या मुली **रत्नाधिपति** राजाला अर्पण करीत असे. बिचाऱ्या ज्या कोणाला मुली नव्हत्या; त्याणें दुसऱ्याच्या चांगल्या चांगल्या मुली मुद्दाम आणून **रत्नाधिपती**ला तो करभार दिला. याप्रमाणें पृथ्वीभर विजय करीत करीत त्याणें ऐंशी हजार बायका जमविल्या. त्यांच्या सहवर्तमान तो भाग्यशाली राजा त्या **रत्नकूट** नामक द्वीपांत यथेच्छ विहार करूं लागला.

**श्वेतरश्मी** हें एक आपल्याला अपूर्व निधान सांपडलें आहे असें राजाला वाटत होतें. कारण त्याला मुख्य आधार काय तो त्या हत्तीचाच होता. तेव्हां त्याला कोणत्याही प्रकारची बाधा होऊं नये व त्याच्या आयुष्याची वृद्धी व्हावी याकरतां राजा **रत्नाधिपति** प्रतिदिवशीं केवळ त्या हत्तीच्या प्रीत्यर्थ पांचशें ब्राह्मणांला भोजन देत होता. नित्याप्रमाणें एकेदिवशीं तो त्या हत्तीवर बसून आसपासच्या दुसऱ्या द्वीपांत संचार करून परत आपल्या द्वीपांत येऊन पोंचला. तेथें आल्यावर राजा हत्तीवरून उतरत आहे, इतक्यांत गरुडपक्ष्याच्या जातींतला एक मोठा पक्षी त्याच्या भोंवतीं घिरट्या घालीत होता, त्याणें त्या हत्तीच्या गंडस्थळावर मोठ्या वेगानें चोंचीचा प्रहार केला. दुर्दैवानें वर्मस्थानीं त्या पक्ष्याची चोंच लागल्यामुळें हत्तीला मूर्च्छा आली. तत्काल राजानें तीक्ष्ण अंकुशाचा सपाटा मारल्यामुळें तो पक्षी वरच्यावर आकाशांत उडून गेला. व इकडे त्या राजाचा प्रिय हत्ती धाडकन् बेशुद्ध होऊन पडला. सुदैवानें यावेळीं राजाला मात्र कांहीं इजा झाली नाहीं. तो तत्काल खालीं उतरला व त्यानें अनेक उपचार

केल्यावरून हत्ती कांहीं वेळानें सावध झाला; पण त्याणें खाणें पिणें अगदीं वर्ज केलें. त्याच्या संवईच्या महातानें व स्वतः राजानेंही पुष्कळ प्रयत्न केला; पण हत्तीनें एक गवताची काडी देखील तोंडांत धरली नाहीं, किंवा एक पाण्याचा घोटही घेतला नाहीं. यारितीनें सतत पांच दिवस तो हत्ती अत्यंत व्याकुळ होऊन पडला होता.

राजाचें मुख्य जीवीत काय तें तो हत्तीच होता, हें पुन्हां येथें सांगावयास नको. तो असा मरणोन्मुख होऊन पडल्यामुळें राजाला खाणेंपिणें कोठून सुचणार! हत्तीबरोबर तोही निराहारच राहिला. लोकांनीं जे जे उपाय सांगितले ते ते सर्व करून पाहिले. तरी त्याणें कांहीं होत नाहीं, असें पाहून शेवटीं निराश होत्साता आकाशाकडे तोंड करून **इंद्रादि** लोकपालांला उद्देशून राजा हात जोडून म्हणाला, "हे लोकपाळहो, यावेळीं मी कोणत्या मोठ्या संकटांत पडलों आहें हें तुह्मी पाहतच आहां. कृपा करून यातून पार पडण्याचा जर कांहीं उपाय असेल तर मला सांगा. तसें न कराल तर मी मुळींच प्राण ठेवणार नाहीं. मी आपलें मस्तक तोडून तुह्माला अर्पण करीन!" राजाचें हें बोलणें केवळ वरपंगी नव्हतें. त्यानें क्षणभर दम धरला; पण तितक्या अवधींत लोकपालांनीं कांहीं सांगितलें नाहीं. तेव्हां तत्काल तो तरवार घेऊन आपलें मस्तक तोडण्यास तयार झाला. राजा **रत्नाधिपति** हा मोठा धार्मिक व शूर होता. धर्मशास्त्राप्रमाणें राजा हा आठही लोकपालांचे[1] अंश धारण करितो. तेव्हां असा पुरुष विनाकारण मरतो आहे ही गोष्ट लोकपालांला योग्य वाटली नाहीं. त्यांच्या प्रेरणेनें तत्काल आकाशवाणी झाली. ती अशी कीं, "अरे राजा, असें साहस विनाकारण करूं नकोस. हा तुझा हत्ती क्षीणायु झालेला

---

१ इन्द्र, वरुण इत्यादि आठ देवता आठ दिशांला राहून लोकांचें रक्षण करतात, असें प्राचीन आर्यलोकांचें मत आहे. राजा हा लोकरक्षक असल्यामुळें तो अष्टौ लोकपालांचा अंशधारी आहे असें अनेक ग्रंथांत आढळतें.

नाहीं. कोणी पतिव्रता स्त्री याच्या अंगावरून हात फिरवील तर हा आ-
तांच सावध होईल. दुसरे कितीही उपाय केलेस तरी कांहीं होणार नाहीं."

ही आकाशवाणी ऐकतांच राजाला मोठा संतोष झाला. तो म्हणाला, "हा उपाय अगदीं सोपा आहे. माझ्या जनानखान्यांत एक नाहीं दोन, ऐंशी हजार स्त्रिया आहेत. आणि त्या सर्वही माझ्यावांचून दुसरीकडे डुंकूनदेखील पाहणाऱ्या नाहींत. त्यांतल्या एकीला हें काम सांगितलें म्हणजे झालें!" असा विचार करून त्या भोळ्या भाबड्या राजानें आपल्या स्त्रियांतली मुख्य, जिचें नांव **अमृतलता**, तिला तेथें बोलावून आणविली. ह्या राजाला बायकोच्या वर्तनावर सक्त जनर ठेवण्याची मोठी ईर्ष्या होती. त्याच्या जनानखान्याचा बंदोबस्त पक्का होता. पट्टराणीला, हत्तीला स्पर्श करण्याकरितां आणिली ती तरी इतक्या बेतानें कीं; तिचें नखदेखील दुसऱ्या कोणाच्या दृष्टीस पडूं नये! असो. इतकेदिवसपर्यंत त्यानें जो कडेकोट बंदोबस्त ठेवला होता व आपल्या व्यवस्थेची आणि राण्यांच्या पातिव्रत्याची जी त्याला घमंड होती ती सर्व आतां नाहींशी होण्याचा समय प्राप्त झाला. **अमृतलता** शिवतांच हत्ती उठेल, अशी त्याची पक्की खातरी होती. राजा मानतो तशी आपण साध्वी नाहीं, असें सांगण्या करितांच कीं काय, तिणें मोठ्या तोऱ्यानें हत्तीच्या साऱ्या शरीरावर हात फिरवून पाहिला; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. हत्ती जो पडला होता त्याणें डोळे देखील उघडले नाहींत. मग काय विचारतां? ती तर जागच्या जागीं अगदीं विरूनच गेली. ती पतिव्रता नाहीं याविषयीं शंकादेखील ठेवण्यास आतां अगदीं जागा राहिली नाहीं. अर्थात् तिला बाजूस लावलें.

आपली पट्टराणी साध्वी नाहीं असें ठरलें हें पाहून राजाला फार वाईट वाटलें. तरी तो ह्मणाला, "हं! त्यांत काय आहे? ही एक सटवी अशी निघाली ह्मणून काय झालें? ऐंशी हजारांतून शेंपन्नास तरी पतिव्रता निवतील कीं नाहीं!"

असा विचार करून त्याणें दुसऱ्या राणीला बोलाविली. थोरल्या बाईसाहेबांची काय दशा झाली ती ऐकून दुसरी पुढें येण्यास धजतच नव्हती. पण राजाच्या हुकुमापुढें बिचारीचें काय चालणार? तिणें येऊन मुकाट्यानें हत्तीला स्पर्श केला. तेव्हां लोकांच्या हंशानें व स्वतःच्या दुष्कर्मानें जिचें तेज नाहींसें झालें आहे अशी तीही तोंड काळें करून एकीकडे सरली. याप्रमाणें एकीमागून एक अशा ऐंशी हजार राण्यांनीं त्या हत्तीला स्पर्श केला; तथापि त्याणें डोळे देखील उघडले नाहींत! शेवटीं एक तरी राणी पतिव्रता निघेल अशी आशा धरून राजा बसला होता, पण बिचाऱ्याची ती मुळींच सफळ झाली नाहीं.

मानी पुरुषाला हवें तितकें नुकसान झालेलें पुरवतें; पण आपला अपमान सहन होत नाहीं. हत्ती सावध होत नाहीं ह्मणून राजा आधींच दुःखित होता. त्यांत त्याच्या स्त्रियांचें पातिव्रत्य कसोटीस लागल्यामुळें लोकांत जो हशा पिकला होता त्याच्या योगानें त्याला, यावेळीं मरण येईल तर बरें असें वाटत होतें. तथापि त्याणें धैर्य सोडलें नाहीं. जनानखान्यांतल्या स्त्रिया सरल्या तेव्हां त्याणें शहरांत जिकडेतिकडे दंवडी पिटवून तमाम सर्व लोकांच्या स्त्रिया बोलवून आणविल्या. त्याणींही अनुक्रमानें हत्तीला स्पर्श केला, पण तो मात्र सावध झाला नाहीं. तेव्हां राजा कपाळावर हात मारून घेऊन ह्मणाला, "हाय! हाय! माझ्या जनानखान्याची मी किती खबरदारी ठेविली होती. असें असून त्या ऐंशी हजारांतून एकदेखील स्त्री साध्वी निघाली नाहीं! तें एक असो; पण या साऱ्या शहरांतल्या स्त्रिया हत्तीला शिवून गेल्या तरी यांत देखील कोणी साध्वी निघाली नाहीं. धिक्कार असो! मी राजा अर्थात् धर्माचा पालक, असें आपल्याला ह्मणवितों त्याचा काय उपयोग? ज्याच्या राज्यांत एक पतिव्रता स्त्री नाहीं, त्याच्या राज्यांत धर्म आहे असें कोण ह्मणेल? व अशारितीनें प्रजेचें पालन करणाऱ्या राजाला राजा तरी कां ह्मणावें?"

याप्रमाणें राजा उदास झाला आहे तों शहरांतील प्रमुख प्रमुख लोकांच्या स्त्रिया आल्या. यावेळीं त्या नगरींतले लहानमोठे सर्व पुरुष त्या हत्ती जवळ उभे होते. प्रत्येकाला आपापल्या बायकोविषयीं घमंड ही आपली असायचीच. 'ही कोण त्या अमक्या गृहस्थाची बायको आलीना? छेः, ती कसली साध्वी असणार? स्वतः माझी यजमानीन येईल, तेव्हां पहा कसें काय होतें तें. हत्ती उठल्यावांचून राहयचाच नाहीं!' असें जो तो प्रथम ह्मणत असे. पण त्याची बायको येऊन तिनें तोंड काळें केलें; ह्मणजे त्याला जी कांहीं लाज वाटे ती सांगतां पुरवत नाहीं. तरी तेथें ही एक मोठी मौज उडाली होती. कोणी कोणाला हंसण्यास जागाच राहिली नव्हती. प्रत्येक मनुष्य आपापल्या बायकोची परीक्षा होईपर्यंत दुसऱ्याची कदाचित् थट्टा करी. पण पुढें त्यालाही खालीं पहावें लागत असे. असें होतां होतां राजापासून रंकापर्यंत सर्वही एकसारखेच झाले. कोणी कोणाला हसण्याची कांहीं सवड राहिली नाहीं. बायकांवर तर ही एक संक्रांतच गुजरली होती. त्या हत्तीच्या नांवानें तटातट बोटें मोडीत होत्या. 'जळो मेला तो हत्ती. कोठून आला कोणास ठाऊक? मेल्या पांढऱ्या पायाच्यानें आमची छळणूक आरंभली आहे. मेल्याची एकदांची तळी उचलेल तर बरें होईल.' असें म्हणून त्या त्याच्यावर शाप सोडीत होत्या.

याप्रमाणें त्या साऱ्या शहरांत स्त्रिया आणि पुरुष सर्वच दुःखित झाले. शेवटीं राजा वर हात करून सर्वांला उद्देशून म्हणाला, "लोक हो! अरे आपल्या या एवढ्या मोठ्या शहरांत एकही पतिव्रता नाहीं काय? कोणी असेल तर तिनें पुढें होऊन या हत्तीला सावध करावें." राजानें असें म्हटलें व आतां कोणी तरी पुढें सरेल याची तो वाट पहात होता; पण कोणीही पुढें आलें नाहीं. इतक्यांत, **ताम्रलिप्ती** नांवाच्या नगरीहून व्यापाराकरितां **हर्षगुप्त** नावाचा एक सावकार तेथें आला होता. इतर मंडळी बरोबर तोही तमाशा पहात उभा होता. त्याच्या

बरोबर त्याच्या घरची एक मोलकरीणही आली होती. ती स्त्री मोठी साध्वी होती. तिचें नांव शीलवती. राजाचें भाषण ऐकून ती पुढें सरसावली. आणि हत्तीच्या जवळ जाऊन म्हणाली "सर्व लोक हो, देवतागणहो, माझी प्रार्थना ऐका. जर मी मनानें देखील परपुरुषाला स्पर्श केला नसेल; तर त्या माझ्या पुण्यानें हा हत्ती सावध होवो." असें बोलून तिणें त्याला हात लावतांच तत्काल हत्ती उठून उभा राहिला. व हुषार होऊन लगेच चाराही खायची त्याणें सुरवात केली. मग काय विचारतां? लोकांत जिकडे तिकडे आनंदाचा गजर झाला. "वाहवा! पतिव्रता म्हणतात त्या अशा असतात. यांच्यांत आणि ईश्वरांत काय अंतर आहे! अशा साध्वी विरळाच असायच्या. त्या आपल्या सामर्थ्यानें, जगाची उत्पत्ति पालन आणि नाश हीं तिन्हीं करण्यास समर्थ आहेत. धन्य आहे अशा साध्वींची." असा जिकडे तिकडे ध्वनि निघाला. सर्व लोक त्या शीलवतीचा जयजयकार करूं लागले. कित्येक तर तिला देवता मानून नमस्कार करूं लागले. याप्रमाणें जयजयकार चालला असतां राजा रत्नाधिपति याला फार आनंद झाला. त्याणें त्या शीलवतीला रत्नांनीं भरून काढलें. तिचा यजमान हर्षगुप्त याचाही राजानें मोठा सत्कार केला. व त्याला आपल्या वाड्याच्या जवळ राहण्यास जागा दिली. आणि त्या दिवसापासून स्त्रियांत शीलवती व पुरुषांत हर्षगुप्त हीं दोघें राजाचा विश्वास पूज्यबुद्धी व प्रेम यांला पात्र झालीं. आपल्या जनानखान्याकडे तर त्याणें त्यावेळेपासून ढुंकून देखील पाहिलें नाहीं. व त्या बायकांचा जो थाटमाट बडेजाव वगैरे होता तो सर्व काढून टाकला. आपण त्यांना लग्न करून आणल्या आहेत तेव्हां त्यांना अन्नवस्त्र दिलें पाहिजे. म्हणून तेवढेंच देण्याची त्याणें तजवीज ठेवली. त्यावांचून बाकीचें सर्व वैभव नाहींसें केलें.

वर सांगितलेली गोष्ट ज्यादिवशीं घडली, तेव्हांपासून त्या नग-

रींत घरोघर बायकांची तर अगदीं खोडच मोडली. कोणी कांहीं म्हटलें कीं नवऱ्यानें म्हणावें, "पुरे पुरे, ठाऊक आहेस कशी आहेस ती. असों म्हणून मी आपला उगी राहतों. नाहींतर तुझ्या सारखीला घरांत ठेवूं देखील नये." नवरे असें म्हणत असत. कित्येक अरेराव होते त्याणीं तर आपल्या बायकांला घरांतून घालवूनच दिलें. बायकांचा वरचष्मा मुळींच चालेनासा झाला. नवऱ्यानें त्यादिवसाची आठवण दिली कीं त्यांला खालीं पहावें लागत असे.

ऐंशीहजार बायका केल्या तरी राजाला यावेळीं एकही बायको नाहींशी झाली. तेव्हां त्याला चैन पडेनासें झालें. प्रथम तर एकंदर स्त्रीजातीचाच त्याला तिटकारा आला. व म्हणून इतःपर कोणाशीं लग्नच करूंनये असा त्याचा निश्चय होता. पण तो फार दिवस टिकला नाहीं. बायकोशिवाय करमेनासें झालें. तेव्हां त्याणें असा विचार केला कीं; ही **शीलवती** मोटी साध्वी आहे, याविषयीं तर आतां कांहीं शंका राहिलीच नाहीं. तेव्हां तिची बहीण किंवा दुसरी कोणी तरी तिच्या माहेरची चांगलीशी मुलगी मिळेल तर तिच्याशीं लग्न करून घ्यावें, असें त्याच्या मनांत आलें. तेव्हां एके दिवशीं **हर्षगुप्त** व त्याची दासी **शीलवती** हिला त्याणें बोलवून आणिलें. आणि त्या सावकाराच्या देखत राजा त्या पतिव्रता स्त्रीला गौरवून म्हणाला, "हे साध्वि, तूं तर प्रत्यक्ष देवताच आहेस. ज्या कुळांत तूं जन्मास आलीस तें कूळ पवित्र असेल याविषयीं कांहीं शंकाच घ्यायला नको. तर तुझ्या माहेरची एखादी कोणी मुलगी लग्नाची आहे काय? असेल तर कृपा करून तूं ती मला देवीव. ती तुझ्या सारखीच पतिव्रता निघेल अशी माझी खातरी आहे."

राजानें याप्रमाणें सांगितलें तेव्हां **शीलवति** ह्मणाली, "महाराज, **राजदत्ता** नांवाची प्रत्यक्ष माझीच बहीण लग्नाची आहे; पण ती **ताम्रलिप्ति** नगरींत आहे. आपली इच्छा असेल तर तिच्याशीं लग्न

लावावें. ती रूपागुणांनीं उत्तम आहे." हें ऐकतांच राजाला फार आनंद झाला. प्रत्यक्ष **शीलवतीचीच** बहीण जेव्हां मिळते आहे; तेव्हां ती तिच्यासारखी साध्वी असलीच पाहिजे; अशी त्या वेड्याची खात्री होती. ह्मणून त्याणें लगेच **राजदत्तेशीं** विवाह करून घेण्याचा निश्चय केला. आणि दुसऱ्याच दिवशीं, तो **हर्षगुप्त** नांवाचा सावकार आणि त्याची दासी ती **शीलवती** यांना बरोबर घेऊन; **श्वेतरश्मि** हत्तीवर बसून राजा **ताम्रलिप्ति** नगरीला जाण्यास निघाला.

तो हत्ती आकाशमार्गानें संचार करणारा होता. ह्मणून तो थोडक्याच अवकाशांत त्या नगरींत जाऊन पोंचला. **हर्षगुप्त** हा तेथला स्थाईक राहणारा असून घरचा श्रीमंत होता. त्याणें राजाला आपल्याच घरीं नेलें. त्याचा योग्य आदर सत्कार झाल्यावर लगेच त्या **राजदत्तेला** राजाला दाखविली. व तिला त्याणें पसंतही केली. आतां राहिली कायती मुहूर्ताची अडचण. तेव्हां त्या शहरांतले मोठे मोठे ज्योतिषी बोलवून लग्नाचा उत्तम मुहुर्त जितका लवकर मिळेल तितका काढून द्यावा, असा राजानें त्यांना प्रश्न केला. त्यांणीं उभयतांचीं जन्मनक्षत्रें विचारून त्यांवरून गणित वगैरे करून पाहिलें. पण त्यावरून असें निघालें कीं; तीन महिन्याच्या आंत मुळींच मुहूर्त नाहीं. ज्योतिषी ह्मणाले, "महाराज, उत्तम मुहुर्त आहे. पण तो आजपासून तीन महिन्यांनीं मिळेल. त्याशिवाय आज एक मुहूर्त आहे, या मुहूर्तावर लग्न झालें तर ही स्त्री अवश्य व्यभिचारिणी झाल्यावांचून राहणार नाहीं, असें आहे. आतां आपल्याला योग्य वाटेल तसें करा."

राजा धर्मनिष्ठ होता. चांगल्या मुहूर्तावर लग्न व्हावें, हें त्याला मनापासून इष्ट होतें. तथापि तीन महिन्यांचा अवकाश असल्यामुळें तोंपर्यंत त्याच्यानें दम धरवत नव्हता. उघडच आहे, ऐंशीं हजार बायकांच्या कळपांत यथेच्छ विहार करणाऱ्या पुरुषाला एकही बायको जवळ नाहीं अशा स्थितींत दिवस कसे काढवतील? अर्थात् तो फार

उत्कंठित असणें हें अगदीं साहजिक आहे. त्यांतून **राजदत्ते**नेंही त्याचें मन अस्वस्थ करून सोडलें होतें. त्या सुंदर स्त्रिशीं विवाह करून घेण्याविषयीं उत्सुक झालेला व एकव्यांनीं ज्याला फार दिवस राहवत नव्हतें, अशा राजाला ज्योतिष्यांनीं त्या दिवशींच्या मुहूर्ताचा काय दोष आहे तो प्रत्यक्ष सांगितला; तरी त्याणें तिकडे दुर्लक्ष्य केलें! तो मनांत ह्मणाला, या कामांत फारसा विचार करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. या **राजदत्ते**शीं आजच्या आज विवाह करावा. कशी झाली तरी ती त्या **शलिवती**ची बहीण आहे. हिला आपल्या कुळाचा कांहींच का अभिमान नसेल? बाकी कशीही निघाली, तरी असती निघायची नाहीं. आणि त्याविषयीं पक्का बंदोबस्त करण्याची आपल्याजवळ उत्तम तयारी आहे. आपल्या राजधानीच्या जवळच समुद्रांत जें एक लहानसें बेट आहे त्यावर कोणीच मनुष्य राहत नाहीं. तेथें आपण एक उत्तम बंगलाही बांधलेला आहे. त्या बंगल्यांत हिला ठेवावी ह्मणजे झालें. तें ठिकाण समुद्रांत असल्यामुळें दुसऱ्या कोणत्याही पुरुषाला सहज तेथें जातां येणार नाहीं. याशिवाय आपण त्याबद्दल सक्त मनाईही करावी. नोकरचाकर वगैरे तेथें ठेवायचे ते सर्व बायकाच ठेविल्या ह्मणजे झालें. हे ज्योतिषी सांगतात ती व्यभिचारिणी होईल ह्मणून; पण कोणी पुरुष दृष्टी पडला तर हिच्या हातून कदाचित् व्यभिचार घडेल. मुळीं त्याचें दर्शनच झालें नाहीं तर व्यभिचार कोठून होणार?

असा विचार करून राजानें त्याच दिवशीं **राजदत्ते**शीं लग्न लावून घेतलें. आपण हवा तितका बंदोबस्त ठेवला तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं याचा नुकताच त्याला अनुभव आला होता. व तो केवळ स्वतःच्या स्त्रियांबद्दलच नसून साऱ्या शहरांतल्या स्त्रियांबद्दल आला असतांही, राजाला आपल्या बंदोबस्ताची घमंड वाटली हें मोठें नवल आहे. पण त्यांत नवल तरी कसलें! अविचारी पुरुष नेहमीं

अशाच घमेंडींत असतात, व शेवटीं त्यामुळेंच त्यांची मानहानी व पस्तावा होत असतो. असो. राजा, **शीलवतीनें** अर्पण केलेल्या **राजदत्तेचा** स्वीकार करून मोठ्या आनंदानें त्या आपल्या नववधूला व तिची बहीण **शीलवती** आणि तिचा यजमान **हर्षगुप्त**, यांला बरोबर घेऊन हत्तीवर बसून पुन्हां **रत्नकूट** नगरीकडे निघाला. आकाशमार्गानें पांढऱ्या शुभ्र ढगासारख्या दिसणाऱ्या हत्तीवर बसून राजाची स्वारी येत असलेली अवलोकन करून; शहरांतील लोक त्याच्या मार्गाकडे पहात उभे राहिले होते. त्यांला आनंद देत होत्साता राजा आपल्या वाड्याजवळ खालीं उतरला. **शीलवतीला** पूर्वी जी नेमणूक वगैरे करून दिली होती ती तर त्याणें पुन्हां सुरू केलीच. तिच्या पातिव्रत्यानें राजाला आधीं ती मान्य झालीच होती. त्यांतून आतां तर ती मेव्हणी झाली. तेव्हां पहिल्यापेक्षांही तिची व्यवस्था विशेषप्रकारची झाली असेल हें सांगावयासच नको. राजा दोनप्रहरच्या सुमारास, आपल्या शहरांत येऊन पोंचला होता. त्याणें स्नान भोजन वगैरे आटपतांच पुन्हां हत्तीवर स्वारी केली. कारण, **राजदत्तेला** त्या बेटांत नेऊन ठेवायचें होतें. जेवणखाण होई तोंपर्यंत ती राजवाड्यांत होती; तरी राजानें तिला आपल्या डोळ्यां आड बिलकूल होऊं दिलें नाहीं. न जाणों कांहीं तरी गोंधळ होईल याची त्याला भीति होती. म्हणून लवकर लवकर तो तिला घेऊन हत्तीवर बसून समुद्राच्या मध्यमार्गी असलेल्या त्या बेटांत जाऊन पोंचला.

तें बेट स्वभावतःच मनुष्यांला दुर्गम होतें. तेथें एक मोठा विस्तीर्ण बंगला होता. त्यांत **राजदत्तेला** परपुरुषसंयोग न व्हावा म्हणून प्रयत्न करणाऱ्या राजानें नेऊन ठेवलें. तिच्या बरोबरचा सर्व परिवार जनानीच ठेवला. राजवाड्यांत खुजे, षंढ इत्यादिकांला जनानखान्यांत कामावर नेमण्याची चाल होती. तथापि, न जाणों कदाचित् त्यांतून एखादा पुरुष निघेल; म्हणून राजानें केवळ स्त्रीलिंगावांचून त्या

बेटांत दुसऱ्याला थाराच दिला नाहीं! हत्ती हें एक त्याला विलक्षण साधन मिळालें होतें. राजदत्तेला त्या ठिकाणीं ज्या ज्या वस्तू पाहिजे असतील त्या त्या सर्व तो त्या हत्तीच्या साह्यानें तेथें पोंहंचवीत असे. त्या वेड्या राजानें किती कडेकोट बंदोबस्त ठेविला होता, याचें कोठवर वर्णन करावें? आपल्या राणीच्या कर्मणुकी करतां हरीण इत्यादि पशु व मोर पोपट इत्यादि पक्षी जे त्यानें तेथें ठेविले होते त्यांत देखील नर न ठेवितां येथून तेथून साऱ्या माद्याच होत्या. येथपर्यंत त्याचा बंदोबस्त होता. तो त्या स्त्रीवर फारच अनुरक्त असल्यामुळें प्रतिदिवशीं सायंकाळीं त्याणें तिकडे जावें. रात्रभर तेथेंच राहून प्रातःकालीं स्नानसंध्या भोजन वगैरे आटपून राजकारभार पाहण्या-करतां पुन्हां रत्नकूट नगरांत यावें. कामकाज आटोपलें कीं लगेच परत त्या बेटांत जावें. असा त्याचा नित्यक्रम चालला होता.

मानवी प्रयत्न—त्याला दैव अनुकूळ झाल्यावांचून—सिद्धीस जाणें कठीण. बिचाऱ्या त्या राजानें कितीतरी प्रयत्न केला. ज्याच्यायोगानें कोट्यावधि प्राण्यांचें हिताहित व्हायचें, ज्याच्यायोगानें त्याला इहलोकीं यश व परलोकीं उत्तम गति मिळायची व जें योग्यरितीनें न चालविलें तर तो नरकांत पडायचा, असें जें राज्य त्याच्याविषयीं त्याला तितकी काळजी नव्हती; जितकी त्याणें त्या राजदत्तेचें रक्षण करण्याविषयीं घेतली. पण उपयोग काय? अवश्य होणाऱ्या गोष्टी जर मानवी प्रयत्नानें चुकविल्या जातील; तर मग मनुष्यालाच ईश्वर ह्मणण्यास काय हरकत आहे? असो. एकेदिवशीं राजाला पहाटे पहाटे कांहीं वाईट स्वप्न पडलें. अर्थात् त्याच्याविषयीं मनाला खेद झाला. तो दुसऱ्या कोण-त्याही रितीनें जात नाहीं असें पाहून राजानें मद्यप्राशन केलें. वस्तुतः मद्य हें फार वाईट आहे. कैफ ह्मटला ह्मणजे मग तो कोण-ताही असो; एकंदरींत वाईटच. तथापि प्रसंगविशेषीं त्याचाही चांगला उपयोग होतो. साधारणतः मनाची स्थिती अस्वस्थ असली,

किंवा कांहीं दुःख झालें, अथवा चिंता लागली, तर तशा प्रसंगीं कैफाचा उपयोग चांगला होतो. त्याच्यायोगानें चिंता वाढत नाहीं. मन एका नादांत गुंतल्यासारखें अगदीं स्थीर राहतें. असें असल्या-वरून, सकाळची वेळ ही मद्यप्राशनकरण्याची नव्हे; तरी राजानें त्या दिवशीं स्त्रियेसह यथेच्छ प्राशन केलें. अर्थात् त्याची स्त्री **राज-दत्ता** कैफानें धुंद झाल्यामुळें त्याला जाऊं देईना. तिणें, आज सारा दिवस येथेंच राहावें; ह्मणून पुष्कळ हट्ट घेतला; तरी तिला सोडून राज्यसंबंधी कामें पाहण्याकरितां तो **रत्नकूट** शहरास निघून गेला. उघडच आहे, बायको कितीही लाडकी झाली; तरी कर्तव्यदक्ष पुरुष आपलें कर्तव्य कर्म सोडून तिच्या नादांत गुंतून रहात नाहींत.

याप्रमाणें राजा **रत्नाधिपती** बायकोचा आग्रह मोडून गेला. तो कचेरींत बसून अनेक कार्यांचा निकाल लावीत होता; तरी त्याचें मन त्यादिवशीं साशंक होतें. 'कैफानें धुंद झालेली व तुझ्या समागमाची इच्छा करणारी, अशा स्त्रीला एकटी टाकून कां आलास?' असें त्याचें मन त्याला विचारीत आहे कीं काय? असें त्याला वाटत होतें. इकडे **राजदत्ता** त्या दुर्गम स्थानांत होती. कोणाही पुरुषाचा तेथें समागम होण्याचा संभव नाहीं हें तिला माहित होतें; तथापि यावेळीं कोणी तरी मिळावा अशी तिला इच्छा उत्पन्न झाली. तिच्या दासी स्वयंपाक वगैरे घरांतील कामें करण्याकडे गुंतल्या होत्या. चैन पडेना ह्मणून ती एकटीच महालाच्या दरवाजांत समुद्राच्या पाण्याची व आकाशाची शोभा पहात उभी राहिली होती. 'देवा, यावेळीं कोणी तरी पुरुष आपल्याला प्राप्त होईल काय?' असें तिच्या मनांत घोळत होतें.

इतक्यांत, राजानें तिच्या रक्षणाविषयीं केलेला प्रयत्न फुकट घाल-वायाचा म्हणून ईर्षा धारण करणारें प्रत्यक्ष दैवच कीं काय; असा एक पुरुष तेथें प्राप्त झाला! त्याला पाहून **राजदत्तेला** मोठा अचंबा वाटला. तो जवळ आला तेव्हां,—" अरे तूं कोण? आणि या अशा अ-

गम्य ठिकाणीं कसा आलास?" असा तिनें प्रश्न केला. तो ऐकून, ज्यानें अनेक हालअपेष्टा भोगल्या आहेत, असा तो मनुष्य तिला म्हणाला, "हे सुंदरि, **पवनसेन** नांवाचा **मथुरेंत** राहणारा मी एक व्यापारी आहें. माझें सर्वस्व भावाबंदांनीं हरण केलें. बापही मरण पावला. तेव्हां त्या दायादांच्या भयानें मी परदेशांत जाऊन, अत्यंत तुच्छ खरी तथापि तिच्यावांचून गति नाहीं म्हणून, दुसऱ्याची चाकरी पत्करली. माझा धनी व्यापारीच होता. प्रथम मी त्याची चाकरी करून बरेंच द्रव्य सांचविलें. नंतर स्वतः व्यापार करूं लागलों. त्यावरही मला चार पैसे मिळाले. करतां करतां परदेशांत जाऊन माल खरेदी करण्याकरितां मी निघालों तों वाटेंत चोरांनीं घाला घालून मला सर्वस्वीं लुटून फस्त केलें. तेव्हां भिक्षेवांचून पोट भरण्याला दुसरें कांहीं साधन राहिलें नाहीं. दुसऱ्या भिकाऱ्याच्या सोबतीनें भिक्षाटन करीत करीत, जेथें रत्नांच्या खाणी पुष्कळ असल्याची प्रसिद्धि आहे; अशा **कनककक्षेत्र** नामक नगरींत गेलों. तेथें पोंचल्यावर मी भीक मागायचें सोडून दिलें. आणि पुन्हां व्यापार आरंभला.

तेथें अशी चाल होती कीं; तेथील राजाकडून जमिनीचा कांहीं भाग व्यापारी लोक मक्त्यानें घेत असत. व त्यांत जीं रत्नें मिळतील त्यांतील नियमित अंश राजाला देऊन, बाकीचीं रत्नें ते घेऊन जात. त्याप्रमाणें राजाच्या सर्व शर्ती मान्य करून मीही एक जमिनीचा तुकडा त्याच्याकडून ठरवून घेतला. एक वर्ष पर्यंत सतत मी तो प्रदेश सर्व खणून पाहिला; पण एकदेखील रत्न मला मिळालें नाहीं! माझ्या बरोबरीचे दुसरे अनेक व्यापारी; आज अमक्याला अमुक रत्नें मिळालीं, आज तमक्याला तमुक मिळालीं, अशा गोष्टी करीत असत व मी प्रतिदिवशीं केवळ श्रम करून रडत आपल्या बिऱ्हाडीं येत असें. आज नाहीं उद्यां, उद्यां नाहीं पर्वां मिळेल, अशा आशेवर मी एकवर्ष सतत मेहनत केली; तरी कांहीं एक मिळालें नाहीं. आणखीही तसाच

श्रम करित राहिलों असतों; पण वर्ष भरत आलें. तेव्हां राजाचा कर भरण्याची मुदत येऊन ठेपली. माझ्याजवळ तर विष खायाला देखील दमडी नव्हती. मग राजाचा कर कोठून देणार? म्हणून मी एकेदिवशीं कोणाला नकळत तेथून पलायन केलें तो थेट समुद्राच्या कांठीं गेलों.

आपण करायाचा तो सर्व प्रयत्न करून पाहिला. कशांतच कांहीं यश येत नाहीं. तेव्हां उगीच वांचून तरी काय करायचें आहे? मरावें हें बरें, असा माझा पक्का निश्चय झाला होता. म्हणून लांकडें जमवून मी चिता रचून तयार केली. तिला अग्नी दिला. व आतां आंत उडी टाकणार इतक्यांत **जीवदत्त** नांवाचा एक मोठा व्यापारी तेथें येऊन पोंहचला. माझें तें साहस पाहून त्याला फार वाईट वाटलें. त्याणें मला मरणापासून निवृत्त केलें. व पोट भरण्यापुतें थोडेसें द्रव्य देऊन त्या दयाळू पुरुषानें मला आपल्या गलबतावर नेलें. तो **जीवदत्त** व्यापाराकरितां **स्वर्णद्विपाला** चालला होता. 'दिलेल्या द्रव्यावर तूंही व्यापार कर म्हणजे कांहीं लाभ होईल' असें त्याणें मला सांगितलें व मलाही थोडीशी उमेद आली. कारण एक क्षणभर तो पुरुष तेथें येण्यास वेळ लागता तर मी जळून खाक झालों असतों. तेव्हां अशावेळीं येऊन त्याणें आपल्याला मरणापासून सोडविलें. यावरून, न जाणों कांहीं तरी आपलें चांगलें व्हायचें असेल, असें मला वाटलें. पण पुढें लौकरच ते सर्व विचार नाहींसे झाले. एकाएकीं वारा प्रतिकूळ झाल्यामुळें आमचें गलबत आवरेनासें झालें. पांच दिवस आमचा प्रवास निर्विघ्नपणें चालला होता. सहाव्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं आकाशांत मेघांची गर्दि झाली. व लौकरच मुसळासारख्या धारांची वृष्टि सुरू झाली. तेव्हां मस्त झालेल्या हत्तीच्या डोक्याप्रमाणें गरगर फिरणारें आमचें गलबत पाण्यांत बुडून फुटून गेलें. मग काय विचारतां? कोणाचा कोणास पत्ता नाहीं. गलबतावरचे कांहीं लोक तर सपाऱ्यासारखे तळास गेले. व कांहीं तरं-

गत तरंगत कोठल्या कोठें जाऊन पोंचले. तशा वेळीं कोण कोणाकडे पाहतो? मी गटंगळ्या खात खात तळास जाण्याच्या बेतांत होतों. इतक्यांत, जणूं काय माझ्या आयुष्यानेंच पाठविलेली, गलबताची एक फळी मला मिळाली. तिच्यावर बसून मी झोकांडे खात कोठल्या कोठें चाललों होतों. ती सारी रात्रभर एकसारखें वादळ सुरू होतें. दुसऱ्या दिवशीं वारा शांत होऊन पाऊस नाहींसा झाला. व समुद्राचें पाणी स्थीर झालें. तेव्हां हळूहळू ती फळी हालवीत हालवीत, ती जिकडे जाईल तिकडे जावो असें ह्मणून निघालों तो या बेटाला येऊन लागलों. नंतर जमीनीवर उतरून या अरण्यांत कोठें कांहीं खायाला मिळेल तर पहावें, ह्मणून शोध करीत करीत येथें आलों. बराच हिंडलों तरी मनुष्याची जागमाग कांहीं दिसली नाहीं. तेव्हां हें बेट ओसाड असावें असें वाटून भुकेनें माझे प्राण व्याकुळ झाल्यामुळें मी अगदीं उदास झालों होतों. इतक्यांत मला उमेद देणारा हा बंगला दृष्टी पडला. येथें कोणी असेल तर पहावें ह्मणून तटबंदीच्या आंत आलों. तों, सर्व ताप शमन करणारी व दृष्टीला अमृतवृष्टीसारखी तृप्त करणारी; अशी ही आपली सुंदर आकृति माझ्या दृष्टी पडली. आतां पुढें काय कर्तव्य तें आपल्याला माहीतच आहे. मी काय बोलूं!"

**राजदत्ता** ही जात्या व्यभिचारिणी नव्हती व तें निंद्य कर्म करावें असें हावेळपर्यंत तिच्या मनांतही कधीं आलें नव्हतें. पण मनाची स्थिती सदा सारखी असत नाहीं. त्यांतून कैफ हा अनावर होण्यास कारण होतो. साधारणतः स्त्रियांला काम विशेष असतो हें तर प्रसिद्धच आहे. मद्य हें कामाला उत्तेजित करणारें आहे. काम अनावर झाला म्हणजे त्याला वेळ काळ, कर्तव्य अकर्तव्य, धर्म अधर्म इत्यादिकांचा कांहींच विचार राहत नाहीं. **राजदत्ता** यावेळीं उन्मत्त झाली असून पुरुषसंगाविषयीं फार आतुर झाली होती. अशा स्थितींत तो

तरुण व्यापारीही दैवयोगानें प्राप्त झाला. त्याचे दुःखकारक हाल ऐकून स्त्रियांच्या स्वभावाप्रमाणें तिचें हृदयही द्रवलें. व यावेळीं तेथें कोणाची आडकाठीही नव्हती. अशा सर्व गोष्टी अनुकूळ झाल्यावर कामानें आपला अंमल कां बजावूं नये? स्त्रीपणा, छाकटेपणा, एकांत, तशा वेळीं पुरुषांचा लाभ व कोणाचा प्रतिबंध नसणें ह्या पंचाग्नींतून एकदोनच अग्नी मिळाले तरी भडका उडाल्यावांचून राहायचा नाहीं. मग पांचही एकेठिकाणीं मिळाल्यावर शीलरूपी तृणाची तेथें राखरांगोळी होण्यास वेळ कितीसा लागणार? तत्काल राणीनें त्याला प्रेमपूर्वक कडकडून आलिंगन दिलें. त्याबरोबरच त्याचे सर्व श्रम वगैरेंचाही परिहार झाला. नंतर तसाच त्याला आंत नेला. उत्तम उत्तम पदार्थ खायाला देऊन, यथेच्छ मद्य प्राशन करविलें. मदानें आणि मदनानें मोहित झालेल्या त्या स्त्रीनें पुढें काय केलें असेल तें सांगावयास नकोच. ही गोष्ट मोठी विचित्र आहे कीं; कामपीडित झालेली स्त्री क्षणभरदेखील दम धरीत नाहीं. राजदत्तेनें चार सहा घटका तशा स्थितींत काढल्या असत्या, तर तिचा पती तिला मिळाला असता. पण कामाला दम कसा धरवेल? असो. आपल्या शीलाची व राजाच्या सर्व हेतूंची दुर्दशा करण्याकरितांच कीं काय, ती त्या तशा दरिद्री व आपत्तींत असलेल्या पुरुषाशीं रत झाली!

इकडे राजाचें चित्त त्यादिवशीं स्थीर नव्हतें हें वर सांगितलेंच आहे. ती नको नको ह्मणत असतां आपण आलों हें चांगलें केलें नाहीं. मागें काय करील कोणास ठाऊक? म्हणून तो जरूरीचीं कामें होतीं तेवढीं आटपून तसाच त्या बेटाकडे निघाला. त्याची नित्याची येण्याची वेळ नियमित होती. इकडे राजदत्ता छाकटी झाली असून चैनींत होती. राजा येण्याच्या वेळेपूर्वी त्या वाण्याला तेथून घालवून द्यावा असें तिच्या मनांत होतें; तथापि, तसें घडलें असतें किंवा नाहीं याच्या परीक्षेची वेळ येण्यापूर्वींच, तो नित्यापेक्षां लवकर आल्यामुळें, तिचें तें कृत्य उघड-

कीस आलें. राजा हत्तीवरून उतरला तो एकदम आंत गेला. तेथें, कळाहीन, उपोषणांनीं शुष्क झालेला व मळिण अशा त्या पुरुषाशीं रत झालेली **राजदत्ता** त्याच्या दृष्टीस पडली! मग काय सांगावें? राजाच तो, त्याणें तत्काल तरवार उपसली. तेव्हां त्या वाण्यानें भयभीत होऊन त्याचे पाय धरले. तो म्हणाला, "यांत माझा कांहींच अपराध नाहीं. आपण मारण्याविषयीं समर्थ आहां; पण तसें करणें हें अन्यायाचें होणार आहे. या कामीं मी मुद्दाम प्रयत्न केला असेल; किंवा याकरितांच येथें आलों असेन, तर मात्र माझ्यावर दोष लागू होईल." याप्रमाणें राजाचीं आर्जवें करून, त्याणें मुळापासून झालेली हकीकत सांगितली. तेव्हां या गरीबाला मारण्यांत काय अर्थ आहे असें समजून त्याणें त्याला सोडून दिलें.

यावेळीं **राजदत्ते**ची स्थिती मोठी चमत्कारीक झाली होती. ती कैफानें धुंद झाली असून त्यांत भयाचाही संचार झाला होता. ती तिची स्थिती पाहून राजा म्हणाला, "कामाला उत्तेजित करणारा केवळ मित्रच असें मद्य प्राशन केलेली स्त्री साध्वी कशी राहील? पण या कामांत एकंदरींत माझ्या मूर्खपणाची मात्र कमाल झाली, यांत कांहीं संशय नाहीं. स्वभावतःच चपल अशा स्त्रीचें रक्षण करण्यास कोण समर्थ आहे? वावटळ वेंगेंत कसें धरतां येईल? त्यावेळीं ज्योतिष्यांनीं मला सांगितलें असून मी त्यांचें ऐकलें नाहीं त्याचें हें फळ आहे. खरें व हिताचें न ऐकणाऱ्या पुरुषाला, ज्याचा परिणाम अत्यंत कडू आहे असें फळ भोगावेंच लागतें. ही **शीलवती**ची बहीण आहे, या भरंवशावर मी गेलों. आणि वाईट मुहूर्तावर लग्न केलें. एक बहीण चांगली असली म्हणून दुसरी तशीच असावी असा कांहीं नियम आहे का? विष हें अमृताचेंच भावंड. परस्परविरुद्ध अशीं तीं दोन एकाच समुद्राच्या पोटांतून कशीं निघालीं? पण याचा विचार करण्यांत अर्थच नाहीं. हा सर्व दैवाचा चमत्कार आहे. ज्याचे व्यापार असंभाव्य

आहेत अशा दैवाला पुरुषप्रयत्नानें जिंकण्याचें कोणाला सामर्थ्य आहे? असो. जें व्हायचें तें झालें. आतां उगीच घातपात करण्यांत तरी काय अर्थ आहे? या दुष्ट स्त्रीचा हा अपराध पोटांत घालण्यासारखा नाहीं. हिला येथल्या येथें ठार केली तर मला कोणीही दोष द्यावयाचा नाहीं. पण त्यांत तरी काय आहे? आपण हा नादच सोडून द्यावा ह्मणजे झालें."

याप्रमाणें विचार करून राजानें आपला राग जागच्याजागीं जिरवून टाकला. व त्या वाण्याला अभय देऊन तेथून जाण्याची परवानगी दिली. **पवनसेना**ला यावेळीं असें वाटलें कीं; आपण मृत्यूच्या दाढेंतून सुटलों. त्या बेटांतून दुसरीकडे जावयास पूर्वीं त्याला मिळालेल्या फळीवांचून दुसरें कांहींच साधन नव्हतें. तरी तो तसाच फळीवर बसून चालता झाला. कांहींसा दूर गेल्यावर त्याला एक जहाज दृष्टी पडलें. तेव्हां मोठ्यानें—"मला वर काढा, मला वर काढा," म्हणून तो ओरडला. **क्रोधवर्मा** नांवाचा एक मोठा व्यापारी त्या जहाजाचा मालक होता. **पवनसेनाचा** तो दीनवाणा आक्रोश त्याच्या कानीं पडल्यावरून दयेनें त्याला वर काढून तो आपल्याबरोबर घेऊन गेला. बिचारा अनाथ व दरिद्री असून आपल्याच जातीचा आहे; तेव्हां याला कांहीं तरी साह्य करावें, असें **क्रोधवर्म्या**च्या मनांत आलें. त्याणें त्याला खायला प्यायला देऊन वस्त्रेंही दिलीं. व 'सध्या तूं आपल्या चाकरींत तत्पर रहा,' असें सांगून त्याला कांहीं हिशेबठिशेब लिहिण्याचें काम नेमून दिलें.

ज्याला जी संवय लागलेली असते ती कांहींकेल्या जात नाहीं. दैवानें त्याच्या कपाळावर जें लिहिलें असेल तेंच कर्म तो वारंवार करीत असतो. व त्यापासूनच त्याचा नाशही होतो. **पवनसेन** त्या बेटावर गेला त्यावेळीं **राजदत्तेनें** वाईट काम करण्याविषयीं त्याला ह्मणजे फार आग्रह केला होता असें नाहीं. ती तर दोषी होतीच.

पण हाही तितकाच दोषी होता. तो दृढ निश्चयाचा व सदाचारी असता, तर युक्तिप्रयुक्तीनें तिला न दुखवितां त्याला टाळाटाळ करतां आली असती. व थोड्याच वेळांत राजाही त्याच्यावर प्रसन्न झाला असता. पण तो पडला मूळचाच दुराचारी. त्याणें खाण्यापिण्याची व वस्त्रपात्रादिकांची अथवा आपलें सर्वस्व गेलें त्याची काहीं काळजी न करतां एकदम तिच्यावर मन ठेविलें, हा कोण जुलूम! असो. त्यावेळीं त्याला कंठस्नानच घडायचें; पण आयुष्याची दोरी कांहींशी शिल्लक होती म्हणून तो वांचला. आतां तरी त्याणें तो नाद सोडून द्यायचा होता; पण तसें कोठून होणार? मृत्यूनें घेरला म्हणूनच कीं काय, त्याला दुष्ट वासना उत्पन्न झाली. त्या गलबताचा मालक **क्रोधवर्मा** याचें सर्व कुटुंब त्याच्याबरोबर होतें. **पवनसेनानें** त्यांतल्या त्यांत संधि साधून यजमानाच्या बायकोवर डोळा ठेवला. व दुर्दैवानें तिणेंही त्याचा शब्द खालीं पडूं दिला नाहीं. एकांतीं दोघांची क्रीडा चालली आहे, हें **क्रोधवर्म्याच्या** नजरेस पडलें. मग काय पुसतां? **क्रोधवर्माच** तो. आपल्या स्त्रीला दूषित करणाऱ्या त्या दुष्टाला त्याणें तत्काल त्याच्या तंगडीला धरून समुद्रांत लोटून दिलें. अर्थात् त्याच्या दुर्वर्तनाचें प्रायश्चित्त व सर्व क्लेशांची शांति करण्याकरतां जलनिधीनें त्याला आपल्या पाण्यांत समाधी दिली!

इकडे राजा **रत्नाधिपति** त्यादिवशीं फार अस्वस्थ होता. त्याणें पुष्कळ वेळ नीट विचार करून क्रोधरूप अग्नि अगदीं विझवून टाकला. एखाद्या फुलाच्या माळेसारखी **राजदत्ता** ही नेहमीं त्याच्या गळ्याला चिकटून असायची. पण यावेळीं ती एकीकडे रडत बसली होती. राजा तिला एक अक्षरदेखील बोलला नाहीं. तरी प्रत्येक मनुष्याला त्याचें दुष्कर्म हेंच लज्जा देत असतें. तसें वाईट कृत्य नवऱ्याच्या प्रत्यक्ष दृष्टी पडलें असतां, **राजदत्ते**सारखी चुकून तशा कर्माला प्रवृत्त झालेली स्त्री तर असो; पण नवऱ्याच्या हातावर तुरी देण्याच्या

कामांत पटाईत असलेली स्त्रीदेखील लाजल्यावांचून राहणार नाहीं. तिची ती दीन अवस्था पाहून राजाला फार दया आली. त्याणें इकडच्या तिकडच्या समाधानाच्या गोष्टी सांगून तिच्या मनांतला विषाद काढून टाकला; व नंतर तिला बरोबर घेऊन सर्व परिवारासह **श्वेतरश्मी**वर बसून तो पुनः रत्नकूट नगरींत प्राप्त झाला. तेथें आल्यावर **शीलवती**ला व तिचा यजमान **हर्षगुप्त** सावकार यांला बोलवून आणलें आणि **राजदत्ते**ला **शीलवती**च्या हवालीं केली. नंतर झालेला सर्व वृत्तांत प्रधानादिकांला निवेदन करून तो म्हणाला, "मित्रहो, मी भलत्याच नादांत शिरून आजपर्यंत कितीतरी दुःख भोगलें. हे विषयोपभोग स्वभावतः असार असून परिणामीं विरस होतात, असें जाणून ही मी त्यांवर आसक्त होऊन इतके दिवस विनाकारण दुःख अनुभवलें. वावटळी सारख्या चंचल बायका कधींतरी एका नियमानें राहणार आहेत काय? पण ही गोष्ट आधीं माझ्या लक्ष्यांत आली नाहीं. असो. झालें तें झालें. इतःपर मी स्त्रियांचा नाद कधींही धरणार नाहीं. आतां सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत जातों आणि **श्रीहरी**च्या चरणकमलांचा आश्रय धरितों. त्या प्रभूच्या आश्रयानें दुःखांचा उपभोग करण्यास पुनः मी पात्र होणार नाहीं."

असें सांगून पश्चात्ताप पावलेल्या राजानें तत्काल सर्वसंगपरित्याग केला. राज्य मुख्य प्रधानाच्या हवालीं करून तो त्याला म्हणाला, "जोंपर्यंत माझ्या हातांत सूत्रें होतीं तोंपर्यंत मी प्रजेच्या रक्षणाविषयीं जबाबदार होतों. आतां माझ्यावरचें सर्व जोखम मी तुझ्या शिरावर घातलें आहे. धर्मानें प्रजा पालन करशील तर परलोकसाधन करण्याविषयीं दुसरें कांहींच पुण्य करावयास नको व अधर्मानें वागशील तर नरकांत ओढून नेण्यास दुसऱ्या पापाचीही गरज नाहीं. तात्पर्य तूं जसा वागशील तदनुसार त्याचें फळ बरें अथवा वाईट तुला मिळणार आहे. मी तर आतां जोगी बनलोंच आहें. पाहिजे तर दुसरा

कोणी योग्य मनुष्य पाहून त्याला राजा कर. नाहीं तर तूंच राजा झालास तरी हरकत नाहीं. मी अधिकारी होतों तोंपर्यंत माझ्याकडून बरें वाईट जें कांहीं झालें तें सर्वांला माहीतच आहे. चांगलें अथवा वाईट जें कांहीं मीं केलें त्याचें जें फळ प्राप्त व्हावयाचें असेल तेंही मला भोगलेंच पाहिजे. आतां सर्वांला माझी शेवटची एवढीच विनंति आहे कीं, त्यांणीं माझें उदाहरण घ्यावें. ह्मणजे विषयांच्या आसक्तीनें मी एवढा पराक्रमी राजा असतांही कसा दुःखास पात्र झालों, याचा विचार करून त्यांणीं या दुष्ट विषयांच्या जाळ्यांत फसूं नये. शाश्वत आनंद देणाऱ्या हरीच्या चरणकमलाचें निरंतर ध्यान करून परलोक साधनाचा मार्ग पहावा."

याप्रमाणें सर्वांला सांगून, सचीव व इतर लोक वरचेवर नको म्हणत असतांही राजानें आपल्या हेतूप्रमाणें व्यवस्था केली. **शीलवती** व तिचा यजमान यांणीं पुष्कळ आर्जवें केलीं; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. विरक्त झालेल्या राजानें जामदारखान्यांत जितकें द्रव्य होतें त्यांतलें अर्धें महासाध्वी जी **शीलवती** तिला दिलें. आणि बाकी राहिलेलें सर्व ब्राम्हणांस वांटलें. **पापभंजन** हा त्याचा मुख्य प्रधान असून तो जातीनें ब्राम्हण होता. तो गुणवान् व लोकप्रिय आहे असें पाहून सर्व राज्य त्याला दिलें. नंतर विषयोपभोगाविषयीं निःस्पृह झालेला राजा कौपीन परिधान करून; अंगाला राख फासून **श्वेतरश्मि** हत्तीवर बसून तपोवनाला जायला निघाला. त्यावेळीं दुःखित होऊन राजाकडे पहात असलेल्या नगरवासी जनांच्या डोळ्यांवाटे अश्रूंच्या धारा गळूं लागल्या. राजा त्या हत्तीवर बसला मात्र, तों तत्काल त्याप्राण्यानें डोळे झांकले. आणि क्षणमात्रांत त्या जड शरीराचा त्याग करून तो दिव्य पुरुष बनला! ज्याच्या गळ्यांत हार आहे, बाहुभूषणें ज्याणें धारण केलीं आहेत, मस्तकावर मुकुट शोभतो आहे; अशा त्या दिव्य पुरुषाला पाहून चकित झालेल्या **रत्नाधिपतीनें**—"महाराज, आपण

कोण आहां ? व आपल्याला हें हत्तीचें शरीर कां प्राप्त झालें ?"
ह्मणून प्रश्न केला.

तो दिव्य पुरुष लोकांला आश्चर्य देत होत्साता ह्मणाला, "राजा, मी एक गंधर्व आहें. आह्मी दोघे बंधू आहों. **मलयपर्वतावर** आह्मी राहत होतों. माझें नांव **सोमप्रभ** आणि वडील बंधूला **देवप्रभ** ह्मणतात. त्या माझ्या वडील बंधूची अत्यंत प्रीतिपात्र अशी एकच स्त्री होती. तिचें नांव **राजवती**. प्रेमपाशानें बद्ध झाल्यामुळें कोठें जायचें असलें तर तो तिला नेहमीं आपल्या मांडीवर घेऊन जात असे. एकेदिवशीं त्या स्त्रीसहवर्तमान तो **सिद्धवास** नांवाच्या ठिकाणीं गेला. त्यावेळीं मीही बरोबर होतों. तेथें भगवान् **विष्णूचें** एक रमणीय मंदिर आहे. आह्मी उभयतां बंधू व ती माझी भावजय या तिघांनींही स्नान करून भक्तिपूर्वक **विष्णूची** पूजा केली. नंतर देवापुढें गायन करावें ह्मणून मंडपांत येऊन बसलों. **राजवती** गाऊं लागली व आह्मी दोघेही तिची साथ करीत होतों. इतक्यांत कोणी एक सिद्ध तेथें आला. देवाला नमस्कार करून तो आमच्याजवळ येऊन उभा राहिला. माझ्या भावजयीचें गाणें खरोखरच अप्रतिम होतें. त्याला लुब्ध झालेला व तिच्या रूपानें ज्याचें मन आकर्षित केलें आहे असा तो सिद्ध एकसारखा तिच्याकडे पहात पुष्कळ वेळ उभा राहिला.

तें त्याचें वर्तन माझ्या भावाला बिलकुल सहन झालें नाहीं. तो त्याचा धिःकार करून ह्मणाला, "अहो महाराज, तुह्मी सिद्ध असून साभिलाष होऊन परस्त्रीकडे पाहतां हें काय ?" माझ्या भावाला त्या वेळीं ईर्षा आणि क्रोध या दोन्ही विकारांनीं घेरलें होतें. त्या सिद्धानें त्याच्या प्रश्नाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. व आपला अपराध असतांही त्याची गणना न करून रागावून माझ्या भावाला ह्मणाला, "मूर्खा, तुला कांहीं अक्कल आहे का ? अरे, हिचें मधुर गायन गोड लागल्यावरून मी हिच्याकडे पाहत होतों. कामदृष्टीनें मी हिला पाहिलें नाहीं. असें

असून त्वां अविचारी पशूनें विनाकारण माझा अधिक्षेप केला. तस्मात् त्याबद्दल तुला दंड केलाच पाहिजे. गुणवती स्त्रिला कोण पाहिजे तो चाहतो. तिच्या गुणांवर दृष्टी देऊन कोणीं तिच्याकडे पाहिलें किंवा कोणीं तिच्यावर प्रेम केलें, ह्मणून त्याबद्दल इतकी ईर्षा बाळगण्याचें काय कारण? बायकोविषयीं तूं असा ईर्ष्यालू आहेस, याकरितां या स्त्रीसहवर्तमान तूं मनुष्ययोनींत पतन पावशील! व ही तुझी ईर्षा जिरण्याकरितां प्रत्यक्ष परपुरुषाशीं रत झालेली ही स्त्री तुझ्या दृष्टी पडेल!" याप्रमाणें शाप देऊन तो सिद्ध तेथून जाऊं लागला. त्यावेळीं मीही हूडपणानें त्याची थट्टा केली. त्यानें माझ्या भावाला शाप दिला याचा मला फार राग आला होता; ह्मणून तेथें जवळच एक पांढरा रंग दिलेला मातीचा हत्ती होता तो उचलून मी त्याच्या अंगावर मारला. तेव्हां मागें वळून त्याणें मलाही शाप दिला. तो ह्मणाला, "उनाड पोरा, ज्या पांढऱ्या रंगाच्या हत्तीनें तूं मला प्रहार केलास तशाच रंगाचा हत्ति होऊन तूं फार दिवसपर्यंत पृथ्वीवर संचार करशील!"

याप्रमाणें आम्हां उभयतांलाही शाप देऊन स्वारी चालती झाली. तेव्हां माझा वडील बंधू **देवप्रभ** याणें पाठोपाठ जाऊन हातांपायां पडून त्याला शांत केलें. नंतर तो दयाळू होऊन आह्माला उःशाप देता झाला. तो ह्मणाला, "अरे, रागाच्या भरांत मी तुह्मा सर्वांला शाप दिला हें वाईट झालें. पण आतां काय उपयोग! तो तुह्माला अवश्य भोगलाच पाहिजे." **देवप्रभाला** ह्मणाला, "जरी तूं मनुष्य होशील तरी एका द्वीपाचें आधिपत्य तुझ्या हातीं राहील. हा तुझा भाऊ हत्ती होऊन तुझें वाहन होईल. हा आकाशमार्गानें तुला पाहिजे तेथें घेऊन जात जाईल. तुझ्या जनानखान्यांत ऐंशीं हजार बायका असतील. तरी कांहीं प्रसंगावरून हजारों मनुष्यांसमक्ष, त्या स्त्रियांचें आचरण चांगलें नाहीं असें तुला समजून येईल. तशीच ही तुझी स्त्री **ताम्रलिप्ति** नांवाच्या नगरींत जन्मास येईल. तुला बायकांविषयीं तिरस्कार

जाहल्या नंतर हिच्याशीं तुझा विवाह होईल. नंतर ही एका पुरुषाशीं रत झाल्याचें प्रत्यक्ष तुला दिसल्यानें, तूं विरक्त होऊन ब्राह्मणाला राज्य देऊन तपोवनाला जायला निघशील. तेव्हां हा तुझा भाऊ प्रथम शापापासून मुक्त होत्साता सर्व हकीकत तुला निवेदन करील नंतर या स्त्रीसहवर्तमान तूंही शापापासून मुक्त होशील." असें सांगून तो सिद्ध निघून गेला. तेव्हां माझा वडील बंधू जो **देवप्रभ** तो प्रत्यक्ष तूंच; ज्या स्त्रीच्या आचरणावरून तुला वैराग्य झालें, ती **राजदत्ता** ही तुझी बायको."

**सोमप्रभ** गंधर्वानें असें सांगतांच **रत्नाधिपती** राजाला पूर्वजन्माचें स्मरण होऊन तो ह्मणाला, "अरेरे! **देवप्रभ** गंधर्व तो मीच! आणि ही **राजदत्ता** माझी बायको. हिचें नांव **राजवति**!" असें बोलून एका बाजूला रडत बसलेल्या **राजदत्तेला** तो घेऊन आला. व तिला त्याणें पूर्वजन्माचें स्मरण दिलें तेव्हां तीही, आपण कोण हें समजली. तत्काल त्या उभयतांनीं मानवदेहाचा त्याग करून दिव्यरूपें धारण केलीं. व गंधर्व झालेले ते उभयतां बंधू त्या स्त्रीसहवर्तमान, सर्व लोक पहात असतां **मलयाचलावर** निघून गेले."

ही कथा सांगून **रत्नप्रभा** म्हणाली, "या जगांत कोणीही कधींही स्त्रीला बलात्कारानें रक्षण करण्यास समर्थ होत नाहीं. सत्कुलांत उत्पन्न झालेल्या स्त्रियांला त्यांचें उत्तम शील हा जो एक मजबूत पाश आहे, तो मात्र नेहमी रक्षण करीत असतो. बायकांच्या संबंधानें ईर्षा धरणें हा अगदीं मूर्खपणा आहे. तीपासून फार दुःख मात्र होतें. व इतरांशीं द्वेष उत्पन्न होतो. शहाण्या पुरुषानें ईर्षा कधींही धरूं नये. नवरा ईर्षा धरतो, असें समजलें ह्मणजे बायका त्याला फसविण्याविषयीं फारच उत्सुक होतात." मोठी चतुर आपली स्त्री **रत्नप्रभा** हिणें सांगितलेली कथा ऐकून **नरवाहनदत्त** प्रधानांसहवर्तमान फार खुष झाला. व त्याणें त्यांतलें तात्पर्य आपल्या मनांत घट्ट धरलें.

याप्रमाणें **रत्नप्रभेनें** सांगितलेल्या कथेच्या ओघावरून **गोमुखा**लाही एक कथा आठवली. तो **नरवाहनदत्ता**ला म्हणाला, "राणीसाहेबांनीं सांगितलें तें खरें आहे. साध्वी स्त्रिया फारच विरळा. जिकडे पहावें तिकडे चंचल स्त्रियाच फार दिसतात. आणि त्यांचा स्वभाव चंचल असल्यामुळें त्यांच्यावर विश्वास ठेवणें हें मोठें धोक्याचें आहे. महाराज, यासंबंधानें एक कथा सांगतों ती ऐकावी. **माळवा** प्रांतांत **उज्जयिनी** नांवाची नगरी आहे. तेथें भगवान् **शंकर महाकाल** हें नांव धारण करून राहत असल्यामुळें ती नगरी साऱ्या विश्वांत प्रसिद्ध आहे. तेथें **निश्चयदत्त** नांवाचा एक व्यापारी पूर्वी राहत होता. तो इतर कोणताही व्यापार करीत नसे. त्याचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे जुगार खेळणें हा होता! तो प्रतिदिवशीं जुगारांत द्रव्य मिळवून, तिसऱ्या प्रहराच्या सुमारास **शिप्रा** नदींत स्नान करून **महाकालेश्वरा**ची पूजा करी. व नंतर दीन अनाथ व विद्वान् ब्राम्हण यांना दानधर्म करी. मग जेवणखाण आटपून अंगाला चंदनाचें सुवासिक तेल वगैरे लावून तांबूल भक्षण करून कांहीं वेळ चैनींत घालवीत असे. तो **महाकालेश्वरा**च्या पुढच्या स्मशानांत[१] जाऊन तेथें आपल्या अंगाला चंदन वगैरे लावीत असे, त्यावेळीं बाकी सर्व अंगाला चंदन लावतां येई; पण पाठीला मात्र लावतां येत नव्हतें. म्हणून तेथल्याच एका दगडी खांबाला आधीं चंदन ठिपून ठेऊन मग तो आपली पाठ त्याला घाशीत असे. बिचारा एकटाच असल्यामुळें त्याला असें करणें भाग पडे. याप्रमाणें त्याचा नित्यक्रम चालला होता. दररदिवशीं पाठ घांशीत गेल्यामुळें तो खांब एका बाजूनें चांगला गुळगुळीत झाला होता. एके दिवशीं चित्र काढण्याचें साहित्य बरोबर घेऊन

---

१:—येथें 'स्मशानांत' असें ह्मटलें आहे त्यावरून खरोखरीचें स्मशान असें समजूं नये. महादेव ज्या ठिकाणीं वास्तव्य करीत असेल त्या जागेला स्मशान हें एक विशेष नांव आहे.

एक चितारी तेथें सहज देवदर्शनाला आला होता. त्याच्या मनांत **गौरीचें** चित्र काढावें असें आलें. चित्र काढण्याला पाहिजे तसा गुळगुळीत तो खांबाचा भाग पाहून त्याणें तेथें एक सुंदर **पार्वतीचें** चित्र काढलें. इतक्यांत एक गवंडी आला. तोही मोठा कुशलच होता. तें सुंदर चित्र पाहिल्यावरून त्याला असें वाटलें कीं, 'कांहीं वेळानें हें चित्र पुसून जाईल. कारण गुळगुळीत दगडावर रंग फार वेळ कसा टिकणार? तेव्हां आपण हें खोदून तयार केलें तर कायम राहील.' असा विचार करून त्याणें तें खोदून तयार केलें. नंतर ते दोघेही यथेच्छ भजन पूजन वगैरे करून तेथून निघून गेले.

त्या दिवशींच रात्रीं **महाकालेश्वराची** पूजा करण्याकरिता एक विद्याधराची कन्या प्राप्त झाली. तिणें ती देवीची मूर्ती पाहून जणूं-काय त्या उत्तम मूर्तीनें जिचें मन वेधलें आहे, अशी ती भक्तिपूर्वक **गौरीची** पूजा करीत बसली. नंतर कांहीं वेळ विश्रांति घेण्याकरितां ती सूक्ष्म रूपानें त्या खांबांत शिरली. इकडे नित्यक्रमाप्रमाणें तो **निश्चयदत्त** वाणीही तेथें आला. काल चित्र वगैरे कांहीं नव्हतें व आज असें सुंदर चित्र कोणीं काढलें आहे, व त्याची कोणीं पूजाही केली आहे, हें पाहून **निश्चयदत्ताला** मोठें आश्चर्य वाटलें. नंतर नित्य-क्रमाप्रमाणें त्याणें आपल्या सर्वांगाला चंदन लावलें व पाठीला लावण्या-करितां त्याच खांबाच्या दुसऱ्या बाजूला तो बसला. चंदनाचा लेप करून तेथें पाठ घासूं लागला. हा प्रकार त्या खांबांत असलेल्या विद्या-धरकन्येनें पाहिला. ती चपलाक्षी **निश्चयदत्ताचें** स्वरूप पाहून मोहित होत्साति म्हणाली, "अरेरे! हा असा सुंदर पुरूष असूनही याच्या पाठीला चंदन लावणारें कोणी नाहीं हें काय? या मोठ्या नगरींतल्या स्त्रिया अगदीं अरसिक आहेत असें वाटतें. तसें नसतें तर याची कोणी तरी सोबत केली असती. बरें, तें असो. आतां आपण याच्या पाठीला चंदन लावावें," असा विचार करून त्या विद्याधरकन्येनें खांबां-

तून आपला हात बाहेर काढला. आणि स्नेहपूर्वक **निश्चयदत्ता**च्या पाठीला चंदन लावलें.

कसा झाला तरी तो स्त्रीहस्ताचा स्पर्श. त्याच्या योगानें पुरुषाच्या मनाला विकार झाल्यावांचून कसा राहील. **निश्चयदत्त** खांबाकडे पाठ करून बसला होता. त्याला विद्याधरीच्या हाताचा स्पर्श होतांच तत्काल, हा कोणा तरी स्त्रीचा हात असावा असें वाटलें. त्यांतून कंकणध्वनीही त्याच्या कानीं पडला. तेव्हां एकदम मागें फिरून त्याणें तिचा हात घट्ट धरिला. तिनें तो सोडवून घेण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला; पण **निश्चयदत्तानें** कांहीं केल्या सोडला नाहीं. तेव्हां ती खांबांतूनच त्याला ह्मणाली, "महाभागा, मी तुझा काय अपराध केला बरें? उगीचच्या उगीच तूं माझा हात धरलास तो कां? कृपा करून माझा हात सोडून दे."

हें ऐकून **निश्चयदत्त** तिला म्हणाला, "अपराध कसा नाहीं केलास? केवळ हाताच्याच स्पर्शानें माझ्या मनाला क्षोभ करणाऱ्या तुला अपराधी असें कां समजूं नये? मी तुझा हात मुळींच सोडणार नाहीं. जर मला प्रत्यक्ष दृष्टी पडशील तर मात्र कदाचित् सोडीन." विद्याधरीनें बराच वेळ 'नाहीं होय' करून शेवटीं प्रत्यक्ष दिसण्याचें कबूल केलें. **निश्चयदत्तानें** शपथ घ्यायला सांगितलें त्याप्रमाणें तिनें शपथही घेतली. तेव्हां त्याणें तिचा हात सोडला. नंतर क्षणमात्रानें, जिच्या शरीरांत कोणत्याही प्रकारची उणीव नाहीं अशी ती सुंदरी, जिचे नेत्र त्याच्या मुखाकडे आसक्त झाले आहेत अशी, प्रत्यक्ष होऊन **निश्चयदत्ता**च्या जवळ येऊन बसली. त्याणें "तूं कोणाची कोण?" म्हणून प्रश्न केल्यावरून ती म्हणाली, "**हिमालया**च्या शिखरावर **पुष्करावती** नांवाची नगरी आहे. तेथें **विंध्यपर** नांवाचा विद्याधरांचा राजा आहे, त्याची मी मुलगी. माझें नांव **अनुरागपरा.** मी येथें **महाकालेश्वरा**ची पूजा करण्याकरितां आलें आहे. कांहीं वेळ

विश्रांति घ्यावी म्हणून मी या खांबांत येऊन बसलें होतें. इतक्यांत तूं येथें येऊन पाठीला चंदन लावून घेत असतां मी या खांबांतून तुला पाहिलें. मदनाच्या मोहनास्त्राप्रमाणें तरुण स्त्रियांचें अंतःकरण मोहित करणाऱ्या तुला पाहून, प्रथमच प्रेमानें रंजित केलेल्या तुझ्या पाठीला चंदन लावल्याकारणानें मी आपला हातही रंगविला. मग या पुढें काय झालें तें सर्व तुला ठाऊकच आहे. आतां कृपा करून मला निरोप दे. मी आपल्या बापाच्या घराला जातें."

असें सांगून ती जाऊं लागली; तेव्हां निश्चयदत्त पुनः तिचा हात घट्ट धरून म्हणाला, "काय, तूं जातेस? पण मी कसा जाऊं देईन? तूं माझें मन चोरलेंस तें अद्याप मी परत घेतलें नाहीं. व तें घेतांही येत नाहीं. तेव्हां तूं माझी वस्तू चोरून जातेसना? मग तुला मी कसें जाऊं द्यावें?" असें बोलून त्याणें तिला घट्ट धरिलें. हें पाहून अनुरागानें वश झालेली ती अनुरागपरा म्हणाली, "सोड सोड; मला जाऊं दे. मी तुझें मन चोरून घेतलें असें म्हणतोस, पण माझेंही तूं घेतलें आहेस. उभयतांनीं एकमेकांची चोरी केली तेव्हां दोघेही सारखेच अपराधी आहोंत. तुझ्यासारख्या पुरुषाचा कोण त्याग करील? तुझें वचन मोडून माझ्यानें जाववत नाहीं; पण काय करूं? मला गेलेंच पाहिजे. जर तूं माझ्या नगरींत येशील तर मी खरोखर तुझ्या समागमाच्या सुखाचा लाभ अवश्य घेईन. यावांचून दुसरा कांहीं उपाय नाहीं. ती नगरी येथून फार दूर आहे. तरी तेथें जाणें फारसें कठीण नाहीं. तेथें आल्यावर तुझा हेतु अवश्य पूर्ण होईल. पक्का निश्चय धर. निश्चयानें काम करणाऱ्याला कोणतीच गोष्ट दुष्कर नाहीं." असें सांगून ती विद्याधरी तत्काल आकाशांत निघून गेली. इकडे निश्चयदत्तही तिच्यावर मन ठेवून आपल्या घरीं परत गेला.

निश्चयदत्ताला हावेळपर्यंत बायकांचें वेड लागलें नव्हतें. तो एकलकोंड्यासारखा आपल्याच नादांत वर सांगितलेल्या नित्यक्रमानें खुशाल

राहत होता. विद्याधरीची भेट झाल्यापासून त्याची स्थितीच बिघडली. एखाद्या झाडाच्या बुंधांतून कोमल अंकूर निघावा, त्याप्रमाणें त्या खांबातून निघालेला त्या रमणीचा सुंदर हात त्याच्या डोळ्यांपुढें दिसत होता. "अरेरे! धिक्कार असो. तिचा हात माझ्या हातांत सांपडला असूनही मला तिची प्राप्ति झाली नाहीं. तेव्हां आतां येथें राहून काय करायचें आहे? तिनें **पुष्करावती** नगरींत यायला सांगितलें आहे, त्याप्रमाणें तिकडेच जावें. दैवानें साह्य केलें तर तिची प्राप्ती होईल; नाहीं तर माझे प्राण तरी जातील. यावांचून दुसरी गति नाहीं," असा विचार करीत त्याणें तो दिवस व रात्र मोठ्या संकटानें आपल्या घरांत घालविली. दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहाटे उठून उत्तर दिशेकडे तोंड करून तो चालता झाला. स्त्रीनें ज्याचें मन हरण केलें आहे अशा पुरुषाची स्थिती कशी विलक्षण असते ती पहा. **निश्चयदत्त** घरचा एकटाच होता. मागें संभाळणारें दुसरें कोणीही नव्हतें. त्याचा स्वभाव एकलकोंडा असल्यामुळें कोणी मित्रही त्याला नव्हता. त्याचें घर म्हणजे केवळ निष्कांचन होतें असें नाहीं. जरी तो जुगार खेळत होता, तरी व्यवस्थेनें वागत असल्यामुळें त्याच्या घरादाराची स्थिती चांगली होती. ज्यावेळीं तो घरांतून बाहेर निघाला त्यावेळीं त्याणें कांहीं तरी विचार करायचा होता कीं नाहीं? आपण घर रिकामें टाकून जातों; याची मागें काय अवस्था होईल? हें त्याच्या मनांत आलें पाहिजे होतें. पण त्याणें त्याविषयीं कांहींच लक्षांत आणिलें नाहीं. एखाद्या भ्रमिष्टासारखा पहाटे उठला तो मुकाट्यानें चालता झाला. उघडच आहे, विचार वगैरे जो कांहीं करावयाचा तो मनानें. मनच जर ठिकाणावर नाहीं तर विचार कोण करणार?

**पुष्करावती** नगरी अमुकठिकाणीं आहे हें त्याला मुळींच माहीत नव्हतें. तरी ती **हिमाचलावर** आहे व **हिमाचल** उत्तर दिशेस आहे इतकें त्याला ठाऊक होतें. म्हणून तो त्याच दिशेकडे तोंड

करून निघाला. एक दोन मुक्काम गेला नाहीं तोंच त्याला आणखी तिघे सोबती मिळाले. ते व्यापारी असून उत्तरेकडच्याच प्रदेशांत जात होते. त्यांच्यासहवर्तमान मार्ग अतिक्रमण करीत मोठमोठीं शहरें, लहान खेडीं, जंगलें, नद्या, पर्वत इत्यादिकांला अतिक्रमण करून तो क्रमानें उत्तरेकडे असलेल्या म्लेंच्छ[1] देशांत येऊन पोंचला. तेथें गेल्यावर त्याची व त्याच्या मित्रांची फारच दुर्दशा झाली. तो एका काफलेवाल्यांच्या तडाक्यांत सांपडला. ते लोक **तार्तार** देशांतून व्यापाराकारितां तिकडे आलेले होते. त्यांणीं यांला जिंकून आपले गुलाम केले. **तार्तार**लोकांची ही एक मोठी क्रूर चाल होती. गोरगरीब कोणी त्यांच्या तावडींत सांपडले कीं, त्यांला ते बेलाशक आपले गुलाम करून इतर जिनसांप्रमाणें भरबाजारांत विकीत असत! **निश्चयदत्ता**वरही तोच प्रसंग आला.

ज्या काफलेवाल्यानें या चौघां मुशाफरांला गुलाम करून आपल्याबरोबर घेतलें होतें, त्याणें कांहीं दिवस आपल्याबरोबर ठेवून घेऊन नंतर दुसऱ्या एका काफलेवाल्याला त्यांना विकलें. तो काफलेवाला परत आपल्या देशीं गेला. तेव्हां आपल्या राजाला कांहीं तरी नजराणा पाठवायचा, त्याबद्दल विकत घेतलेले हे चार गुलाम

१—'म्लेंच्छ' हा शब्द फार प्राचीन आहे. अर्वाचीन लोक म्लेंच्छ म्हणजे मुसलमान असें समजतात; पण ही चूक आहे. म्लेंच्छ याचा धात्वर्थ—'अस्पष्ट बोलणारा' असा आहे, मुसलमानी धर्म उत्पन्न होण्यापूर्वीं हजारों वर्षें झालेल्या महाभारतादि ग्रंथांत म्लेंच्छ, त्यांचे आचार, त्यांचे राजे वगैरेंचें वर्णन आढळतें. सामान्यत: पंजाबाच्या पलीकडील प्रदेशांत, अर्थात् काबूल वगैरे ठिकाणीं राहणाऱ्या लोकांचें बोलणें अस्पष्ट असल्याचें अद्यापि अनुभवास येतें. त्या लोकांनीं मुसलमानी धर्म स्वीकारला म्हणून तेवढ्यानें त्यांची भाषाही बदलली असेल असें म्हणवत नाहीं. व मुसलमानांचा मुख्य पैगंबर जो महंमद त्याणें नवीन धर्मपंथ काढला; पण त्याबरोबरच त्याला नवी भाषा काढतां आली नसेल यांत काहीं संशय नाहीं. यावरून म्लेंच्छ म्हणजे अस्पष्ट बोलणारे लोक, अर्थात् पंजाबाच्या पलीकडचे, असें समजावें. मूळांत म्लेंच्छदेश म्हटला आहे तो बहुतकरून काबुलच्या आसपासचा प्रदेश असावा असें वाटतें.

त्याणें नजर पाठविले. तो राजा **तुर्क** देशांतला होता. त्याचें नांव **मुरवार**. क्रूर काफलेवाल्यानें आपल्या चाकरांच्या हातीं देऊन हे चार गुलाम त्या **मुरवारा**ला पाठविले होते; पण तो त्याचा राजा, हे गुलाम त्याच्या राजधानींत पोंचण्याच्या संधीस एकाएकीं मरण पावला. तेव्हां काफलेवाल्याच्या नोकरांनीं हे दुर्दैवी गुलाम त्याच्या पुत्राला नजर केले. ते घेऊन तो राजपुत्र ह्मणाला, "हा नजराणा माझ्या बापाचा आहे आणि तो त्याला त्याच्या एका मित्रानें पाठविला होता. तेव्हां तो आपण काय ह्मणून घ्यावा? बापाला अद्याप मूठमाती द्यायची असून तो समारंभ उद्यां सकाळीं व्हायचा आहे. तेव्हां त्याच्या प्रेताकारितां जो खळगा तयार केला आहे त्यांतच या नजराण्यालाही जागा द्यावी ह्मणजे झालें! मित्राकडून आलेली ही भेट घेऊन परलोकीं बाबांचा आत्मा संतुष्ट होईल" असा विचार करून **मुरवाराच्या** पुत्रानें ह्या चौघांही दुर्दैवी प्राण्यांचे हातपाय बांधून त्यांला अंधारकोठडींत कोंडून ठेविलें.

बिचारे ते चार प्राणी त्या अंधारकोठडींत यातना भोगीत पडले होते. **सूर्योदय** होतांच त्यांना समाधी मिळावयाची होती. तेव्हां यावेळीं त्यांची स्थिती कशी झाली असेल तिचें वर्णन काय करावें? **यम**राजाच्या रेड्याच्या गळ्यांतल्या घांटेचा आवाज त्यांच्या कानांत घुमघुमत होता. मरणाचीं जीं कांहीं सर्व लक्षणें व्हायचीं तीं आपोआपच झालीं होतीं. पुढें काय करावें तें कोणालाही सुचत नव्हतें. कांहीं बोलावें तर कोणी ऐकेल याची भीति. अशा स्थितींत अर्धी त्याची रात्र गेली. जिकडे तिकडे सामसूम झालें आहे, असें पाहून **निश्चयदत्त** आपल्या सोबत्यांला ह्मणाला, "गडे हो, तुह्मी असे हातपाय गाळून कां पडलां? अशा आणीबाणीच्या प्रसंगीं धैर्य सोडलें तर काय उपयोग होणार? भित्रे जसे भयाच्या कारणापासून पळत असतात, तसेंच भयही धैर्यशाली मनुष्यापासून पळत असतें. धैर्यानें विपत्ती

दूर होतात व कार्य सिद्ध होऊन सुख प्राप्त होतें. असा हा धैर्याचा प्रभाव आहे. याकरितां तुह्मी आपलें मन स्थीर करा. व संकटापासून मुक्त करणारी भगवती **दुर्गा**देवी हिचें स्मरण करा. यावेळीं तीच आपल्याला संकटांतून मुक्त करील; दुसरा कांहीं उपाय नाहीं." याप्रमाणें आपल्या सोबत्यांला धीर देऊन त्यांच्यासहवर्तमान **निश्चयदत्त** देवीची स्तुती करूं लागला. एकाग्र अंतःकरण करून तो ह्मणाला, "हे **महादेवि**, तुला नमस्कार असो! ज्यांला आळत्याचा रंग लावल्यामुळें मर्दन केलेल्या असुराच्या रक्तानेंच भिजले आहेत कीं काय असे दिसणारे, जे तुझे चरण ते सदैव आमच्या हृदयांत राहोत. विश्वाला उत्पन्न करणारी तूं अचिंत्यशक्ति आहेस. तूं आपल्या शक्तीच्या प्रभावानें सर्व जिंकलें आहेस. तुझ्यावांचून प्रत्यक्ष **शंकर**ही कांहीं करूं शकत नाहीं. तूं चेतना दिलीस ह्मणून हें सर्व जग आपापले व्यापार करतें. दुष्ट **महिषासुरा**चें मर्दन करून त्वां जगाचें रक्षण केलेंस. त्या तुला आमचें रक्षण करणें काय अशक्य आहे? तुझ्यावांचून यावेळीं आह्मांला मृत्यूच्या भयांतून सोडविणारा दुसरा कोणी नाहीं. शरण आलेल्यावर दया करणारे भगवति, आह्मा शरणागतांचें रक्षण कर."

याप्रमाणें एकाग्र अंतःकरणानें देवीची स्तुती करीत असतां थकल्या भागलेल्या **निश्चयदत्ता**ला तेथेंच गाढ निद्रा लागली. व त्याच्याबरोबर त्याचे सोबतीही निजले. थोडक्याच अवकाशांत **निश्चयदत्ता**ला स्वप्न पडून त्यांत देवीनें—" मुलांनो, उठा जागे व्हा आणि येथून खुशाल निघून जा. तुमचें बंधन नाहींसें झालें आहे व तुह्माला कोणी अटकावही करणार नाहीं," असें सांगितलें. **निश्चयदत्ता**बरोबरच त्याच्या सोबत्यांलाही असेच दृष्टांत झाले. तेव्हां तत्काल जागे होऊन पहातात तों हातापायांचीं बंधनें आपोआप गळून पडलेलीं. नंतर एकमेकांला आपापलीं स्वप्नें सांगून आनंदित होत्साते ते चौघेही तत्क्षणींच तेथून निघाले. त्यांच्यावर सक्त पाहरा होता; पण देवीच्या अनुग्रहानें

त्यांना कोणींच हटकलें नाहीं. दारें आपोआप उघडीं झालीं. व पहाऱ्यावरचे शिपाई झोंपीं गेले होते, यामुळें ते चौघेही खुशाल तेथून दूर निघून गेले. सूर्योदयापर्यंत त्यांणीं बरीच दूरची मजल मारली. नंतर एका ओढ्याच्या कांठीं बसून त्यांनीं प्रातःकालचें कृत्य आटोपलें.

आतां तेथून पुढें निघायचें, अशा वेळीं **निश्चयदत्ता**च्या सोबत्यांला दुसराच कांहीं एक विचार सुचला. ते त्याला ह्मणाले, "गड्या, या उत्तर दिशेला म्लेंच्छांची वस्ती फार आहे. ते स्वभावानें किती क्रूर व रानटी आहेत, याचा आपणां सर्वांलाही अनुभव आलाच आहे. येथून जसजसें पुढें जावें, तसतसें म्लेंच्छांचें प्राबल्य विशेष. तेव्हां आह्मांला असें वाटतें कीं ही दिशाच सोडून देऊन **दक्षिणे**चा रस्ता धरावा. आह्मा तिघांचा तर असा पक्का निश्चय झाला आहे; आतां तुझी मर्जी काय आहे ती सांग. त्वां एकट्यानें पुढें जावेंस हें आह्मांला बरें वाटत नाहीं. तथापि तशीच तुझी मर्जी असली तर मग आमचा कांहीं इलाज नाहीं. तूं आपला खुशाल जा. आह्मी मात्र येथूनच मागें फिरणार."

त्या तिघांनीं जो हा विचार काढला तो त्यांचा ठीकच होता. कारण ते कोठें तरी रोजगार धंदा करावा म्हणून निघाले होते. अमक्याच दिशेला जायचें असा कांहीं त्यांचा नियम नव्हता. पण **निश्चयदत्ता**ला तसें करतां येत नव्हतें. घरा दारावर पाणी सोडून तो निघाला होता तो कशाकरितां ? हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याला दक्षिणेकडे जाऊन काय करायचें? त्या तिघां सोबत्यांचा मागें फिरण्याचा निश्चय पाहून **निश्चयदत्तानें** स्वसंतोषानें त्यांला अनुमोदन दिलें. तो म्हणाला, "गडेहो, तुमचा विचार कांहीं वावगा नाही. या दिशेला अनेक संकटें येण्याचा संभव आहे खरा; तथापि मला तिकडेच गेलें पाहिजे. माझ्याबरोबर तुम्ही उगीच प्राणसंशयांत पडावें तें कां ? एकट्या माझेंच जें काय होणार असेल तें होवो. मी इकडेच जाणार. तुम्ही

खुशाल मागें परता." असें सांगून त्याणें त्या सोबत्यांला निरोप दिला. तेव्हां ते तत्काल **दक्षिण**दिशेस निघाले व **अनुरागपरेनें** ज्याचें आकर्षण केलें आहे असा **निश्चयदत्त** **उत्तरे**कडे निघाला.

मोठ्या जोरानें मार्ग क्रमण करीत **उत्तरे**कडे निघाला असतां त्याला चौघे संन्याशी भेटले. त्यांलाही तिकडेच जायचें होतें त्यांची याची सोबत जमली. बराचवेळ मार्ग क्रमण केल्यावर वाटेंत **वितस्ता**[1] नदी लागली. त्या संन्याशांसहवर्तमान नदी उतरून **निश्चयदत्त** पलीकडे जातो आहे तों **सूर्य** अस्ताचलाला जाऊन भिडला. तेव्हां तेथेंच संध्याकाळचा नेमधर्म आटपून फळें मूळें वगैरे कांहीं जवळ होतीं तीं खाऊन त्या पांचही प्रवाशांनीं पुढें चाल केली. तेथें जवळ निवाऱ्याचें स्थान नव्हतें. तेव्हां येथें राहणें आणि पुढें जाणें एकसारखेंच, असें समजून ते मार्ग चालूं लागले. जातां जातां पुढें लौकरच मोठें अरण्य लागलें. त्या झाडींत प्रवेश करण्यापूर्वीं लांकडांचे भारे आणणारे लोक वाटेंत त्यांना भेटले. हे कोणी तरी परदेशी प्रवासी आहेत असें समजून ते म्हणाले, "बाबांनों, पुढें कोठें चालला? येथून जवळ गांवशींव वगैरे कांहीं नाहीं. झाडी फार भयंकर आहे. रात्रीची वेळ, तेव्हां पुढें जाल तर फसाल. याउप्पर तुमची मर्जी. कदाचित् गेलांच तर या जंगलांत एक **शिवाचें** देऊळ तुह्माला लागेल तेथें तरी राहूं नका. तें अगदीं ओसाड आहे. त्याठिकाणीं पूजारी वगैरे कोणीएक राहत नाहीं. कारण रात्रीं तेथें राहणाराला मोठें भय आहे. देवळांत किंवा त्याच्या आसपास रात्रीं जर कोणी मनुष्य राहिला तर **शृंगोत्पादिनी** नांवाची एक यक्षीण तेथें राहते; ती त्या माणसाला प्रथम शिंगें उत्पन्न करून त्याला मोहित करून पशु करिते. आणि शेवटीं खाऊन टाकते असें आहे."

हें ऐकून **निश्चयदत्त** कांहींच बोलला नाहीं. तरी तो विचारांत पडला

---

१—या नदीला सांप्रत झेलम म्हणतात. ही काश्मीरांतून थेट लदाक शहरापर्यंत वहात गेली आहे.

होता. पण त्याच्या बरोबरचे चौघे संन्यासी ह्मणाले, "अँः त्यांत काय आहे! अरे तूं चल आमच्याबरोबर ती बिचारी यक्षीण काय करते आमचें तें पाहूं. आम्ही मोठमोठ्या स्मशानांत रात्रीच्यारात्री घालविल्या आहेत. वेताळासारख्यांची आम्हाला भीती वाटत नाहीं तेथें यक्षिणीची काय परवा?" ते संन्याशी मोठे मांत्रिक होते. आपल्या विद्येच्या घमंडीवर त्यांणीं लाकूडतोड्यांनीं सांगितलें त्याचा उपहास केला! **निश्चयदत्ता**ला तसें साहस करूंनये असें प्रथम वाटलें होतें. पण त्या संन्याश्यांनीं जोर दिला तेव्हां " जें होईल तें होवो " असें म्हणून तो त्यांच्या बरोबर निघाला.

प्रहरदहा घटका रात्रीच्या सुमारास ते पांचही असामी लांकूडविक्यांनीं सांगितलेल्या त्या ओसाड शिवालयांतच येऊन पोंचले. **निश्चयदत्त** त्या देवळांत गेला. त्यानें इकडे तिकडे फिरून पाहिलें पण कांहीं जागमाग दिसली नाहीं. नंतर देवाच्या समोरच आंगणांत झाडून जागा साफ केली. संन्याशांनीं अभिमंत्रित केलेल्या भस्मानें एक मंडल तयार केलें. **निश्चयदत्तानें** जवळचीं लांकडें गोळा करून आणून त्या मंडलाच्या मध्यभागीं धुमी पेटविली. व त्या यक्षिणीची बाधा न व्हावी म्हणून मंत्रजप करीत **निश्चयदत्ता**सहवर्तमान ते चौघे संन्याशी मोठ्या धैर्यानें बसले.

सुमारें मध्य रात्र उलटून गेल्यावर, मनुष्यांच्या हाडांची किनरी वाजवीत नाचत नांचत ती **शृंगोत्पादिनी** यक्षिणी तेथें आली. तिणें प्रथम ज्या मंडळांत **निश्चयदत्त** व त्याचे सोबती बसले होते, त्याच्या सभोंवती एक दोन वेळ घिरट्या घातल्या. नंतर त्या चार संन्याशांतून एकावर दृष्टि लावून मंडलाच्या बाहेरच तोंडानें मंत्र ह्मणत तिणें नृत्य सुरू केलें. त्या मंत्राचा असा कांहीं विलक्षण प्रभाव कीं, तत्काल त्या संन्याशाला शिंगें उत्पन्न झालीं! व मोहित होत्साता तो आपल्या आसनावरून उठून एकसारखा नाचूं लागला. नाचत नाचत जवळच पेटत

असलेल्या अग्नींत जाऊन पडला. त्याला देहाची मुळीं शुद्धच राहिली नव्हती. अग्नींत पडल्यावर तो अर्धा जळत आहे इतक्यांत त्या **शृंगोत्पादिनी** यक्षिणीनें आकर्षणमंत्रानें त्याला आपल्याकडे ओढून घेऊन खाऊन फस्त केलें. नंतर आनंदानें पुन्हां दुसऱ्या संन्याशावर दृष्टि लावली आणि पूर्वींप्रमाणेंच शिंगें उत्पन्न करायचा तो मंत्र ह्मणत नृत्य करूं लागली. तेव्हां मंत्रप्रभावानें ज्याला शिंगें उत्पन्न झालीं आहेत, असा तो दुसरा संन्याशीही एकदम आसनावरून उठून नाचूं लागला. व मोहित होत्साता पाहिल्याप्रमाणेंच तोही अग्नींत पतन पावला. तेव्हां दुसरे संन्याशी पहात असतां यक्षिणीनें त्याचें शरीर बाहेर ओढून घेऊन, मिटक्या मारीत भक्षण केलें. याप्रमाणें मोहित करून तिणें ते चारही संन्याशी मटमटावून टाकले. चौथ्या संन्याशाला खात असतां; पूर्वीं खाल्लेल्या तिघां संन्याशांचें मांस व रक्त यांच्या योगानें ती उन्मत्त झाली होती.

क्रमा क्रमानें आतां **निश्चयदत्ता**वर ती पाळी यायची होती. व त्याला ती कोणत्याही रितीनें मुळींच चुकवितां आली नसती. पण त्याचें आयुष्य भरपूर असल्यामुळें त्याला वांचण्याची उत्तम संधी मिळाली. चौघां संन्याशांची मेजवानी ताजी मिळाल्यामुळें तिला खूप आनंद झाला होता. व त्याच्या बहरांत ती नृत्य करूंलागली होती. एकीकडे संन्याशाचें मास खायाचें व दुसरीकडे नृत्य करायचें अशा दोन व्यापारांकडे लक्ष्य द्यायचें असून यावेळीं ती उन्मत्तही झाली होती. यामुळें हातांतली किनरी तिला संभाळतां आली नाहीं. तेव्हां तिनें ती आपणच एका बाजूला काढून ठेविली. **निश्चयदत्ता**ला ती संधी उत्तम मिळाली. त्याणें चटकन् आपल्या जाग्यावरून उठून इकडे तिकडे न पाहतां ती तिची किनरी हातांत घेतली व तो धैर्यशाली **निश्चयदत्त** स्वतः नाचूं लागला. त्याचें तें हंसणें नाचणें बागडणें इतकें कांहीं विलक्षण होतें कीं, त्यावेळीं पाहणाराला तो उन्मत्त झाला आहे असेंच वाटावें.

शृंगोत्पादनाचा मंत्र त्या यक्षिणीनें वरचेवर चारवेळ मोठ्यानें म्हटला होता, त्यामुळें तो **निश्चयदत्ताला** सहजच पाठ झाला होता. किनरी वाजवून त्या यक्षिणीवर दृष्टी लावून **निश्चयदत्तानें** मंत्रपाठ सुरू केला. तेव्हां ती बिचारी अगदी घाबरी झाली. आतां आपणही मरतें कीं काय असें तिला वाटलें. कारण, स्वतः तिलाच शिंगें उत्पन्न झालीं! तेव्हां अत्यंत नम्र होऊन ती **निश्चयदत्ताला** म्हणाली, "महाभागा, तुझ्या आकृतीवरूनच तूं उदार पुरुष आहेस असें दिसतें. मी बायको मनुष्य आहें. मला मारून तुला काय फायदा होणार आहे? त्यांतून मी शरण आलें आहें. यावेळीं तुझ्यावांचून मला दुसरा कोणीही रक्षण करण्यास समर्थ नाहीं. कृपा करून मंत्र म्हणायचें तेव्हढें बंद कर आणि ती किनरी वाजवूं नकोस म्हणजे झालें. माझें रक्षण करशील तर मी तुला साह्य करणारी होईन. तूं कोणतें कृत्य करण्याची इच्छा करीत आहेस व तूं इकडे कां आला आहेस हें सर्व मला माहित आहे. तो तुझा हेतू पूर्ण होण्याच्या कामीं मी तुला पुष्कळ मदत करीन. तुझी प्रिया **अनुरागपरा** विद्याधरी ज्या ठिकाणीं आहे तेथें मी तुला नेऊन पोंचवीन. याहून तुझें दुसरें मी काय सहाय करूं?"

याप्रमाणें त्या यक्षिणीनें त्याची प्रार्थना केली. व त्याला साह्य करण्याचें जें तिणें कबूल केलें त्याच्याविषयीं अन्यरितीनें त्याची पूर्ण खात्री केली. तेव्हां धैर्यशाली **निश्चयदत्त** याणें तिची विनंती मान्य करून मंत्र म्हणायचें बंद केलें. नंतर, आपल्याला कोणीकडे जायचें तें **निश्चयदत्तानें** सांगितल्यावरून यक्षिणीनें त्याला आपल्या खांद्यावर घेतलें आणि उत्तरेकडे मोठ्या झपाट्यानें ती निघाली. क्षणमात्रांत कोसांचे कोस अतिक्रमण करणारी, ती **शृंगोत्पादिनी** आकाशमार्गानें वाऱ्यासारखी चालत होती. आपल्या प्रियेला भेटण्याविषयीं घाई घाईनें जाणाऱ्या **निश्चयदत्ताला** यक्षिणीसारखें त्वरित गमन करणारें तें वाहन मिळाल्यामुळें, मोठा आनंद झाला. सूर्योदयाच्या सुमारास शेंकडो

कोंसावर एका पर्वतावरच्या दाट अरण्याजवळ तो येऊन पोंचला. तेव्हां ती यक्षीण मोठ्या नम्रतेनें **निश्चयदत्ता**ला ह्मणाली, " महाभागा, क्षमा कर. **सूर्य** उदय झाला; आतां माझी गति कुंठित झाली. आम्ही केवळ रात्रीं संचार करणाऱ्या आहोंत. दिवसा आमचें कांहीं चालत नाहीं. याकरितां तूं **सूर्या**चा अस्त होईपर्यंत या रमणीय अरण्यांत विश्रांती घे. येथें गोडगोड फळें आहेत तीं खा. स्वच्छ व उत्तम झऱ्याचें पाणी आहे तें पी. आतां मी आपल्या स्थानास जातें. आणि **सूर्या**स्त होतांच परत येऊन, तुला तुझी प्रिया जी **अनुरागपरा** तिच्याजवळ घेऊन जाईन. **हिमाचला**च्या मस्तकावरची पुष्पमालाच कीं काय अशी ती **पुष्करावति** नगरी येथून बरीच दूर आहे; तरी मला तेथें जाण्यास फारसा वेळ लागायचा नाहीं."

असें सांगून **निश्चयदत्ता**ची आज्ञा घेऊन, तिणें त्याला आपल्या खांद्यावरून खालीं उतरलें. जिणें आपल्याबरोबरचे चार संन्याशी खाऊन टाकले, जिचें सामर्थ्य विचित्र, जिचा ठावठिकाण मुळींच माहीत नाहीं, अशा त्या यक्षिणीवर भरंवसा ठेवला, आणि प्रत्यक्ष मृत्यूच्या खांद्यावरच बसून **निश्चयदत्त** इतक्या दूर आला व आतां तिणें जातें ह्मणून सांगितलें तेव्हां त्यानें तिला निरोप दिला, या गोष्टीचा वाचकांस मोठा अचंबा वाटेल. व **निश्चयदत्त** हा एक मूर्ख मनुष्य असावा, असेंही कदाचित् कोणी ह्मणेल; पण त्याणें आपल्या हातची अणी सोडून सर्वस्वीं त्या यक्षिणीच्या वचनावर भरंवसा ठेवला तें युक्तच केलें. कारण भूत, प्रेत, पिशाच, यक्षिणी इत्यादि देवयोनी हे सत्य वचनी असतात. मनुष्यें पाहिजे तशीं अप्रामाणिक बनतात. पण त्यांच्या हातून तसें कधींही होत नाहीं. हा अगदीं सिद्धांत असल्या-वरून **निश्चयदत्ता**नें तिच्यावर विश्वास ठेवला हें योग्यच केलें. असो.

वर सांगितल्याप्रमाणें **निश्चयदत्ता**ची आज्ञा घेऊन सत्यप्रतिज्ञ ती यक्षीण तेथून निघून गेली. इकडे **निश्चयदत्त** स्नान वगैरे नित्य-

कृत्य आटपण्याकरितां कोठें जलाशय आहे काय? ह्मणून पाहूं लागला, तों त्याला जवळच एक सरोवर दृष्टी पडलें. त्याचें पाणी फार खोल होतें, तरी अगदीं निवळशंख असून गार होतें. त्याच्या आंत मात्र विष होतें. नुकत्याच बाहेर आलेल्या **सूर्यानें** आपले कर ( किरण ) पसरून—'हे विषयी पुरुषा, स्त्रियांचें चित्त असेंच, ह्मणजे बाहेरून कोमल व आंत कठोर आहे,' ह्मणून दाखविलेलें तें सरोवर पाहून **निश्चयदत्त** त्याच्या जवळ गेला. तो स्वभावतःच मोठा चौकस व धूर्त होता. पाण्याचा वास आला त्यावरूनच त्याणें तें सविष आहे, असें जाणून त्याचा त्याग केला. त्याला स्नान वगैरे करायचें होतें, व तहानही फार लागली होती. ह्मणून तो दुसरा जलाशय शोधीत त्या दिव्य पर्वतावर फिरूं लागला. फिरतां फिरतां त्याला एका उंचवट्यावर दोन **पद्मरागमणी** दिसल्याचा भास झाला. हीं खरोखरीच रत्नें असतील असें समजून त्याणें तेथें खणलें. वरची माती काढून टाकली तेव्हां जिवंत असलेल्या एका माकडाचें डोकें दिसलें. त्याला मण्यांसारखें जें दिसलें होतें, ते त्या माकडाचे डोळे होते. तें त्या माकडाचें मस्तक पाहून **निश्चयदत्त** आश्चर्य करीत आहे, व हें काय आहे याचा विचार करितो आहे, इतक्यांत मनुष्यवाणीनें तो मर्कट त्याला ह्मणाला, "हे उदार पुरुषा, मी मनुष्य असून मर्कट झालों आहें. मी जातीचा ब्राह्मण आहें. कृपा करून मला वर काढशील तर मी आपला सर्व वृत्तांत तुला सांगेन."

**निश्चयदत्ताला** हा काय चमत्कार आहे तो समजून घेण्याची मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली होती. त्यांतून—'मनुष्य असून माकड झालों,' असें त्याणें सांगितल्यावरून तर त्याला फारच उत्कंठा लागली. व तो प्राणी जमीनींत गाडला गेला होता ह्मणून त्याची दयाही आली. त्याणें भराभर माती एकीकडे काढून त्या माकडाला जमीनींतून वर काढलें. वर आल्यावर आंग झाडून तो हुषार झाला. व **निश्चयदत्ताच्या**

पायांवर डोकें ठेवून दीन वाणीनें ह्मणाला, "संकटांतून मुक्त करणाऱ्या दयाळु पुरुषा, आज तूं मला प्राण दिलेस. तर चल आतां माझ्या-बरोबर. तूंही श्रमला आहेस असें वाटतें. मधुर फळें खाऊन पाणी पी. तुझ्या प्रसादानें मीही आज फार दिवसांच्या उपोषणाचें पारणें करीन," असें सांगून त्या माकडानें त्याला दूर एका डोंगराच्या पायथ्यापाशीं नदी वाहत होती तिच्या किनाऱ्याशीं नेलें. तेथें थंडगार छाया, गोड फळें व मधुर उदक यथेच्छ होतें. **निश्चयदत्ता**ला त्या माकडा-विषयीं कांहींच शंका आली नाहीं. त्याणें जसें जसें सांगितलें तसें तसें त्या पुरुषानें केलें. त्या नदीच्या स्वच्छ व पवित्र उदकांत स्नान करून पोटभर फळें खाल्लीं व पाणी पिऊन **निश्चयदत्त** ताजातवाना झाला. इकडे त्या माकडानेंही स्नान करून पारणें केलें. नंतर ते दोघे मित्र एके ठिकाणीं विश्रांती घेत बसले. तेव्हां **निश्चयदत्तानें** मनुष्य असून तूं माकड कसा झालास? तें सांगण्याविषयीं विनंती केल्यावरून माकड आपली हकीकत सांगूं लागला.

तो ह्मणाला, "गृहस्था, मला अशी स्थिती प्राप्त होण्याचें कारण काय तें सांगतों ऐक. **वाराणसी** नगरींत **चंद्रस्वामी** नांवाचा मोठा विद्वान् व कुलीन ब्राह्मण होता. त्याच्या स्त्रीचें नांव **सुदत्ता**. तिचा मी मुलगा. माझें नांव **सोमस्वामी**. मित्रा, तुला काय सांगूं? आमचें कुळ, माझ्या बापाचा नांव लौकिक व आमच्या घरची स्थिती यांची आठ-वण झाली ह्मणजे मला रडूं येतें. मला अशी दुर्दशा भोगावी लागली याबद्दल दुसऱ्या कोणावरही बोल ठेवतां येणार नाहीं. माझ्याच क-र्मानें मला हें दुःख प्राप्त झालें आहे. असो. आईबापांनीं माझें उत्तम प्रकारें पालन पोषण केलें. दिवसेंदिवस मी प्रौढ होत गेलों. **मदनरूपी** मदोन्मत्त अशा हत्तीवर मी पुरता आरूढ झालों. मग काय विचारतोस? तो निरंकुश हत्ती जिकडे जिकडे नेईल तिकडे तिकडे मी सारखा धांवत होतों!

तारुण्याचा ऐन बहर, प्रपंचाची कांहीं काळजी नाहीं, आईबापांचा लाडका आणि रूपानें सुंदर असा मी; मदांध होऊन यथेच्छ विहार करूं लागलों. एके दिवशीं त्या नगरींत राहणाऱ्या **श्रीगर्भ** नामक सावकाराची मुलगी आपल्या माडीवर खिडकींत उभी राहिली होती, तिची माझी दृष्टादृष्ट झाली. तिचें नांव **बंधुदत्ता**. ती **मथुरें**त राहणाऱ्या **वराहदत्त** नामक एका सावकाराची बायको असून सांप्रत माहेरीं राहत होती. त्या तरुणीनें पाहतांच माझें मन व मीही तिचें मन हरण करून आह्मी एकमेकांनीं अदलाबदल केली. व **मदनशरांनीं** होणाऱ्या व्यथेचे दोघेही समविभागी झालों.

माझें चित्त तिच्यावर आसक्त झालें होतें तरी तिच्यापर्यंत जाण्याची माझी छाती नव्हती; पण ही अडचण तिणें दूर केली. मोठ्या श्रीमंताची मुलगी ती ; तिच्याजवळ दासदासी वगैरे नोकर पुष्कळ होते. तिणें तत्काल आपल्या विश्वासांतली एक दासी माझ्याकडे पाठविली. माझे डोळे व मन जरी तिच्यावर आसक्त झालें होतें; तरी शरीर रस्त्यानें पुढें चाललें होतें. 'देवा हिचा आणि माझा समागम होईल काय?' असें मी मनांत ह्मणत आहें, इतक्यांत घाबऱ्यां घाबऱ्यां तिची दासी माझ्याजवळ येऊन पोंचली. तिणें नेत्रसंकेत करून मला एका बाजूला नेलें; आणि आपल्या यजमाननीचा हेतू काय आहे, तो मला कळविला. मी तर त्याबद्दल देवाला नवसच करीत होतों. तिणें आपण होऊन माझ्याजवळ गोष्ट काढतांच मी तत्काल तिची विनंती मोठ्या आनंदानें कबूल केली. पुढें कसें काय करायचें तें ती आधींच समजली होती. व त्याबद्दल त्या दोघींचें बोलणेंही झालें होतें. त्यांणीं जो संकेत केला होता; त्याप्रमाणें तिच्या सखीनें मला आपल्या घरीं नेऊन ठेविलें.

तेथें मला एका खोलींत बसवून ती तशीच लगोलग त्या **बंधुदत्ते**कडे गेली. व नंतर बऱ्याच वेळानें ह्मणजे **सूर्यास्त** झाल्यावर त्या

दोघीही तेथें आल्या. खोलीचें दार लावलेलें होतें. व आंत भुतासारखा एकटाच मी त्या सावकारकन्येची वाट पहात बसलों होतों. इतक्यांत हळूच दार उघडून ती दासी आंत आली. तिला पाहून माझें मन अंमळ टवटवीत होत आहे, इतक्यांत माझी ती हृदयवल्लभा बंधुदत्ताही दृष्टी पडली. मग काय विचारतोस? औत्सुक्यानें जिची लाजलज्जा एकीकडे सारली आहे, अशी ती कामांध झालेली, सावकारकन्या एकदम माझ्या गळ्याला मिठी मारून प्रेमाश्रू गाळूं लागली. मित्रा, तुला या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटेल. पूर्वीचा कांहीं परिचय किंवा कधीं बोलणें चालणें देखील नसतां एकदम परपुरुषाच्या गळ्याला मिठी घालण्याचें धैर्य तिनें कसें केलें? असें तूं ह्मणशील व तें खरेंही आहे. कारण बोलून चालून ती स्त्री; अर्थात् अबला. तिच्या हातून असें धारिष्ट होणें हें चमत्कारिकच. पण त्या वेळचें धैर्य हें स्वतः तिचें नव्हतें. तर तिच्या अंगांत संचारलेला जो मदनवीर त्याचें तें धैर्य होतें. काम स्त्रियांच्या शरीरांत प्रविष्ट होऊन तो तुफान झाला ह्मणजे त्याच्या सारखा दुसरा कोणीही शूर मिळायचा नाहीं. असो.

पुढें आह्मा उभयतांचा जो कांहीं सुखाचा सोहळा व्हायचा तो झाला. दोघांची दोस्ती पक्की झाली, हें तर तुला सांगावयासच नको. कारण स्त्रियांच्या मैत्रीचा उत्कर्ष काय तो समागमानें होत असतो. पुष्कळ वेळ आह्मा उभयतांचा प्रीतिसंवाद चालला होता. नंतर प्रतिदिवशीं अमुक वेळीं मीं व तिणें त्याच ठिकाणीं यावें; आणि परस्परांच्या भेटी होत असाव्यात असा संकेत ठरून, फार वेळ झाल्यामुळें निरुपायास्तव तिणें माझा निरोप घेतला. खरें विचारशील तर निरोप तो कसला? तिणें गळ्याला मिठी घातल्यापासून मीं आपण होऊन कांहींच केलें नाहीं. ती जसें वागवील तसा वागलों. तिणें सांगितलेल्या गोष्टी मान्य केल्या. जायला निघाली, तेव्हां उगीच तिच्या तोंडाकडे पाहत बसलों इतकेंच; दुसरें कांहींच माझ्या

हातून झालें नाहीं. ती निघून गेल्यावर तिचा वियोग ज्याला असह्य झाला आहे, असा मी सुस्कारे टाकीत कसा तरी आपल्या घरीं निघून गेलों. त्या दिवसापासून प्रतिदिवशीं त्याच ठिकाणीं आह्मा उभयतांच्या भेटी होत असत. प्रतिदिवशीं नवेनवे विलास व भोग यांच्या योगानें मी इतका कांहीं आनंदित होतों कीं, सारा वेळ त्यांवांचून मला दुसरें कांहीं सुचत नव्हतें. माझ्या डोळ्यांवर धुंदी आली होती. एखाद्याला साम्राज्य मिळालें तरी जो मद चढायचा नाहीं, तो एका यःकश्चित् त्या स्त्रीच्या समागमास पात्र झाल्यामुळें मला चढला होता. मित्रा, त्यावेळच्या माझ्या स्थितीचें वर्णन काय करूं ? मला तसें कां वाटत होतें याचें कारणच कांहीं समजत नाहीं.

याप्रमाणें सुखाचा अनुभव घेत असतां बरेच दिवस गेले. सुखाच्या पाठीमागें दुःख हें आपलें असायचेंच. पुढें लौकरच मला दुःख भोगण्याचा प्रसंग येण्याची सुरवात झाली. ती माहेरी फार दिवस राहिली ह्मणून तिला नेण्याकारितां **मथुरेहून** तो तिचा नवरा **वराहदत्त** आला. जांवईबुवा फार दिवसांनीं आले, ह्मणून सासऱ्यानें स्नेहपूर्वक त्याला कांहीं दिवस ठेवून घेतलें. त्याचें आदरातिथ्य उत्तम प्रकारें केलें. नंतर तो जायला निघाला. **बंधुदत्ते**ला घेऊन जाणार असें सांगितल्यावरून बापानें तिला पाठविण्याची तयारी केली. तिचा नवरा आला त्या दिवसापासून माझ्याशीं फार वेळ समागम करण्यास तिला सवड मिळत नव्हती. तथापि ती प्रतिदिवशीं मला भेटल्यावांचून राहत नव्हती. नवरा आल्याचें वर्तमान मला तिनें मुळींच कळविलें नाहीं. लवकर कां जातेस ह्मणून विचारलें; ह्मणजे कांहीं तरी निमित्त सांगत असे. **वराहदत्ता**चा तेथून निघण्याचा निश्चय झाला तेव्हां मात्र तिला मोठें संकट पडलें. जिनें तिला माझी भेट करून दिली होती ती तिची मैत्रीण तिच्या पूर्ण विश्वासांतली होती. तिचें सर्व हितगुज तिला समजलें होतें. तेव्हां **बंधुदत्ता** तिला ह्मणाली, "गडे,

खरोखर आतां माझा नवरा मला **मथुरेस** घेऊन जाणार. मी पुष्कळ आढेवेढे घेतले; पण तो कांहीं ऐकत नाहीं. कदाचित् मी फारच हट्ट घेईन तर त्याला भलतीच एखादी शंका येईल. तशांतून बाबांनीं देखील मला पाठवायची तयारी केली आहे. तेव्हां आतां गेल्यावांचून सुटका नाहीं. पण गडे त्या **सोमस्वामी**चा मला वियोग सहन व्हायचा नाहीं. तुला खरें सांगतें; तो माझ्या दृष्टि आड झाला तर मी खचित वांचणार नाहीं. तेव्हां आतां या संकटांत काय तोड काढावी तें सांग. मला प्रत्येक वेळीं तूं मोठें साहाय्य करतेस. सासरीं तर गेलेंच पाहिजे. आणि त्या माझ्या प्राणविसाव्याचा वियोग तर सहन होत नाहीं. तेव्हां याविषयीं तूंच कांहीं तरी उपाय सांग."

याप्रमाणें गळ्याला मिठी घालून ढळढळ रडत तिणें आपल्या मैत्रिणीला विचारलें; तेव्हां ती **सुखशय्या** तिला ह्मणाली, "अग, तूं अशी रडतेस हें बाई मला बरें वाटत नाहीं. एका योगिनीची पूर्वीं मी पुष्कळ सेवाचाकरी केली होती. तिणें मला दोन मंत्र दिले आहेत. त्यांतून एका मंत्रानें काळें सूत कोणाही मनुष्याच्या गळ्यांत बांधलें ह्मणजे तत्काल तो माकड होतो असें आहे. आणि दुसरा मंत्र ह्मणून तें सूत सोडून टाकलें ह्मणजे माकडाचा पुन्हां तोच मनुष्य होतो. तो माकड बनला तरी त्याची प्रज्ञा नष्ट होत नाहीं. ह्मणून मी असें ह्मणतें कीं; तो तुझा प्रिय **सोमस्वामी** जर कबूल असेल तर मी तुला ते दोन्ही मंत्र शिकवितें. त्यांच्या साह्यानें तुझा हेतू पूर्ण होईल. तूं त्याला माकड करून क्रीडेकरितां आपल्या बरोबर घेऊन खुशाल सासरीं जा. त्याचा माकडाचा आकार पाहून रात्रंदिवस त्याला जवळ ठेवलेंस तरी तुझा नवरा कांहीं शंका घेणार नाहीं. व तुला एकांतीं पाहिजे त्यावेळीं आपला हेतू पुरवून घेतां येईल! कशी काय तुझी मर्जी आहे ती सांग. मी आतांच पाहिजे तर त्याला माकड करतें."

**सुखशय्या** मैत्रीण हिनें याप्रमाणें सांगितलें तेव्हां **बंधुदत्तेच्या** तोंडावर अंमळ टवटवी आली. तिला—'त्याचें अनुमत घेऊन तुला काय तें कळवितें' असें सांगून तिणें मला तेथें बोलवून नेलें. कोणता प्रसंग आला आहे, त्या दोघींचा काय विचार झाला आहे, यांतलें मला मुळींच कांहीं माहीत नव्हतें. मी नित्याप्रमाणें तिला भेटलों. तेव्हां माझ्या गळ्याला मिठी मारून तिनें जो हंबरडा फोडला त्याणें माझें धैर्य, विवेक, शहाणपण वगैरे चट् सारें नाहींसें केलें. 'अग, अशी रडतेस कां? काय झालें तें सांग तरी,' असें मी वरचेवर विचारलें तरी कांहीं उत्तर न देतां ती अधिकाधिकच रडूं लागली. 'आतां तूं मला अंतरलास! पुन्हां तुझी कशी भेट होईल? मी तुला भलतेंच सांगावें तरी कसें?' असे मधून मधून तिच्या तोंडांतून शब्द निघत होते. तेव्हां—'तुला काय सांगायचें असेल तें सांग. तुझ्याकरितां मी आपल्या प्राणांवर देखील उदार होईन,' असें सांगून मीं तिचें समाधान केलें. नंतर ती रडें आटपून मला ह्मणाली, "प्राणप्रिया, तुला काय सांगूं? माझें नशीब फुटलें. देवाच्या दयेनें माझे सुखांत दिवस जात होते, त्यावर आतां पाणी पडलें. आज चार दिवस झाले मेला कृतांत काळ (नवरा) मला न्यायला आला आहे. आणि गेल्याशिवाय तर आतां सुटका नाहीं. येथून गेल्यावर तूं मला अंतरशील. मग हे प्राण कसे राहतील? ह्मणून मी रडतें. न जाण्याविषयीं मी पुष्कळ खटपट केली; पण तो चांडाळ (नवरा) मुळींच कांहीं ऐकत नाहीं. माझ्या दैवासारखे बाबादेखील जाच ह्मणतात! तेव्हां आतां काय करूं? माझ्या मैत्रिणीनें एक तोड काढली आहे. तसें केलें तर तुझा आमचा वियोग व्हावयाचा नाहीं; पण सख्या, ती गोष्ट तुला मान्य होईल कीं नाहीं कोणास ठाऊक? तुला सांगायला मला कठीण वाटतें. मी सांगितलें आणि तूं त्याचा भलताच एखादा अर्थ घेतलास तर आतांच घात होणार!"

मित्रा **निश्चयदत्ता**, हें भाषण करीत असतां तिची चर्या कशी झाली

होती त्याचें माझ्यानें मुळींच वर्णन करवत नाहीं. त्या तिच्या हरिणासारख्या टकोऱ्या डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रुधारा, तें तिचें प्रेमळ भाषण व ती दुःखित मुद्रा हीं पाहून माझेंचसें काय; पण एखाद्या मोठ्या तपस्वी ऋषीचें देखील मन विरघळल्यावांचून राहिलें नसतें. पुढें जे मला हाल भोगावे लागले त्यावरून तूं मला वेडा ह्मणणार तर खुशाल ह्मण; पण त्यावेळचा तो प्रसंग तसाच होता. असो. 'सखे, तुझ्याकरतां पाहिजे तें भोगण्यास मी तयार आहें,' असें मी पुनरपि तिच्या गळ्यावर हात ठेवून सांगितलें तेव्हां, तिणें तिच्या मैत्रिणीनें मंत्राची जी युक्ती काढली होती ती मला सांगितली. व मीही तत्काल माकड होण्यास कबूल झालों! मग काय उशीर? तिच्या सखीनें मंत्र ह्मणून माझ्या गळ्यांत दोरा बांधतांच मी तत्काल माकडाचें पोर होऊन बागडूं लागलों! स्त्रियांच्या मोहानें, मी मी ह्मणणाऱ्या मोठमोठ्यांची स्थिती काय झाली होती ती तुला ठाऊकच असेल. तीवरून मी आपल्याला माकड करून घेतलें याचें तुला नवल वाटणार नाहीं. असो. मला माकड करून सुखशय्येनें बंधुदत्तेला तत्काळ दोन्ही मंत्र शिकविले. तेव्हां माकड झालेल्या मला कडेवर घेऊन ती माझी कौटाळीण प्रिया मला आपल्या नवऱ्याजवळ घेऊन गेली. आणि—' हें माकड मला माझ्या मैत्रिणीनें कर्मणुकीकरितां दिलें आहे. हें मोठें गुणी आहे. ह्मणून मी याला आपल्याबरोबर घेणार,' असें ह्मणाली.

हें ऐकून त्यालाही संतोष झाला. त्याणें थोडा वेळ माझ्याशीं विनोद केला व त्यावरून त्याची तिच्यापेक्षांही माझ्यावर अधिक मर्जी बसली. त्याणें तत्काल मला आपल्या मांडीवर घेऊन मुके घेऊन घेऊन मला कंटाळा आणला. माझी बुद्धि लुप्त झाली नव्हती. आणि माझी वाणीही पहिल्याप्रमाणेंच होती. व मी मूळचा मोठा कुलीन मनुष्य असा असतांहीं, केवळ एका लबाड स्त्रीच्या मोहपाशांत सापडून त्या दंपत्याचा क्रीडामर्कट बनलों होतों! वरचेवर मला त्या बंधुदत्तेच्या बोलण्याचें हंसूं

येत होतें. व त्यावरून स्त्रीचरित्र मोठें अगाध असें जें मी अनुभविक मनुष्यांच्या तोंडून ऐकलें होतें तें पदोपदीं माझ्या अनुभवास येत होतें. तरी मी तो आपला हेतू कधीं व्यक्त करून दाखविला नाहीं. दुसरे दिवशींच बंधुदत्ता व तिचा नवरा यांणीं तेथून प्रस्थान ठेवलें. यावेळीं आईबापानीं तिचें समाधान केलें. अनेक चांगल्या चांगल्या वस्तू दिल्या. पुन्हां लौकरच बोलावूं पाठवीन असें सांगून बापानें बंधुदत्तेची रवानगी केली. निघतेवेळीं बंधुदत्तेनें मला आपल्या एका चाकराच्या खांद्यावर देऊन आपल्या बरोबर चालण्यास सांगितलें. बंधुदत्ता आणि तिचा नवरा एकाच गाडींत बसले होते. त्या गाडी बरोबर आमचीही स्वारी चालली होती.

याप्रमाणें मार्ग क्रमण करीत असतां दोनतीन दिवसांनीं आह्मी वाटेंत लागणाऱ्या एका मोठ्या जंगलांत येऊन पोंचलों. तेथें पुष्कळ मर्कटें संचार करीत होतीं. मला त्या मनुष्याच्या खांद्यावर बसलेला पाहून मोठा किलकिलाट करून जंगलांतल्या मर्कटांनीं माझ्यावर हल्ला केला. एकदम शेंकडों माकडें जेव्हां आपल्या अंगावर येतात असें पाहिलें तेव्हां, मला ज्याणें खांद्यावर घेतलें होतें तो मनुष्य कशाला राहतो ? त्याणें तत्काल मला जमिनीवर फेकून दिलें. आणि लवकर तेथून पोबारा केला. अर्थात् मी त्या माकडांच्या तावडींत सापडलों. एकल्यावर हजारों माकडांनीं हल्ला केला असतां काय अवस्था होईल हें सांगावयासच नको. माझी ती तशी अवस्था पाहून बंधुदत्ता, तिचा भर्ता व त्याच्या बरोबरचीं माणसें यांणीं हातांतल्या काठ्या, दगड, ढेंकळें यांचा त्यांच्यावर वर्षाव केला; पण त्यांचा समाज मोठा असल्यामुळें त्यांला हटवितां आलें नाहीं. नंतर त्या माकडांनीं माझ्या प्रत्येक अवयवावर—किंबहुना रोमरोमावर ह्मटलें तरी चालेल—नखांनीं आणि दांतांनीं ओरबाडे काढले. तो प्रसंग पाहून मला असें वाटलें कीं, परस्त्रीसंगरूपी जें माझ्या हातून कुकर्म घडलें त्यागें देव

रागावले, ह्मणूनच ते माकडरूपानें असा माझा सूड घेत आहेत. असो. गळ्यांत जें सूत बांधलें होतें, त्याच्या प्रभावानें आणि भगवान् **काशीविश्वेश्वर** याच्या भक्तिपूर्वक स्मरणानें त्या मरणाच्या संकटांतून मी कसा तरी एकदाचा पार पडलों. त्या सर्वांला झुकांडी देऊन मी इतका वेगानें पळालों कीं, पुन्हां त्यांच्या आटोक्यांत मी मुळींच सांपडलों नाहीं. नंतर त्यांच्या दृष्टिआड झाल्यावर अनेक अरण्यें फिरत फिरत ह्या अरण्यांत प्राप्त झालों.

**बंधुदत्तेनें** मला माकड बनविलें होतें त्यांत तिचा कांहीं वाईट हेतू नव्हता. मध्यंतरीं जर, वर सांगितलेलें विघ्न आलें नसतें तर मी खुशाल चैन भोगीत तेथें राहिलों असतों. पण किती झालें तरी दुष्कर्मच तें; फार दिवस एकसारखें कसें चालणार? अर्थात् त्यांत तसें विघ्न आलें हें योग्यच झालें. पण त्या विघ्नापासून दुसरा जो एक विलक्षण परिणाम झाला, तो मात्र मला फारच दुःखकारक झाला आहे. **बंधुदत्तेचा** वियोग झाल्यामुळें मला या माकडाच्या शरीरांत कायमचें राहणें भाग पडलें. पुन्हां मनुष्य करण्याचा मंत्र कायतो **बंधुदत्तेलाच** माहीत होता. तेव्हां तो मंत्र म्हणून माझ्या गळ्यांतलें सूत सोडल्यावांचून मला पुन्हां मनुष्यदेह कोठून प्राप्त होणार? असो. दैवानें जें भोगायला लावलें तें भोगीतच राहावें असा विचार करून त्याबद्दल विशेष विषाद न करितां या अरण्यांत यथेच्छ संचार करीत होतों. परस्त्रीसमागमरूप जें पातक घडलें त्याचें फळ हें मर्कटत्व, याच जन्मांत आपल्याला कसें प्राप्त झालें? याविषयीं मला वरचेवर दुःख प्राप्त होत होतें. त्या दुःखरूपी अंधकारानें आंधळा झालेला मी पावसाळ्या दिवसांत या प्रदेशांत फिरत असतां दुसऱ्या एका मोठ्याच दुःखांत पडलों. जणू काय दिलेल्या दुःखानें दैव संतुष्ट न झाल्यामुळें त्यानें मला हें आणखी दिलें. कसेंही असो; आपल्या कर्मगतीविषयीं विचार करीत मी फिरत असतां एके दिवशीं एका हत्तिणीनें सहज लीलेनें सोंडेंत धरून मला वर उचलिलें.

बराच वेळ इकडे तिकडे फिरवून पावसाच्या पाण्यानें मूळापर्यंत भिज-लेल्या वारुळावर मला हळूच ठेवून ती चालती झाली. ती कोणीही असो. पण मित्रा, मला तर ती हत्तीण एक देवता असावी असें वाटलें. कारण तिणें मला अशा ठिकाणीं ठेवलें कीं मी तेथून सुटण्याविषयीं जों जों प्रयत्न करावा तों तों माझे पाय चिखलांत रुततच गेले. व शेवटीं मी साराच त्यांत बुडालों.

भवितव्यता मोठी बळकट आहे. मी चिखलांत गाडलों गेलों तरी माझे प्राण गेले नाहींत. घडलेल्या कर्माबद्दल पश्चात्ताप करून मी भक्तिपूर्वक **शंकराचें** ध्यान करित होतों. त्याच्या कृपेनें तशा स्थितींत देखील मला पुष्कळ सुख झालें. क्षुधा किंवा तृषा यांची बाधा मुळींच झाली नाहीं. व माझें ज्ञानही नष्ट झालें नाहीं. उलट एकाग्रता झाल्या-मुळें माझें चित्त स्थीर होऊन ईश्वराकडे अधिकच रुजू झालें. यानंतर, नुकतेंच तूं मला काढलेंस तोंपर्यंत, **शंकराचें** ध्यान करीत जमीनींत मी गाडलेलों होतों. आतां मला इतकें ज्ञान असून मी माकडाच्या शरीरा-पासून आपणास सोडवून कां घेतलें नाहीं? असें ह्मणशील; तर तितकी माझी शक्ति नव्हती. जेव्हां कोणी एखादि मंत्र जाणणारी बायको, **बंधुदत्ते**ला तिच्या मैत्रिणीनें जे दोन मंत्र दिले होते, त्यापैकीं दुसरा मंत्र ह्मणून माझ्या गळ्यांतलें सूत सोडील त्यावेळीं मी पूर्ववत् मनुष्य होईन; तोंपर्यंत मला असेंच रखडत रहावें लागेल. असो. येथपर्यंत मी तुला हा आपला वृत्तांत सांगितला. आतां तूं या अगम्य अशा अरण्यांत कसा आलास? व आतां पुढें कोठें जाणार? तें सांगण्याला कांहीं अड-चण नसेल तर मला सांग. मी तुला मित्रत्वाच्या नात्यानें विचारतों."

याप्रमाणें माकडाचें रूप धारण करणाऱ्या **सोमस्वामी** ब्राह्मणानें विचारिलें; तेव्हां **निश्चयदत्तानें** मूळापासून आपली हकीकत त्याला निवेदन केली. विद्याधरीच्या प्रीतीला गुंतून हा **उज्जयनीहून** निघाला व धैर्यानें जिंकलेल्या यक्षिणीनें येथपर्यंत आणला. हा आश्चर्यकारक

त्याचा वृत्तांत ऐकून कपिरूप धारण करणारा तो मोठा बुद्धिवान् **सोमस्वामी निश्चयदत्ताला** ह्मणाला, "मित्रा, तूंही माझ्यासारखेंच केवळ स्त्रीच्या निमित्तानें फार दुःख अनुभवलेंस; पण गड्या, मी खरोखर सांगतों, स्त्रिया आणि लक्ष्मी ह्या कधींच कोणा जवळ स्थीर राहिलेल्या नाहींत. संध्याकाळच्या वेळेसारख्या क्षणिक राग (लाली अथवा प्रीति) दाखविणाऱ्या, नद्यांसारख्या कुटिलाशय ह्मणजे ज्यांच्या मनाची गति वांकडी तिकडी, नागिणीसारख्या विश्वास ठेवण्यास अपात्र व विद्युल्लतेसारख्या चंचल, अशा ह्या स्त्रिया आहेत. ह्मणून ती विद्याधरी **अनुरागपरा** जरी तुझ्यावर फार अनुरक्त असली तरी क्षणांत बदलल्यावांचून राहणार नाहीं. तिला तिच्या जातीचा कोणी विद्याधर मिळाला ह्मणजे ती तुझ्यावर विरक्त होईल. कारण तूं आहेस मनुष्य आणि ती आहे विद्याधरी. तिच्या अंगीं असलेलें सामर्थ्य आणि तुझें सामर्थ्य यांची बरोबरी मुळींच व्हायची नाहीं. मी सांगतों हें खचित आहे असें समज. आणि केवळ स्त्रीसमागमाकरतां तूं जो ऐवढा मोठा प्रयास आरंभिला आहेस तो सोडून दे. व यापुढें तिचा नाद मुळींच धरूं नको. अरे, शेवटीं विरस होणाऱ्या कुजक्या फळासारखा स्त्रीसमागम करून काय उपयोग? मित्रा, हें माझें सांगणें ऐक. आणि ती विद्याधरांची नगरी जी **पुष्करावति** तिकडे न जातां त्या यक्षिणीच्या खांद्यावर बसून आल्यावाटें परत आपल्या **उज्जयिनीसच** जा. मी तुझा एक निष्कृत्रिम मित्र आहें असें समज आणि माझें सांगणें ऐक. मी पूर्वीं मित्राचें सांगणें ऐकलें नाहीं ह्मणून अशा दुःखांत पडलों. आणि आतां पश्चात्ताप करीत आहें. माझा **भवशर्मा** नावांचा एक परम मित्र होता. त्याणें—'त्या **बंधुदत्तेच्या** नादीं लागूं नकोस. पुढें फसशील,' इत्यादि पुष्कळ गोष्टी मला सांगितल्या होत्या; पण मी त्या ऐकल्या नाहींत. त्या माझ्या मित्रानें पुनः पुनः समजावून सांगितलें. 'अरे, स्त्रियांच्या अधीन होऊं नकोस. बायकांचें चित्त मोठें दुर्गम आहे. स्वतः

मी या गोष्टीचा अनुभव घेतला आहे, तो तुला सांगतों, त्यावरून तरी सावध हो.' असें सांगून **भवशर्म्यानें** मला जी गोष्ट सांगितली ती मी तुला सांगतों.

**भवशर्मा** मला ह्मणाला, "मित्रा, याच **वाराणसी** नगरींत, मोठी रूपवती असून भर तारुण्यांत आलेली, **सोमदा** नांवाची एक ब्राह्मणी होती. तिचा स्वभाव फार चंचल होता. ती गुप्त रीतीनें जादूटोणा वगैरे करीत असे. दैवयोगानें एके दिवशीं तिची माझी भेट झाली. व त्याच वेळीं उभयतांचा समागमही झाला. त्यापासून जसजसें आह्मां उभयतांचें विशेष संघट्टण होत गेलें तसतशी माझी तिच्यावर विशेष प्रीती बसली. बरेच दिवस असा क्रम चालला होता. एकेदिवशीं प्रेम-क्रिडेच्या निमित्तानें मी सहज रागावून तिच्या तोंडांत दिली. त्यावेळीं ती कांहींच बोलली नाहीं. मला असें वाटलें कीं तें तिणें सहन केलें; पण त्याबद्दल तिणें आपल्या मनांत पुरा दंश धरला होता. पुढें एक-दोन दिवसांनीं विलासाच्या ऐन बहरांत येऊन तिणें सहज थट्टेनें माझ्या गळ्यांत एक दोरा बांधला. तो बांधला मात्र; लगेच मी खच्ची केलेला मोठा बळकट बैल बनलों! माझें स्मरण नष्ट झालें नव्हतें; तरी पुन्हां मनुष्य होण्याचें मात्र सामर्थ्य नाहींसें झालें. स्त्रियांवर विश्वास ठेवावा कीं नाहीं इतका ज्याला विवेक नाहीं, असा मी प्रथमच बैल होतों. त्यांतून त्याचा आकारही तिणें दिल्यामुळें पक्का बैल बनलों. नंतर त्या दुष्ट स्त्रीनें मला गाडीवानाला नेऊन विकलें. मी चांगला धष्टपुष्ट दिसत होतों, यामुळें माझी किंमतही तिला बरीच आली. तो माझा धनी व्यापारी लोकांचा माल पोंचाविण्याचा धंदा करीत होता. मी भरभक्कम असल्यामुळें दोन बैल लावायचे त्याठिकाणीं मला एकट्यालाच गाडीला जुंपून त्यानें काम चालविलें. मग काय विचा-रतोस? दुर्दैवानें, सकाळपासून संध्याकाळपर्यंत ओझीं ओढतां ओढतां माझे प्राण जातात कीं राहतात अशा स्थितींत येऊन पोंचलों.

केलेल्या दुष्कर्माचें तें फळ मला किति दिवस भोगावें लागणार याचा कांहीं नियम नव्हता. दररोज पश्चात्ताप करीत मी निमूटपणीं तें काम करीत होतों. इतक्यांत माझें भोक्तृत्व लवकरच सरलें. एके दिवशीं **बंधमोचनिका** नांवाची एक योगिनी रस्त्यानें चालली होती, तिणें माझी ती दुर्दशा पाहिली. ओझें पुष्कळ असल्यामुळें माझ्यानें ओढवत नाहीं व माझा धनी वारंवार मला चाबकानें मारतो आहे, हें पाहून तिला फार दया आली. ती मोठी मांत्रिक होती. तिणें तेथल्या तेथेंच क्षणभर डोळे झांकून माझी पुर्वीची स्थिती काय आहे ती समजून घेतली. मला **सोमदेनें** पशु केलें आहे असें समजून तत्काल ती आमच्या गाडीजवळ आली. आणि माझ्या धन्याशीं कांहीं बोलत उभें राहून तितक्यांतले तितक्यांत त्याची दृष्टी चुकवून तिणें माझ्या गळ्यांतलें सूत काढून घेतलें. अर्थात् तत्काल मी मनुष्य झालों. मी जेव्हां बैलोबा होतों त्यावेळचा तो माझा धनी किती शाहणा असणार? मंत्रतंत्राचे चमत्कार त्याला काय माहीत? मनुष्याचा बैल व बैलाचा मनुष्य होतो हें त्या बिचाऱ्याला काय ठाऊक? आपला बैल कोठें पळून गेला असें समजून तो शोधीत फिरूं लागला. वस्तुतः मी त्याच्याजवळच होतों; पण त्याला मात्र समजलें नाहीं? असो. याप्रमाणें मी सुदैवानें त्या पशुपणापासून मुक्त झालों. आणि **बंधमोचनिके**-सहवर्तमान तिच्या मठाकडे जात होतों, तों दुर्दैवानें वाटेंत ती कृत्या **सोमदा** दृष्टीस पडली. अरे बापरे! त्यावेळचा तो तिचा राग मोठा विलक्षण होता! जिचे डोळे लाल झाले आहेत, ओंठ व सर्वांग जिचें कांपत आहे अशी ती राक्षसीण जवळ येउन **बंधमोचनिकेला** ह्मणाली, "अग, हें काय केलेंस? या चांडाळाला पशुत्वापासून तूं कां मोकळें केलेंस? धिःकार असो तुला. अग दुराचारे, या तुझ्या कुकर्माचें फळ तुला अवश्य प्राप्त होईल. या मेल्याला आणि तुला उद्यांच ठार मारून टाकतें," असें बोलून हात पाय आपटीत ती अवदसा पुढें चालती झाली.

**बंधमोचनिका**ही त्या विद्येंत प्रवीणच होती. म्हणून ती म्हणाली, "भल्या गृहस्था, पाहिलेंस ना ही तुझ्यावर कशी रागावली आहे ती. ती कौटाळीण उद्यां आपणावर कांही संकट आणणार आहे. तुझ्या निमित्तानें मलाही ती मारणार ह्मणते. पण ती काय काय करणार तें मला सर्व समजलें आहे. उद्यां ती काळ्या घोडीचें रूप घेऊन मला मारायला येईल. मीही त्यावेळीं लाल घोडीचें रूप घेईन. नंतर आह्मा दोघींचें युद्ध सुरू होईल. त्यावेळीं तुला जर तिचा पुरता सुड घ्यायचा असला तर तूं एक काम कर. तुझ्याजवळ मी एक तरवार देऊन ठेवतें. तेवढी हातांत घेउन एकाएकीं तेथें येऊन मोठ्या हुषारीनें तूं काळ्या रंगाची जी घोडी असेल तिचे दोन्ही पाय छाटून टाक, म्हणजे झालें. मग पुढें ती काय करील तें मी पाहून घेईन."

**बंधमोचनिके**नें याप्रमाणें सांगितलें तें मी कबूल केलें. आणि तिच्याबरोबर तिच्या घरापर्यंत गेलों. घराच्या खाणाखुणा वगैरे नीट ध्यानांत धरून व सकाळीं परत यायचें कबूल करून मी तेथून आपल्या घरीं गेलों. या एकाच जन्मांत ज्याणें जन्मांतराच्या सुखाचा अनुभव घेतला आहे, असा मी मोठ्या विचारांत पडलों. त्या **सोमदे**चें माझ्यावर किती तरी प्रेम होतें; आणि माझेंही किती तिच्यावर होतें याचा कांहीं ठिकाण होता काय? मी सहज थट्टेनें तिच्या तोंडांत दिली काय आणि त्याचा एवढा द्वेष धरून मला बैल करून तिनें विकलें काय? या गोष्टी वरचेवर आठवून मी अगदीं भांबावल्यासारखा झालों होतों. तथापि मी आपल्या कर्तव्याला विसरलों नाहीं. भल्या पहाटे उठून सर्व नित्य कृत्य आटपून त्या योगिनीनें दिलेली तरवार घेऊन देवाला नमस्कार करून घरांतून निघालों. मी **बंधमोचनिके**च्या घरीं पोंचलों त्यावेळीं ती माझी प्रतिस्पर्धीण तेथें आली नव्हती. तरी लौकरच, काजळासारख्या काळ्या भोर घोडीचें रूप धारण करून तिची स्वारी आली. मी दडून बसलों होतों. तिला मी पाहिलें; पण तिनें मात्र

मला पाहिलें नाहीं. मला पशुदेहरूपी नरकांतून मुक्त करणाऱ्या **बंधमोचनिके**ला जय येवो, असें मी परमेश्वराजवळ मागणें मागत होतों.

लवकरच त्या दोघींचें झगडें सुरू झालें. एकमेकांला चावायचें व दुगाण्या झाडायच्या हेंच कायतें त्यांचें लढणें! मी क्षणभर त्या लढाईचा देखावा पहात उभा राहिलों. आणि संधी साधून एकदम पुढें येऊन जोरानें तरवारीचा असा एक सपाटा मारला कीं, त्या सरसे त्या चांडाळणीचे मागचे दोन्ही पाय तुटून पडले. अर्थात् ती जमिनीवर पडतांच **बंधमोचनिके**नें तिचा चेंदा मेंदा उडवून दिला. **बंधमोचनिके**चें मंत्रसामर्थ्य त्या दुष्ट **सोमदे**पेक्षां विशेष होतें. ह्मणूनच तिणें तिला चित केलें. तें कांहीं असो. पण ती अवदसा मेल्यामुळें मी अगदीं निर्भय झालों. नाहीं तर शेपटीवर पाय दिलेल्या एखाद्या नागिणीसारखी, जन्मभर माझा दंश धरल्यावांचून ती राहिली नसती. त्या दुःखांतून सोडविल्याबद्दल मीं परमेश्वराचे व त्याबरोबरच **बंधमोचनिके**चे फार उपकार मानले. जणूं काय दुर्गतींतून मुक्त झालों असा होत्साता, मी आपल्या घरीं गेलों. त्या दिवसापासून तशा लबाड बायकांचा समागम करावा असें माझ्या मनांतदेखील येईनासें झालें. चपलपणा, साहस व अनेकप्रकारचीं कपटें, जादू टोणा वगैरे हे दुर्गुण ज्या स्त्रियांच्या अंगीं असतील, त्या त्रैलोक्यालाही भयावह होतात. याकरतां डाकिनीशीं मैत्री ठेवणाऱ्या त्या **बंधुदत्ते**कडे तूं कां धांवतोस? तिची आपल्यावर प्रीति आहे असें जें ह्मणतोस तें अगदीं खोटें आहे. अरे, विचार करून पहा कीं, जिचा आपल्या नवऱ्यावर स्नेह नाहीं तिचा तुझ्यासारख्या परकी मनुष्यावर कोठून असेल?"

मित्रा **निश्चयदत्ता**, याप्रमाणें मला त्या **भवशर्म्या**नें पुष्कळ सांगितलें; तरी मीं त्याचें ऐकलें नाहीं. म्हणून मी सांप्रत या दुर्दशेला पात्र झालों आहें. याकरतां मी तुला सांगतों कीं; त्या **अनुरागपरे**वर आसक्त होऊं नकोस. व तिच्याकरतां व्यर्थ क्लेशही भोगूं नकोस.

तिला आपल्या लगतीचा कोणी पुरुष मीळाला कीं, ती खरोखर तुझा त्याग करील." कपीचें रूप धारण करणाऱ्या **सोमस्वामीनें निश्चयदत्ताला** याप्रमाणें अगत्यपूर्वक उपदेश केला. 'जशी भ्रमरी नित्य नव्या नव्या फुलाची इच्छा करते; त्याप्रमाणें स्त्रीला नित्य नवा पुरुष पाहिजे. या कामांत तुला माझ्यासारखाच पश्चात्ताप करावा लागेल,' असें त्याणें वरचेवर सांगितलें तरी, तें त्याचें भाषण प्रेमरूप बळकट वस्त्रानें झांकलेल्या **निश्चयदत्ताच्या** मनांत प्रविष्ट झालें नाहीं. उलट तो त्याला म्हणाला, "गड्या, तूं सांगतोस तें खरें; पण सगळ्या स्त्रिया एकसारख्याच असत नाहींत. प्रत्येक व्यक्तीव्यक्तीचें वर्तन निरनिराळें असतें. विद्याधरांच्या राणीसारख्या मोठ्या व अत्यंत शुद्ध कुळांत उत्पन्न झालेली ती माझ्याशीं प्रतारणा करील किंवा माझ्यावरचें तिचें प्रेम नाहींसें होईल, ही गोष्ट मला बिलकूल खरी वाटत नाहीं. तू आपला व आपल्या मित्राचा अनुभव सांगितलास तो खरा असेल; पण तेवढ्यावरून सर्व स्त्रीजात तशीच असेल असें मानणें हें मला योग्य वाटत नाहीं." असो. याप्रमाणें त्या उभयतांचा संवाद चालला आहे; तो संध्येवर अनुरक्त झालेला, **निश्चयदत्ताचें** प्रिय करावें ह्मणूनच कीं काय, भगवान् **भास्कर** अस्ताचलावर गेला.

नंतर रात्र पडतांच ती **शृंगोत्पादिनी** यक्षिणी **निश्चयदत्तापुढें** एकाएकीं हाजर झाली. लगेच **निश्चयदत्तानें** आपला मित्र झालेला जो तो मर्कट याचा निरोप घेतला. आणि तत्काल तो यक्षिणीच्या खांद्यावर बसला. कपीला त्याचें तें कृत्य केवळ मूर्खपणाचें वाटलें; तरी 'मित्रा, ये बरें. माझी आठवण मात्र असूं दे,' असें सांगून त्याणें त्याला निरोप दिला. **निश्चयदत्त** तेथून निघाल्यावर त्याच्या मनानें आधींच गांठलेली अशी जी विद्याधरपतीची नगरी **पुष्करावती** तींत तो मध्यरात्रीच्या सुमारास जाऊन पोंचला. **अनुरागपरा** ही विद्याधरीच होती. ती आपल्या विद्येच्या प्रभावानें **निश्चयदत्त** येतो आहे

असें आधींच समजली. ह्मणून ती सखीसहवर्तमान आपल्या नगरींतून बाहेर येऊन त्याची वाट पहात होती. इकडे यक्षिणीनें **पुष्करावतींत** नेऊन **निश्चयदत्ताला** खालीं उतरलें; आणि—'रात्रीच्या समयीं नेत्रांला आनंद देणारी दुसरी **चंद्राची** मूर्ती अशी ही तुझी प्रिया येते आहे पहा. आतां तुह्मी परस्परांला भेटा. आषक माषुकांत माझ्यासारखी खेट मध्यें कशास हवी? आतां मी येतें,' असें सांगून **अनुरागपरेला** दाखवून **निश्चयदत्ताला** नमस्कार करून ती यक्षीण निघून गेली.

इकडे **निश्चयदत्त** एक दोन पावलें पुढें येत आहे इतक्यांत, फार दिवस उत्कंठित झालेली **अनुरागपरा** घाबऱ्यां घाबऱ्यां पुढें येऊन एकदम तिणें **निश्चयदत्ताला** कडकडून मिठी मारली. दासींनीं त्याच्यावरून लिंबलोण उतरलें. उभयतांला परस्परांचा अंगस्पर्श इतका सुखकर झाला कीं, फारवेळ तो त्यांच्यानें निराळा करवेनासें झालें. बहुत क्लेश भोगून ज्याला तिचा समागम प्राप्त झाला आहे, अशा **निश्चयदत्ताचें** शरीर मात्र निराळें दिसत होतें. आत्मा तिच्यांतच प्रविष्ट झाला होता. लगेच तेथल्या तेथें गांधर्वविधीनें त्या दोघांचें लग्न लागलें. बापाच्या नगरींत राहून आपल्याला स्वैर विहार करायला मिळायचा नाहीं ह्मणून **अनुरागपरेनें** तत्काल दुसरें एक दिव्य नगर निर्माण केलें. त्या नगरांत **निश्चयदत्त** तिच्यासहवर्तमान खुशाल चैन उडवीत राहिला होता. **निश्चयदत्ताशीं** आपण रममाण झालें आहे ही गोष्ट तिणें आपल्या आईबापांला कळूं दिली नव्हती. अर्थात् त्या उभयतांचा हा चौर्यसमागम झाला होता. येतांना 'वाटेंत तुह्मांला काय काय संकटें आलीं? इतक्या दूरचा प्रवास कसा घडला?' हें तिणें विचारल्यावरून **निश्चयदत्तानें** झालेली सर्व हकीकत निवेदन केली. आपल्याकरतां इतके क्लेश भोगून आल्यामुळें तो तिला फारच प्रिय झाला. तिणें प्रतिदिवशीं नवेनवे भोग त्याला अर्पण केले. एके दिवशीं बोलतां बोलतां **निश्चयदत्ताला** त्या माकडाची आठवण झाली. तेव्हां,

"अरेरे! तो माझा मित्र बिचारा मोठ्या संकटांत पडला आहे. प्रिये, त्याला माकडाच्या देहांतून कोणी सोडवील तर माझें मोठें प्रिय होईल," असें सांगून त्याणें **सोमस्वामी**ची सर्व हकीकत तिला निवेदन केली. तेव्हां **अनुरागपरा** ह्मणाली, "तें खरें आहे. तुमच्या त्या मित्राला मी सोडविलें असतें; पण तो मंत्रमार्गांतला विषय आहे. आणि ज्या स्त्रिया योगिनी असतात, त्या मंत्रतंत्र करितात; आमचा तो कांहीं विषय नाहीं. तथापि तुमच्या प्रीतिस्तव हें काम मी करवितें. **भद्ररूपा** नांवाची माझी एक मैत्रीण आहे, ती मंत्रतंत्रांत फार प्रवीण असून तिला सिद्धीही प्राप्त झाली आहे. तिला सांगितलें ह्मणजे ती आत्तां करील."

**निश्चयदत्त** अगदीं मोकळ्या मनानें तिच्याशीं वागत होता. तिणें आपलें काम करण्याचें कबूल केल्यावरून फार आनंदित होऊन तो तिला ह्मणाला, "प्रिये, तर मग तूं त्या माझ्या मित्राला पहायाला येईनासकां? येथें जवळच तो आहे. चल आपण तिकडे जाऊं या." असें त्याणें सांगितलें, तें मान्य करून ती दुसऱ्या दिवशीं **निश्चयदत्ता**ला बरोबर घेऊन आकाशमार्गानें तो माकड ज्या ठिकाणीं होता त्या ठिकाणीं क्षणमात्रांत जाऊन पोंचली. तेथें कपीचें रूप पावलेल्या त्या मित्राला पाहून प्रियेसहवर्तमान त्याणें त्याला नमस्कार केला, व कुशल विचारलें. **निश्चयदत्त** त्यास यावेळीं जो भेटायला आला होता तो जरी मित्रत्वाच्या नात्यानेंच आला होता, तरी त्याच्या मनांत थोडासा ताठा होता. **सोमस्वामी**नें त्याला—'स्त्रियांच्या समागमापासून फार दुःख होतें या करितां तूं त्या **अनुरागपरे**कडे जाऊं नको,' असें जें सांगितलें होतें; त्याचें त्याला उसनें फेडायाचें होतें. 'तूं दोष दिला होतास व नको जाऊं ह्मटलें होतेंस खरेंना? तर मग पहा आतां आमचा उभयतांचा जोडा कसा चैनींत आहे तो!' असें त्या माकडाला दाखवावें असेंही त्याच्या मनांत होतें.

**निश्चयदत्त** ह्मणजे मूर्ख होता असें नाहीं. तोही चांगला शहाणाच

होता. तरी स्त्रियांच्या संबंधानें त्याला अद्याप अनुभव आला नव्हता. यामुळें त्याच्या शहाणपणांत थोडी कमतरता होती. पण **सोमस्वामी** हा अनुभव घेऊन सवरून पक्का झाला होता. हा यावेळीं जो आपल्याला भेटायला आला आहे तो कोणत्या मुख्य उद्देशानें हें तेव्हांच त्याच्या लक्षांत आलें. तो त्याला ह्मणाला, "माझें कुशल काय विचारतोस? मी सदासर्वकाळ दुःखांतच आहें; पण आज मात्र मी मोठा कुशली आहें. कारण ही मनमोहिनी **अनुरागपरा** हिच्यासह तुला पाहून मला जो कांहीं आनंद होत आहे, तो वर्णन करतां येत नाहीं." असें बोलून त्या मर्कटानें **निश्चयदत्ता**चा ताठा अधिकच दृढ केला. नंतर त्याला व त्याच्या स्त्रीला प्रेमपूर्वक आशीर्वाद देऊन चांगलीं चांगलीं फळें व मूळें दोघांलाही नजर केलीं. तीं भक्षण करून जवळच वहात असलेल्या नदीचें उदक प्राशन करून स्वस्थ झालेलीं तीं तिघेंही एका रम्य शिळेवर बसलीं. तेथें इकडच्या तिकडच्या पुष्कळ गोष्टी निघाल्या. **निश्चयदत्त** व त्याची ती प्रिया **अनुरागपरा सोमस्वामी**ला असें दुःख भोगावें लागलें ह्मणून फार हळहळलीं. शेवटीं **निश्चयदत्तानें** 'आपल्या प्रियेच्या द्वारानें तुला यांतून सोडविण्याची आपण तजवीज केली आहे' असेंही त्याला सांगितलें. नंतर बराच वेळ तेथें बसून **निश्चयदत्तानें** त्याचा निरोप घेतला. **अनुरागपरेनें निश्चयदत्ता**ला आपल्या मांडीवर घेऊन आकाशांत उड्डाण केलें. तो लौकरच परत आपल्या प्रियेच्या मंदिरांत प्राप्त झाला.

याप्रमाणें एक दिवस गेला. दुसऱ्या दिवशीं पुन्हां **निश्चयदत्त अनुरागपरे**ला ह्मणाला, "प्रिये चल; कालच्याप्रमाणें आजही आपल्या मित्राकडे क्षणभर जाऊं या. काल तुला त्याच्या भेटीपासून आनंद झाला नाहीं का? तो माकड असून कसा शहाणा आहे? त्याचें बोलणें किती तरी पोक्त! आणि संभाविती तरी काय! तशांशीं संवाद घडल्यानें कांहीं तरी लाभच होतो. त्यांची भेट फुकट जात नाहीं. ह्मणून

आजही आपण तिकडे जाऊं या." **निश्चयदत्तानें** असें सांगितलें, तरी या दिवशीं तिची येण्याची खुषी नव्हती. ती ह्मणाली, "आर्यपुत्र, आज आपणच मित्रसमागमाचा लाभ घ्यावा. मी येथेंच राहतें. आपल्याला तेथें जायचें कठीण पडणार नाहीं. वर उडायची आणि खालीं उतरायची अशा दोन्ही विद्या मी तुह्माला देतें. ह्या घेऊन तुह्मी तिकडे जाऊन या." तिची येण्याची मर्जी नाहीं असें पाहून **निश्चयदत्तानें** फारसा आग्रह केला नाहीं. तो, तिणें दिलेल्या दोनही विद्या चांगल्या पाठ करून वर उडायच्या विद्येनें आकाशांत गेला. व ज्या ठिकाणीं तो माकड बसला होता, त्या ठिकाणीं दुसरी विद्या जपून खालीं उतरला.

**अनुरागपरा** आज त्याच्याबरोबर कां गेली नाहीं, अशी कदाचित् कोणास शंका येईल ह्मणून तिचें निराकरण केलें पाहिजे. **निश्चयदत्ताची** त्या माकडाशीं निष्कृत्रिम मैत्री होती. व **अनुरागपरे**शींही त्याचें तसेंच वर्तन होतें. माकडानें जें भाषण केलें व आपली हकीकत सांगितली, तींत स्त्रियांच्या कपटाचें वर्णन मुख्य असून त्यांची निंदाही पुष्कळ होती. **अनुरागपरेला**—जणूं काय आपण पुढें त्याच स्त्रियांच्या वर्गांत जाणार आहें, असें वाटलें असेल ह्मणून—त्या माकडाच्या गोष्टी फारशा आवडल्या नाहींत व त्याची तिला विशेष दयाही आली नाहीं. केवळ **निश्चयदत्ताच्या** मुरवतीस्तव तिणें होय होय ह्मणत कसा तरी तो प्रसंग टाळला. पहिल्याच खेपेस अशी स्थिति झाल्यामुळें ती विद्याधरीण पुन्हां त्याच्याकडे कशाला जाईल ? असो. **निश्चयदत्त** कालच्याप्रमाणें आज आपल्या मित्राला भेटला व उभयतांच्या सुखदुःखाच्या गोष्टी चालू झाल्या. इकडे **अनुरागपरेला** एकटीला चैन पडेनासें झालें. तिला **निश्चयदत्ताचा** फारच नाद लागला होता. तिकडे जाण्याची त्याला विशेष उत्कंठा आहे असें दिसल्यावरून तिणें मोडा घातला नाहीं व आपलें मन प्रसन्न नसल्या-

वरून ती त्याच्या बरोबरही गेली नाहीं. तथापि तिला तो वियोग असह्य झाला.

बागेंत फिरून ती कशीतरी मनाची कर्मणूक करीत होती. फार वेळ हिंडून श्रम झाल्यामुळें खिन्न झालेली ती एका सुंदर चौथऱ्यावर बसली होती. इतक्यांत कोणी विद्याधराचा तरुण पुत्र आकाशमार्गीनें फिरत फिरत सहज तेथें आला. तशी ती रमणीय बाग, जवळ दुसरें कोणीच नाहीं आणि अशा स्थितींत **अनुरागपरे**सारखी तरुण स्त्री एकांतीं दुःखित बसलेली पाहून त्या तरण्या बांड शोकीन विद्याधराला कसें पुढें जाववेल बरें? तिच्या अवलोकनानें कामाच्या अधीन झालेला तो तसाच तटस्थ दृष्टीनें तिच्याकडे पहात उभा राहिला. विद्येच्या प्रभावानें व अनुमानानें—ही विद्याधरी असून कोणातरी मनुष्याला हिनें आपला पती करून घेतला आहे असें त्याला समजलें. आपल्या समोर उभा राहिलेला व ज्याची दृष्टि आपल्यावर तल्लीन झाली आहे, अशा त्या विद्याधराला पाहून **अनुरागपरा**ही मान खालीं घालून नम्रतेनें त्याला ह्मणाली, "महाभागा, तूं कोण आहेस? आणि येथें कशा करितां आलास? यापुढें कोठें जायचें आहे? तें कृपा करून सांगशील काय?" **अनुरागपरे**नें कौतुकानें प्रश्न केला हाच आपल्यावर मोठा अनुग्रह झाला; आतां आपली आशा सफळ होईल असें समजून तो विद्याधर तिला ह्मणाला, "तुझ्यासारखीला न सांगायचें असें तें गुह्य नाहीं. मी विद्याधर आहें; माझें नांव **रागभंजन**. मी आपल्या विद्या आणि ज्ञान या दोहोंनीं प्रसिद्ध आहें. मी सहज सृष्टिचमत्कार पहात पहात आकाशमार्गानें चाललों असतां या तुझ्या बागेनें माझे डोळे आकर्षण केले. नंतर मनमोहिनी तूं दिसलीस. त्वां तर माझा आत्माच काढून घेतलास. हे हरिणाक्षि, केवळ दर्शन घडवूनच कामराजानें माझा पराभव करून मला तुझ्या हवालीं केलें आहे. मला ठाऊक आहे कीं, तूं सांप्रत कोणा मनुष्याशीं रत झाली आहेस. पण ती गोष्ट फार अयोग्य

आहे. आपण विद्याधर हे मनुष्यांपेक्षां श्रेष्ठ आहोंत. असें असून त्या मानवाशीं रत झालीस ही गोष्ट तुझ्या बापाला कळली नाहीं तोंपर्यंत तूं त्याचा त्याग करून बरोबरीच्याशीं (अर्थात् माझ्याशीं) समागम कर. आजपर्यंत त्या हीन मनुष्याचे सोबतींत राहिलीस तितकें पुरे. असें न करशील तर केवळ तुझा बापच नव्हे, तर सर्व विद्याधर तुझ्याशीं प्रतिकूळ होतील."

आधींच ती पुरुषसमागमाविषयीं उत्सुक झाली होती. त्यांतून त्या विद्याधरानें तिला भय घातलें. व योग्यतेनेंही तो आपल्या बरोबरीचा आहे असें तिला वाटलें. तेव्हां बिचाऱ्या **निश्चयदत्ताला** सोडून तिच्या मनानें तत्काल त्या तरुण विद्याधराची सोबत धरली ! ती चंचल स्त्री प्रेमपूर्वक व वांकड्या डोळ्यांनीं पहात होत्साती मनांत म्हणाली, 'हा सांगतो हें खरें आहे. आणि हा मला पतीही शोभण्यासारखा आहे. तो (**निश्चयदत्त**) किती झाला तरी मनुष्य, आणि त्यांतूनही वाणी. त्या भिकारड्याला घेऊन काय करायचें आहे ? त्याला माझ्याशिवाय कांहींच करतां येत नाहीं. आतां तो आपल्या मित्राकडे गेला आहे तरी मी त्याला दोन विद्या दिल्या तेव्हांच त्याचें जाणें झालें. नवराबायकोचें जोडपें म्हटलें म्हणजे नेहमीं त्यांची योग्यता समान असली पाहिजे. कदाचित् नवऱ्याची अधिक असून बायकोची कमी असली तरी चालेल. पण बायको योग्यतेनें मोठी आणि नवरा कमी हें फारच लाजिरवाणें. आपल्या चारचौघां सोबतिणींत गोष्टी निघाल्या आणि तसल्या भिकारड्या नवऱ्याचें नांव आलें, तर मान खालीं घालावी लागणार; त्यापेक्षां हा म्हणतो आहे तें मान्य करावें हें चांगलें.' असा विचार करून तत्काल तिणें त्याचा स्वीकार केला. त्या उभयतांचें बोलणें चालणें होऊन तेथल्या तेथेंच पक्का संबंध झाला. उघडच आहे; एकांत आणि दोघांचीं चित्तें एक होणें, याहून **मदनाला** दुसऱ्या कोणत्या सामग्रीची अपेक्षा असणार ? असो.

यांप्रमाणें **अनुरागपरेच्या** अनुरागाला पात्रभूत होऊन तो तरुण विद्याधर पुन्हां येण्याचा वायदा करून तेथून निघून गेला. नंतर कांहीं वेळानें **निश्चयदत्त**ही, आपल्या मित्राशीं पुष्कळ वेळ गोष्टी बोलून त्यानें केलेलें भविष्य खरें करण्याकरितांच कीं काय, परत आपल्या प्रियेकडे आला. तो आतां येणार हें तिला माहीतच होतें. स्त्रियांची प्रीती असेल तोंपर्यंत तो पुरुष त्यांना प्राणापेक्षांही प्रिय वाटतो. व प्रीती अगदीं नाहींशी होतांच तोच दावेदार असें वाटतें! यावेळीं **अनुरागपरेचा** जिव्हाळा काय तो त्या विद्याधराकडे लागला होता. कोणत्या तरी युक्तीनें दुर्दैवी **निश्चयदत्ताचें** तेथून उच्चाटन करावें ह्मणून तिणें कपाळ दुखण्याचें बळेंच निमित्त केलें. ती त्याला सामोरी गेली नाहीं; कांहीं बोलली नाहीं; या नाहीं बसा नाहीं, कांहीं एक नाहीं. आज माझें अतिशय कपाळ दुखतें असें निमित्त करून ती एकीकडे विव्हळ होऊन पडली होती. तिचें मन **निश्चयदत्तावरून** पार उडालें होतें; पण **निश्चयदत्ताचें** मात्र पूर्वींप्रमाणेंच होतें. ह्मणून तिचें तें ढोंग आहे असें त्याला मुळींच वाटलें नाहीं. तो बिचारा भोळा **निश्चयदत्त** खरोखरीच तिच्या जीवाला समाधान नाहीं असें समजून मोठा कष्टी होऊन बसला. ती सारी रात्र त्याणें तशाच दुःखांत कशीतरी काढली. अवघ्या रात्रींत **अनुरागपरेच्या** प्रेमळ शब्दाला किंवा अंगस्पर्शाला तो मुळींच पात्र झाला नाहीं!

प्रातःकाळ होतांच स्नानसंध्या वगैरे आटपून **निश्चयदत्त** खिन्न होत्साता त्या **सोमस्वामीला** भेटायला गेला. इकडे या उभयतांचा पूर्वीं संकेत ठरलाच होता. 'त्या पिडेला ( **निश्चयदत्ताला** ) काढूनलावीपर्यंत तूं तो येथें नाहीं अशी वेळ साधून येत चल,' असें तिणें कालच त्या आपल्या नूतन हृदयवल्लभाला सांगून ठेविलें होतें. त्याप्रमाणें तिच्या विरहानें रात्रभर ज्याला जागरण घडलें आहे, असा तो कामी विद्याधर, **निश्चयदत्त** तेथून निघतांच **अनुरागपरेजवळ** प्राप्त

झाला, आणि रात्रभर घडलेल्या विरहानें उत्कंठित झालेल्या त्या प्रियेला त्याणें प्रेमालिंगन दिलें. तिचें डोकें दुखायचें यापूर्वीच बंद झालें होतें. नंतर उभयतांनीं यथेच्छ मद्यप्राशन करून क्रीडा केली. व शेवटीं श्रांत झालेला तो तिच्या मांडीवर उसें टेकून झोंपी गेला. नंतर त्याला आपल्या विद्येच्या प्रभावानें अदृश्य करून रात्रीच्या उजागऱ्यानें श्रांत झालेली **अनुरागपरा**ही निजली.

इकडे **निश्चयदत्त** आपल्या त्या प्रिय मित्राला जाऊन भेटला. त्या वानरानें पूर्वीप्रमाणेंच त्याचें स्नेहानें आगतस्वागत केलें. आणि त्याचा चेहरा उतरलेला पाहून ह्मणाला, "गड्या, आज तुला मी खिन्न झालेला पाहतों याचें कारण काय तें कृपा करून सांगशील काय?" यावर **निश्चयदत्त** ह्मणाला, "काय सांगूं! माझी ती प्राणवल्लभा आज फारच अस्वस्थ आहे. मित्रा, ती मला प्राणापेक्षांही प्रिय आहे हें तुला माहीतच आहे. कालची सारी रात्र ती एकसारखी तळमळत होती. यामुळें मी फार दुर्मुख झालों आहें. माझें चित्त कोठेंच लागत नाहीं ह्मणून मी आज अवेळींच तुझ्याजवळ आलों. नाहीं तर मी दोनप्रहरानंतर तुझ्याकडे यायचा."

**निश्चयदत्ता**ला, तो प्रेमानें आंधळा झाला असल्यामुळें खरें वर्तमान कांहींच समजलें नव्हतें. तो माकड एकनिष्ठ ईश्वरसेवनें आलीकडे मोठा अंतर्ज्ञानी झाला होता. तशांतून शहाण्याला सर्व कांहीं समजतें. **निश्चयदत्ता**नें सांगितलेल्या हकीकतीवरून त्या विद्याधरीचें मन याच्यावरून उडालें आहे असें तो तेव्हांच समजला. मनुष्यांसारखे विद्याधरांला रोग वगैरे होत नाहींत, ही गोष्ट तर उघडच आहे. असें असून ती अस्वस्थ आहे असें हा सांगतो, तेव्हां हें तिणें मुद्दाम ढोंग केलें असावें असें समजून तो त्या **निश्चयदत्ता**ला ह्मणाला, "गड्या घाबरूं नको. रात्रीं जागरण झाल्यामुळें यावेळीं ती तुझी प्रिया सुस्त निजली असेलसें वाटतें; तर तूं आलास तसाच परत जाऊन तिला

मांडीवर घेऊन माझ्याजवळ लवकर ये. ह्मणजे तुला मी एक आश्चर्य दाखवितों तें आतांच पहाशील."

**निश्चयदत्ता**ला **अनुरागपरे**नें दोन विद्या आधींच देऊन ठेविल्या होत्या. त्यांच्या साह्यानें त्याला आकाशमार्गानें जाण्यायेण्याची कांहींच पंचाईत नव्हती. **सोमस्वामी**नें सांगितलें तें पाहण्यासाठीं उत्कंठित होत्साता तसाच तो घाईघाईनें परत गेला. आणि **अनुरागपरे**ला न जागवितां आपल्या मांडीवर घेऊन हळूच तो तेथून निघाला. यावेळीं तिचा प्यारा विद्याधर प्रत्यक्ष **निश्चयदत्ता**च्या मांडीला चिकटला होता. पण तिणें अदृश्य करून ठेविल्यामुळें, त्याला तो मुळींच दिसला नाहीं. **निश्चयदत्त** क्षणमात्रांत त्या आपल्या प्रियेला घेऊन आला. आणि 'ही पहा हिला आणली. आतां काय चमत्कार दाखवितोस तो दाखव,' असें त्याणें त्या वानराला सांगितलें.

त्या मर्कटाला दिव्य शक्ती प्राप्त झाली होती; कारण त्याणें इतके दिवस जें **शंकरा**चें आराधन केलें त्याचें तें मुख्य फळ होतें. **निश्चयदत्ता**च्या डोळ्यांवरून हात फिरवून तो ह्मणाला, "मित्रा, आतां तूं आपल्या प्रियेला नीट पहा." त्याणें डोळ्यांवरून हात फिरविल्यामुळें **निश्चयदत्ता**लाही दिव्य दृष्टि प्राप्त झाली. तो बिचारा काय पाहणार! त्या तरुण विद्याधरानें गळ्याला मिठी मारलेली आपली प्रिया पाहून त्याची अवस्था काय झाली असेल हें सांगावयासच नको. "हाय हाय! अरेरे!! हें काय आहे? हा कोण अनर्थ!" असें ह्मणून तो कावराबावरा होत आहे तों तो वानर त्याला ह्मणाला, "हां हां, असा बावरा होऊं नकोस." असें ह्मणून त्याणें मुळापासून त्या विद्याधराच्या समागमाची हकीकत त्याला सांगितली. तेव्हां **निश्चयदत्त** अतिशयच संतापला. तो त्याला मारण्याविषयीं प्रवृत्त होत आहे, इतक्यांत तो विद्याधरही जागा होऊन तत्काल आकाशांत अंतर्धान पावला.

नंतर कांहीं वेळानें ती **अनुरागपरा**ही जागी झाली. व आपली

गुप्त गोष्ट उघडकीस आल्याबद्दल तिला अतिशय लाज वाटली. ती खाली तोंड घालून सुकल्यासारखी उभी राहिली. बोलते काय ? सर्वस्वी अपराधीच झाली होती. **निश्चयदत्ता**ला आपल्या अविचारीपणाचा मोठा पश्चात्ताप झाला. त्याचे डोळे भरून आले. तो तिला ह्मणाला, "अग चांडाळणी, मी सर्वस्वीं तुझ्यावर विश्वास ठेवून राहिलों असतां तूं मला असें कसें फसविलेंस ? पारा हा फार चंचल आहे असें ह्मणतात; तरी त्याला बांधण्याचीही कांहीं युक्ती आहे असें समतें. पण स्त्रियांचें मन स्थीर करण्याची कांहींच युक्ति नाहीं !" याप्रमाणें सर्वप्रकारें लज्जित झालेली ती विद्याधरी मुळुमुळु रडत रडत कांहीं न बोलतां तशीच आकाशमार्गानें आपल्या घरीं निघून गेली. उघडच आहे, आणखी कांहीं वेळ ती तेथें राहिली असती तर **निश्चयदत्ताचे** शिव्याश्राप ऐकण्यावांचून तिला दुसरा कोणताच लाभ झाला नसता. तो तर तिला नकोसा झाला होता; तेव्हां त्याचें मर्मभेदक भाषण ती कशाला ऐकत राहील. असो. नंतर तो मर्कट **निश्चयदत्ता**ला ह्मणाला, "कां बाबा, आतां तरी तू शुद्धीवर आलासना? मी तुला नको ह्मणत असतां तूं हिच्यामागें धांवलास. तुझ्या रसरशीत प्रेमाग्नीचे कोळसे झाले असून सांप्रत तूं पश्चात्ताप करीत आहेस हें त्याचें पिकलेलें फळ प्राप्त झालें आहे. चंचल अशा संपत्ती व स्त्रिया यांच्यावर विश्वास तो कसला ? आणि एखाद्या मूर्खानें यांच्यावर विश्वास ठेवला तर पश्चात्ताप झाल्यावांचून राहील काय ? असो. आतां विलाप करूं नकोस. तुझे रडणें व्यर्थ आहे. विवेकानें आपलें मन स्थीर कर. भवितव्य प्रत्यक्ष **ब्रह्मदेवा**लाही खोटें करवत नाहीं. जें व्हायचें होतें तें झालें. आतां शोक करण्यांत काय अर्थ आहे ?" याप्रमाणें त्या **सोमस्वामी**नें ज्याला बोध केला आहे असा **निश्चयदत्त**, शोक आणि मोह यांचा त्याग करून विषयोपभोगाविषयीं विरक्त होत्साता **शंकरा**ला शरण गेला. केवळ **स्त्रियां**चीच नव्हे, तर ऐहिक कोणत्याही वस्तूची त्यानें अपेक्षा ठेविली नाहीं.

याप्रमाणें समदुःखसुखी झालेल्या त्या प्रिय मित्रासहवर्तमान तो त्याच ठिकाणीं राहिला. माकडाच्या देहापासून त्याची सुटका होई-पर्यंत दुसरीकडे जायचें नाहीं असा त्याणें निश्चय केला. कांहीं दिवसांनीं **मोक्षदा** नांवाची एक तपस्विनी फिरत फिरत दैवानें तेथें प्राप्त झाली. तिच्या आकृतीवरून ही कोणी तरी मोठी तपस्विनी आहे, असें **निश्चयदत्ता**ला वाटलें. त्याणें तिचें चांगलें आगतस्वागत केलें. व परस्परांच्या कांहीं गोष्टी झाल्या. नंतर, "तूं मनुष्य असून या माकडाशीं तुझी इतकी दोस्ती झाली हा काय चमत्कार आहे तें सांग?" याप्रमाणें तिणें प्रश्न केला; तेव्हां **निश्चयदत्तानें** प्रथम आपला वृत्तांत व नंतर मित्राचा सर्व वृत्तांत तिला सांगून, "भगवति, जर तुला कांहीं मंत्र तंत्र माहीत असेल; तर या माझ्या प्रियमित्राला माकडाच्या शरीरापासून कृपा करून मुक्त कर," अशी तिची प्रार्थना केली.

**सोमस्वामी**चें चरित्र ऐकून तिलाही फार कळवळा आला. तिला मंत्र वगैरे तर माहीतच होते. तिणें तत्काल एका मंत्राचा जप करून माकडाच्या गळयांतला दोरा सोडतांक्षणींच तो **सोमस्वामी** पूर्वींप्रमाणेंच मनुष्य झाला. आपल्यावर उपकार करणाऱ्या त्या तपस्विनीचे आभार मानण्याविषयीं **सोमस्वामी** प्रवृत्त होत आहे इतक्यांत विद्युल्लतेसारखी ती **मोक्षदा** एकाएकीं अदृश्य झाली. नंतर त्या उभयतांनीं तेथेंच राहून तपश्चर्या करून हरलोकांत उत्तम गति मिळविली." याप्रमाणें कथा सांगून **गोमुख** म्हणाला, "महाराज, स्त्रिया स्वभावतः चपल असतात. त्यांचें वर्तन फारच वाईट असतें. केव्हां त्या अतिशय सुख व केव्हां दुःख देण्यास कारण होतात. तसेंच कधीं विवेक आणि वैराग्यही त्यांच्या समागमापासूनच मिळतें. नूतन चंद्रकलेप्रमाणें आपल्या जन्मानें कुळाला शोभा आणणारी अशी स्त्री कोठें विरळा जन्मास येते."

याप्रमाणें **गोमुखानें** कथा सांगितली; ती ऐकून युवराज **नरवाह-**

**नंदत्त** फार संतुष्ट झाला. **गोमुखाची** सर्वांनीं फार तारीफ केली. तेव्हां त्याच्या स्पर्धेनें **मरुभूति** ह्मणाला, "युवराज, सगळ्याच स्त्रिया चपळ आहेत, हें ह्मणणें मला योग्य वाटत नाहीं. बहुतकरून त्या तशा असतात खऱ्या; तरी चांगल्याही पुष्कळ असतात. ज्यांला कोणाचीच आडकाठी नाहीं, अशा वेश्यादेखील सत्वशील असतात. मग इतर असतील यांत काय संशय आहे? याविषयीं एक कथा प्रसिद्ध आहे ती आपल्याला सांगतों. **पाटलिपुत्रक** नांवाच्या नगरांत **विक्रमादित्य** नांवाचा राजा होता. त्याचे **हयपती** आणि **गजपती** नामक दोघे मांडलिक राजे परम मित्र होते. त्यांच्या जवळ हत्ती आणि घोडे यांचें भरपूर साधन होतें. **पैठणांत** राज्य करणारा **नरसिंह** नांवाचा एक बलाढ्य राजा **विक्रमादित्याचा** शत्रू होता. त्याच्याजवळ जी फौज होती ती केवळ पायदळच होती.

**विक्रमादित्याच्या** आणि **नरसिंहाच्या** नेहमीं चकमकी झडत असत. त्यांत बहुतकरून त्यांची बरोबरीच होई. तेव्हां अशा लढाया करून कांहीं उपयोग नाहीं. आपल्या शत्रूचा पुरता पाडाव करावा म्हणून **नरसिंहानें** खूप तयारी केली. तरी तो त्याच्यावर चालून गेला नाहीं. **नरसिंह** **विक्रमादित्यापेक्षां** प्रबळ होता. **विक्रमादित्य** मोठा मानी व आपल्या मित्राच्या बळानें गर्विष्ठ झालेला होता. शत्रूवर स्वारी करण्याची गोष्ट सभेंत निघाली; तेव्हां रागाच्या आवेशांत येऊन त्याणें जोरानें ही प्रतिज्ञा केली. तो म्हणाला, "लोकहो, तुह्मी चमत्कार पहा. मी यावेळीं त्या शत्रूला असा जिंकतों कीं त्यानें माझ्या दारांत चाकरी करीतच रहावें; व बंदी भाटांनीं माझा पराक्रम वर्णन केलेला त्यानें ऐकत असावा. असें करीन तरच मी **विक्रमादित्य**."

रागाच्या भरांत मोठ्या ताठ्यानें अशी प्रतिज्ञा करून त्याणें आपले मित्र **हयपती** आणि **गजपती** यांला लढाईच्या तयारीनें बोलाविलें. तेव्हां एकानें स्वारांच्या पलटणी व एकाने हत्तीवर बसणाऱ्या यो-

द्दूचांच्या पलटणी बरोबर घेऊन, मोठ्या तयारीनें **विक्रमादित्याला** साह्य केलें. स्वतः आपली फौज व त्या दोघां मित्रांची फौज एके-ठिकाणीं करून, समुद्रासारखें अफाट सैन्य बरोबर घेऊन, सैन्याच्या धुरळ्यानें आकाशाला आच्छादीत होत्साता राजा **विक्रमादित्य** कडे-कोट तयारीनें **नरसिंहा**वर चालून गेला. **विक्रमादित्य** आपल्या-वर येत आहे हें ऐकून **नरसिंह**ही भ्याला नाहीं. आपल्या नांवाचें सार्थक करून दाखविण्याकरितांच कीं काय, तो आपली फौज बरोबर घेऊन शहराच्या बाहेर त्याला सामना देण्यास तयार झाला. उभ-यतांची लढाई जुंपली. ती लढाई प्रेक्षकांला फारच आश्चर्यकारक वाटली. एकीकडे सर्व हत्ती आणि घोडे; व दुसरीकडे फक्त पायदळ! हा चमत्कार पाहण्याकरतां आकाशांत देवांचीं विमानें दाटलीं. हत्ती आणि घोडे हे प्राणी आकारानें मोठे आहेत तरी शिकून तयार झालेल्या हुषार पायदळापुढें त्यांचें काय चालणार ? त्यांतून **नरसिंह** राजाचें सैन्य थोडेंथोडकें नव्हतें. त्याच्या असंख्य फौजेनें **विक्र-मादित्याच्या** फौजेची त्रेधा उडविली. हत्ती सोंड वर करून 'चीची' करीत मारायला येतो आहे, तों शत्रूच्या वीरानें चटकन् त्याची सोंडच कापून टाकावी. कोणाचे पाय कापले, कोणाच्या माना कापल्या, याप्रमाणें जिकडे तिकडे एकसारखी कत्तल करून **नरसिंहा**च्या फौजेनें **विक्रमादित्या**च्या सैन्याचा अगदीं मोड केला. तेव्हां त्याणें राहि-लेल्या फौजेनिशिं पळ काढला. त्याचे ते दोघे मित्र आपापल्या राजधानींला गेले. व स्वतः **विक्रमादित्य पाटलिपुत्रक** नगरांत शिरून आपला बचाव करता झाला.

इकडे **नरसिंह** जयशाली होत्साता सूत, मागध, बंदी इत्यादिकांनीं ज्याचें यश वर्णन केलें आहे, प्रजाजनांनीं ज्याच्यावर पुष्पवृष्टी केली आहे, असा मोठ्या थाटानें **प्रतिष्ठान** शहरांत प्रवेश करिता झाला. त्या दिवसापासून **नरसिंहा**चें प्रस्थ फारच वाढलें. व **विक्रमादित्य**

अगदीं निस्तेज झाला. लढाईला जाण्यापूर्वी त्याणें भर सभेंत जी प्रतिज्ञा केली होती ती खोटी झाल्यामुळें त्याला लोकांस तोंड दाखविण्याची लाज वाटूं लागली. उघडच आहे; तसा अपमान साधारण मनुष्यालादेखील कधीं सहन व्हावयाचा नाहीं. मग **विक्रमादित्या**सारख्या अभिमानी पुरुषाला कसा सहन होईल? कोणत्याही रितीनें **नरसिंहा**ला जिंकावें असा त्याचा निश्चय झाला होता. शस्त्रांनीं तो अजिंक्य आहे, असें समजून विलक्षण युक्तीच्या साह्यानें त्याला जिंकायचा असा **विक्रमादित्या**नें निश्चय केला. 'माझी प्रतिज्ञा खोटी झाल्याबद्दल लोक मला दोष देतात ते खुशाल देवोत बापडे! पण मी घेतलेली शपथ कधीं खोटी होऊं देणार नाहीं. मीं कपट केलें तर त्याबद्दलही लोकांनीं दोष दिला असतां वाईट मानण्याचें कांहीं कारण नाहीं,' याप्रमाणें कोणत्याही रीतीनें आपला हेतू सिद्ध करायचा असा विचार करून **विक्रमादित्या**नें योग्य प्रधानांवर सर्व राज्याचा भार ठेवला. आणि **बुद्धिवर** नांवाच्या एका मंत्र्याला बरोबर घेऊन तो शंभर निवडक सरदारांसहवर्तमान कोणाला नकळत आपल्या नगरांतून निघाला. त्याणें बरोबरच्या सरदारांला अनेकप्रकारचे वेष देऊन निरनिराळ्या ठिकाणीं पाठविलें. आणि त्यांतले पांच शूर सरदार व तो **बुद्धिवर** प्रधान यासहवर्तमान कानफाट्याचा वेष घेऊन, तो आपल्या शत्रूचें नगर जें **प्रतिष्ठान** त्यांत शिरला.

मुषाफरांला धर्मशाळा किंवा वेश्यादिकांचीं घरें यांशिवाय दुसरीकडे कोठें रहावयाला जागा मिळणार आहे? धर्मशाळेंत उतरलों तर आपल्याला पाहिजे आहे ती माहिती मिळेल किंवा नाहीं याविषयीं संशय आल्यावरून, तो शहरांत वेश्यांचीं घरें धुंडींत निघाला. तेथें **मदनमाला** नांवाची एक मोठी श्रीमंत वेश्या राहत होती. राजवाड्यासारखें टोलेजंग तिचें तें घर पाहून राजा **विक्रमादित्य** त्यांत शिरला. उंच तटबंदीवर लावलेल्या पताकांच्या हलण्यानें—जणूं काय आप-

त्याला बोलावताहेत असें जेथें वाटतें आहे, मंद सुगंध वायूनें दरवा॰ ज्यांतल्या बागेचे वृक्ष हालताहेत, गरगर फिरणाऱ्या वेलींचे कोंवळे शेंडे जणूं काय तोंडा भोंवतीं आरती ओंवाळताहेत; अशा त्या वार-विलासिनीच्या हवेलींत **विक्रमादित्य** राजाची स्वारी प्रविष्ट झाली. तिच्या मुख्य दरवाजावर हातांत शस्त्रास्त्रें धारण करणारे पुष्कळ शिपाई व कांहीं स्वारही होते. त्या हवेलीला चहूंकडे चार मोठे दरवाजे असून प्रत्येकावर पहारेकरी व स्वार हाजर होते.

राजाची स्वारी मुख्य दरवाजांत जाऊन पोंचतांच, भरजरी पोषाख केलेला एक म्हातारा पुढें येऊन मोठ्या आदबीनें त्याणें त्याचें येण्याचें कारण विचारून घेतलें. आणि 'क्षणभर आपण दम धरावा; मी यज-मानणीझा वर्दी देऊन येतों,' अशी विनंती करून त्याणें **मदनमालेला** वर्दी दिली. व तिची आज्ञा झाल्यावरून त्या प्रवाशांला नेण्याकरितां तो परत आला. एका बाजूला उत्तम उत्तम घोड्यांची पागा शोभत आहे; दुसरीकडे हत्तींच्या रांगा लागल्या आहेत, कोठें शिपाईलोक तरवारी परजीत बसले आहेत, कोठें दांडपट्टा खेळताहेत, कोठें हिरे माणकें मोहरा वगैरेंची व्यवस्था चालली आहे, कोठें चाकरलोक स्वस्थ बसून गोष्टी करताहेत, अशा त्या टोलेजंग वाड्याचे, एकाच्या आंत एक असे सात चौक **विक्रमादित्य** राजानें अतिक्रमण केले. त्यांच्या आंत रत्नखचित असा तो तिचा सुंदर महाल त्याच्या दृष्टीस पडला. प्रत्येक मनुष्याचें, तो ज्या योग्यतेचा व ज्या स्थितींतला असेल तदनुसार बोलणें चालणें व सहजवर्तन होत असतें. तिच्या वाड्यांत निरनिराळ्या अनेकप्रकारच्या वस्तू व अनेक चमत्कार होते, तरी त्यांतून हत्ती घोडे शस्त्रास्त्रें यांच्याकडेसच राजाचें विशेष लक्ष लागलें. व त्यांचीच त्याणें फार तारीफ केली. राजा **विक्रमादित्य** हा अपरि-चित मनुष्य होता. त्यांतून कानफाट्याचा वेष घेतला असून त्याणें आपलें खरें तत्वही सांगितलें नव्हतें. तरी वेश्या ह्या स्वभावतःच मोठ्या

चतुर असतात. त्यांच्या चातुर्यांतली मुख्य गोष्ट हीच कीं, त्याच्या आकारावरून, बोलण्याचालण्यावरून व इतर रीतीनें हा मनुष्य कोणत्या प्रकारचा आहे, तें जाणून त्या त्याच्याशीं वर्तन करतात. **मदनमाले**ला हे प्रवासी कोण आहेत? व कशा योग्यतेचे आहेत? हें समजून घ्यायचें होतें म्हणून तिणें 'त्यांला आंत आणतेवेळीं वाड्यांतले सर्व प्रकार दाखवीत आणावें' असें सांगितलें होतें. व त्यावेळीं त्यांचे कसे काय उद्गार निघतात तेही वेळोवेळ कळविण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें **विक्रमादित्या**चे जे उद्गार सेवकांनीं तिला कळविले, त्यांवरून हा कोणी मोठ्या योग्यतेचा मनुष्य असावा, व कांहीं कारणामुळें वेषांतर करून तो आला असावा, अशी आधींच तिणें आपल्या मनांत गांठ मारली. व त्याप्रमाणेंच पुढें त्याच्याशीं वर्तनही ठेवलें.

राजा **विक्रमादित्य** महालाच्या जवळ येतांच ती त्याला सामोरी गेली. व आपला त्याच्यावर अभिलाष आहे असें दाखवून कौतुकानें नमस्कार करून मोठ्या नम्रतेनें तिणें त्याला महालांत नेलें. मोठ्या राजाला योग्य अशा आसनावर बसवून त्याचा उत्तम सत्कार केला. राजा **विक्रमादित्य**ही तिचें रूप, मोठें भाग्य आणि नम्रता, यांणीं चकित होत्साता तिच्यावर फिदा झाला. आपण कोण? व कोठला? हें न कळवितां आपलें शरीर त्यानें तिला अर्पण केलें. तीही मोठी चतुरच होती. तिणें त्यासंबंधानें राजाजवळ मुळींच कांहीं प्रश्न केला नाहीं. नंतर मंगलस्नानाची तयारी झाली. अंगाला सुगंधी तेल वगैरे लावून स्वतः आपल्या हातांनीं तिनें त्याला स्नान घातलें. उत्तम वस्त्रें दिलीं, चांगले चांगले अलंकार घातले, सुवासिक फुलांचा हार घातला व अंगाला चंदनाच्या उट्या लावल्या. हा सर्व आदरमान होत आहे; तों इकडे स्वयंपाकाची तयारी तिणें पूर्वींच करविली होती. त्याला शिधासामग्री वगैरे काय पाहिजे तें देऊन त्याच्याबरोबरच्यांकडूनच जेवणाची तयारी करविली. नंतर राजानें यथेच्छ भोजन केलें.

पुढें तांबूल इत्यादि उपचार अर्पण करून ती त्याच्या सेवेंत तत्पर राहिली. व त्याच्या दर्शनानें वश झालेली ती वारांगना राजाला आपला आत्मा अर्पण करिती झाली. नंतर तिच्यासहवर्तमान प्राशनादि लीलेंत निमग्न होऊन राजानें तो दिवस मोठ्या आनदांत तिच्या घरीं घालविला.

याप्रमाणें **मदनमालेच्या** घरीं गुप्तपणें राजा **विक्रमादित्य** राहिला होता. ती प्रतिदिवशीं, मोठ्या सार्वभौमाला योग्य अशा आदर-उपचारांनीं त्याला संतुष्ट करीत होती. तो राजा मोठा दानशूर होता. प्रतिदिवशीं याचकांला तो जितकें द्रव्य देई तितकें सर्व ती **मदनमाला** पुरवीत असे. तिनें त्याबद्दल आपली कधींही नाखुषी दाखविली नाहीं, किंवा 'आतां पुरे' असेंही ह्मटलें नाहीं. याप्रमाणें त्या वेश्येचें शरीर आणि द्रव्य दोहोंचाही राजा **विक्रमादित्यानें** यथेच्छ उपभोग चालविला याबद्दल तिणें आपल्याला कृतार्थ मानलें. राजावांचून दुसऱ्या पुरुषावर किंवा त्याच्या देणगीवर तिचें बिलकूल लक्ष्यच नव्हतें. फार काय सांगावें; प्रत्यक्ष त्या शहरचा राजा **नरसिंह** हा एके दिवशीं, तिचे गुण ऐकून लुब्ध होत्साता तिला भेटायला आला; पण तिणें त्याचीदेखील मुलाकत घेतली नाहीं! इतकी ती **विक्रमादित्यावर** फिदा झाली होती. युक्तिप्रयुक्तीनें राजा **नरसिंह** याचें समाधान करून तिणें त्याला वाटेस लावलें.

याप्रमाणें **मदनमालेनें** ज्याची उत्तम सेवा केली आहे, असा राजा **विक्रमादित्य** एकेदिवशीं आपल्या बरोबरच्या **बुद्धिवर** नामक प्रधानाला एकांतीं ह्मणाला, "गड्या यावेळीं मी मोठ्या संकटांत पडलों आहें. वेश्या ह्मटली ह्मणजे ती द्रव्यलोभी असायचीच. जरी ती एखाद्या पुरुषावर सकाम झाली तरी त्याच्याकडून मुळींच कांहीं प्राप्ती झाली नाहीं तर ती मुळींच संतुष्ट होत नाहीं. वेश्यांचा जो द्रव्यलोभ त्यांतलाच अंश ब्रम्हदेवानें याचकांला दिला आहे. असें असून सां-

प्रत मला निराळ्याच प्रकारचा अनुभव येत आहे. या **मदनमालेनें** आपलें शरीर मला अर्पण केलें असून, त्याचा मी यथेच्छ उपभोग घेत आहें. त्याबद्दल माझ्याकडून तिला हावेळपर्यंत एका कवडीचादे-खील लाभ झालेला नाहीं. हें एक असो; हिच्या घरीं संपत्ती पुष्कळ आहे, ह्मणून कदाचित् ही आणखी मिळविण्याची आशा धरीत न-सेल; किंवा माझ्याकडून एकदम मोठा लाभ होईल अशा आशेवर ती कांहीं मागत नसेल असें कदाचित् ह्मणतां येईल. पण दुसरा प्रकार याहूनही मोठा विलक्षण आहे. मी प्रतिदिवशीं हजारों रुपये दानधर्मांत खर्च करतों आणि ते सर्व द्रव्य तिचेंच. आज इतक्या दिवसांत कोणा पाहिजे त्याला काय हवें तें मीं दिलें; तरी तिनें तोंड वांकडें केल्याचें मीं कधींही पाहिलें नाहीं. दिवसें दिवस माझ्यावर तिची इतराजी तर नाहींच, पण तिच्या प्रेमाच्या दोऱ्या दृढ होत चालल्या आहेत. तेव्हां आतां हिचे हे उपकार फेडावे तरी कसे? याचें मला मोठें संकट पडलें आहे. बरें मी आपल्या घरांतून निघालों तो कशाकरितां? हें तुला माहीतच आहे. अर्थात् माझी प्रतिज्ञा मला पूर्ण केलीच पाहिजे. आणि हिचे उपकार फेडल्यावांचून तर जातां येत नाहीं. तेव्हां अशी कांहीं युक्ति असली तर सांग कीं, जिच्या योगानें आपली दोन्ही कामें सिद्ध होतील."

हें ऐकून तो **बुद्धिवर** प्रधान ह्मणाला, "महाराज, असें असेल तर **प्रपंचबुद्धी** नांवाच्या संन्याशानें जीं आपल्याला अमोलिक रत्नें दिलीं आहेत त्यांतलीं कांहीं या वेश्येला द्यावीं ह्मणजे झालें. हिचें आजपर्यंत जें द्रव्य आपण खर्च केलें असेल, तें त्यांतल्या एकाच रत्नानें भरून येईल अशीं तीं अमोलीक आहेत." हें ऐकून राजा ह्मणाला, "अरे, तीं सर्व रत्नें जरी दिलीं तरी या **मदनमालेचे** थोडेदेखील उपकार फिटायचे नाहींत. आतां एवढें खरें आहे कीं, त्या रत्नांचें तूं नांव घेतल्यावरून मला दुसऱ्या एका गोष्टीची आठवण झाली. त्या रत्नांच्या

संबंधानें मला जो एक लाभ झाला आहे तो दिला असतां मात्र या उदार वेश्येचे उपकार फिटतील. तेव्हां तसें आपण करूं ह्मणजे झालें."

**बुद्धिवराला**, त्या रत्नांच्या संबंधानें राजाला दुसरा कोणता लाभ झाला आहे हें मुळींच माहीत नव्हतें. **प्रपंचबुद्धि** नांवाचा संन्याशी रोजरोज रत्नें आणून देत होता येवढें मात्र त्याला माहित होतें. ह्मणून—"आपल्याला दुसरा लाभ झाला तो कोणता? तो कृपा करून सांगावा" अशी त्याणें विनंती केली. तेव्हां राजा ह्मणाला, "एक, या संबंधाची कथा तुला सांगतों. पूर्वीं मी **पाटलिपुत्र** राजधानींत असतां प्रतिदिवशीं **प्रपंचबुद्धी** नावाचा संन्याशी आपल्या छाटींत दडवून एक फळ आणी. आणि तें माझ्या हातावर ठेवून आशीर्वाद देऊन जात असे. याप्रमाणें सतत एक वर्ष त्याचा क्रम चालला होता. मीही—कोठलें? कसलें फळ? यांत काय आहे? वगैरेचा कांहीं तपास न करतां संन्याशानें माझ्या हातावर ठेवलें कीं तसेंच मी तें जामदाराच्या हातीं देत असें. एके दिवशीं नित्याप्रमाणें त्या संन्याशानें माझ्या हातावर फळ ठेवलें. आणि मी जामदाराच्या हातांत देत आहें इतक्यांत दैवयोगानें तें खालीं पडून त्याचे दोन तुकडे झाले. तेव्हां तत्काल त्याच्या पोटांत असलेलें लाल व तेजस्वी रत्न बाहेर आलें. जणूं काय आजपर्यंत वेडेपणानें मी आपली परिक्षा केली नाहीं, ह्मणून त्या फळानें आपण होऊन आपलें हृदय मला फाडून दाखविलें.

हा चमत्कार मीं पाहिला तेव्हां संन्याशानें यापूर्वीं जीं फळें दिलीं होतीं त्यांतही अशींच रत्नें आहेत कीं काय? तें पाहण्याकरतां मी पूर्वींचीं सर्व फळें आणण्यास जामदारास सांगितलें. तोही बिचारा माझ्यासारखाच भोळाभावार्थी. मी त्याच्या हातांत फळ दिलें ह्मणजे तें त्याणें तसेंच जामदारखान्यांत नेऊन ठेवीत असावें. हें कसलें? व यांत काय आहे? हें पाहण्याची त्यालाही कधीं इच्छा झाली नाहीं. हुकुमाप्रमाणें त्याणें तीं सर्व फळें माझ्याजवळ हाजर केलीं. तेव्हां फोडून

पाहतों तर प्रत्येकांत निरनिराळ्या तऱ्हेचीं रत्नें. मला त्या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें. हा यःकश्चित् संन्याशी असून याच्याजवळ इतकीं रत्नें कोठलीं ? व तीं अशीं बहुमोल याला मिळालीं तरी कशीं ? आणि तीं हा विनाकारण मला कां आणून देतो ? हें कांहींच माझ्या लक्षांत येईना. नंतर दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें तो **प्रपंचबुद्धी** मला फळ द्यायला आला. तेव्हां मी त्याला विचारलें "महाराज, अशीं बहुमोल रत्नें मला आपण आणून देतां तीं, मीं प्रसन्न व्हावें ह्मणून देत असाल ? पण अशी माझी प्रसन्नता संपादन करून आपल्याला काय करायचें आहे ? तें मला समजलें पाहिजे."

यावर त्या **प्रपंचबुद्धीनें** 'एकांतीं सागतों.' असें ह्मटल्यावरून मीं जवळच्या हुजऱ्याला वगैरे घालविलें. तेव्हां तो मला ह्मणाला, " महाराज, आतां जी ही कृष्णचतुर्दशी येणार आहे, त्या दिवशीं रात्रीं गांवाबाहेरच्या स्मशानांत मला कांहीं मंत्रसाधन करायचें आहे. त्या कामीं मला आपलें साह्य पाहिजे आहे ; दुसरें कांहीं नको. मी मंत्र जपायला बसेन त्यावेळेस बाहेरून जो कांहीं अपाय होईल तो आपण निवारण केला ह्मणजे झालें. आपल्यासारख्या वीराच्या साह्यानें सिद्धी अनायासानें प्राप्त होते. " याप्रमाणें त्या संन्याशानें माझें साह्य मागितलें. तेव्हां मी त्याला तें द्यायचें कबूल केलें. त्याचा अंतर्गत हेतू काय होता हें मला अद्याप मुळींच ठाऊक नव्हतें. मी आपला शौर्याच्या घमंडीवर गेलों. ज्याच्या अंगीं शौर्य असतें त्याला तसा एखादा साहसाचा प्रसंग आला ह्मणजे फार आनंद वाटतो. असो.

मीं विचार न करतां त्याला वचन दिलें. त्यावरून आपलें काम सिद्ध झालें असें समजून तो आनंदानें निघून गेला. थोडक्या दिवसांनीं ती त्याची कृष्णचतुर्दशीही आली. तेव्हां त्या संन्याशाला दिलेल्या वचनाची मला नेमकी आठवण झाली. त्या दिवशीं मी सूर्योदयापासून अगदीं व्रतस्थ राहिलों. दिवसाचें सारें कृत्य केलें तथापि कांहीं आहार

केला नाहीं. केव्हां रात्र येईल आणि केव्हां मी त्या संन्याशाचें साह्य करीन असें झालें होतें. मी मध्यान्हकालची संध्या करून जप करीत होतों. करतां करतां तेथेंच माझा डोळा लागला. आणि कांहीं वेळानें मला एक स्वप्न पडलें. स्वप्नांत गरुडावर बसलेला भगवान् भक्तवत्सल ज्याच्या मांडीवर **लक्ष्मी** शोभते आहे, असा प्रत्यक्ष **विष्णु** दिसला. त्याणें मला अशी आज्ञा केली कीं, "अरे **प्रपंचबुद्धि** संन्याशी खरोखरीचाच प्रपंचबुद्धी[1] आहे. मुला, तो मंडळांत बसून देवतेचें साधन करणार आहे. त्याचें साह्य करायला तूं गेलास ह्मणजे तो तुला देवतेला बली देणार! याकरितां तो जें तुला कांहीं सांगेल तें तूं करूं नकोस. तुला मारण्याचा त्याचा इरादा आहे. वचन दिल्याप्रमाणें त्याचें साह्य करायला जा; पण तो जें करायला सांगेल तें, 'आधीं तूं करून दाखीव ह्मणजे मी करतों,' असें सांगून प्रथम त्याच्याकडून करीव. असें करतां करतां तुला त्यांतलेत्यांत सवड सांपडेल तेव्हां त्याला ठार कर. ह्मणजे त्यानें जी सिद्धी प्राप्त होण्याकरतां येवढा प्रयत्न केला आहे, ती सिद्धी आयतीच तुला मिळेल." असें भाषण करून भगवान् विष्णू अदृश्य झाला. नंतर मी जागा होऊन त्या दृष्टांताचा बराच वेळ विचार केला. व त्याप्रमाणें करायचें असा माझा पक्का निश्चय झाला. तो संन्यासी कपटी होता हें मला तोंपर्यंत ठाऊक नव्हतें. भगवंताच्या अनुग्रहानें त्या दुष्टाचा मृत्यू आज माझ्या हातून होणार याबद्दल मला समाधान वाटलें.

नंतर लौकरच रात्र पडली. पहिला प्रहर गेल्यावर हातांत तरवार घेऊन मी एकटाच त्या स्मशानांत गेलों. तेथें इकडे तिकडे शोधीत असतां एक मोठें मंडळ करून त्यांत जप करीत बसलेला तो संन्याशी मला दिसला. मी बोलण्यापूर्वींच मला पाहून फार आनंद झाल्याचें

---

१—'प्रपंच' शब्दानें येथें कपट घेतलें आहे. प्रपंच ह्मणजे कपट ज्याचे बुद्धींत आहे तो प्रपंचबुद्धि; अर्थात् एक सांगून भलतें करणारा.

दाखवून तो शठ मला ह्मणाला, "हे महाप्रतापी राजा, तूं आपलें वचन सत्य केलेंस याबद्दल मला फारच संतोष वाटतो. तुझ्यासारख्या शूराला अशक्य काय आहे? आतां कृपा करून मी सांगतों तसें कर. तुझे डोळे झांक आणि हातपाय पसरून जमिनीवर थोडावेळ सपशेल पालथा पड. असें केलेंस म्हणजे केवळ एकट्या मलाच सिद्धि प्राप्त होणार असें नाहीं; आपण दोघेही सिद्ध होऊं." हें त्याचें घातकी भाषण ऐकून हा आतांच मला ठार करणार असें माझ्या लक्षांत आलें. मी ह्मणालों, "मी केवळ आपल्या साह्याकरितांच आलों आहें. स्वतः मला सिद्धीची वगैरे कांहीं जरूर नाहीं. माझ्या साह्यानें आपल्याला सिद्धि प्राप्त झाली ह्मणजे तेवढ्यानें मी संतुष्ट होईन. मी समजलों होतों कीं आपण मला कांहीं तरी बिकट काम सांगाल म्हणून; पण तसें कांहींच नाहीं. जमिनीवर पालथें पडायचें अगदीं सोपें आहे. तथापि हें तुम्हां मांत्रिकांचें प्रकरण आहे. मला यांतील कांहींच माहिती नाहीं. एखाद्या भलत्याच रितीनें पडलों तर तुमचें कार्य व्हायचें नाहीं. याकरतां कसें जमिनीवर पडलें पाहिजे तें कृपा करून आपण मला दाखवा ह्मणजे त्याप्रमाणें करतों."

तो भिक्षु मोठा घातकी होता तरी त्याला वेडाच म्हटला पाहिजे. कारण, माझें बोलणें तो खरें समजला. आणि मला दाखविण्याकरितां जमिनीवर पालथा पडून 'असें पडावें बरें' ह्मणून त्याणें सांगितलें. मीही पण त्यावेळीं गाफल राहिलों नाहीं. याला चीत करण्याची हीच संधि असें समजून मी तरवारीचा असा एक हात केला कीं; त्यासरसें त्याचें शिर आणि धड वेगळीं वेगळीं झालीं. मी तें कृत्य केलें खरें तथापि—'देवा! यांत माझ्या हातून अधर्म तर घडला नाहींना? ज्यानें मला पुष्कळ अमोलिक रत्नें आणून दिलीं त्याला कांहीं अपराध नसतां मी मारलें हें चांगलें नाहीं,' असें समजून मी खिन्न होत आहें इतक्यांत आकाशवाणी झाली. "शाबास, राजा शाबास! तूं

आज हा पापी संन्याशी बळी दिलास हें फार चांगलें केलेंस. यानें आकाशांत संचार करतां येण्याची सिद्धी मिळण्याकरितां हा प्रयत्न केला होता. तीच सिद्धी आज तुला प्राप्त झाली आहे. हें या दुष्टाला तूं मारलेंस त्याचें फळ होय. याशिवाय तुझें धैर्य पाहून मला फार संतोष झाला आहे. मी येथच्या निधीचें रक्षण करणारा **कुबेर** आहें. माझा संतोष व्यर्थ जाणार नाहीं. याकरितां तुला पाहिजे असेल तो दुसरा वर मागून घे." असें बोलून प्रत्यक्ष माझ्या पुढें प्रकट झालेला तो धनाधिप वर मागण्याविषयीं मला पुनः प्रेरणा करूं लागला. तेव्हां मी त्याला नमस्कार करून ह्मणालों, "भगवन्, यावेळीं तुझ्याजवळ काय मागावें तें मला सुचत नाहीं. तर ज्यावेळीं मला जरूर लागेल त्यावेळीं मी तुझी प्रार्थना करीन. मग तूं उपयुक्त वर दे. हाच यावेळीं मी वर मागतों." हें ऐकून "तुझी मर्जी तशी असेल तर तसें कां होईना!" असें ह्मणून तो भगवान् तेथेंच अदृश्य झाला. नंतर ज्याला सिद्धी प्राप्त झाली आहे, असा मी परत लौकर आपल्या वाड्यांत गेलों. झालें. माझा जो वृत्तांत ऐकण्याची तुझी इच्छा होती तो मी तुला सांगितला. आतां पुढचा विचार असा आहे कीं, **कुबेरानें** जो मला वर दिला आहे त्याणें या **मदनमालेच्या** उपकाराची फेड करावयाची. याकरितां हे **बुद्धिवरा**, तूं आपल्या **पाटलिपुत्र** नगरास जा. माझा जो राजकीय पोषाख आहे तो तूंच धारण कर. आणि फारसा कोणाच्या दृष्टी पडूं नको. व मीच आलों आहें असें शहरांत जिकडे तिकडे कळोंत. असें झालें ह्मणजे मी तुझ्या पाठोपाठ या प्रियेवर प्रत्युपकार करून—परत इकडे येण्याच्या इराद्यानें—कांहीं दिवस राहण्याकरितां **पाटलिपुत्रक** नगरांतच येईन." याप्रमाणें आपल्या सचिवाला सांगून राजा **विक्रमादित्य** स्नान भोजन वगैरे आटोपल्यावर लगेच **बुद्धिवराला**, त्याच्याबरोबर सर्व सामानसुमान व पांच सरदार आणले होते तेही देऊन त्याला रवाना करता झाला.

यजमानाची आज्ञा घेऊन **बुद्धिवर** प्रधान तेथून निघाला. तेव्हां **मदनमाले**ला कांहींसा संशय आला. राजानें आपण काय करतों हें तिला सांगितलें नव्हतें. व तिनेंही त्याच्या करण्याबद्दल कधींच प्रश्न केला नव्हता. ते एकमेकांच्या मनांतला हेतू समजून तदनुसार वर्तन करीत असत. पुढें होणाऱ्या वियोगानें जिचा अंतरात्मा उदास झाला आहे, मन उत्कंठित झालें आहे, अशा त्या **मदनमाले**सह राजानें ती रात्र तेथें घालविली. उभयतांनीं परस्परांला आपला हेतू अगदीं स्पष्ट सांगितला नव्हता तरी राजाची स्वारी आतां जाणार हें **मदनमाला** समजून चुकली. जणूं काय तिचा अंतरात्माच तिला सांगत होता कीं, तुला आतां वियोग सहन करावा लागेल. त्या रात्रीं राजाला झोंप लागली होती; पण ती मात्र उत्कंठित होऊन त्याच्या गळ्याला मिठ्या घालीत असे. साऱ्या रात्रींत तिचा डोळ्याला डोळा मुळींच लागला नाहीं. प्रातःकाल झाल्यावर राजा स्नानसंध्या वगैरे करून देवपूजा करण्याकरितां ह्मणून एकटाच देवघरांत गेला. आणि तेथें पुष्कळ वेळ जप करीत बसला होता. जपाच्या निमित्तानें त्याणें तेथें **कुबेराचें** ध्यान केलें. तत्काल तो प्रकट होतांच पूर्वीं देण्याचें कबूल केलेला आपला वर त्याणें त्याच्याजवळ मागितला. तो ह्मणाला, "भगवन्, सोन्याचे पांच मोठे पुतळे आतांच्या आतां मला प्राप्त व्हावे, हा मी वर मागतों. ते पुतळे अक्षय असावे—ह्मणजे त्यांच्या अंगाचे तुकडे तुकडे काढून घेतले, तरी ते पूर्ववत् व्हावे, हा मला वर पाहिजे आहे."

ही त्याची प्रार्थना ऐकून **कुबेरानें**—"जशी तूं इच्छा करतोस, त्याप्रमाणें तुला पांच सोन्याचे पुतळे प्राप्त होतील." असें सांगितलें व तो तेथेंच गुप्त झाला. नंतर राजा आपल्यासभोंवती पाहतो तों सोन्याचे मोठे धिप्पाड पांच पुतळे त्याच्या दृष्टी पडले. त्यांला पाहून राजाला फारच आनंद झाला. **मदनमालेनें** जी आपली सेवाचाकरी केली, तिचा मोबदला आपल्याकडून तिला मिळाला हें बरें झालें, असें त्याला

वाटलें. नंतर आपण जी पूर्वीं प्रतिज्ञा केली होती. तिची घट्ट आठवण ठेवून तो देवघरांतून जो बाहेर निघाला तो तत्काल आकाशांत उडाला. व त्या मार्गानें लौकरच **पाटलिपुत्रक** नगरांत प्राप्त झाला. गांवांतल्या लोकांना कांहीं वर्तमान न कळवितां तो थेट आपल्या महालांत उतरला. **बुद्धिवर** इत्यादि प्रधान त्याची वाटच पहात होते. त्यांला व अंतःपुरांतल्या राणी इत्यादि सर्व लोकांला त्याचें आगमन फार आनंदकारक झालें. प्रतिज्ञा पुरी केल्यावांचून आपण आलों याची त्याला लाज वाटत होती. ह्मणून तो दरबारांत कधींच येऊन बसला नाहीं. अंतःपुरांत राहूनच कामकाज पहात होता. यावेळीं त्याचें शरीर **पाटलिपुत्रक** नगरांत होतें तरी मन **प्रतिष्ठान** शहरांतच होतें. असो.

इकडे **प्रतिष्ठान** शहरांत काय वर्तमान घडलें तें पाहूं. देवघरांत जाऊन फार वेळ झाला तरी राजा अद्याप बाहेर येत नाहीं, ह्मणून आपल्या हृदयवल्लभाला पाहण्याविषयीं उत्कंठित झालेली **मदनमाला** एकदम देवघरांत गेली. तेथें तिला तो प्रिय पुरुष ( **विक्रमादित्य** ) तर मुळींच दिसला नाहीं. मात्र मोठे धिप्पाड असे पांच सोन्याचे पुतळे दिसले. वस्तुतः दुसरी कोणी द्रव्यलोभी वेश्या असती तर तिला ते पुतळे पाहून होणाऱ्या आनंदापुढें **विक्रमादित्याची** आठवणदेखील झाली नसती. पण **मदनमाला** ही कशाप्रकारची स्त्री होती हें वर सांगितलेंच आहे. आपला वल्लभ न दिसल्यामुळें तिला त्या पुतळ्यांबद्दल कांहींच वाटलें नाहीं. उलट ती दुःखित होऊन ह्मणाली, "खरोखर तो माझा प्रिय कोणी विद्याधर किंवा गंधर्व असावा. ज्याणें मला हे पुतळे देऊन आपण आकाशमार्गानें गमन केलें. हे येवढे मोठे सोन्याचे पुतळे आहेत; पण त्याच्यावांचून यांला घेऊन मी काय करूं?" असा विचार करून ती घाबरी होऊन बाहेर आली. आपल्या वाड्यांतील सर्व नोकरचाकरांला तिणें तो कोठें गेला? काय झालें? त्याचा कोणी अपमान केला कीं काय? वगैरे विचारलें. नंतर वाड्याच्या बाहेर ती

चोहोंकडे फिरली; पण तो कसचा मिळणार ? आकाशमार्गानें
मुळें राजा विक्रमादित्य अमुक ठिकाणीं गेला, किंवा अमक्य
गेला, हें कोणास कांहींच समजलें नाहीं. तिच्या प्राणांचा
काय तो तोच होता. त्याच्यावांचून तिला कसें चैन पडणार ?
वर, विलासगृहांत, बागेंत व जेथें जेथें ह्मणून तिणें त्याच्याशीं
केली होती तेथें तेथें जाऊन तिणें विलाप केला. शेवटीं आतां
भेट खास होत नाहीं असें तिला वाटलें. तेव्हां ती शरीराचा
करण्यास तयार झाली. उंच महालाच्या गच्चीवर चढून तेथून
टाकावी, असा तिणें बेत केला होता. पण सेवकांनीं तो सिद्धी
दिला नाहीं. "बाईसाहेब आपण अशा दुःखी होऊं नका. तो
तरी स्वेच्छाविहारी देव असावा. आपण त्याचा अपमान वगै
केलेला नाहीं. अपराधावांचून तसे पुरुष आपली ममता कधींह
करीत नाहींत. तेव्हां जसा तो पूर्वीं स्वेच्छेनें येऊन भेटला
आणखीही कधीं तरी येईल." असें सांगून जवळच्या
तिचें समाधान केलें.

**मदनमालेलाही** तें त्यांचें बोलणें थोडें संभवनीय वाटलें.
वर विरक्त होऊन तो गेलेला नाहीं. तेव्हां कदाचित् पुन्हां ये
समजून तिणें प्रतिज्ञा केली. ती म्हणाली, "तुह्मी सर्व जण म
दाखवितां तेव्हां मीही तुमचें सांगणें अमान्य करीत नाहीं
महिनेपर्यंत त्याच्या भेटीची वाट पाहतें. आजपासून सहा
आंत जर तो मला दर्शन न देईल तर माझ्या जवळ जें क
तें सर्व लोकांना देऊन मी खास अग्निप्रवेश करीन." याप्रम
करून तिणें लोकांच्या सांगण्याला मान दिला. व आपलें
केलें. त्या हृदयवल्लभाची मूर्ति सर्वकाल मनांत धरून तिणें
वसापासून दानधर्म करण्याचा सपाटा लावला. हावेळप
**विक्रमादित्यानें** दिलेल्या पुतळ्यांला हात लाविला नव्हता.

च्या मनांत असें आलें कीं; हे पुतळे ठेवून तरी काय करायचें
हेही देऊन टाकावे. असा विचार करून तिणें एका पुतळ्याचे
त तोडून ब्राह्मणाला दान केले.

ुतळे अक्षय्य आहेत हें तिला हावेळपर्यंत माहीत नव्हतें. दु-
दिवशीं देवघरांत येऊन पाहते तों पाचही पुतळ्यांचे हात कायम
तेव्हां काल आपण हात तोडले ते कोणाचे? याविषयीं तिला
उत्पन्न झाली. नंतर अमक्या पुतळ्याचे हात तोडले होते अशी
ाठवण झाली. हात पूर्वीप्रमाणें दिसल्यावरून; ते अक्षय आहेत
मजून तिला फार आश्चर्य वाटलें. तरी आणखी अनुभव पहावा
ऱ्या दिवशीं पांचही पुतळ्यांचे हात तोडून तिणें ब्राह्मणांस देऊन
पण दुसरे दिवशीं पाहते तों पूर्वीप्रमाणें सर्वांचे हात आपले
आहेत, असें पाहून तिला फारच अचंबा वाटला. व तिच्या
ळाही भरतें आलें. त्या दिवसापासून तिणें असा नियम केला
ा ब्राह्मणानें जितके वेद ह्मटले असतील तितके हात त्याला
ायचे. ह्मणजे एक वेद ह्मणणारास एक व चार वेद ह्मणणारास
ी तिणें वेदांची संख्या लावली.

करणाराची कीर्ती ही दासी होते, हें तर उघडच आहे. दा-
कीर्ति मिळविण्याचें दुसरें कोणतेंच साधन नाहीं **मदनमालेनें**
लें दानही फारच मोठें; अर्थात् त्याप्रमाणेंच तिचा लौकिक
णतां चहूंकडे पसरला. देशदेशांतराहून मोठमोठे विद्वान्
तिच्याजवळ दान मागायला येऊं लागले. एकेदिवशीं एक
अत्यंत दरिद्री ब्राह्मण प्रतिग्रह घेण्याकरतां तिच्या दरवाज्यावर
ा. त्याचें नांव **संग्रामदत्त.** तो **पाटलिपुत्रक** नगराहूनच
ता. दरवाज्यावरच्या अधिकाऱ्यांनीं परवानगी लावून त्या
**मदनमा**लेजवळ नेलें. नियमांनीं आणि दारिद्र्यानें अत्यंत
ळल्या त्या ब्राह्मणाची पूजा करून—"आपल्यास किती वेद

येतात?'' ह्मणून तिनें प्रश्न केला. **संग्रामदत्तानें** आपण चतुर्वेदी आहें असें सांगितल्यावरून तिनें त्यास सुवर्णपुतळ्यांचे चार हात दिले.

भिक्षुक ब्राह्मण मोठे धूर्त असतात. ते ज्यांच्या घरीं जातील तेथली बारीक सारीक खबरबात समजून घेण्याकडे त्यांचें विशेष लक्ष असतें. **मदनमालेचें** ऐश्वर्य एखाद्या मोठ्या राजाला लाजविणारें असें असून बाकी सर्व गोष्टी अनुकूळ असतां ती अत्यंत कृश व पांढरी फटिक दिसली यावरून **संग्रामदत्ताला** संशय आला. तो दान घेऊन देवघरांतून बाहेर आला व तेथें कांहीं कारभारी लोक बसले होते त्यांच्याकडे 'यजमानीण अशी दुःखी कां दिसते?' ह्मणून त्यानें चौकशी केली. तेव्हां त्यांणीं दुःखाचें कारण आणि तिची ती भयंकर प्रतिज्ञा वगैरे सर्व त्याला सांगितलें. तें ऐकून ब्राह्मणाला फार वाईट वाटलें व आनंदही झाला. हावेळपर्यंत ज्याच्या हातांला सोन्याचा कधीं स्पर्शदेखील झाला नव्हता त्या गरीबाला एकदम इतकें सोनें मिळाल्यावर हर्ष कां न व्हावा? त्या अगडबंब पुतळ्यांचे चार हात ह्मणजे सुमारें दहामण सोनें झालें. येवढें मोठें ओझें एकट्याच्यानें कसें नेववणार? ह्मणून त्याणें **मदनमालेच्या** कारभाऱ्याकडून दोन उंट मागून घेतले आणि त्यांवर तें ओझें घालून तो आपल्या घरीं ह्मणजे **पाटलिपुत्रक** नगरास गेला. तेथें पोंचल्यावर त्याला असें वाटलें कीं, हें इतकें सोनें घेऊन काय करायचें आहे? एकादवेळ चोरांची धाड पडली किंवा परचक्र आलें तर याचा उगाच नाश होईल. तेव्हां कांहीं तरी सत्कारणीं याचा व्यय करावा. असा विचार करून तो राजा **विक्रमादित्याच्या** कचेरींत गेला. आणि राजाला ह्मणाला, "महाराज, मी याच नगरांत राहणारा ब्राह्मण आहें. दरिद्रानें फार पीडल्यामुळें द्रव्य संपादनाकरतां मी दक्षिण देशांत गेलों होतों. फिरतां फिरतां **नरसिंह** राजाच्या **प्रतिष्ठान** नामक शहरांत पोंचलों. तेथें दान देणारा कोण आहे याविषयीं माझा शोध चालला होता. त्या नगरांत **मद-**

नमला नांवाची एक वेश्या राहते. तिच्या औदार्याविषयीं मीं पुष्कळ गोष्टी पूर्वींच ऐकल्या होत्या. पण त्या शहरांत गेल्यावर तिच्या संबंधाची मला दुसरी एक गोष्ट समजली. कोणी दिव्य पुरुष फार दिवस तिच्या घरांत राहून सोन्याचे अक्षय्य पांच पुतळे तिला देऊन कोठें निघून गेला त्याचा पत्ता नाहीं. तो गेल्यापासून त्याच्या वियोगानें पीडित झालेल्या तिला आपलें जीवित विषाच्या वेदनेसारखें वाटूं लागलें. देह निष्फल वाटला. कांहीं आहार करणें चोराच्या यातनेसारखें वाटूं लागलें. तिचें धैर्य समूळ नाहींसें झालें. ती प्राणत्याग करायला तयार झाली होती, पण जवळच्या लोकांनीं समाधान केल्यावरून त्या मनस्विनीनें प्रतिज्ञा केली आहे. ती अशी कीं, "जर सहा महिन्यांत त्या पुरुषानें आपल्याला भेट दिली नाहीं तर अग्नींत प्रवेश करून आपल्या दुर्दैवी शरीराची राखरांगोळी करायची!" अशी प्रतिज्ञा करून मरणाचा निश्चय करून बसलेली ती स्त्री, होईल तितकें पुण्य संपादावें ह्मणून प्रतिदिवशीं मोठमोठीं दानें देत असते. महाराज, या कांहीं माझ्या ऐकींव गोष्टी नव्हत. मीं प्रत्यक्ष तिला पाहिलें आहे. अंगांत शक्ति नसल्यामुळें चालतानां जिचीं पावलें अस्ताव्यस्त पडत होतीं, निराहारानें तिचें शरीर कृश झालें होतें, तरी पाहणाराच्या नेत्रांला आनंद देत होतें, दानोदकानें ( मदानें ) जिचा कर ( हात ) ओला आहे, जिच्या सभोंवती भ्रमरांचे ( भिक्षुकांचे ) कळप घिरट्या घालताहेत, अशी कामरूपी हत्तीची, प्रत्यक्ष देह धारण करणारी ती केवळ मदावस्थाच कीं काय? असें मला वाटलें. तिची ती अवस्था पाहून ज्याणें तिला अशा विरहदुःखांत घातलें तो कामी पुरुष मला एका रितीनें अतिशय निंद्य वाटला. व दुसऱ्या रितीनें—तिच्यासारखी भाग्यशाली व सुंदर स्त्री त्याच्या करतां मरायला तयार झाली आहे ह्मणून मला तो दैवशाली पुरुष वंद्यही वाटला. असो. तिचें वर्णन करावें तितकें थोडेंच. माझा हेतू काय आहे तो मी थोडक्यांत यावेळीं

आपल्याला निवेदन करतों. त्या **मदनमालेनें** मी चतुर्वेदी ब्राह्मण आहें ह्मणून मला त्या सुवर्णपुतळ्याचे चार हात यथाविधि दान दिले आहेत. पण इतकें द्रव्य मला घेऊन काय करायचें आहे? केव्हां तरी त्याचा नाश होणारच. ह्मणून मी धर्मकार्यांत त्याचा विनियोग करण्याचा विचार केला आहे. माझ्या मनांत एक मोठें अन्नसत्र बांधून प्रतिदिवशीं आल्यागेल्या अतीथअभ्यागताची सेवा करावी असें आहे. तर याकामीं कृपा करून आपण मला साह्य करावें."

ब्राह्मणाला **विक्रमादित्य** राजाशीं त्या वेश्येचा संबंध असल्याचें मुळींच माहीत नव्हतें. जातिस्वभावाप्रमाणें त्याचें बोलणें स्पष्ट होतें व त्यांत ज्या पुरुषाला त्याणें दोष दिला होता, तो प्रत्यक्ष **विक्रमादित्यच** होता. तरी त्याबद्दल राजाला कांहीं वाईट वाटलें नाहीं. उलट त्याला अतिशय आनंदच झाला. त्याला एका निमित्तानें प्रियेची हकीकत समजली. तिचें तें औदार्य, लोकांची तिच्याविषयीं पूज्य बुद्धी व आपल्याविषयीं तिचा दृढ अनुराग या गोष्टी ऐकून राजाला मोठाच चटका लागला. त्याणें त्या ब्राह्मणाला अथवा इतर कोणालाही आपला हेतु मुळींच कळविला नाहीं. चोपदार बरोबर देऊन **संग्रामदत्ताला** कोतवालाकडे पाठविलें. व 'हा ब्राह्मण जें जें साह्य मागेल तें तें याला द्यावें,' असा त्याला हुकूम दिला. जिणें आपल्याकरतां प्राणही तृणासारखे तुच्छ मानले, तिला लवकर भेटावें असें राजाच्या मनांत आलें. तिणें जी सहा महिन्यांची मुदत ठरविली होती; ती आतां लवकरच भरणार असें समजून पुन्हां आपलें राज्य प्रधानाच्या हवालीं करून तो तिकडे जावयास निघाला. त्याची प्रतिज्ञाही सिद्ध व्हायची होती व ती **मदनमालेच्या** साह्यानेंच होणार होती. म्हणून उत्कंठित झालेला राजा एकाएकीं निघून आकाशमार्गानें **प्रतिष्ठान** नगरांत आपल्या प्रियेच्या घरीं खालीं उतरला. तेथें चंद्रिकेसारखें स्वच्छ वस्त्र परिधान केलेली व विबुधांला (विद्वानांला) जिणें आपलें वैभव अर्पण केलें आहे अशी,

पर्वकालींच्या चंद्रकलेप्रमाणें कृश झालेली ती कांता त्याणें पाहिली. एकाएकीं डोळ्यांवर अमृतवृष्टी करण्यास आलेल्या त्या आपल्या हृदयवल्लभाला पाहून तीही क्षणभर भ्रांतिष्टासारखी झाली.

तिणें त्याला पळपुटा तर ठरविलाच होता. पण पुन्हां त्यानें पळून न जावें म्हणूनच कीं काय; तिणें त्याच्या गळ्यांत आपल्या भुजलतेचा घट्ट फांस घातला. आणि "निर्दया, कठोरा, कांहीं अपराध नसतां मला टाकून कां गेलास?" असें ती म्हणाली. त्यावेळीं तिच्या नेत्रांतून प्रेमाश्रु चालले होते. व गळा दाटून आला होता. राजाचीही अवस्था तशीच झाली होती. "एकांतीं चल. मग तुला काय तें सांगतों." असें सांगून राजा तिच्या सहवर्तमान अंतर्गृहांत गेला. यावेळीं त्या वाड्यांतील सर्व लोक आनंदानें नाचूं लागले. एकांतांत गेल्यावर राजानें आपलें नांव गांव वगैरे सांगून **नरसिंह** राजाला युक्तीनें जिंकण्याकरतां आपण आलों आहें असें सांगितलें. नंतर **प्रपंचबुद्धी** नामक संन्याशाला मारल्यामुळें आपल्याला आकाशांतून जाण्याची सिद्धी कशी प्राप्त झाली; **कुबेरानें** वर कसा दिला; त्याच्या साह्यानें सोन्याचे पुतळे आपण कसे दिले; **संग्रामदत्तानें** आपल्याला तुझी हकीकत काय सांगितली व नंतर आपण येथें कसा आलों हें सर्व राजानें तिला सांगितलें. आणि ह्मणाला, "प्रिये, हा तुझ्या नगरीचा राजा **नरसिंह** स्वतः मोठा बलाढ्य असून त्याच्या जवळ फौजही चांगली आहे. यामुळें तो मला अजेय झाला आहे. त्याच्या माझ्याशीं पुष्कळ वेळ लढाया झाल्या. एकदां तर आह्मी दोघांनीं बाहुयुद्ध केलें. त्यावेळीं मी चटकन् आकाशांत उडून त्याला मारण्यास समर्थ होतों; पण तसें करण्यांत अधर्म होतो. सामनेवाला ज्या रितीनें लढेल त्याच रितीनें आपणही त्याच्याशीं लढावें, असा आम्हा शूर क्षत्रियांचा धर्म आहे. अधर्म करून जय मिळविण्यांत काय अर्थ आहे? व तसें करावें असें कोणा कुलीन क्षत्रियाच्या मनांत येईल! अर्थात् त्याला जिंकायचें अशी जी माझी प्रतिज्ञा ती कांहीं

केल्या पूर्ण होत नाहीं. म्हणून तुझ्या साह्यानें तें काम करावें असा मी विचार केला आहे. माझी प्रतिज्ञा म्हणून एवढीच आहे कीं; मी जेथें असेन तेथें त्याणें यावें. व चोपदारांनीं—'**नरसिंह** राजा आपल्याला नम्र होऊन भेटायला आला आहे,' असें ह्मटलेलें मी ऐकावें म्हणजे झालें. हें कार्य तुझ्या हातून सहज होईल. तूं त्याला युक्तीनें येथें आणून असें करशील तरच हें काम होईल."

हें ऐकून, अमुक अमुक रितीनें आपण हें काम करतें; असें राजाला सांगून तिणें आपल्या वाड्याच्या दरवाजावरचा अधिकारी व भाट यांला सांगितलें कीं, "अरे, आपल्या शहरचा राजा **नरसिंह** आतां जेव्हां माझ्या घरीं येईल तेव्हां तुह्मी अगदीं सावध असावें. दारांत राहून त्याच्या येण्याकडे लक्ष्य लावून बसा. आणि मी ज्याठिकाणीं असेन त्याच्याजवळ तो राजा प्राप्त झाला ह्मणजे—'महाराज, **नरसिंह** राजा आपल्यावर अनुरक्त असून भक्त आहे,' असें तो माझ्या घरांत येत असतां वरचेवर तुह्मी ह्मणा. 'आंत कोण आहे?' ह्मणून त्याणें तुह्माला विचारलें तर '**विक्रमादित्य** राजा आंत बसला आहे;' असें तत्काल तुह्मी उत्तर द्या." भाटालाही याप्रमाणेंच सांगितलें—"**नरसिंह** राजा येईल त्यावेळीं त्याला एकदम मी असेन तेथें येऊं दे. परवानगीची गरज ठेवूं नको." याप्रमाणें व्यवस्था करून, नाहींसा झालेला प्राणनाथ जिला पुन्हा प्राप्त झाला आहे अशी **मदनमाला** आनंदांत राहूं लागली.

**मदनमाला** ही एक वेश्या होती; तरी ऐश्वर्यादिकांनीं ती राजाची बरोबरी करीत होती. याशिवाय तिच्या अंगीं अप्रतिम रूप व गुण असल्यामुळें सुवासिक फुलाप्रमाणें ती सर्वांला स्पृहणीय झाली होती. अशाप्रकारचें रत्न आपल्या राजधानींत आहे याबद्दल राजा **नरसिंहाला** एक प्रकारें भूषण वाटत होतें. तो तिच्या नादीं लागला नव्हता तरी तिच्यावर त्याची विशेष मेहरबानी होती. सवडीप्रमाणें केव्हां केव्हां तो तिच्या घरीं भेत आसे. अंतर्गत विशेष संबंध नसल्या-

मुळें त्याला बोलावूं पाठविण्याचा **मदनमालेला** अधिकार नव्हता. तो आपल्या तब्येती प्रमाणें केव्हां येईल तेव्हां येईल. असें असल्यावरूनच **मदनमालेनें** आपल्या चाकरांला वर सांगितल्याप्रमाणें ताकीद देऊन ठेविली होती. पुढें एकेदिवशीं राजा **नरसिंह** सहज तिला भेटायला आला. सोन्याच्या पुतळ्याचे हात प्रतिदिवशीं ती ब्राह्मणाला दान करीत होती. तेव्हां हा काय चमत्कार आहे ? हिला हे अक्षय पुतळे कोठून प्राप्त झाले ? याचा शोध करावा असा त्याचा हेतू होता. तो तिच्या बाहेरच्या दरवाज्याच्या आंत शिरला त्यावेळीं कोणीच त्याला मज्जाव केलें नाहीं. प्रत्येक दरवाजावर भाट उभे राहिलेलेच होते. त्यांणीं आपल्या यजमाननीच्या हुकुमाप्रमाणें मोठ्यानें—" महाराज, **नरसिंह** राजा आपल्या ठिकाणीं नम्र असून विशेष भक्तिमान् आहे," असें ह्मटलें. **नरसिंह** राजाला ते शब्द मोठे चमत्कारिक वाटले. व त्याबद्दल रागही आला. त्यानें साशंक होऊन—'अरे आंत कोण आहे?' ह्मणून विचारिलें. तेव्हां भाटांनीं '**विक्रमादित्य** राजा आहे,' असें त्याला सांगितलें.

तें ऐकतांच त्याला पूर्वीच्या गोष्टीचें स्मरण झालें. तो मनांत ह्मणाला, "हं हं, याणें पूर्वीं प्रतिज्ञा केली होती ती सांप्रत या रीतीनें पूर्ण केली असें वाटतें. हा राजा **विक्रमादित्य** मोठा वस्ताद आहे खरा. मला नकळत माझ्या राज्यांत प्रवेश करून याणें यारितीनें आपलें बोलणें खरें केलें. एकूण या धूर्तानें मला अशा रितीनें जिंकला. मी पाहिजे तर याला आतांच येथें ठार करीन; पण यावेळीं तो येथें एकटा असल्यामुळें त्याला मारावें हें ठीक नाहीं. त्यांतून तो माझ्या घरीं आला आहे. तेव्हां अभ्यागताचा सत्कारच करावा हें आपल्याला योग्य आहे." असा विचार करून राजा तसाच आंत गेला. त्याला पाहतांच **विक्रमादित्य** सामोरा आला. आणि प्रेमपूर्वक त्याच्या गळ्याला मिठी घातली. नंतर परस्पर कुशल विचारून दोघेही आसनावर बसले. **मदनमाला**

जवळ हात जोडून उभी राहिली. उभयतांनींही परस्परांची तारीफ करून आजपासून आपली मैत्री कायम रहावी, असा दृढ निश्चय केला. **नरसिंहाला** सोन्याचे पुतळे कोठून आले? तें समजून घ्यायचें होतें. म्हणून त्याणें बोलतां बोलतां सहज राजाला प्रश्न केल्यावरून **विक्रमादित्यानें** त्या संन्याश्याला मारल्याची व **कुबेरानें** वरदान दिल्याची गोष्ट सविस्तर त्याला सांगितली. ती ऐकून **नरसिंहाला** मोठा अचंबा वाटला. आकाशमार्गानें संचार करण्याची शक्ती असल्यामुळें हा आपल्यापेक्षां विशेष आहे, असें समजून व त्याचा शुद्ध स्नेहही पाहून, **नरसिंह** राजानें बहुत दिवस चाललेला द्वेषभाव आपल्या मनांतून समूळ काढून टाकला.

मित्रत्वाच्या नात्याप्रमाणें, इतके दिवस तो आपल्या नगरींत असून त्याचा आदरसत्कार आपल्याकडून कांहीं घडला नाहीं; म्हणून **नरसिंहानें विक्रमादित्याला** आग्रहपूर्वक आपल्या घरीं नेलें. तेथें कांहीं दिवस ठेवून घेऊन मेजवान्या, नाच, रंग वगैरेचा उत्तम थाट केला. आणि सन्मानपूर्वक परत **मदनमालेच्या** येथें त्याला आणून पोंचविलें. नंतर ज्याणें केवळ आपल्या बुद्धिबलानें दुस्तर प्रतिज्ञा सिद्ध केली आहे; असा राजा **विक्रमादित्य** आपल्या राजधानीकडे जावयास निघाला. त्यावेळीं **मदनमालेनें**ही त्याच्या बरोबर जावयाची तयारी केली. राजानें पुष्कळ समजुतीच्या गोष्टी सांगितल्या तरी ती त्याचा विरह सहन करण्यास असमर्थ होती. तिणें तत्काल हजारों ब्राह्मण बोलावून आणून त्यांना आपली संपत्ती वाटून दिली. घरावर तुलसीपत्र ठेवून तें पुरोहितबुवांच्या स्वाधीन केलें. दासदासी वगैरे जे कोणी तिच्या बरोबर जाण्यास तयार होते त्यांना बरोबर घेतलें. बाकीच्यांना यथायोग्य देणगी देऊन निरोप दिला. ते पांच सोन्याचे पुतळे तिच्यावांचून दुसरीकडे राहायचेच नाहींत म्हणून ते मात्र तिणें बरोबर घेतले. बाकी सर्व ऐश्वर्य देऊन टाकलें. याप्रमाणें साऱ्याची विल्हे-

वाट लावून; बरोबर येण्यास तयार झालेल्या **मदनमालेला** घेऊन राजा **विक्रमादित्य** रत्नखचित अंबारींत बसला. **नरसिंह** राजानें त्याला त्याच्या राजधानीपर्यंत पोंचविण्याकरतां बरोबर पुष्कळ फौज दिली होती. ती सहवर्तमान राजा **विक्रमादित्य** मोठ्या थाटानें आपली राजधानी **पाटलिपुत्रक** येथें येऊन पोंचला. कामदार व नगरवासी जनांनीं त्या दिवशीं मोठा उत्सव करून राजाच्या आगमनाबद्दल मोठा आनंद प्रदर्शित केला. नंतर **नरसिंह** राजाशीं ज्याची पक्की मैत्री झाली आहे. असा तो **विक्रमादित्य**, गुणलुब्ध झालेल्या **मदनमालेसहवर्तमान** सुखानें राज्य करिता झाला." ही कथा सांगून **मरुभूति** म्हणाला, "महाराज, याप्रमाणें वेश्याही मनापासून अनुरक्त होतात. व आपल्या प्रियपुरुषाकरतां सर्वस्वाचा त्याग करतात. मग कुलीन स्त्रिया करतील यांत काय आश्चर्य!" **मरुभूतीनें** सांगितलेली ही कथा ऐकून युवराज **नरवाहनदत्त** व **रत्नप्रभा** यांना फार आनंद झाला.

**गोमुखानें** स्त्रियांच्या वाईट व घातकी वर्तनाविषयीं गोष्टी सांगून एकंदरींत स्त्रिया म्हटल्या म्हणजे वाईट असा जो सिद्धांत काढला होता; त्याचें खंडण करण्याकरतां **मरुभूतीनें** वर सांगितलेली **मदनमालेची** कथा सांगितली. ती ऐकून सेनापती **हरिशिख नरवाहनदत्ताला** म्हणाला, "महाराज, **मरुभूतीनें** सांगितलें तें खरें आहे. वाईट स्त्रिया घातकी असोत, पण चांगल्या स्त्रियांना नवऱ्यावांचून दुसऱ्या कोणाचीही आशा नसते. त्या प्रत्येक कामांत पतीच्या आश्रयानेंच वागत असतात. याविषयीं मला एक विचित्र कथा आठवली ती सांगतों. या पृथ्वीवर **वर्द्धमानपुर** नांवाचें जें प्रसिद्ध शहर आहे, तेथें **वीरभुज** नांवाचा मोठा धर्मिष्ठ राजा पूर्वीं होता. त्याच्या शंभर स्त्रिया होत्या. इतक्या स्त्रिया असतांही त्या राजाची **गुणवरा** नांवाची आवडती राणी एकच होती. आणि तीच पट्टराणीच्या पदवीचा उपभोग घेत होती. राजाला प्राणांपेक्षां अधिक कायती तीच होती.

दैवयोगानें शंभर स्त्रिया असूनही त्या राजाला एकही पुत्र झाला नाहीं. पूर्व वयांत त्याचें फारसें तिकडे लक्ष्य गेलें नाहीं. पण पुढें पुढें त्याला संततीविषयीं विशेषच हुर हुर लागली.

मूलबाळ नसलेले लोक—देवऋषी, ज्योतिषी, साधुसंत, वैद्य वगैरे लोकांच्या भजनीं लागतात. त्याप्रमाणें राजाचा **श्रुतवर्धन** नामक एक वैद्य होता, त्याच्यावर त्याची विशेष भक्ति होती. एकेदिवशीं राजा त्याला ह्मणाला, "वैद्यबुवा, तुह्मी आपल्या विद्येंत मोठे प्रवीण अहां यांत तर कांहींच संशय नाहीं. पण त्याचा आम्हास मात्र मिळावा तो फायदा मिळत नाहीं. एक नाहीं दोन, शंभर बायका असून मला संतती नाहीं ही गोष्ट तुह्माला चांगली वाटते का? माझ्या दैवींच तसा योग नसेल तर उपाय नाहीं. पण ज्योतिषी सांगतात कीं, 'तुम्हाला शंभर पुत्र होणार.' आणि अद्याप एकासही ठिकाण नाहीं! तेव्हां याविषयीं तुमच्याकडून कांहीं उपाय होण्यासारखा नाहीं काय? पुत्र होण्यासारखें कांहीं औषधविवषध असेल तर पहा."

हें ऐकून तो वैद्य म्हणाला, "महाराज, उपाय नसेल कां? शास्त्रांत अनेक उपाय सांगितले आहेत. व ते मला ठाऊकही आहेत. आज-पर्यंत महाराजांनीं कधीं गोष्ट काढली नाही म्हणून माझेंही तिकडे लक्ष्य गेलें नाहीं. पण आतां त्याविषयीं मी प्रयत्न करितों. एवढें मात्र झालें पाहिजे कीं; एक जंगली बकरा आपण कृपा करून मला आणून देववावा. तें औषध बकऱ्याच्या योगानेंच साधायचें आहे." हें ऐकून राजा म्हणाला, "हें कांहीं मोठें कठीणसें नाहीं, जंगली बकरे हवे तितके आणून देतां येतील. तुह्मी बाकीची तयारी करा." असें सांगून राजानें चोपदाराकरवीं शिकारखान्यावरच्या मुख्य अधिकाऱ्याला बोलावून आणला. व कसेंहीं करून जंगली बकरा मिळेल तेथून आ-णण्याविषयीं त्याला सक्तीचा हुकुम दिला. जंगली बोकड त्या प्रदे-शांत फार दुर्मिळ होते. तथापि त्या अधिकाऱ्यानें रानोमाळ धुंडून

मोठ्या प्रयत्नानें एक बकरा आणून हाजर केला; राजानें लगेच तो वैद्यबुवाकडे दिला. वैद्यबुवांनीं राजाच्या मुदपाकावरचा मुख्य स्वयंपाकी याला आणवून तो बोकड त्याच्या हातीं दिला. आणि त्याच्या मासांत जीं त्याला औषधें वगैरे घालायचीं होतीं तीं घालून त्याचा एक रस तयार करविला. नंतर राजाला सांगून त्याच्या सर्व स्त्रियांना एकत्र जमवाव्या अशी व्यवस्था केली. राजा देवपूजेला गेला ह्मणजे त्याच्या सर्व बायका नित्य तेथें जमत असत. त्याचवेळीं वैद्याला येण्याविषयीं राजानें सांगितलें.

दैवयोग मोठा विचित्र आहे संकेताप्रमाणें बाकीच्या सर्व स्त्रिया जमल्या; पण राजाची मुख्य आवडती **गुणवरा** ही मात्र त्यावेळीं त्या समाजांत नव्हती. राजा देवपूजा करीत बसला होता त्याच्या जवळ होती. राजाच्या सर्व स्त्रिया मिळाल्या; असें पाहून **श्रुतवर्धन** वैद्यानें तयार केलेल्या बोकडाच्या मासाच्या रसांत आणखी कांहीं चूर्ण घालायचें होतें; तें घालून तो रस तेथें असलेल्या सर्व स्त्रियांला सारखा वाटून दिला. पट्टराणी **गुणवरा** ही त्याला माहित नव्हती असें नाहीं. तथापि दैवयोगानें तिची त्याला मुळींच आठवण राहिली नाहीं. नंतर देवाची पूजा आटपून राजा **वीरभुज गुणवरे**सहवर्तमान तेथें आला. वैद्यानें **गुणवरे**करतां रस ठेवला असेल असें राजाला वाटलें होतें. पण पाहिलें तों भांडें अगदीं रिकामें दिसलें. तेव्हां तो वैद्याला ह्मणाला, "महाराज वैद्यबुवा, तुह्मी ह्या माझ्या पट्ट राणीकरतां औषध मुळींच टेविलें नाहीं हें काय? तुह्माला अशी कशी विसर पडली कोणास ठाऊक? इतका खटाटोप केला; तो केवळ हिच्याकरतां. असें असून हिलाच आपण विसरलां हें काय?"

हें ऐकून वैद्य फार शरमला. आपल्या विसराळू पणानें मोठी चूक झाली असें त्याला वाटलें. तो स्तब्ध बसलेला पाहून राजानें—"त्या बोकडाच्या मांसाचा कांहीं अंश शिल्लक आहे का?" असें स्वयंपा-

क्याला विचारलें. तेव्हां त्याणें—"फक्त दोन शिंगें मात्र राहिलीं आहेत," असें सांगितलें. तें ऐकून वैद्य ह्मणाला, "वाहवा! फार चांगलें आहे. शिंगांतून जो रस निघेल तो तर उत्तम गुणकारी होणार आहे." असें बोलून बकऱ्याच्या शिंगांचे तुकडे तुकडे करून ते भट्टींत घातले व त्याचा रस काढून पूर्वीप्रमाणेंच त्यांत चूर्ण घालून वैद्यानें तो **गुणवरेला** दिला. वैद्यानें तयार केलेलें औषध खरोखरच उत्तम होतें. त्याच्या प्रभावानें राजाच्या नव्याण्णव स्त्रिया प्रथम गर्भार झाल्या व त्यांच्या मागून पट्टराणी **गुणवरा** गरोदर राहिली. पूर्ण दिवस झाल्यावर प्रथम त्या नव्याण्णव स्त्रिया प्रसूत होऊन त्यांला पुत्र झाले व मागाहून **गुणवरेला** सर्वलक्षणसंपन्न असा पुत्र झाला. मग काय विचारतां? ज्याला एकही पुत्र नव्हता त्याला शंभर होतांच किती आनंद होईल तें सांगावयासच नको. राणी **गुणवरेला** बोकडाच्या शिंगाच्या रसापासून पुत्र झाला ह्मणून राजानें त्याला **शृंगभुज** असें नांव ठेविलें. ते शंभरही मुलगे एकाचा दुसरा सावत्र बंधु, याप्रमाणें सावत्रच होते. तरी राजाची आवडती स्त्री **गुणवरा** आणि नावडत्या नव्याण्णव असे त्यांत दोन पक्ष होते. नावडत्या स्त्रियांचे मुलगे व आवडत्या स्त्रीचा मुलगा यांच्यांतही पुढें दोन पक्ष झाले. **शृंगभुज** हा वयानें सर्वांत लहान होता, तरी गुणांनीं वडील झाला होता. त्या राजपुत्राचीं लक्षणें लहानपणापासूनच कांहीं निराळ्या प्रकारचीं दिसत होतीं. त्याचें खेळणें, हंसणें, बोलणें वगैरे असें होतें कीं; त्यावरून चतुर पुरुष, तो मुलगा मोठा नांवा लौकिकाचा होईल असें अनुमान करीत असत. तो रूपानें **कामासारखा**, धनुर्विद्येंत **अर्जुनासारखा** आणि सामर्थ्यानें **भीमासारखा** दिसत होता. आधींच आवडत्या बायकोचा मुलगा. त्यांतूनही गुणी असल्यामुळें राजाची त्याच्यावर फारच मर्जी होती.

इतर स्त्रियांच्या पुत्रांवर राजाची मर्जी अंमळ कमी इतकेंच कायतें. पण त्यांचें कांहीं उणें पडलें होतें असें नाहीं. पट्टराणीवर राजा

फारच प्रेम ठेवतो ह्मणून इतर स्त्रियांच्या मनांत धुसपुस चाललीच होती. त्यांतून **शृंगभुज** हा त्या वैराला विशेष कारण झाला. त्या सर्व स्त्रियांनीं, कांहीं तरी उपाय करून **शृंगभुजा**चा नाश करावा ह्मणजे अर्थात् राजाचें चित्त आपल्या मुलांकडे वळेल असा निश्चय केला! त्यांच्यांत **अयशोलेखा** नांवाची एक दुष्ट राणी होती तिनें या कामांत पुढाकार घेतला. बाकीच्या सवतींशीं मसलत करून हें काम अमुक अमुक रितीनें करायचें असा त्यांचा ठराव झाला. राजा **वीरभुज** हा **गुणवरे**ला विशेष चहात होता तरी बाकीच्या स्त्रियांवर त्याचें अगदींच दुर्लक्ष्य होतें असें नाहीं. त्याणें त्यांचा मानमरातब वगैरे सर्व यथास्थित ठेवलें होतें. व पाळी पाळीनें तो त्यांच्या भेटीलाही जात होता. त्याप्रमाणें ज्यावेळीं त्या **अयशोलेखे**च्या घरीं राजा आला त्यावेळीं उगीच रडवें तोंड करून ती दीन होऊन त्याच्या पुढें बसली. 'असें होण्याचें कारण काय?' ह्मणून वरचेवर विचारलें. तेव्हां ती कौटाळीण ह्मणाली, "आर्यपुत्र, काय सांगूं! मला सांगायला मोठी लाज वाटते. ती गोष्ट आपल्याला फारच दुःखकारक होईल. तथापि सांगण्याचें माझ्या नशिबींच आलें आहे ह्मणून सांगतें. दुसऱ्याच्या घरीं कांहीं वाईट साईट गोष्टी चालल्या असल्या तर त्याचा शोध लावून आपण त्यांचा बंदोबस्त करतां. आणि स्वतः आपल्या घरीं काय चाललें आहे; याची आपल्याला खबर देखील नाहीं हें काय? माझ्यानें मेलं तोंडावाटे उच्चारवत् नाहीं. **सुरक्षित** नांवाचा जो या आपल्या जनानखान्यावरचा मुख्य कामगार आहे तो तरणाताटा असून दिसण्यांतही अंमळ बरा आहे, हें आपल्यालाही माहित असेलच. पण जळ्ळें मेलं असलं हलकट काम कसें करवतें कोणास ठाऊक! थोरल्या बाईसाहेबांनीं त्या मेल्यावर फिदा व्हावें ही किती लाजेची गोष्ट आहे बरें! जनानखान्यावर आपण पहारा कडक ठेवला आहे. त्यामुळें दुसऱ्या पुरुषाचा सहज आंत प्रवेश व्हायचा नाहीं. ह्मणून बाईसाहेबांनीं त्या मेल्या **सुरक्षिता**लो आपलें

शरीर अर्पण केलें! हें आतां नवेंच झालें आहे असें नाहीं. फार दिवस हे सोहाळे चालले आहेत. आणि जनानखान्यातल्या सर्वांला हें माहितही आहे. त्याच्यावर गीतें देखील रचलीं आहेत. तेव्हां आपल्याला हें असें करणें पुरवतें झणून आपण कानाडोळा करतां? किंवा आपल्याला त्याची मुळींच खबर नाहीं हें कांहींच समजत नाहीं."

त्या दुष्ट व कपटी स्त्रीचें भाषण ऐकून राजाच्या अंगावर शहारे उठले. **गुणवरे**च्या हातून अशी गोष्ट कधींही व्हायची नाहीं; हें सारें कुभांड आहे असें प्रथम त्याला वाटलें. तरी सामान्यतः स्त्रियांच्या वर्तनाविषयीं पुरुष नेहमीं साशंक असतात. त्याप्रमाणें—न जाणों, ही अशी छातीला हात लावून सांगते आहे तेव्हां यांत कांहींतरी खरेपणा असेल, असें वाटून राजानें त्याच्याविषयीं बारीक शोध चालविला. त्यानें प्रत्येक राणीला याविषयीं बारीक वर्तमान विचारलें; पण त्यांनीं तर पूर्वीं संकेतच करून ठेवला होता. या कुभांडानें **गुणवरे**चा सूड घ्यायचा असा त्यांचा संकल्प झाला असल्यावरून राजानें जिला जिला विचारलें तिणें तिणें **अयशोलेखे**प्रमाणेंच सांगितलें. तेव्हां मात्र राजाला मोठा विचार पडला. तो अत्यंत शांतवृत्तीचा असून बुद्धिमान् होता. तो मनांत म्हणाला, 'या सर्व राण्यांनीं जरी अशी गोष्ट सांगितली तरी मला त्याचा संभव दिसत नाहीं. आणि यांनीं बातमी तर ही अशी पसरविली आहे. तेव्हां आतां काय करावें? या गोष्टीचा पक्का निश्चय झाल्यावांचून कोणाला शिक्षा करणें हें तर योग्य नाहींच. युक्तीनें त्या दोघांलाही निराळीं करावीं, म्हणजे त्यांतलें खरें वर्त्तमान काय तें समजेल. राणीला तर बाहेर घालवितां येतच नाहीं. त्या **सुरक्षिता**ला मात्र तिच्यापासून दूर करावा. म्हणजे त्यांत कांहीं पाप असलें तर उघडकीस येईल.'

असा निश्चय करून दुसरे दिवशीं राजानें भरकचेरींत अंतःपुरावरील मुख्य अधिकारी **सुरक्षित** याला बोलावून आणलें; आणि बळेंच

त्याच्यावर दांतओंठ खाऊन रागानें म्हणाला, "अरे दुष्टा! पाप्या! तूं ब्रह्महत्या केलीस असें मला समजलें आहे. याकरतां तूं आतांच्या-आतां तीर्थयात्रेला निघून जा. यात्रा करून आल्यावांचून तुझें तोंड पाहूं इच्छित नाहीं." हें ऐकून **सुरक्षित** घाबरा झाला. तो पायांपडून म्हणाला, "महाराज, मी ब्रह्महत्या कशी केली? मला तर कांहीं आठवण नाहीं. पण आपल्याला हें वर्तमान कोणी सांगितलें?" यावर राजा पुन्हां म्हणाला, "जा जा. फार दांडगेपणा करूं नकोस. पवित्र अशा **काश्मीर** देशांत जा. तेथें **विजयक्षेत्र**, तसेंच पवित्र **नदीक्षेत्र** आणि जेथें **वराहक्षेत्र** आहे त्या ठिकाणीं जा. चक्रपाणि भगवान् **विष्णू** याणें जिला **वितस्ता**[१] असें नांव दिलें आहे; ती नदी जेथें वाहते आहे तेथें जा. जेथें मडवक्षेत्र आहे व **उत्तरमानस** सरोवर जेथें आहे; त्या ठिकाणीं जा व मी सांगितलीं या सर्व तीर्थांचें स्नान करून पवित्र हो. आणि मग माझ्या दर्शनाला ये. जा आतां वेळ लावूं नकोस."

बिचाऱ्या **सुरक्षितावर** हा एक आकांत कोसळला होता. त्याला राजाचा आपल्यावर राग होण्याचें कारण काय तें मुळींच समजलें नाहीं. तरी हुकुमाप्रमाणें केलें पाहिजे म्हणून निरुपायास्तव तसाच तीर्थयात्रेला निघून गेला. याप्रमाणें युक्तीनें राजा **वीरभुजानें** **सुरक्षिताला** तेथून घालविला. आणि तो शहरांतून बाहेर गेला असें समजल्यावर राणी **गुणवरा** हिच्या महालांत गेला. यावेळीं राजाच्या मनांत—तिच्याविषयीं प्रीति, तिचें वाईट वर्तन असल्याचें ऐकल्यावरून राग व तें खरें किंवा खोटें याविषयीं संशय असे तीन विकार प्रबळ झाले होते. तो महालांत गेला तेव्हां त्याचा चेहरा अगदीं निस्तेज व दुःखित दिसला. तें पाहून **गुणवरा** घाबरी होऊन म्हणाली, "आर्यपुत्र, आज एकाएकीं आपण खिन्न दिसतां याचें कारण काय?" राजाला कोणत्या दुष्ट विकारानें घेरलें होतें हें त्या बिचारीला मुळींच माहित नव्हतें.

---

१—सांप्रत 'झेलम' असें ह्मणतात ती हीच नदी. ही काश्मीरदेशांत आहे.

तिनें साळसूदपणानें प्रश्न केला. तो ऐकून राजा बळेंच मोठ्या दुःखांत असल्यासारखें दाखवून तिला म्हणाला, "देवि, आज एक विलक्षण प्रकार झाला आहे. एक मोठा ज्ञानी पुरुष माझ्या भेटीला आला. आणि एकांतीं मला म्हणाला, "राजा, तुझी ग्रहदशा थोडे-दिवसपर्यंत फार वाईट आहे. तिचा परिहार करण्याकरतां तूं तुझी जी अत्यंत आवडती स्त्री असेल तिला कांहीं दिवस भुयारांत ठेव! आणि स्वतः तूंही ब्रह्मचर्य धारण कर. असें न करशील तर तुझें राज्य नष्ट होईल व ती तुझी राणी खरोखर मेल्यावांचून राहणार नाहीं." असें सांगून तो ज्ञानी पुरुष निघून गेला. तेव्हां आतां काय करावें हें सुचेना म्हणून मी खिन्न झालों आहे."

पतीचें हें भाषण ऐकून ती साध्वी **गुणवरा,** भय आणि प्रीति यांनीं जिच्या मनाचा गोंधळ झाला आहे अशी, राजाला ह्मणाली, "मग याच्याबद्दल इतकें दुःख कशाला करायला पाहिजे? आजच मला भुयारांत कां टाकीत नाहीं? माझ्या मरणाविषयीं कांहीं काळजी करावयास नको. माझ्या प्राणांनीं जर पतीचें हित झालें; तर मी धन्य होईन. मला खुशाल मृत्यू येवो! पण तुह्मी मात्र दुःखी होऊं नका. इहलोकांत किंवा परलोकांत स्त्रियांला पति हीच काय ती गति आहे. त्याच्यावांचून जिवंत राहून काय करायचें आहे?"

राणी **गुणवरेचें** हें भाषण अगदीं मनापासून होतें. त्यांत कपटाचा लेशदेखील दिसला नाहीं. तें ऐकून राजाच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. तो मनांत ह्मणाला, 'अरेरे!! माझ्या पोटांत व्यर्थ संशय आला. हिच्या अंगीं कांहीं पाप असेल अशी शंका देखील येत नाहीं. आणि तो बिचारा **सुरक्षित**ही असाच निष्पाप असेल. मी ज्यावेळीं त्याला तीर्थयात्रेला जा ह्मणून सांगितलें त्यावेळीं त्याचा चेहरा उतरल्यासारखा दिसला नाहीं. जर त्याच्या अंगीं कांहीं पाप असतें तर तो फिक्का पडल्यावांचून राहिलाच नसता. त्याच्याकडे मी

बारीक दृष्टीनें पहात होतों. तरी तो साशंक झाल्याचें मला मुळींच दिसलें नाहीं. हाय! हाय!! अशा निष्कलंक माणसास उगीच शिक्षा करणें हें किती वाईट आहे. तथापि आपल्याला याची उपेक्षा करतां कामा नये. लोकांत जी वाईट बातमी पसरली आहे, तिचा पुरता शोध लावलाच पाहिजे. नाहीं तर मीच तसला आहें; असें लोक ह्मणतील.' असा विचार करून दुःखित झालेला राजा राणीला ह्मणाला, "बरें, त्या साधूनें सांगितल्याप्रमाणें केल्यावांचून तर गतीच नाहीं. तेव्हां मला असें वाटतें कीं; या तुझ्या महालांतच तें भुयार तयार करावयास लावतों. ह्मणजे त्यांत तूं सुखानें राहशील." राणीनें याही गोष्टीला मान्यता दिली. तेव्हां राजानें कारागिरांला सांगून तेथें भुयार करवून त्यांत **गुणवरेला** ठेवली.

तिचा पुत्र **शृंगभुज** हा बराच जाणता झाला होता. राजानें आईला भुयारांत कां घातली? हें त्याला कांहींच माहित नव्हतें. त्यानें विचारलें तेव्हां राजानें **गुणवरेला** जें निमित्त सांगितलें होतें तेंच त्या मुलाला सांगून त्याणें त्याचें समाधान केलें. राणी **गुणवरा** त्या भुयारांत रहात होती तरी तिला त्याबद्दल काडी मात्र दुःख वाटलें नाहीं. उलट नवऱ्याच्या हिताच्या कामीं आपल्या शरीराचा विनियोग होणार आहे, याबद्दल तिला जो आनंद वाटला होता त्याच्या बहरांत तिणें त्या भुयाराला **स्वर्ग** मानला. उघडच आहे. साध्वी स्त्रियांला स्वतःचें सुख कांहींच वाटत नाहीं. ज्यांत भर्त्याचें सुख असेल त्यालाच त्या सुख समजतात. असो. याप्रमाणें त्या दुष्ट **अयशोलेखेनें** राजाच्या मनांत विकल्प उत्पन्न करून **गुणवरेचा** सूड घेतला. तरी तेवढ्यानें तिचें समधान झालें नाहीं. तिचा मुलगा जो **शृंगभुज** त्याचें उच्चाटन करावें असें तिच्या मनांत होतें. **निर्वासभुज** नांवाचा तिचा मुलगा होता. त्याला ती ह्मणाली, "आह्माला त्रास देणारी ती सवत **गुणवरा** तर भुयारांत गेलीच. आतां तिचा मुलगा राहिला आहे. तो जर

येथून काढून दिला जाईल तर आपण सुखी होऊं. याकरतां पुत्रा, तो तुझा वैरी जो **शृंगभुज** त्याला राजा हद्दपार करील अशी कांहीं तरी युक्ति कर. या कामीं तुला तुझे दुसरे सावत्र बंधू साह्य करतील."

**अयशोलेखे**चाच पुत्र तो. त्याला चांगले विचार कोठून सुचणार ? त्याणें आईचें सांगणें घट्ट मनांत ठेवलें आणि **शृंगभुजाला** तेथून हांकून लावण्याविषयीं काय युक्ति करावी, याचा तो आपल्या इतर बंधूंसहवर्तमान विचार करूं लागला. राजानें आपल्या सर्व मुलांना उपयुक्त विद्या आणि कला शिकविण्याची व्यवस्था केली होती. शिक्षक विद्यार्थ्याला विद्या सारखीच देतो; पण ज्यांची ज्यांची जशी योग्यता असेल तदनुसार ते तिचें ग्रहण करतात. त्याप्रमाणें **शृंगभुज** हा इतर मुलांपेक्षां हुषार असल्यामुळें तो प्रत्येक विद्येंत आणि कलेंत त्यांच्यापेक्षां विशेष निपूण झाला होता. ह्मणून त्या सर्वांचीं मनें दूषित होऊन ते त्याचा घात करण्याविषयीं टपले होते. तथापि तो त्यांच्यांशीं मोकळ्या मनानें वागत होता. एकेदिवशीं ते सर्व राजपुत्र आपल्या शस्त्रास्त्रांचा प्रयोग करीत होते. त्यांची आपआपसांत कवाईत चालली होती. कांहीं तमासगीर लोक आसपास उभे राहिले होते. इतक्यांत एका बंगल्यावर एक अजस्त्र बगळा बसलेला दृष्टी पडला. त्याचा आकार मोठा चमत्कारिक होता. राजपुत्रांपैकीं एकाची दृष्टि तिकडे लागली; ह्मणतां ह्मणतां सारेजण त्याच्याकडेच पाहूं लागले. यावेळीं त्या मार्गानें एक जति (जैन साधू) चालला होता. तो मोठा मांत्रिक असून अंतर्ज्ञानी होता. राजपुत्रांचें त्या बगळ्याकडे लक्ष्य लागलेलें पाहून तो ह्मणाला, "हे राजपुत्र हो! अरे हा खरोखरीचा बगळा नव्हे. हा **अग्निशिख** नांवाचा राक्षस हें बगळ्याचें रूप घेऊन फिरत आहे. हा मोठमोठीं नगरें ओसाड घालणारा आहे. याकरतां तुह्मी शूर क्षत्रिय पुत्र आहां. बाण मारून याला ठार करा. चला लवकर बाण मारा. नाहीं तर हा येथून जाईल."

त्या क्षपणकाचें हें भाषण ऐकून, मुलांना मोठें कौतुक वाटलें. त्या नव्याण्णवही बंधूनीं आपापल्यापरी मोठ्या जोरांनीं त्याच्यावर बाण सोडले; तथापि त्यांतून एकही त्या बगळ्याला लागला नाहीं. हें पाहून तो नग्न क्षपणक पुन्हां त्यांला ह्मणाला, "अरे, तुमच्याहातून हा मुळींच मरायचा नाहीं. हा जो तुमचा लहान बंधू आहे त्याच्या हातून मात्र हा खचित मरेल. हाच याला मारण्याविषयी समर्थ आहे. तर त्याला धनुष्य घेऊं द्या." वस्तुतः त्या जतीनें **शृंगभुजा**ची स्तुती केली ती त्यांला वाईटच वाटली; पण **निर्वासभुजा**ला त्यावेळीं आपल्या आईच्या सांगण्याची आठवण झाली. तो दुष्ट मनांत ह्मणाला, 'आईच्या सांगण्याप्रमाणें हा **शृंगभुज** आपला शत्रू आहे. याला येथून घालविण्याला हीच उत्तम संधि आहे. याकरतां आमचे बाबा जें धनुष्य घेतात तेंच यावेळीं आपण याला द्यावें, आणि बाणही पण त्यांचेच द्यावे. ते सोन्याचे बाण अंगाला लागले असूनही हा बगळा मेला नाहीं आणि त्या बाणासह जर हा येथून उडून गेला; तर हाही त्या बाणांचा शोध करीत त्याच्या मागून जाईल. मग आह्मी त्याच्या पाठीस लागूं. जतीनें सांगितल्याप्रमाणें हा बगळा जर राक्षस असला; तर तो याच्या मुळींच हातीं लागायचा नाहीं. आणि **शृंगभुज** शोध करीत फिरत राहील. बाबांचे बाण फुकट गेले तर याला पुनः घरीं तोंड दाखविण्यास सवड राहणार नाहीं. अर्थात् यारितीनें आपलें काम होईल,' असा विचार करून त्या दुष्टानें राजा **वीरभुज** जें धनुष्य घेत होता तें **शृंगभुजा**च्या हातांत आणून दिलें. व बाणही त्याचेच आणून दिले.

**शृंगभुजा**ला हें कपट मुळींच माहित नव्हते. धनुष्य हातांत घेऊन तें आकर्णपर्यंत ओढून, रत्नांचें ज्याला फळ लावलें आहे असा एक सोन्याचा बाण त्या प्रतापी **शृंगभुजा**नें बगळ्यावर सोडला. त्याणें नेम धरल्याप्रमाणें तो बाण अचुक त्या बगळ्याला लागला, तरी त्या बलाढ्य राक्षसाचा तेथल्यातेथें प्राण गेला नाहीं. तो तसाच बाण घेऊन तेथून

उडून गेला. इकडे निर्वासभुजाचा हेतू पूर्ण झाला. तो आपल्या इतर बंधूंसहवर्त्तमान शृंगभुजाला ह्मणाला, "अरे, हें काय केलेंस? मोठा घात झाला. आतां बाबा काय करतील कोणास ठाऊक? अरे, तो सोन्याचा बाण प्रत्यक्ष बाबांचा आहे. ते आतां आमचा जीव काढतील. मुकाट्यानें बाण कोठें आहे तो आणून दे. तूं असा नेमळा आहेस ह्मणून आह्मास काय ठाऊक? सपाट्या सरसा तूं त्या बगळ्याला जागच्याजागीं चीत करशील, असें वाटलें ह्मणून आह्मी तो बाण तुझ्या हातीं दिला. तो जर मुळच्याजागीं नेऊन ठेविला नाहीं तर बाबा आह्मा सर्वांला घरांत घेणार नाहींत. आणि दुसरा करावा ह्मटला तर येथल्या एकाही कारागिराला तसला मुळींच करतां यायचा नाहीं. याकरतां काय पाहिजे तें कर; पण तो बाण आणून दे. नाहीं तर आह्मी येथल्यायेथें तुझ्यापुढें जीव देतों!"

हें त्या कपट्यांचें भाषण ऐकून शृंगभुजाला त्यांचा खरा हेतू काय आहे तो कळला नाहीं. तो शूर त्यांना ह्मणाला, "अरे, तुह्मी असे भितां काय? थोडा धीर धरा. हातपाय गाळूं नका. त्या दुष्ट राक्षसाला मारून मी तो तुमचा बाण आणून देतों. तुह्मी इतकी पक्की खातरी ठेवा कीं, तो बाण घेतल्यावाचून मी कधींही परत यायचा नाहीं." असें सांगून त्याणें बापाचें धनुष्य त्यांच्या हवालीं केलें. आणि आपलें धनुष्य व बाण घेऊन तो प्रतिज्ञापूर्वक तेथून निघाला. जरी तो पक्षी कोणीकडे पळून गेला हें त्याला माहित नव्हतें; तरी त्याच्या अंगांतून जी रक्ताची धार वहात होती तिच्या अनुलक्ष्यानें माग काढीत शृंगभुज वेगानें त्या पक्ष्याच्या पाठीस लागला. इकडे ते त्याचे दुष्ट सावत्र बंधू फार खूष झाले. त्यांणीं आपलें कार्य झाल्याबद्दल एकमेकांच्या हातावर टाळ्या दिल्या. आणि हा आपला पराक्रम—पराक्रम कसला, घातकीपणाचें कृत्य—आपापल्या आईला कळविण्याकरतां ते घाईघाईनें घराकडे गेले. इकडे तो शृंगभुज एकटाच त्या बगळ्याचा माग काढीत

चालला असतां अनेक दऱ्यांखोऱ्यांतून पार होऊन एका मोठ्या अरण्यांत येऊन पोंचला. येथेंच कोठें तरी तो राक्षस असेल असें समजून शोध करीत फिरत असतां शृंगभुजाला तेथें एक मोठें नगर दृष्टीस पडलें. जणूं काय योग्य वेळीं उपयोग घेण्याकरतां मिळालेलें पुण्यरूपी वृक्षाचें फळच, अशा त्या नगरांत शृंगभुज निःशंकपणें शिरला. फिरतां फिरतां क्षणभर विश्रांति घ्यावी ह्मणून तो तेथल्या बागेंत एका झाडाखालीं बसून श्रमाचा परिहार करीत आहे इतक्यांत; जिचें रूप परमआश्चर्यकारक आहे, अशी एक तरुण कन्या आपल्याकडेच येत आहे असें त्याला दिसलें. विरह झाला असतां प्राण हरण करणारी व समागम झाला असतां प्राण देणारी अशी, जणूं काय ब्रह्मदेवानें विष आणि अमृत या दोहीं वस्तूंनीं जिला निर्माण केली आहे, अशी ती विचित्र स्त्री नेत्रांनीं प्रेमरूपी अमृताची वृष्टी करीत होत्साती हळूहळू जवळ येऊन त्या शृंगभुजाकडे टक लावून पाहूं लागली. तिच्याप्रमाणेंच त्याचेंही मन तिच्याकडे गेलें. तेव्हां तो मधूर शब्दांनीं तिला ह्मणाला, "हे हरिणाक्षि! मी प्रवासी आसल्यामुळें यावेळीं तुझें स्वागत करण्यास असमर्थ आहें याची क्षमा कर. आणि—या नगरीचें नांव काय? व ही कोणाची? तसेंच माझ्या नेत्राला आनंद देणारी तूं कोण? व येथें कशा करितां आलीस? तें सांगण्यासारखें असेल तर कृपा करून सांगशील काय?"

राजपुत्राचा हा प्रश्न ऐकून त्याच्या दृष्टीसमोर तोंड करून आपली दृष्टी जमिनीकडे लावून ती प्रेमपूर्वक मधुर वाणीनें त्याला ह्मणाली, "महाभागा, यानगरीचें नांव धूमपूर. सर्वप्रकारच्या संपत्तीचें हें केवळ घरच आहे. येथें मोठा प्रबल अग्निशिख नावांचा राक्षस राहत असतो त्याची मी मुलगी. माझें नांव रूपशिखा. आतां येथें येण्याचें कारण काय तें माझ्यानें सांगवत नाहीं. तरी असाधारण अशा तुझ्या रूपानें मनाला आकर्षण केल्यामुळें हें शरीर या ठिकाणीं आलेंसें वाटतें. हा माझा वृत्तांत मी सांगितला. आतां आपण कोण? कोठलें

राहणारे? व येथें कसे आलां? हें कृपा करून सांगाल काय?" तिच्या रूपानें मोहित झालेला **शृंगभुज** मधुर भाषणानें तृप्त होत्साता आपली सर्व हकीकत निवेदन करिता झाला. "बापाचा बाण नेण्याकरतां आपण येथें आलों," असें त्याणें सांगितलें. तें ऐकून ती **रूपशिखा** ह्मणाली, "असें असेल तर आपल्यासारखा धनुर्धर या त्रैलोक्यांत दुसरा कोणीच नाहीं असें ह्मटलें पाहिजे. बगळ्याचें रूप घेणाऱ्या प्रत्यक्ष माझ्या ताताला जेव्हां तुह्मी बाण मारला; तेव्हां तुमचें शौर्य काय वर्णन करावें? तो तुमचा सोन्याचा बाण लीलेने मी आपल्या जवळ ठेवला आहे. आमच्या बाबांची जखम केव्हांच बरी झाली. **महादंभ** नांवाचा त्यांचा एक प्रधान आहे. त्याला **विशल्यकरणी** इत्यादि पुष्कळ वनस्पति माहीत आहेत. त्यानें औषधोपाय करून ती जखम नाहींशी केली. असो. आतां आपण येथेंच क्षणभर बसावें. मी बाबांला ही हकीकत सांगून आपल्याला घरीं घेऊन जातें. मी राक्षासाची कन्या ह्मणून माझेविषयीं संशय घेऊं नका. आर्यपुत्र, माझा आत्मा मी तुमच्यावर ठेविला आहे असें जाणा. याहुन अधिक माझ्यानें कांहीं सांगवत नाहीं."

असें सांगून **शृंगभुजाची** पुर्ती खात्री करून **रूपशिखेनें** त्याला तेथेंच बसविलें. आणि ती घाई घाईनें आपल्या बापाकडे गेली. व त्याला ह्मणाली, "ताता, **शृंगभुज** नावांचा कोणी राजपुत्र येथें फिरत फिरत आला आहे. त्याचें रूप किती तरी सुंदर आहे ह्मणून सांगूं? कुल तर मोठें प्रसिद्धच. स्वभाव उत्तम. वय भर तारुण्यांतलें. आणि गुण तर अप्रतिमच. यावरून मला असें वाटतें कीं, तो कोणी देवपुत्र अवतार धारण करून या लोकांत आला असावा. मनुष्याच्या अंगीं इतके गुण मुळींच असायचे नाहींत. बाबा, मला आपण पति करून देणार ह्मणतां तर तो राजपुत्रच करून द्या. तो न मिळेल तर खरोखर मी प्राणत्याग केल्यावांचून राहणार नाहीं."

हें ऐकून तिचा बाप **अग्निशिख** राक्षस ह्मणाला, "मुली, मनुष्य हें आमचें भक्ष्य आहे. तेव्हां त्यांच्याशीं शरीरसंबंध तो कसला? तथापि जर तुझा तसा आग्रहच आहे तर त्या राजपुत्राशींच मी तुझा विवाह करून देतों. जा. त्याला येथें आणून मला दाखव." हें ऐकून **रूपशिखेला** अतिशय आनंद झाला. ती तत्काल **शृंगभुज** ज्या ठिकाणीं बसला होता त्याठिकाणीं गेली व इकडे झालेलें वर्तमान सविस्तर सांगून त्याला बापाजवळ घेऊन गेली. त्याचें तें मनोहर रूप व अतिशय नम्रता पाहून **अग्निशिख** राक्षस प्रसन्न झाला. तो ह्मणाला, "राजपुत्रा, मी ही माझी मुलगी **रूपशिखा** तुला देतों. पण जर तूं केव्हांही, मी जें कांहीं सांगेन तें माझें वचन थोडें देखील अतिक्रमण न करशील तरच मी तुला जांवई करून घेईन."

त्या राक्षसाचें हें भाषण ऐकून **शृंगभुज** नम्रतेनें त्याला ह्मणाला, "मला तुमची आज्ञा शिरसा मान्य आहे. आणि मी खात्रीपूर्वक सांगतों कीं; तुमचें वचन मी कधींही अमान्य करणार नाहीं. आपण माझे गुरु आहां. माझें कल्याण व्हावें असेंच आपल्या मनांत येणार. तेव्हां असली आज्ञा मी कशी अमान्य करीन?" हें त्याचें भाषण ऐकून **अग्निशिखाला** फार समाधान वाटलें. त्याच्या चर्येवरून हा राजपुत्र प्रमाणिक आहे व सांगितल्याप्रमाणें हा खरोखर वागेल, अशी त्याची खात्री झाली. तेव्हां त्याणें त्याला आपल्या हमामखान्यांत जाऊन स्नान करून येण्यास सांगितलें. व **रूपशिखेला** ह्मणाला, "तूं जा, आणि आपल्या साऱ्या बहिणींला लवकर घेऊन ये." याप्रमाणें दोघांला दोन हुकूम केले. तेव्हां **रूपशिखा** आणि **शृंगभुज** दोघेही तेथून निघालीं. **शृंगभुज** हमामखान्याकडे जात होता. **रूपशिखाही** त्याच्या बरोबरच गेली. तिला कांहीं गुह्य गोष्ट त्याला सांगून ठेवायची होती. जवळ कोणी नाहीं असें पाहून **रूपशिखा** त्याला ह्मणाली, "आर्यपुत्र, माझ्या आणखी शंभर बहिणी आहेत. आह्मी सर्वही

एकसारख्याच आहोंत. दागदागिने, वस्त्रें वगैरे सर्वांचीं अगदीं एकसारखीं आहेत. आह्मा साऱ्याजणींच्या गळ्यांत एकाच नमुन्याचे हार आहेत. तेव्हां माझा बाप आतां असें करणार आहे कीं, आह्मा शंभर बहिणींला एकेठिकाणीं जमवून—'यांतून तुला पाहिजे असेल ती घे,' असें तुला सांगेल. तेव्हां तूं गोंधळांत पडशील. त्यांत मी अमुकच आहें अशी तुला ओळख पटणार नाहीं. बाबांनी पुढें काय करायचें व तें कसें करायचें हें मला अद्याप सांगितलें नाहीं; तरी, त्यांचें कपट मी अंदाजानें जाणलें आहे. कारण यावेळीं आह्मा सर्वांला एकेठिकाणीं जमविण्याचें दुसरें कांहींच प्रयोजन दिसत नाहीं. तेव्हां मी एक खूण सांगून ठेवतें ती तूं ध्यानांत ठेव. बाबा जेव्हां तुला सांगतील कीं, 'या मुलींतून तुला जी पाहिजे असेल ती घे,' ह्मणून त्यावेळीं मी आपल्या गळ्यांतला हार वेणीला अडकवून ठेवीन. त्या खुणेवरून मला ओळखून, तुझ्या हातांत तो जी वनमाला देईल ती माझ्या गळ्यांत घाल. हा आमचा बाप मोठा चमत्कारिक आहे. याला विवेक कसला तो मुळींच नाहीं. प्रत्यक्ष आपल्या मुलीजवळ असें कपट करायचें त्याला काय कारण होतें? पण जातिस्वभाव कोठें जाईल? तो आणखीही पुष्कळ युक्ती करील. कोणत्याही रितीनें तुला फसवावें असें त्याच्या मनांत आहे. पण तो जेंजें कांहीं तुला सांगेल तें तें तूं कबूल कर आणि मला सांगत जा. ह्मणजे पुढें काय करायचें तें सर्व मला ठाऊक आहे."

घरभेद्या मनुष्याच्या साह्यानें पाहिजे तसलीं बिकट कामें सिद्ध होतात. अग्निशिखाजवळ **शृंगभुजा**चें शहाणपण कांहींच चाललें नसतें. तो केव्हांच हरला असता; पण ही **रूपशिखा** आंतला भेद सांगणारी मिळाल्यामुळें तो विजयी झाला, हें अनुक्रमानें पुढें येईलच. असो. तिणें जसें वागण्याविषयीं सांगितलें तसें वागण्याचें **शृंगभुजानें** कबूल केलें. तेव्हां ती आपल्या बहिणीकडे गेली व **शृंगभुज** हमाम-

खान्यांत गेला. लवकरच आपल्या शंभर बहिणींसह ती बापाकडे आली. इकडे शृंगभुज हमामखान्यांत जाऊन पोंहचतांच तेथें शेंकडो दासी उभ्या होत्या. त्यांनीं त्याच्या अंगाला उट्या लावल्या. सुवासिक तेलें वगैरे लावून मोठ्या थाटानें स्नान घालून त्याला परत रवाना केलें. तो अग्निशिखाजवळ आला तेव्हां त्याणें, एक सुंदर फुलांची माळ त्याच्या हातांत दिली. व एकसारख्या रांगेनें उभ्या राहिलेल्या आपल्या मुलींकडे बोट दाखवून ह्मणाला, "या सर्व माझ्याच मुली आहेत. यांतून तुला जी पसंत असेल ती कोणती तरी एक वर." शृंगभुजाला त्याच्या प्रियेनें पूर्वी सांगून ठेविलेंच होतें. तो अनुक्रमानें एकेकीला पहात पहात रूपशिखेजवळ येऊन पोंचला. तिणें आपला हार वेणीवर अडकविला होता. ही खूण पाहून तत्काल त्याणें तिच्या गळ्यांत माळ घातली. हें पाहून अग्निशिखाला यागोष्टीचा मोठा चमत्कार वाटला. कारण याणें रूपशिखेला नेमकी कशी ओळखली हें त्याच्या लक्ष्यांत आलें नाहीं. तरी आपल्याला संतोष झाला असें दाखवून त्या उभयतांलाही त्याणें, 'उद्यां तुमचा विवाह करून देईन' असें सांगितलें. नंतर त्यांला व बाकीच्या मुलींला आपापल्या ठिकाणीं जाण्यास सांगितलें.

त्याच्या आज्ञेप्रमाणें शृंगभुज रूपशिखेबरोबर तिच्या महालांत जाऊन पोंचत आहे इतक्यांत अग्निशिखानें त्याला बोलावूं पाठविलें. हुकमाप्रमाणें तो परत त्याच्या जवळ आला. तेव्हां तो राक्षस ह्मणाला, "अरे, हे दोन बैल आणि हा नांगर घेऊन शहरच्या बाहेर जा. तेथें एकाठिकाणीं शंभर खंडी तीळ जमाकरून ठेविले आहेत ते आसपासची जमीन नांगरून त्यांत पेरून ये. पण हें काम आजच्या आज झालें पाहिजे बरें!" शंभर खंडी तीळ पेरणें आणि तेंही एका मनुष्यानें एका दिवसांत, हें किती अशक्य आहे तें सांगावयासच नको. पण शृंगभुजानें कांकूं न करतां—"आज्ञेप्रमाणें करतों" असें सांगून ते बैल

घेऊन तो तेथून निघाला. जातेवेळीं सासऱ्याचा काय हुकूम झाला आहे तो त्याणें रूपशिखेला कळविला. तेव्हां ती ह्मणाली, "आर्यपुत्र, कांहीं चिंता नाहीं. तूं याच्याबद्दल काडीमात्र विषाद करूं नकोस. हे बैल घेऊन तूं खुशाल तिकडे जा. मी आपल्या मायेनें तें तुझें काम लवकर साधून देतें."

प्रियेच्या सांगण्यावरून राजपुत्र शृंगभुज नांगर घेऊन गांवाबाहेर तिळांची रास करून ठेविली होती तेथें गेला. आतां हे शंभर खंडी तीळ आजच्या आज कसे पेरले जातील ? याची त्याला काळजी लागली. तरी त्याणें आपलें काम सुरू केलें. तो नांगर जूंपून पेरणी सुरू करतो आहे; इतक्यांत ती सारी जमीन नांगरलेली असून झाडून साऱ्या तिळांची पेरणी झाली आहे; असें त्याच्या दृष्टीस पडलें. हें सर्व रूपशिखेनें एका क्षणांत आपल्या मायेच्या सामर्थ्यानें केलें. त्याबद्दल आश्चर्य करीत होत्साता तो ते बैल व नांगर घेऊन अग्निशिखाजवळ गेला. व "आज्ञेप्रमाणें सर्व तीळ पेरले" असें त्याणें त्याला सांगितलें. अग्निशिखाला कोणत्याही रितीनें शृंगभुजाला फसवायचा होता. तो ह्मणाला, "वाहवा, भला शाहणा दिसतोस ! मला तीळ पेरून काय करायचें आहे. बरें जा जा आतां, आणि ते सर्व तीळ गोळा कर." शृंगभुजानें—"करतों" असें सांगून रूपशिखेची पुनः भेट घेतली. व "आतां जमीनींत पेरलेले शंभर खंडी तीळ कसे जमा केले जातील ?" असें तो ह्मणाला. यावर ती ह्मणाली, "कांहीं चिंता नाहीं. हेंही काम मी आपल्या मायेनें घटका दोन घटकांत करतें पहा." असें सांगून तिणें कोट्यावधि मुंग्या उत्पन्न करून त्या शेतांत सोडल्या. अंगीं तेलाचा अंश असल्यामुळें त्या मुंग्यांनीं पेरलेले भराभर तीळ वर काढले. मायेनें उत्पन्न केलेल्याच त्या मुंग्या. त्यांणीं क्षणमात्रांत सारे तीळ एक ठिकाणीं जमा केले. ती रास झालेली पाहून शृंगभुजानें हुकुमाप्रमाणें तीळ जमा केल्याची खबर अग्निशिखाला दिली.

**अग्निशिखाच्या** मनांत त्याला हरवायचें होतें. व तो हरला ह्मणजे त्याला खाऊन टाकायचें हा त्या कपट्याचा हेतू होता. राक्षस, भुतें वगैरे माणसांला मारतात; पण कांहींतरी अपराध त्यांच्याकडे लागू केल्यावांचून तसें करीत नाहींत. शंभर खंडी तीळ एका दिवसांत पेरणें व पेरलेले एकत्र करणें या दोन्ही अशक्य अशा गोष्टी त्यानें त्याला सांगितल्या होत्या. व त्या न झाल्या असत्या तर त्याणें केव्हांच त्याला मटमटावून टाकला असता. पण तें फसल्यामुळें तो मनांत चरफडला. तथापि बाहेर कांहीं न दाखवितां त्याला ह्मणाला, "येथून दक्षिणदिशेस आठ कोसांवर एक ओसाड शिवाचें देऊळ आहे. तेथें **धूमशिख** नांवाचा माझा आवडता बंधू राहतो. तेथें तूं आतांच्या आतां जा. आणि देवळाच्या बाहेर उभा राहून—'हे **धूमशिखा**, परिवारासह तुला बोलविण्याकरतां **अग्निशिखानें** मला दूत पाठविलें आहे; तर लवकर ये. उद्यां **रूपशिखेचा** लग्नसमारंभ व्हायचा आहे. त्या करितां तुला त्वरित बोलाविलें आहे,' इतकें तूं त्याला सांग. आणि मागच्या पायांनीं लवकर माझ्याकडे ये. हें काम केलेंस ह्मणजे झालें. मग खुशाल माझी मुलगी **रूपशिखा** हिचें पाणिग्रहण कर."

पूर्वीं जीं दोन बिकट कामें सांगितलीं होतीं तीं त्याणें केलीं. यावरून **अग्निशिखानें** अनुमान करायचें होतें. तथापि, मूर्खाला तितकें शहाणपण कोठून असेल? त्याणें सांगितलेलें काम ऐकून, "आज्ञे प्रमाणें करतों" असें सांगून **शृंगभुज रूपशिखेजवळ** गेला. आणि तिच्या बापानें जी त्याला कामगिरी सांगितली होती ती तिला कळविली. ती साध्वी **रूपशिखा** मोठी चतुर होती. तिणें माती, पाणी, कांटे आणि अग्नि त्याच्या जवळ दिले. आणि आपला घोडा त्याला बसायला देऊन म्हणाली, "आर्यपुत्र, या घोड्यावर बसून तूं त्या देवळा जवळ जा. आणि बाबांनीं भावाला जो निरोप सांगायला सांगितला आहे तो सांगून ताबडतोब तेथून निघ. हा घोडा खुप

जलद चालणारा आहे. तूं याला जितका वेग देशील तितका त्वरित हा चालेल. परत येतेवेळीं वरचेवर मागें पहात जा. जर तो **धूमशिख** तुझ्या मागून येत आहे असें तूं पहाशील तर प्रथम ही माती त्याच्या येण्याच्या वाटेवर विखरून टाक. ही माती टाकतेवेळीं मागच्या हातांनीं टाक. तेवढ्यानें तो मागें न परतला तर तूं हे पाणी मागें टाक. इतकेंही करून तो पुढें आला तर हे कांटे टाक. यानंतरही पुढें आलाच तर तूं हा अग्नि त्याच्या वाटेंत टाक. असें केलेंस म्हणजे संकटावांचून तूं परत येथें येऊन पोंचशील. आतां जें हें मी तुला सांगितलें आहे याविषयीं तूं मनांत कांहीं संशय आणूं नकोस. माझ्या विद्येचें बळ किती आहे हें तुला आजच समजून येईल. आतां जा लवकर. वेळ लावूं नको."

**रूपशिखेनें** त्याला निरोप दिला. तेव्हां तिणें हें काय सांगितलें? व याचा परिणाम काय होईल? याबद्दल **शृंगभुजानें** मुळींच चिकित्सा केली नाहीं. माती, पाणी, कांटे व अग्नि या वस्तू युक्तीनें बरोबर घेऊन घोड्यावर बसून तो मोठ्या त्वरेनें त्या देवळाजवळ गेला. तेथें बाहेरूनच त्याणें देवाचें दर्शन घेतलें. ज्याच्या डाव्या बाजूला **पार्वती** व उजव्या बाजूला **गणपति** शोभत आहे, अशा त्या भगवान् **शंकराला** नमस्कार करून **अग्निशिखानें** आपल्या भावाला जो निरोप सांगितला होता, तो मोठ्यानें **धूमशिखाचें** नांव घेऊन त्याला सांगितला. व लगेच मागें फिरून घोडा भरधांव सोडला. थोडा वेळ गेल्यावर मान मागें फिरवून पाहतो तों; तो **धूमशिख** राक्षस आपल्या पाठीस लागला आहे असें दिसलें. तेव्हां **रूपशिखेनें** सांगितल्याप्रमाणें त्याणें प्रथम माती त्याच्या वाटेंत टाकली. ती माती खालीं टाकतांच तिचा एक मोठा पर्वत बनला. अर्थात् त्याच्या आड झाल्यामुळें **धूमशिख शृंगभुजाला** दिसेनासा झाला. पण कांहीं वेळानें पुन्हां पहातो तों; तो राक्षस पाठीस लागला आहे असें दिसलें. तेव्हां

त्याणें पाणी टाकलें. त्या पाण्याची तत्काल एक मोठी नदी बनली. मोठमोठ्या लाटा येताहेत अशी ती नदी मध्यें आल्यावरून आपल्यावरचें अरिष्ट टळलें असें **शृंगभुजाला** वाटलें. पण क्षणमात्रानें पुन्हां **धूमशिख** त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्यानें ते कांटे मागें फेंकले. काट्यांचें तत्काल एक मोठें जंगल बनलें. त्यांत जिकडे तिकडे कांटेरीं झाडें झालीं! आतां तरी ही पीडा टळेल असें राजपुत्राला वाटलें होतें; पण क्षणमात्रानें तो पुन्हां त्याला दिसला. तेव्हां त्यानें अग्नि आपल्या मागें फेंकून दिला. अग्नि पडतांच त्या सगळ्या जंगलाला आग लागली. गवत झाडें वगैरे चट्सारें एकदम पेटून मोठा भडका उडाला. असें पाहिलें तेव्हां मात्र **धूमशिख** खिन्न झाला. **अर्जुनानें खाडव** वन जाळलें त्याप्रमाणें तो अग्नि चहूंकडे पसरलेला पाहून त्याच्या पलिकडे जाण्यास असमर्थ झालेला तो **धूमशिख** राक्षस, भयभीत होऊन परत आपल्या ठिकाणीं निघून गेला. **रूपशिखेच्या** मायेनें त्या राक्षसाला मोह झाला होता. ह्मणूनच त्याला असें परत जावें लागलें. जरी तो वणवा फार मोठा होता; तरी आकाशमार्गानें त्याच्या वरून **धूमशिखाला** जातां आलें असतें. पण मायेनें मोहित झाल्यामुळें त्याचें त्याला स्मरण राहिलें नाहीं. तो राक्षस यावेळीं पायीं चालत होता. अर्थात् त्याला परत जावें लागलें.

याप्रमाणें तो राक्षस परत गेला असें पाहून, आपल्या प्रियेच्या मायेच्या प्रभावाची मनांत तारीफ करीत होत्साता **शृंगभुज** निर्भयपणें परत **धूमपुरांत** येऊन पोंचला. प्रथम **रूपशिखेच्या** महालांत जाऊन तिचा घोडा तिच्या हवालीं केला. व झालेला सर्व वृत्तांत मुळापासून त्याणें तिला सांगितला. आपण सांगितल्याप्रमाणें **शृंगभुज** सुखरूप परत आला, हें ऐकून तिला फारच आनंद झाला. नंतर तिचा निरोप घेऊन **शृंगभुज अग्निशिख** राक्षसाजवळ गेला. आणि त्याला नमस्कार करून 'तुमच्या आज्ञेप्रमाणें आपला बंधू **धूमशिख** याला मी आमंत्रण

देऊन आलों' असें त्याणें सांगितलें. तें ऐकतांच **अग्निशिख** भांबावल्यासारखा झाला. कारण **धूमशिखाच्या** तडाक्यांतून हा जीवंत यायचा नाहीं अशी त्याची पक्की खात्री होती. तो ह्मणाला, "माझ्या भावाला निरोप सांगितला ह्मणतोस पण मला तें खरें वाटत नाहीं. खरोखरीच तेथें गेला असशील तर कांहीं खाणाखुणा सांग पाहूं." हें ऐकून **शृंगभुज** त्या कपटी राक्षसाला ह्मणाला, "खरोखरच मी तेथें गेलों होतों. लहान पोर असतां देखील मी कधी खोटें बोलल्याचें स्मरत नाहीं. तुह्माला तेथल्या खुणा ऐकायच्या असतील तर त्याही सांगतों. तें **महादेवाचें** देऊळ आहे. तेथें डाव्या बाजूला **पार्वती** व उजव्या बाजूला **विनायक** यांच्या मूर्ती आहेत. हें खरें कीं खोटें? याचा आपणच विचार करा."

**शृंगभुजानें** सांगितलेल्या खुणा बरोबर होत्या. त्यावरून तो तेथें गेला होता याविषयीं तर कांहीं संशय राहिलाच नाहीं. तेव्हां तो राक्षस मनांत ह्मणाला, 'हा बेटा तेथें गेला होता यांत कांहीं संशय नाहीं. असें असून माझा भाऊ याला खाऊं शकला नाहीं हें काय! याचें सामर्थ्य कांहीं विलक्षण दिसतें. खरोखर हा कोणी तरी देव असावा. मनुष्य मुळींच नव्हे. नाहीं तर मी ज्या तीन गोष्टी सांगितल्या त्या याच्या हातानें कधींही सिद्ध झाल्या नसत्या. तेव्हां याला आतां फार त्रास देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपली मुलगी **रूपशिखा** याच्यावर आसक्त झाली आहे, आणि हा तिला पतीही योग्य आहे.' असा विचार करून **अग्निशिखानें** **शृंगभुजा**ची तारीफ केली. आणि 'तूं कृतकृत्य झालास' असें सांगून **रूपशिखेच्या** महालांत जाण्यास सांगितलें. त्या अज्ञानी राक्षसाला आंतला भेद काय होता हें मुळींच समजलें नाहीं. त्याच्या तावडींतून आपण सुटलों व तो खुष झाला हें पाहून **शृंगभुज** **रूपशिखेशीं** आपला विवाह केव्हां होईल याविषयीं फार उत्सुक झाला. **अग्निशिखानें** 'आपली मुलगी तुला देतों' असें

सांगितलें होतें तरी हावेळपर्यंत त्याला तिच्याविषयीं फारशी अशा नव्हती. कारण या राक्षसाच्या सपाट्यांतून आपला बचाव होईल; याची त्याला बिलकूल खातरी नव्हती. असो. तो **रूपशिखे**च्या महालांत गेला. त्या ठिकाणीं खाणें पिणें व इतर अनेक प्रकारच्या क्रीडा यांत त्याणें ती रात्र कशी तरी घालविली. प्रातः काल होतांच **अग्निशिखानें** आपल्या ऐश्वर्याला शोभेल अशाप्रकारचा समारंभ करून **अग्नीच्या** साक्षीनें आपली मुलगी यथाविधि **शृंगभुजाला** दिली. कोठें राक्षसाची मुलगी आणि कोठें तो राजपुत्र! परस्पराचें साम्य किती! एक भक्ष्य आणि दुसरा भक्षक! अशी स्थिती असून त्या उभयतांचा स्नेह जमतो काय? आणि तीं स्त्रीपुरुषें होतात काय? हा सर्वच अद्भुत चमत्कार. प्राक्तन कर्माची गति मोठी विचित्र आहे!

तो राजपुत्र **शृंगभुज**, आपल्या प्रीतीला पात्र झालेल्या त्या राक्षस-कन्येचा स्वीकार करून फारच आनंदित झाला. यद्यपि राक्षसांचें स्वरूप भयंकर असतें; तथापि चिखलांत जशी कमलिनी उत्पन्न होते त्याप्रमाणें शोभणारी, अत्यंत नाजूक व सुस्वरूप अशा त्या **रूपशिखे**चा हंसाप्रमाणें त्याणें स्वीकार केला. उभयतांचेंही मन अगदीं एकरूप झालें होतें. मनोरम अशा त्या स्त्रीसहवर्तमान अनेकप्रकारचे भोग भोगीत तो राजपुत्र तेथें मोठ्या चैनींत राहिला. **रूपशिखे**ला अनेक विद्या माहित होत्या हें वर सांगितलेंच आहे. ती आपल्या पतीचें प्रिय करावें ह्मणून नित्य नवे नवे उपचार त्याला अर्पण करीत असे. बरेच दिवस याप्रमाणें चैनींत गेल्यावर राजपुत्राच्या प्रेमाचा पूर अंमळ शांत झाला. तेव्हां तो एकेदिवशीं **रूपशिखे**ला एकांती म्हणाला, “प्रिये, सासऱ्याच्या घरीं फार दिवस राहणें हें मला कसेंसेंच वाटतें. इतके दिवस राहिलों तितकें पुरे. तर चल आतां आपण आपल्या **वर्द्धमा-नपुरा**ला जाऊंया. ती आपली राजधानी आहे. तेथून मला माझ्या शत्रूंनीं कशारितीनें बाहेर घालविला, हें मी तुला पूर्वीं सांगितलेंच आहे.

तेव्हां वारंवार त्या गोष्टीची आठवण होऊन मला फार वाईट वाटतें. मान हाच माझ्या सारख्यांचा प्राण असतो. मला जो त्यांणीं तिरस्कारपूर्वक बाहेर घालविला त्याचा बदला त्यांला दिल्यावांचून माझें मन स्वस्थ होणार नाहीं. याकरतां तूं आतां आपली जन्मभूमी सोड. जरी तुला ती सोडणें फार कठीण वाटेल तरी माझ्याकरतां तूं हें काम कर. बापाचा निरोप घे. आणि जो सोन्याचा बाण तूं बापाकडून मागून घेतला आहेस तो माझ्याकडे आणून दे."

शृंगभुजानें सांगितलें तें ठीकच होतें; पण रूपशिखेला तसें करणें फार कठीण होतें. तथापि ती साध्वी तत्काल त्याच्या सांगण्याला मान्य झाली. ती म्हणाली, "आर्यपुत्र, मी आपल्याला माझें सर्वस्व अर्पण केलें आहे. या माझ्या शरीरावर किंबहुना माझ्या मनावर देखील माझी मुळींच सत्ता नाहीं. आपल्या आज्ञेप्रमाणें मी आतां निघण्यास तयार आहें. कोठली जन्मभूमी, कोठले आप्त, आणि सोयरे. माझें जें कांहीं आहे तें सर्व आपण आहां. पतिव्रता स्त्रियांला पतीवांचून दुसरी गतीच नाहीं. बाबांचा निरोप घ्यावा असें आपण सांगितलें; पण ती गोष्ट होणें कठीण आहे. ते आम्हाला कधींही सोडायचे नाहींत. आणि त्यांनीं नको म्हटलें असतां गेलों तर—त्यांचा स्वभाव फार रागीट असल्यामुळें—ते काय करतील कोणास ठाऊक ? याकरतां त्यांना न सांगतां आपण मुकाट्यानें येथून चालतें व्हावें हें बरें दिसतें. आह्मी गेल्याची खबर त्यांला समजल्यावांचून राहणार नाहीं. त्यांनीं पाठलाग न केला तर बरेंच झालें. कदाचित् तो पाठोपाठ आलाच तर मी आपल्या विद्येनें त्यांला मोहित करीन. तो तितका विवेकी नाहीं हें मी पूर्वींच सांगितलें आहे."

याप्रमाणें रूपशिखेनें मसलत सांगितली ती ऐकून शृंगभुजाला फार समाधान वाटलें. प्रत्यक्ष आईबाप व असें अनुपम ऐश्वर्य टाकून ती आपल्या बरोबर येईल किंवा नाहीं; याविषयीं त्याला मोठा संशय

होता. तेव्हां गोष्ट काढतांच तिणें तयारी दर्शविल्यावरून त्याला आनंद झाला हें योग्यच. **अग्निशिखानें** कन्यादानाच्यावेळीं आपलें अर्धें राज्य मुलीला दिलें होतें. तेंच तिणें **शृंगभुजाला** दिलें. अमोलीक पुष्कळ रत्नांनीं भरलेली एक कंठाळ बरोबर घेऊन **रूपशिखेनें** तो सोन्याचा बाण त्याला दिला. नंतर **शृंगभुज** तिनेंच आणलेल्या **शंखवेग** नांवाच्या उत्तम घोड्यावर आरूढ झाला. आणि 'आह्मी उभयतां कांहीं वेळ बागेंत फिरायला जातों;' असें सांगून त्यांणीं आपल्या जवळच्या चाकरांला नकळत तेथून प्रयाण केलें. **शृंगभुज रूपशिखे** सहवर्त्तमान मोठ्या वेगानें घोडा दवडीत **वर्द्धमानपुराकडे** निघाला. ते बरेच दूर गेल्यावर **अग्निशिखाला** तें वर्त्तमान समजलें. तेव्हां तो दांत ओंठ खात रागानें आकाशमार्गानें त्यांच्या पाठीस लागला. आकाशांत तो मोठ्या वेगानें चालला होता. त्याच्या येण्याचा आवाज ऐकून **रूपशिखेला** तो आला असें वाटलें. तेव्हां ती **शृंगभुजाला** ह्मणाली, "आर्यपुत्र, पहा मी सांगितलें होतें तें खरें झालें कीं नाहीं तें. आह्मांला परत नेण्याकरतां बाबा पाठोपाठ आले. तुह्मी निःशंकपणें स्वस्थ असा. मी त्याला कसा फसवितें तो चमत्कार तरी पहा. हा घोडा आणि तुह्मी दोघेही त्याच्या दृष्टीस पडणार नाहींत. मी तुमच्यावर आपल्या विद्येनें झांकण घातलें आहे." असें बोलून ती घोड्यावरून खालीं उतरली. **शृंगभुजानें** आपला घोडा तेथेंच उभा केला. इकडे **रूपशिखेनें** तत्काल पुरुषाचा वेष घेतला. आणि जवळच एक लांकूडतोड्या होता त्याला म्हणाली, "अरे भल्या माणसा, येथें एक मोठा राक्षस येत आहे. तर तूं एकीकडे होऊन क्षणभर असाच उभा रहा. आणि तुझी कुऱ्हाड अंमळ माझ्या हातांत दे." त्या लांकूडतोड्याला तिचें बोलणें खरेंच वाटलें. त्याणें आपली कुऱ्हाड तत्काल तिच्या हातांत दिली. ती घेऊन **रूपशिखा** लांकडें तोडूं लागली. **शृंगभुज**, हा काय चमत्कार आहे ह्मणून विस्मित होऊन पाहूं लागला.

इतक्यांत तो **अग्निशिख** राक्षस—पुरुषाच्या वेषानें लांकडें तोडीत असलेल्या **रूपशिखेला** पाहून—'याला विचारलें असतां कांहीं तरी शोध लागेल' ह्मणून खालीं उतरला. आणि तो वेडा पीर **रूपशिखेला** ह्मणाला, "बाबा लांकूडतोड्या, या वाटेनें एक तरुण स्त्री आणि पुरुष असें जोडपे गेल्याचें तूं पाहिलेंस काय?"

लांकूडतोड्या बनलेली **रूपशिखा** ह्मणाली, "गृहस्था, आह्माला काय विचारतोस? हा (ह्मणजे खरोरीचा लांकूड तोड्या) आणि मी दोघेही आह्मी आपलें काम करीत आहों. पुष्कळ लोक या वाटेनें जातात येतात; पण त्यांच्याकडे लक्ष देऊन आह्माला काय करायचें आहे. आमचा भारा पुरता झाला नाहीं तर संध्याकाळीं पोटाची भरती व्हायची नाहीं. तेव्हां कोणी आलेला किंवा गेलेला पुरुष अथवा स्त्री, कोणालाच आह्मी पाहिलें नाहीं. त्यांतून आज आह्माला एक विशेष कामगिरी आहे. राक्षसांचा राजा **अग्निशिख** हा मेला आहे! आणि त्याला जाळायला लांकडें पाहिजे आहेत. व तीं सर्व पुरविण्याचा आह्मी मक्ता घेतला आहे. तेव्हां तें काम लौकर केलें पाहिजे. तुला शोध करायचा असला तर तूं पुढें जाऊन कोणाला तरी विचार!" हें तिचें बोलणें ऐकून तो मंदमति **अग्निशिख** मनांत ह्मणाला, 'अरे! मी मेलों कसा! मला मरायला काय झालें? तें कांहीं समजत नाहीं. टवळी पोरटी गेली तर जावो. तिला घेऊन मला काय करायचें आहे. आपण परत घरीं जाऊन कसा मेलों त्याचा तपास करावा. नोकराचाकरांला तें माहित असेल.' असा विचार करून तो दीडशहाणा राक्षस परत घाई घाईनें आपल्या घराकडे निघून गेला.

इकडे **रूपशिखेनें** केलेला चमत्कार व त्या राक्षसाचें मूर्खपण पाहून ज्याला हंसें आंवरेनासें झालें आहे; अशा **शृंगभुजानें** प्रेमपूर्वक आलिंगन दिलेली **रूपशिखा** पूर्वींप्रमाणें घोड्यावर बसून त्याच्यासहवर्तमान पुढें चालती झाली. थोडासा मार्ग अतिक्रमण करून पुढें जातात तों

इतक्यांत राक्षसाची स्वारी परत आली. त्याणें घराकडे जाऊन आपल्या चाकरांला—"मी जीवंत आहे कीं मेलों!" म्हणून विचारल्यावरून, ज्यांच्या पोटांत हसें मावेनासें झालें आहे; अशा सेवकांनीं "महाराज, आपण जीवंत आहां." असें सांगितलें. तें ऐकून—"वाहवा! एकून मी जीवंत आहें तर!" असें म्हणून आनंद पावलेला **अग्निशिख** मुलीचा आणि जांवयाचा पाठलाग करायला आला. त्याच्या भरारीचा आवाज दुरून ऐकून **रूपशिखा,** स्वारी येते आहे असें समजून पूर्वींप्रमाणें घोड्यावरून उतरली व **शृंगभुजाला** आपल्या विद्येनें झाकून ठेवून तिणें पुरुषाचा वेष घेतला. यावेळीं त्या वाटेनें कोणीएक लेखक चालला होता. त्याच्या हातांतला लिहिलेला एक कागद घेऊन **रूपशिखा** तो वाचीत उभी राहिली. इतक्यांत राक्षस खालीं उतरला व पूर्वींप्रमाणें— "या वाटेनें स्त्रीपुरुषाचें एक जोडपें गेलें आहेका?" म्हणून त्याणें विचारिलें. तेव्हां डोळ्यांत पाणी आणून व दुःखाचा सुस्कारा सोडून ती त्याला म्हणाली, "बाबा, मी आपल्या गडबडींत असल्यामुळें माझें चित्त मुळींच ठिकाणावर नाहीं. या वाटेनें जोडपें गेलें किंवा नाहीं हें माझ्या लक्षांत राहिलें नाहीं. आमचे यजमान राक्षसांचे राजे **अग्निशिख** महाराज यांची शत्रूशीं मोठी कडाक्याची लढाई झाली. तींत त्या दुष्टानें त्यांला पाडलें. सांप्रत ते अगदीं मरणोन्मुख झाले आहेत. थोडीशी कोठें धुगधुगी राहिली आहे. त्यांचा भाऊ **धूम्रशिख** यथेच्छ वर्तन करीत असतो. तरी यावेळीं त्याच्यावांचून दुसरा कोणी अधिकारी नाहीं म्हणून, आपलें राज्य त्याला देण्याकरतां महाराजांनीं हा लेख माझ्याकडे लिहून दिला आहे. तो त्याला लौकर नेऊन पोंचविला पाहिजे याकरतां मी जलदीनें जात आहें."

हें ऐकून **अग्निशिख** मनांत ह्मणाला, 'अरेरे!!! काय, मला शत्रूंनीं मारलें? फार वाईट झालें. आतां याचा शोध केलाच पाहिजे.' असें समजून भांबावल्यासारखा होऊन मरणाचा शोध करण्याकरितां

घरीं गेला! कोण तरी हा चमत्कार! आपण स्वस्थ आहें असें त्याला मुळींच समजलें नाहीं काय? विश्व उत्पन्न करणाराची किती तरी विचित्र शक्ति आहे पहा. त्याणें तमोगुणापासून[1] उत्पन्न केलेले प्राणी किती तरी मूढ आहेत त्याचा कांहीं नियम नाहीं. असो तो वेडा धांवत धांवत परत आपल्या घरीं गेला. घरांतल्या माणसांला विचारलें, तेव्हां ते हंसू लागले. त्यावरून आपण जीवंत आहें अशी तर त्याची खात्री झालीच. पण त्याला लाजही वाटली. त्यांतून येण्याजाण्याचे फार श्रम झाले ह्मणून तो फिरून मुलीचा पाठलाग करायला आला नाहीं. त्या गडबडींत त्याला रूपशिखेचें विस्मरणच पडलें.

इकडे बापाला याप्रमाणें मोहित करून रूपशिखा पतीसहवर्तमान पूर्वीप्रमाणें मार्ग क्रमण करूं लागली. उघडच आहे; साध्वी स्त्रियांला पतिहितावांचून दुसरें कांहींच ठाऊक नसतें. संकटांपासून मुक्त झालेला शृंगभुज आपल्या स्त्रीसहवर्तमान मोठ्या विचित्र दिसणाऱ्या घोड्यावर बसून वर्द्धमाननगरींत प्राप्त झाला. राजा वीरभुज याचा त्याच्यावर मनापासून विशेष लोभ होता. सावत्र बंधूंनीं कांहीं कपट करून त्याला वनवासाला पाठविलें, ह्मणून तो फार दुःखित झाला होता. व त्याच्या येण्याची एकसारखी मार्गप्रतीक्षा करीत होता. शृंगभुज शहराच्या जवळ आला तेव्हां त्याला पाहून, धांवत धांवत जाऊन कोणीं राजाला हें वर्तमान कळविलें. तेव्हां तो प्रिय वर्त्तमान सांगणाऱ्या त्या पुरुषाला मोठें बक्षीस देऊन आनंदानें शृंगभुजाला भेटण्याकरतां शहराच्या बाहेर आला. श्रीकृष्ण सत्यभामेसह दिसावा त्याप्रमाणें शोभणाऱ्या आपल्या पुत्राला दुरून पाहून राजाला फार आनंद झाला. इतके दिवस

१—आर्यलोकांच्या प्राचीन ग्रंथांत जो सृष्टीचा क्रम वर्णन केला आहे त्यांत ब्रह्मदेवानें—सात्विक, राजस आणि तामस अशी तीन प्रकारची सृष्टी उत्पन्न केल्याचें वर्णन केलें आहें. राक्षस भूत, प्रेत इत्यादिक ही तामस सृष्टी असें त्यांचें मत आहे.

नष्ट झालेली राजलक्ष्मी आज पुन्हां मिळाली असें त्याला वाटलें. पित्याला पाहतांच **शृंगभुज** तत्काल घोड्यावरून खालीं उतरला. व स्त्रीसहवर्तमान त्याणें बापाच्या पायांवर लोटांगण घातलें. ज्याच्या डोळ्यांतून प्रेमाश्रू चालले आहेत अशा राजा **वीरभुजानें** पुत्राला उठवून त्याला प्रेमपूर्वक आलिंगन दिलें. केवळ त्याच्या अवलोकनानेंच ज्याला खेद नाहींसा होऊन मंगल प्राप्त झालें आहे, अशा **शृंगभुजाला** हत्तीवर बसवून मोठ्या थाटानें तो आपल्या राजधानींत घेऊन जाता झाला.

नंतर स्नान भोजन वगैरे झाल्यावर **शृंगभुजाला** हातीं धरून राजानें आपल्या खोलींत नेलें. व त्याच्या हनुवटीला हात लावून म्हणाला, "बाळा, तूं असा कठोर कां झालास? इतके दिवस मला टाकून कोठें गेला होतास? माझ्यावर रागावला होतास काय?" असें बोलत असतां राजा **वीभुरज** याचा गळा दाटुन आला होता. तें पाहून **शृंगभुजाचें** चित्त फार कळवळलें. तो त्याला नमस्कार करून म्हणाला, "मी आपल्यावर रागावलों नाहीं. व मन कठोरही केलें नाहीं. मला कशाचा कंटाळा आला नाहीं. तरी पण माझ्या भावांनीं मला येथून जाणें भाग पाडल्यावरून मी गेलों होतों." असें सांगून त्याणें मूळापासून सर्व हकीकत सांगितली. आणि **निर्वासभुज** इत्यादि आपल्या सावत्र बंधूंला बोलावून बापाच्या समक्ष त्याणें तो सोन्याचा बाण त्यांच्या हवालीं केला. **शृंगभुज** विजयी होऊन आला व त्याला बापानें मोठ्या समारंभानें घरांत आणलें, हें ऐकूनच **निर्वासभुज** इत्यादि त्याच्या सावत्र बंधूच्या अंगाचा तिळपापड झाला होता. **शृंगभुज** मेला असेल असें समजून इतके दिवस ते आनंदांत होते. गेलेली पीडा परत आली म्हणून त्यांला फार दुःख झालें होतें. त्यांतून तो बाण परत दिला, तेव्हां तर—यावेळीं जमीन दुभागून जाईल तर बरें, असें त्यांना वाटलें. पण करतात काय? त्यांना निमूटपणें तें सहन करावें लागलें. **वीरभु-**

जाला शृंगभुजानें पूर्वी झालेली हकीकत सांगितलीच होती. तीबद्दल त्याणें पुन्हां निर्वासभुज इत्यादिकांकडे चौकशी केली. व त्यावरून ते नव्व्याण्णव पुत्र एकाच तऱ्हेचे, म्हणजे अत्यंत दुष्ट व घातकी आहेत असें वाटून ते वीरभुजाच्या मनांतून अगदीं उतरले. आपला पुत्र म्हणण्यासारखा काय तो एकटा शृंगभुजच आहे असें समजून राजा त्याच्यावर विशेषच प्रीति करूं लागला.

नंतर त्याच्या मनांत राणी गुणवरा इच्याविषयींही विचार आला. तो मनांत म्हणाला, 'या दुष्ट पोरांनीं जसें या शृंगभुजाला कांहींतरी निमित्त करून येथून घालवून दिलें, तसेंच यांच्या आयांनीं ती माझी प्रिया गुणवरा इच्यावर नसतेंच कांहीं तरी कुभांड रचलें असावें. ज्यांचीं पोरें अशीं दुष्ट झालीं आहेत, त्या स्वतः दुष्ट असतील किंवा काय याविषयीं संशयच घ्यायला नको. या शृंगभुजाची आई खरोखर निर्दोष असलीच पाहिजे. बस्स; या गोष्टीचा खुलासा झाला. आतां वेळ लावण्याचें कांहीं कारण नाहीं. आजच मला याचा निकाल केला पाहिजे.' असा विचार करून राजानें संध्याकाळ होईपर्यंत वाट पाहिली. व रात्रीं निर्वासभुजाची आई अयशोलेखा इची परीक्षा पाहण्याकरतां म्हणून तो तिच्या महालांत गेला. यजमानांची स्वारी आज आपल्या महालांत आली, हें पाहून अयशोलेखेला फार आनंद झाला. राजा वीरभुजाला खरें काय आहे तें काढून घ्यायचें होतें. म्हणून त्याणें त्यादिवशीं तिला खूप दारू पाजली. ती इतकी कीं; त्या दारूच्या कैफानें ती अगदीं बेहोष होऊन गेली. तिच्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी करतां करतां राजानें—"प्रिये, खरें सांग. ती गुणवरा खरोखरच का सुरक्षिताशीं लागू होती ? आतां हें समजून घेऊन कांहीं कर्तव्य नाहीं. कारण तिला भुयारांत घालून ठेवलें त्याला आज पुष्कळ दिवस झाले. ती तेथें सुकून मेलीच असेल; पण खरें काय आहे तें समजलें ह्मणजे समाधान होईल इतकेंच."

दारू ही एक प्रकारें उत्तम बुद्धी देणारी आहे असें ह्मटलें तरी चालेल. कारण तिच्या कैफांत असलेला मनुष्य अनेकप्रकारचे वेडेवेडे-चार करतो. व त्या दारवेनें त्याचें शरीरही खराब होतें, तरी तो खोटें बोलत नाहीं. जी गोष्ट त्या मनुष्यानें मुद्दाम लोकांला न कळण्याकरतां छपवून ठेवलेली असेल ती गोष्ट दारवेच्या कैफांत तो सहज बोलून जातो. राजानें **गुणवरे**विषयीं विचारिलें तेव्हां छाकटी झालेली ती **अयशोलेखा** त्याला ह्मणाली, "हां हां हां! मी काय अशी वेडी नाहीं. तुह्मी मला ख-खरें सांगायला ला-लावतां हें आतां मी समजलें. तुह्माला आपली ती राणी जारिणी नाहीं असें वाटत असेल आणि मीं तरी ती त-तशी आहे असें कधीं ह्मटलें. पण मीं जर तसें तुह्माला सांगितलें नसतें तर आपली स्वारी आज माझ्या महालांत क-कधीं आली असती काय? खरें सांगा, तुह्माला माझी शपथ आहे. तुमच्या गळ्याच्यान् हो मी कांहीं खोटें सांगत नाहीं. नाहींच. मी ह्मणतें तें खोटें कीं खरें तें पहा!

छाकटी झालेली **अयशोलेखा** पुष्कळ वेळ अशीच बडबडत होती; पण राजाला त्याच्याशीं कांहीं प्रयोजन नव्हतें. त्याला मुख्यत्वें ज्या गोष्टीचा खुलासा पाहिजे होता तो आपोआप झाला. तेव्हा **गुणवरा** व्यभिचारिणी नाहीं अशी त्याच्या मनाची पूर्ण खातरी झाली. बाकीच्या स्त्रियांनीं विनाकारण तिच्यावर आग पाखडली याविषयीं त्याला अति-शय राग आला. तो तत्काल त्या कैफी झालेल्या बायकोला तशीच टाकून आपल्या स्वतःच्या महालांत गेला. अपरात्र झाली होती, तरी त्याणें महालांतल्या नोकरांला असा हुकुम केला कीं; "राणी **गुण-वरे**ला भुयारांतून काढून न्हाऊधुवूं घालून, वस्त्रें व अलंकार देऊन, माझ्याजवळ लवकर घेऊन या. ज्या भविष्यवाद्यानें माझ्यावर अरिष्ट येईल ह्मणून तिला भुयारांत कांहीं दिवस ठेवावें असें सांगितलें होतें त्याणेंच ही मर्यादा केली आहे. आज **सूर्योदय** होण्यापूर्वीं तिला अवश्यमेव वर काढावी असें त्याणें सांगितलें आहे."

याप्रमाणें राजाचा हुकुम होतांच चाकरांनीं आपल्याकडून होईल तितकी जलदी करून **गुणवरे**ला स्नान घालून वस्त्रालंकारादिकांनीं भूषित करून राजाजवळ आणिलें. त्या साध्वीला पाहतांच त्याला जो कांहीं आनंद झाला तो सांगतां पुरवत नाहीं. त्याणें तिला आपल्या गळ्याशीं धरून इतके दिवस झालेल्या विरहाचा ताप शांत केला. रात्रीचा जो भाग अवशेष राहिला होता तो त्या उभयतांनीं एकमेकांला घट्ट आलिंगन देऊन मोठ्या आनंदांत घालविला. राजानें **गुणवरे**चा पुत्र **शृंगभुज** याचा सर्व वृत्तांत तिला सांगितला. इकडे ती दुष्ट **अयशोलेखा** कांहीं वेळानें शुद्धीवर आली. कैफ उतरला तेव्हां सावध होऊन पलंगावर पाहते तों राजा नाहीं. तेव्हां तिला चटका लागला. आपण जें कपट केलें होतें तें आपल्याकडूनच फुटलें असेंही तिला वाटलें. म्हणून ती अतिशय दुःखित झाली, व आतां पुढें आपली गत कशी होईल याची तिला मोठी काळजी पडली.

ती रात्र निघून गेल्यावर प्रातःकाळीं राजा **वीरभुजानें रूपशिखे**-सहवर्त्तमान **शृंगभुजा**ला आपल्या महालांत बोलावून आणलें. त्या मायलेंकरांला परस्परांची भेट किती आनंदकारक वाटली असेल! **शृंगभुजानें** भुयारांतून निघालेल्या आईच्या पायांवर मस्तक ठेवलें. **रूपशिखे**लाही हर्ष झाला. ती तर मोठी चतुरच होती. तिणें **गुणवरे**ला कधीं पाहिलें नव्हतें. तरी हीच आपली मुख्य सासू असें समजून ती राणीच्या पायां पडली. सुनेसहवर्तमान पुत्राला मांडीवर घेऊन उभयतांलाही कुरवाळून **गुणवरे**ला जें सुख झालें तें शब्दांनीं व्यक्त करतां येत नाहीं. फार दिवस निराश होऊन भुयारांत पडलेल्या तिला पतीची भेट झाली, हा प्रथम आनंदाचा प्रसंग. त्यांतच पुत्राचा पराक्रम ऐकून हर्ष झालेला असून लगेच **रूपशिखे**सारख्या सुनेसहवर्तमान त्याला पाहायला मिळालें, यामुळें दुहेरी तिहेरी आनंद झाला. राजा **वीरभुजानें**—"मुला, आपल्या आईला तुझा वृत्तांत विस्तारपूर्वक

सांग." अशी आज्ञा केल्यावरून शृंगभुजानें रूपशिखेचीं कृत्यें मुळापासून आईला सांगितलीं. तीं ऐकून गुणवरा खुष होऊन म्हणाली, "बाळा, ह्या रूपशिखेनें तुझ्याबद्दल काय काय केलें नाहीं? सर्व कांहीं केलें. प्राणासारखे आपले प्रिय मातापितर, आपला देश, घरदार, या सर्वांचा त्याग केला यावरून या विचित्र चरित्राच्या स्त्रीनें तुला सर्व त्रैलोक्य दिलें, असें म्हटलें तरी चालेल. मला वाटतें कीं, ही मनुष्य तर नाहींच; पण राक्षसीही नव्हे. तुझें हित करण्याकरितां दैवानें ही कोणी तरी देवता अवतार धारण करवून पाठविली आहे. हिणें आपल्या कृत्यानें सर्व पतिव्रतास्त्रियांच्या मस्तकांवर पाय ठेवला असें ह्मटलें पाहिजे."

याप्रमाणें राणीनें रूपशिखेची तारीफ केली व राजानेंही तसेंच तिचें वर्णन केलें. रूपशिखा विनयानें नम्र होत्साती सासूसासरे काय बोलतात, तें ऐकत उभी राहिली होती. इतक्यांत जनानखान्यावरचा मुख्य अधिकारी सुरक्षित, ज्याच्यावर अयशोलेखेनें उगीच आरोप आणिला होता, तो राजाच्या हुकुमाप्रमाणें सर्व तीर्थाटन करून परत आला. जरी तो जनानखान्यावरचा मुख्य अधिकारी होता तरी राजाची इतराजी होऊन त्याणें त्याला घालविलें होतें, ह्मणून एकदम त्याला आंत जाण्याचें धैर्य झालें नाहीं. तो दरवाज्यांत येऊन उभा राहिला, तेव्हां चोपदारानें आंत खबर दिली. ती ऐकून राजाला फार आनंद झाला. त्याणें तत्काल त्याला आपल्या समोर आणून त्याचा बहुमान केला. व ज्या अधिकारावर तो पूर्वीं होता त्यावरच त्याची नेमणूक केली. याप्रमाणें ज्या दोघां निरपराधी मनुष्यांवर राजानें वांकडी दृष्टी केली होती, त्यांच्याबद्दल पूर्ण खात्री होऊन त्याचें मन शुद्ध झालें. आतां ज्यांणीं राजाचें मन दूषित केलें होतें, त्यांला त्यांच्या कर्मांचें प्रायश्चित्त द्यायचें बाकी राहीलें होतें. ह्मणून राजानें अयशोलेखा इत्यादि बाकीच्या सर्व स्त्रियांला तेथें बोलावून

आणलें. ज्या मनुष्याच्या हातून वाईट कर्म घडलें असेल, तो आपणच आपल्या ठिकाणीं लज्जित होतो. आपल्या दुष्कृत्यानें निस्तेज झालेल्या त्या स्त्रियांला पाहून राजाला फार राग आला. त्याणें त्याच **सुरक्षिताला** सांगितलें कीं; "अरे **सुरक्षिता**, या स्त्रिया फार दुष्ट आहेत तर यांना आतांच्या आतां, ज्याठिकाणीं **गुणवरा** राहिली होती, त्याच भुयारांत नेऊन घाल." राजाचा हा हुकूम ऐकून त्या सर्वेही स्त्रिया थरथर कांपूं लागल्या. **अयशोलेखा** तर फारच भ्याली. त्यांची ती अवस्था पाहून **गुणवरेला** फार दया आली. ती राजाच्या पायांवर डोकें ठेवून ह्मणाली, "महाराज, क्षमा करा. यांला आपण अशी शिक्षा करूं नका. त्यांच्याकरितां मी पाहिजे तर त्या भुयारांत पुन्हां जातें. पण यांला नका तेथें पाठवूं. यांची ही भयभीत मुद्रा माझ्यानें पाहवत नाहीं."

याप्रमाणें त्या साध्वीनें प्रत्यक्ष आपल्या दावेदारिणींबद्दल राजाजवळ रद्‌बदली करून, त्यांच्यावरची शिक्षा चुकविली. वस्तुतः त्या तिच्या दावेदारिणी होत्या. त्यांणींच तिला इतके दिवस दुःख भोगावयास लावलें. मायलेकरांची व स्त्रिपुरुषांची ताडातोड केली. तेव्हां अशांवर दयाकरणें हें केवढें मोठें औदार्य! पण थोर मनाच्या मनुष्यांना आपल्या शत्रूवर दया करण्यास जितकी उमेद वाटते तितकी मित्रांवर देखील नाहीं. असो.

याप्रमाणें आपल्या कर्मानें लज्जित झालेल्या त्या स्त्रियांला राजानें आपापल्या घरीं जाण्याविषयीं आज्ञा दिली. त्यांला, जीवंत राहण्यापेक्षां मरण आलें असतें तर बरें होतें असें वाटलें. **गुणवरेचें** विलक्षण औदार्य पाहून राजाची तिच्यावर फारच मर्जी बसली. व अशी उत्तम स्त्री आपल्याला देवानें दिली आहे याबद्दल ईश्वराचे आभार मानून आपण मोठा भाग्यवान् आहे असें तो समजूं लागला. राजाच्या मनांतला राग अद्याप शांत झाला नव्हता. **गुणवरेच्या** आग्रहास्तव

त्या दुष्ट स्त्रियांला त्याणें माफी दिली, तरी त्यांच्या पोरांला चांगली शिक्षा द्यावी असें त्याच्या मनांत होतें. उघड रीतीनें त्यांला दंड केला तर **गुणवरा** किंवा **शृंगभुज** हे त्याच्या आड येतील ह्मणून युक्तीनें त्यांना दूर घालवून देण्याची त्यानें योजना केली. तो त्या सर्वांला जमवून वळेंच ह्मणाला, " दुष्ट हो, चांडाळानो, तुह्मी सर्वांनीं मिळून पैशाच्या लोभानें एका वाण्याला ठार केल्याचें वर्तमान मला समजलें आहे. तो बिचारा विदेशी असल्यामुळें त्याला आपला बचाव करतां आला नाही. हें जें तुह्मी घोर पाप केलें आहे त्याचा परिहार करण्याकरितां तुह्मी सर्वांनीं आतांच्या आतां तीर्थयात्रेला जावें. त्यावांचून तुमच्या पापाचा परिहार व्हायचा नाहीं. " हें ऐकून दुःखित झालेल्या त्या पुत्रांनीं अनेकप्रकारें राजाची प्रार्थना केली, तरी त्याचें मन वळविण्यास ते समर्थ झाले नाहींत. उघडच आहे, प्रभूनें एखाद्या कामीं हट्ट धरला तर तेथें कोणाचें काय चालणार आहे? राजाच्या आज्ञेप्रमाणें त्यांला निघावेंच लागलें. ते रडत होत्साते, केलेल्या कर्माचा पश्चात्ताप करीत तीर्थयात्रेला निघाले. त्यांला पाहून दयेनें ज्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले आहेत; असा **शृंगभुज** काकुळती येऊन राजाला ह्मणाला, " ताता, मी आजपर्यंत आपल्याजवळ कधीं कांहीं मागितलें नाहीं. तेव्हां आपण मला एक गोष्ट द्याल कीं नाहीं?" बापानें 'हो हो, खुशाल देईन.' असें सांगितलें. तेव्हां तो ह्मणाला, "जर आपण देत असाल तर या माझ्या बंधूंच्या अपराधाची क्षमा करून यांच्यावर दया करा. यावांचून मला दुसरें कांहींच नको." असें बोलून त्याणें बापाचे पाय घट्ट धरले.

ही त्या मुलाची विनंती ऐकून राजाचें अंतःकरण सद्गदित झालें. तो मनांत म्हणाला, 'भूधराचा (पर्वताचा) भार सहन करणारा यशो-दयाश्रित ( यश आणि दया यांणीं आश्रित अथवा **यशोदा** नामक **नंदाच्या स्त्रीनें** आश्रित ) असा बाळपणांतच हा मोठा गुणवान् **हरीचा**

अवतार आहे कीं काय असें त्याला वाटलें. राजाला त्या पोरांचा फारच राग आला होता; पण शृंगभुजाचें मागणें त्याच्यानें मोडवेनासें झालें. तरी आपल्या गंभीर मनांत तें वैर ठेवून राजानें त्यावेळीं त्यांला माफी दिली. त्या सर्व बंधूंलाही असें वाटलें कीं; शृंगभुजानेंच यावेळीं आपले प्राण वांचविले. नंतर त्यांणीं त्याची क्षमा मागून आपापल्या घरची वाट धरिली. शृंगभुजाचा हा गुणातिशय अवलोकन करून लहान मोठे सारे कामदार व प्रजा यांचें मन त्याच्याकडे लागलें. हाच आपला राजा असावा अशी सर्वांनीं इच्छा प्रगट केली. राजाच्या मनांत तसें करायचेंच होतें. त्यांतून प्रजेची संमति मिळाल्यावरून त्याणें मोठा समारंभ करून शृंगभुजाला यौवराज्याचा अभिषेक केला. वस्तुतः तो अधिकार निर्वासभुजाला प्राप्त व्हायचा होता. कारण तो वयानें सर्वांत वडील होता. शृंगभुज सर्वांत लहान असल्यावरून त्याला राज्य मिळण्याचा तर अगदींच असंभव; तथापि गुणांनीं ज्येष्ठ असल्यावरून राजानें त्यालाच युवराज केलें.

अभिषेक होतांच दिग्विजयाला जाण्याविषयीं त्याणें बापाजवळ परवानगी मागितली. व त्याणेंही मोठ्या संतोषानें ती त्याला दिली. तेव्हां चतुरंग सैन्य बरोबर घेऊन शृंगभुज दिग्विजयाला निघाला. बाहुवीर्याच्या प्रभावानें सर्व पृथ्वीवरील राजे जिंकून, दशदिशांवर आपली कीर्ती स्थीर करून, अपरंपार लक्ष्मीला बरोबर घेऊन तो परत आपल्या राजधानीला प्राप्त झाला. त्याचा पराक्रम वगैरे पाहून त्याचे ते दुष्ट बंधु आपोआप नम्र झाले. मनांतून त्यांला फार वाईट वाटत होतें; तरी निरुपायास्तव त्यांला त्याची ताबेदारी पत्करावी लागली. शृंगभुजानें त्या सर्व बंधूंला आपल्या हाताखालीं सरदारीच्या जागा दिल्या. पुत्राचे शौर्यादि गुण पाहून राजा वीरभुज हळूहळू सर्व राज्यभार त्याच्यावर ठेवून निश्चिंत झाला. तो मातापितरांला आनंद देत होत्साता गोरगरीबांला सुखी करून सर्वांच्या हिताविषयीं झटत होता. व प्रत्यक्ष

**अर्थसिद्धीच** कीं काय, अशी प्रियपत्नी **रूपशिखा** हिच्यासहवर्तमान **शृंगभुज** बहुत दिवस सुखाचा उपभोग करिता झाला."

अशी कथा सांगून **हरिशिख** ह्मणाला, "**गुणवरा** आणि **रूपशिखा** या सास्वासुनांप्रमाणें साध्वी स्त्रिया अनन्यभावानें सर्वप्रकारें पतीचीच उपासना करतात. व कित्येक **अयशोलेखे**प्रमाणें दुष्टही असतात. तथापि सर्वच स्त्रिया वाईट असें ह्मणतां येत नाहीं." **हरिशिखा**च्या मुखानें ही कथा ऐकून **नरवाहनदत्त** व **रत्नप्रभा** यांणीं "वाहवा! शाबास! फार चांगली कथा सांगितलीस!" अशी त्याची स्तुती करून संतोष प्रदर्शित केला. नंतर **नरवाहनदत्त** तेथून उठून आन्हिक आटपून **रत्नप्रभे**सह बापाकडे गेला. तेथें त्याच्या पंक्तीला भोजन उरकलें. व मग कांहीं वेळ त्याच्या सेवेंत राहून परत आपल्या महालांत गेला. तेथें गाणें बजावणें थट्टा विनोद याखालीं ती रात्र त्याणें आनंदांत घालविली.

**मदनमंचुका** ही **नरवाहनदत्ता**ची पट्टराणी होती. व तिच्यावर त्याचें विशेष प्रेमही होतें. तरी **रत्नप्रभा** ही नवी बायको त्याला प्राप्त झाली होती ह्मणून तिच्या प्रीतीचा व विलासाचा बहार घेण्याकरितां त्याची स्वारी आतांशा तिच्याच महालांत सारा वेळ घालवीत होती. वर सांगितल्याप्रमाणें ती रात्र निघून गेली. प्रातःकाळ होतांच मुखमार्जनादि कृत्य आटपलें. इतक्यांत **नरवाहनदत्ता**ला भेटण्याकरितां **रत्नप्रभे**च्या महालांत **गोमुखा**दि त्याचे सर्व प्रधान आले. **मरुभूती** थोडासा मागाहून आला. तो गेल्या रात्रीं फार चैनींत होता. **मद्य** थोडें अधिक प्राशन केल्यामुळें अद्यापि तो त्याच्याच गुंगींत होता. त्याणें रात्रीं विलासाच्या वेळीं गळ्यांत हार घातले होते व अंगाला जी चंदनाची उटी लावली होती तीही अद्याप तशीच त्याच्या अंगावर होती. येत असतां वाटेंत त्याचे पाय अडखळत होते. व तोंडानें थट्टेचीं भाषणें बोलून तो सर्वांला हंसवीत होता. तेव्हां **नरवाहनदत्ता**चा जिवलग मित्र **गोमुख** विनोदानें त्याला ह्मणाला, "वाहवा! तूं

**यौगंधरायणाचा** मुलगा असून तुला सभ्यपणानें कसें वागावें हें समजत नाहीं का? ऐन कामाकाजाच्या वेळीं, ह्मणजे पहाटे मद्य पितोस आणि उन्मत्त होऊन यजमानाजवळ येतोस हें काय? तुझ्या बापाची योग्यता काय? त्याचें वर्तन कसें? आणि तुझें कसें? याचा कांहीं तरी विचार करतो आहेस का?"

**गोमुखानें** थट्टेनें भाषण केलें; पण **मरुभूतीला** तें सहन झालें नाहीं. तो आधींच छाकटा झाला होता त्यांत रागानें लाल होऊन **गोमुखाला** ह्मणाला, "बस, बस; पुरे कर. मला या यजमानांनीं पाहिजे तर विचारावें किंवा माझ्या बापानें मला काय तें सांगावें. **इत्यक** चोपदाराच्या पोरा, तूं रे मला कोण शिकवणार? आपला अधिकार काय? आपण बोलतों काय? याची तुला लाज वाटावी कीं नाहीं?" **मरुभूतीनें** रागावून असें ह्मटलें; तरी **गोमुखानें** त्याचा विषाद मानला नाहीं. तो हंसत हंसत पुन्हां ह्मणाला, "माझा कांहीं तुला बोलण्याचा अधिकार नाहीं हें खरें आहे; तथापि धनी अविनीत मनुष्याला आपल्या तोंडानें कधीं दूषण देत नाहींत. त्यांच्याजवळ आमच्या सारखे जे कोणी असतील त्यांणींच अवश्यमेव त्यावेळीं बोललें पाहिजे. मी **इत्यक** चोपदाराचा मुलगा आहें हें तर खरेंच व मला त्याचें भूषण आहे; पण तूं तर मंत्रिवृषभ[१] (बैल) आहेसना? तसा तूं आहेस हे तुझें जाड्यच सांगत आहे. कमी काय तें येवढेंच कीं, तुला दोन शिंगें नाहींत!"

हें ऐकून **मरुभूति** फारच संतापला. रागानें त्याच्या तोंडावाटे शब्दांचा स्पष्ट उच्चार होईनासा झाला. तो ह्मणाला, "गाढवा, मूर्खा! तूंच बैल. गोमुखालाच (बैल तोंड्याला) बैलपण असणें योग्य आहे.

---

१—या शब्दांत श्लेष आहे. 'वृषभ' हा शब्द श्रेष्ठत्व दाखवयाचें असलें म्हणजे योजतात. जसें—'राजवृषभ' 'मंत्रिवृषभ' इत्यादि शब्दांत 'राजांत व मंत्र्यांत श्रेष्ठ' असा अर्थ असतो. दुसऱ्या पक्षीं 'वृषभ' ह्मणजे बैल असेंही होतें. गोमुखानें 'मंत्रिवृषभ' ह्मणजे 'प्रधानबैल' अशाच अर्थी या शब्दाचा येथें उपयोग केला आहे.

असें असून तूं अद्याप अदांत ( खच्ची न केलेला ) आहेस हा तुझ्या जातिसंकराचा गुण झटला पाहिजे." प्रधानमंडळीचा हा विचित्र संवाद ऐकून सर्व लोक हंसूं लागले. तेव्हां **गोमुख** पुन्हां ह्मणाला, "महाराज, खरें सांगतों; हा **मरुभूति** ह्मणजे सामान्य नव्हे. हें एक रत्न आहे. शेंकडों यत्न केले तरी ज्याला वेज पाडतां यायचें नाहीं, असें हें वज्र ( पाच ) आहे. तेव्हां याच्यांत गुणाचा ( दोरा अथवा गुण ) प्रवेश कोण करवील? ज्याला सहज वेज पाडतां येतें तें पुरुषरत्न निराळ्या प्रकारचें असतें. याविषयीं वाळवेच्या पुलाचा वृत्तांत मला आठवला तो मी उदारणार्थ येथें सांगतों:—

**प्रतिष्ठान** नगरांत पूर्वीं **तपोदत्त** नांवाचा एक तरुण ब्राह्मण होता. त्याचा बाप चांगला विद्वान् होता. त्याणें लहानपणापासून मुलास विद्या शिकविण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केला; पण त्या मंदाला कांहींच आलें नाहीं. प्रौढ झाल्यावर त्या अक्षरशत्रूची जिकडे तिकडे लोक टवाळी करूं लागले. लोकांनीं अतिशय निंदा आरंभिली तेव्हां **तपोदत्ताला** मोठा पश्चात्ताप झाला. काय होईल तें होवो, पण आपण विद्या संपादन केल्यावांचून राहायचें नाहीं, असा निश्चय करून तो तप करण्याकरितां **गंगेच्या** कांठीं गेला. तेथें त्याणें मोठें उग्र तप आरंभिलें. तो त्याचा प्रयत्न अगदीं व्यर्थ आहे, असें जाणून तपापासून त्याला निवृत्त करण्याकरितां ब्राह्मणाचें रूप धारण करून स्वतः **इंद्र** त्याच्याजवळ प्राप्त झाला. ज्या ठिकाणीं **तपोदत्त** तप करीत बसला होता, त्याच्याजवळच ब्राह्मण झालेल्या **इंद्रानें** एक चमत्कारिक उद्योग सुरू केला. कांठावरची रेती ओंजळीनें भरभरून तो एकसारखा **गंगेच्या** पाण्यांत टाकूं लागला. घटका, दोन घटका, चार घटका, ह्मणतां ह्मणतां पुष्कळ वेळ त्याचा तो एकसारखा उद्योग चालला होता. तो पाहून **तपोदत्ताला** मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें मौन घेतलें होतें; तरी बोलल्यावांचून राहवेनासें झाल्यावरून त्याला तें सोडावें लागलें. तो

त्या ब्राह्मणाला ह्मणाला, "ब्राह्मणा, एकसारखा तूं हा एक विलक्षण व्यापार कां करीत आहेस ! रेती पाण्यांत टाकतोस त्याचा उपयोग काय ?" तपोदत्तानें एक दोन वेळ असेंच विचारलें; तरी त्या ब्राह्मणानें तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. त्याणें एकसारखा आपला उद्योग चालविलाच होता. शेवटीं त्याणें फारच आग्रह केला तेव्हां तो ब्राह्मणरूप धारण करणारा इंद्र ह्मणाला, "तूं तर बुवा माझें कपाळच उठविलेंस. अरे, हें मी काय करतों हें तुला समजत नाहीं काय ? या वाटेनें लोकांला जाण्यायेण्याला फारच अडचण पडते. ही गंगा विशाळ रूप धारण करून मध्यें पडली आहे. ह्मणून माझ्या मनांत पक्का बांध बांधून लोकांना रस्ता खुला करून द्यायचा आहे !"

हें ऐकून तपोदत्त ह्मणाला, "गृहस्था, मूर्ख तर नाहींसना ? अरे, आपल्या लाटांनीं सहज होरल्या जाणाऱ्या वाळूला ही गंगा दाद देईल काय ? वाळूचा बांध घालणार ह्मणतोस ती गोष्ट कधीं तरी होणें शक्य आहे का ?" हें ऐकून तो ब्राह्मण हंसून ह्मणाला, "हासेच्या ! त्यांत काय मोठें आश्चर्य आहे ? तुझा आणि माझा प्रयत्न सारखाच आहे. माझ्यानें वाळवेचा बांध घालवला जाणार नाहीं असें जर तुला वाटत असेल तर, पाठ केल्यावांचून व गुरूची सेवा केल्यावांचून विद्या येणार नाहीं, हें तुला नाहीं का समजत ? व्रतांनीं आणि उपवासांनीं विद्या संपादन करण्याविषयीं तूं उद्युक्त झाला आहेस हा कोठला शहाणपणा ! ही तुझी इच्छा सशाला शिंगें येण्याची आशा करणें, आकाशांत चित्रांची कल्पना करणें, अथवा अक्षरावांचून पुस्तक लिहिण्याची इच्छा करणें, यांसारखी व्यर्थ आहे. रे वेड्या ! अध्ययन केल्यावांचून कधीं तरी विद्या प्राप्त होते का ? व्रतांनीं आणि उपोषणांनीं विद्या मिळेल तर गुरुगृहांत कष्ट भोगण्यास व अध्ययनाचे श्रम करण्यास कोणीही तयार होणार नाहीं, हा विचार तुझ्या मनांत कसा येत नाहीं ?"

ब्राह्मणाचें रूप धारण करणाऱ्या इंद्रानें असें समजावून सांगितलें तेव्हां **तपोदत्त** मनांत विचार करूं लागला. त्याला त्याचें बोलणें खरें वाटलें, आणि तत्काल तप करण्याचें सोडून तो त्याच्या देखत घराकडे निघून गेला." ही कथा सांगून **गोमुख** ह्मणाला, "शहाण्याला बोध करणें सुखाचें आहे. **तपोदत्ताला** इंद्रानें थोडेसें उदाहरण दाखवून सांगतांच त्यानें तत्काल त्याचें सांगणें मान्य केलें. पण एखाद्या दुर्बुद्धीशीं गांठ पडली तर हवें तितकें सांगितलें तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. तद्वत् हा **मरुभूति** दुर्मति असून दांडगा आहे. याला बोध करणें अशक्य आहे. 'असें नव्हे, असें' ह्मणून कोणी सांगायला गेलें तर याला राग येतो."

याप्रमाणें **गोमुखानें** **मरुभूतीची** खूपच टर उडविली. तो त्याच्यावर कांहीं बोलणार इतक्यांत **हरिशिखानें** मध्यें तोंड घातलें. तो **नरवाहनदत्ताला** ह्मणाला, "महाराज, **गोमुख** सांगतो तें खरें आहे. बुद्धिमान् असतात त्यांना बोध करणें खरोखरच सोपें आहे. याविषयीं मला एक इतिहास आठवला तो सांगतों. पूर्वी **वाराणसी** नगरींत कोणी एक श्रेष्ठ ब्राह्मण होता. त्याचें नांव **विरूपशर्मा**. नांवाप्रमाणेंच तो अगदीं विरूप असून अत्यंत दरिद्रीही होता. नुसती विद्या असली तरी तिला कोण विचारतो? तिच्या जोडीला दुसरे कांहीं गुण लागतात. इतर कोणतेही गुण नसले तरी चालेल; पण चार पैसे जवळ असले ह्मणजे तो मनुष्य कसलाही असला तरी त्याला प्रतिष्ठा मिळते! दरिद्री आणि कुरूप असा असल्यामुळें **विरूपशर्म्याला** जेथें तेथें अपमान व छळ यांवांचून दुसरें कांहींच मिळत नव्हतें. शेवटीं तो त्या स्थितीला अतिशय कंटाळला आणि निर्विण्ण होऊन तपोवनांत गेला. तेथें त्याणें उत्तम रूप व विपुल द्रव्य मिळण्याकारितां कडक तपश्चर्या आरंभिली. पण त्याचा तो प्रयत्न व्यर्थ होता. बिचारा उगीच कष्ट भोगीत आहे, असें पाहून इंद्राला त्याची दया आली.

आणि युक्तीनें त्याची समजूत करावी ह्मणून त्याणें, अत्यंत रोगी व गलितकुष्ट झालेल्या कोळ्याचें रूप धारण केलें. तशा रूपानें इंद्र त्याच्याजवळ येऊन बसला. तेव्हां, हजारों माशा ज्याच्या अंगावर घोंघावताहेत, सर्वांगाला क्षतें पडलीं आहेत, शक्ति कसली ती मुळींच नाहीं, अशा त्या कोळ्याला पाहून **विरूपशर्मा** हळूच मनांत ह्मणाला, "अरेरे!! एकून पूर्वकर्मानें या संसारांत अशाप्रकारचे देखील दुःखी प्राणी आहेत. ह्या कोळ्याचें दुःख पाहून मला फार वाईट वाटतें. माझें दुःख याच्या दुःखापुढें कांहींच नाहीं. दैवानें मला याच्यासारखा केला नाहीं हे त्याचे मोठे उपकार आहेत. व याबद्दल त्याचे आभार मानले पाहिजेत. जर मी असा गलितकुष्ठी झालों असतों तर काय केलें असतें? तेव्हां एकंदरींत या प्राण्यापेक्षां मी पुष्कळ सुखी आहें. दैवानें ज्याला जी स्थिति दिली असेल तिला टाळण्याविषयीं कोण समर्थ होणार? तेव्हां आपण जो हा प्रयत्न आरंभला आहे तो दैवावर ताण करायचा असल्यामुळें कधींच सिद्ध व्हायचा नाहीं." याप्रमाणें विचार करतां करतां **विरूपशर्म्याला**—तप करणें हें व्यर्थ आहे; तपानें चांगलें रूप अथवा द्रव्य मिळतें ही गोष्ट खोटी आहे; असें समजून आलें व त्याणें तो प्रयत्न सोडून दिला. आणि परत आपल्या घरीं येऊन जी कांहीं ओली कोरडी भाकर मिळेल तीवर संतुष्ट राहून त्याणें आपलें आयुष्य सुखासमाधानांत घालविलें." हें उदाहरण सांगून **हरिशिख** ह्मणाला, "खरोखर सुजाण मनुष्याला ताळ्यावर आणण्यास फार वेळ लागत नाहीं; पण पुष्कळ प्रयत्न केला तरी अविचारी मनुष्याला बोध करतां येत नाहीं."

याप्रमाणें **हरिशिखानें** उदाहरण सांगून **गोमुखाचें** बोलणें दृढ केलें तेव्हां रत **मरुभूति** फारच चवताळला. अमलांत गुंग असलेल्या त्याणें शेवटीं लठ्ठालठ्ठीवर प्रसंग आणला. तो ह्मणाला, "अरे ये, चोपदाराच्या कारव्या, तुझें बळ काय तें जिभेंतच आहे. तुझ्यासारख्या

वाचाळाशीं फार बोलण्यांत काय अर्थ आहे? कांहीं असलें सामर्थ्य तर ये असा पुढें पाहूं. मग दाखवतों तुला काय तें. तुझ्यासारख्या हलकट मनुष्याशीं कलह करीत बसणें हें माझ्यासारख्या बाहुशाली पुरुषाला फार लाजिरवाणें आहे." असें बोलून **मरुभूति** लढाईला तयार झाला. त्याची ती तयारी पाहून आतां हें प्रकरण विकोपाला जातें असें वाटल्यावरून **नरवाहनदत्तानें** मध्यें पडून सर्वांचें समाधान केलें. तो **मरुभूती**ला ह्मणाला, "गड्या, तूं यावेळीं फार श्रमला आहेस. घरीं जाऊन विश्रांति घे ह्मणजे तुला बरें वाटेल." असें सांगून त्याणें त्याला घरीं पाठविलें. व बाकीच्यांसही त्यावेळीं आपापल्या घरीं जाण्यास निरोप दिला. नंतर तो दिवस **रत्नप्रभेशीं** विनोद व क्रीडा करण्यांत घालवून मनाची करमणूक केली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सर्व मंडळी पुन्हां त्याच्या भेटीला आली. आदल्या दिवशीं आपल्या हातून जें अयोग्य वर्तन झालें; त्याबद्दल **मरुभूती**ला फार लाज वाटत होती. तो युवराजाजवळ आला तरी मुकाट्यानें खालीं मान घालून बसला होता. तें पाहून **नरवाहनदत्ता**ची प्रिया पतीला उद्देशून ह्मणाली, "आर्यपुत्र, आपण धन्य आहां. खरोखरच सुदैवानेंच—लहानपणच्या स्नेहरूपी बेडीनें बद्ध झालेले व ज्यांचीं मनें पवित्र आहेत असे—हे बुद्धिशाली आपल्याला प्राप्त झाले आहेत. आपल्याप्रमाणेंच हे सचिवही धन्य आहेत—ज्यांला तुमच्यासारखा स्नेहाळू यजमान मिळाला आहे. तुह्मा उभयतांचा सेव्यसेवकभाव पूर्वकर्मानेंच जडलेला आहे यांत कांहीं संशय नाहीं." याप्रमाणें राणीनें सर्वांची प्रशंसा केली. ती ऐकून **नरवाहनदत्ता**चा खुषमस्कऱ्या **वसंतका**चा पुत्र **तपंतक** ह्मणाला, "खरोखर, हे आमचे यजमान साहेब पूर्वजन्मार्जितच आहेत. प्रत्येक मनुष्याला जें कांहीं प्राप्त होतें तें पूर्वकर्मांनींच होत असतें. याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐकावी.

**श्रीकंठ** देशांत **विलासपुर** नामक शहर आहे. तेथें **विनयशील**

नांवाचा राजा होता. त्याचें तें नांव यथार्थ होतें. त्याचा स्वभाव फारच नम्र होता. त्याची **कमलप्रभा** नांवाची राणी असून ती त्याला प्राणांसारखी प्रिय होती. केवळ विषयोपभोगांतच आसक्त झालेला राजा तिच्यासह चैन उडवीत होता. ऐहिक सुख क्षणभंगुर असायचेंच. राजानें इतके दिवस मजा मारली त्यांत त्याचें रूप, गुण, भाग्य वगैरे सर्व त्याला अनुकूळ होतें. पण पुढें—'बहुत दिवस विषयांचा उपभोग घेतलास; आतां पुरे कर' ह्मणून सांगण्याकरितांच कीं काय, जरा त्याच्या कानांला लागली. हळूहळू राजाचे केश पांढरे होऊं लागले. गालांवर बारीक बारीक सुरकुत्याही पडूं लागल्या व एकंदरींत त्याचें सौंदर्य नष्ट होत चाललें. तें पाहून तो विषयी राजा फार दुःखित झाला. 'बर्फानें निस्तेज झालेल्या कमलासारखें आपलें तोंड आतां राणीला कसें पाहवेल! यापेक्षां मला मरण आलें असतें तर बरें,' असें त्याला वाटूं लागलें. श्रीमंत लोक भाग्याच्या जोरावर ईश्वरी नियमाचें अतिक्रमण करण्याविषयीं कधींकधीं प्रयत्न करीत असतात. व ह्मातार्‍या मनुष्याला आपण तरुण स्त्रियांच्या डोळ्यांत भरण्यासारखें दिसावें असें वाटून तो अनेक वेडेचार करीत असतो.

राजा **विनयशीलानें**, प्रयत्नांनीं आपले दोष नाहींसे करावे असा इरादा केला. या कामीं वैद्याकडूनच त्याला सहाय मिळण्यासारखें होतें. **तरुणचंद्र** नांवाचा एक वैद्य त्याच्या आश्रयास होता. त्याला बोलावून त्याचा विशेष आदरसत्कार करून राजा **विनयशील** त्याला ह्मणाला, "वैद्यबुवा, तुमची आमच्यावर फार निष्ठा आहे आणि तुह्मी आपल्या विद्येंतही फार हुषार आहां ह्मणून विचारतों. बरें खरेंच सांगा, ही माझी जरा घालविण्यासारखी तुमच्याजवळ कांहीं युक्ति आहे कीं नाहीं?" राजेलोकांजवळ नेहमीं असणारे लोक बहुतकरून मोठे धूर्त असतात. **विनयशीलराजाचा** प्रश्न ऐकून तो **तरुणचंद्र** (प्रतिपदेचा, अर्थात् वांकड्या कोरेचा चंद्र)—आपण राजाश्रयानें

थोडाबहुत अधिकारी आहेंच तरी पूर्ण अधिकारी व्हावें अशी इच्छा करून—मनांत ह्मणाला, ‘हे राजश्री तर मूर्खांचे बाप आहेत. आणि यांना लुटायची ही चांगली संधी आली आहे. आपण हळू हळू याला खूप लुटावें’ असा विचार करून तरुणचंद्र राजाला ह्मणाला, “महाराज, उपाय नसेल कां? शास्त्रकारांनीं प्रत्येक गोष्टीला उपाय सांगून ठेविले आहेत. ते योग्य रीतीनें केले मात्र पाहिजेत. आपल्या या रोगाविषयीं एकच उत्तम उपाय आहे. आणि त्याणें हटकून कार्य झाल्याशिवाय राहायचें नाहीं; पण तो अंमळ कठीण आहे. आठ महिने पर्यंत आपल्याला एकव्यानें भुयारांत राहून एका औषधाचें सेवन केलें पाहिजे. असें होईल तर मी खात्रीपूर्वक आपली जरा नाहींशी करीन!”

बिचारा वैद्य ईश्वरी नियम खोटे करण्यास काय समर्थ होणार? पण ह्या गोष्टी केवळ वेडे झालेल्या लोकांच्या लक्ष्यांत कोठून येणार? वैद्यानें उपाय सांगितला तो ऐकून, तरणा बांड होऊं इच्छिणारा तो राजा भुयारांत राहण्यास तयार झाला! तत्काल त्याणें कारागिरांला सांगून एक मोठें भुयार तयार करावयास लावलें; आणि वैद्याच्या सांगण्याप्रमाणें तो, जीवंतपणीं नरकयातना भोगण्या करितांच कीं काय, तेथें प्रविष्ट झाला! मूर्ख असून विषयलोभी असलेल्या मनुष्याला विचार मुळींच सुचत नाहीं. प्रधानांनीं त्याला पुष्कळ समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. “महाराज, पुराणांतरीं अशाप्रकारच्या गोष्टी ऐकूं येतात, पण तपाच्या आणि सत्वाच्या प्रभावानें अनेक सिद्धी ज्यांला प्राप्त झालेल्या आहेत अशा पुरुषांनीं कुरुपांचे सुरूप व वृद्धांचे तरुण बनविले आहेत. कोणीं कोणीं तशीं दिव्य रसायनेंही तयार केलीं आहेत; पण त्या साऱ्या गोष्टी पुराणांतल्या आहेत. युगाच्या सामर्थ्यानें तशाप्रकारचे चमत्कार केव्हां केव्हां घडत असतात. पण ह्या काळांत आणि या वैद्याच्या हातून तसें होईल असें मुळींच वाटत नाहीं. याकरितां आपण भुयारांत जाऊन बसणें हें आह्मास अगदीं योग्य

वाटत नाहीं. धूर्त लोक भोळ्या मनुष्यांला फसवून खुशाल मौज मारतात. महाराज, आपल्याला काय भ्रांति झाली आहे कीं, आहे तरी काय? एकवेळ गेलेलें वय कधीं तरी पुन्हां येतें काय?"

बिच्याऱ्या मंत्र्यांनीं अशाप्रकारच्या समजुतीच्या गोष्टी सांगून पुष्कळ प्रयत्न केले; पण त्यांचें ऐकतो कोण? विषयोपभोगाच्या गाढ इच्छेनें वेढलेल्या त्याच्या हृदयांत प्रधानांच्या उपदेशाला शिरण्यास वाटच मिळाली नाहीं. असो. तो वेडा राजा बरोबरचा परिवार वगैरे सोडून एकटा त्या भुयारांत राहूं लागला. वैद्य व त्याचा एक नोकर या दोघांला मात्र भुयारांत जाण्याची मोकळीक होती. ते रोज रोज आंत जाऊन औषधोपचार करीत असत. राजाला योग्य असे नोकर चाकर वगैरे सर्व कांहीं होतें; पण त्याचें कपाळ फुटकें म्हणूनच कीं काय? त्याणें त्या सर्वांचा त्याग केला. पुढें आपण तरणा बांड होऊन बायकांची विषयवासना तृप्त करणार अशी खोटी आशा धरून तो—जणूं काय आपल्या हृदयांतून बाहेर पसरलेला मूर्खपणाच, अशा त्या काळोखांत खुशाल राहूं लागला!

वैद्याचें सांगणें व त्याप्रमाणें राजाचें आचरण या संबंधानें गावांत लोक अनेकप्रकारच्या चर्चा करूं लागले. कोणी राजाला मूर्ख ह्मणत, कोणी शहाणा म्हणत, कोणी वैद्याला लबाड म्हणत, कोणी त्याला **धन्वंतरी** म्हणत. तात्पर्य जसें ज्याला वाटेल तसें तो बोलूं लागला. हां हां म्हणतां सुमारें सहा महिने गेले. दिवसेंदिवस राजा अधिकाधिक क्षीण दिसूं लागला. त्याच्या अंगावरचा केसानकेंस पांढरा सफेत झाला. पिकत घातलेल्या फळासारखा तो नखशिखांत पिकून तयार झाला. आपला प्रयत्न उलट झाला हें अवलोकन करून तो शठ वैद्य त्याच्याचसारखा एक परदेशी पुरुष पाहून त्याला घेऊन आला. त्याणें त्याला आपल्या घरीं नेऊन चांगला पढवून तयार केला. 'तुला मी राजा करतों माझें मात्र नेहमीं ऐकत जा' असें त्याला सांगितलें व त्याणेंही तें कबूल केलें.

तो याच्याहीपेक्षां वस्ताद होता. 'एकदां आपण राजा झालों ह्मणजे झालें. याच्या हुकमांत वागायचें तें पुढें पाहून घेतां येईल,' असा विचार करून त्याणें तरुणचंद्रानें सांगितल्याप्रमाणें सर्व गोष्टी कबूल केल्या. तो मनुष्य तरणाताठा असून चांगला भव्य होता. राजासनावर बसला तर शोभेल असा दिसल्यावरून तरुणचंद्रानें त्याचीच योजना केली. नंतर आपला हेतू सिद्ध करण्याकरतां त्या वैद्यानें त्या भुयाराला सुरुंगाच्या द्वारानें दुसरी एक वाट तयार केली. कारण ज्या वाटेनें तो नित्य जात येत असे तेथें खडापाहरा होता. पाहरेवाल्यांला चुकवून, राजा करण्याकरतां जो नवा उमेदवार तयार केला होता त्याला आंत नेण्याची सवड नव्हती, ह्मणून त्याणें ही युक्ति योजली. आठ महिने पुरे होण्याची संधी जवळ आली. भुयारांत बसलेला वेडा राजा तर, आपण तरणाबांड होऊन कधीं बाहेर निघेन याविषयीं दिवस मोजीत होता. राजा तरणा व्हायचा नाहीं हें तर वैद्याला माहितच होतें तरी आपण सांगितल्याप्रमाणें गुण न आला तर राजा काय करील कोणास ठाऊक! शिवाय लोकांचा उपहास, हें एक निराळेंच. या सर्व अरिष्टांचा परिहार करण्याकारितां त्या वैद्यानें मोठी घातक युक्ति योजिली. राजासनाकरतां जो उमेद्वार त्याणें तयार केला होता, त्याला सुरुंगाच्या द्वारानें भुयारांत पाठविलें व त्याच्याकडून, तेथें आपल्या मूर्खपणाचें फळ भोगीत पडलेल्या दुर्दैवी **विनयशील** राजाला ठार मारवून तें प्रेत सुरुंगाच्या द्वारानें गुप्तपणें बाहेर आणवून कोणाला नकळत एका खोल विहिरींत टाकून दिलें. सूर्यानें आपल्या पापाची साक्ष न द्यावी ह्मणूनच कीं काय हें दुष्ट कृत्य त्यांणीं अंधाऱ्या रात्रीं केलें. नंतर त्या तरुण पुरुषाला सुरुंगाच्या वाटेनें आंत सोडून वैद्यानें सुरुंगाचें तोंड बुजवून टाकलें. मूढबुद्धि पुरुषांच्या वेडेपणानें यथेच्छ सवड मिळाल्यावर उच्छृंखल व हलकट मनुष्य कोणतें साहस करण्याला मागें सरणार आहे! असो.

याप्रमाणें कपटानें सर्व तयारी करून वैद्यानें एकेदिवशीं प्रधान व इतर बडे लोक यांची सभा जमविली. आणि मोठ्या फुशारकीनें आपल्या कर्तबगारीचें त्यांच्यापुढें वर्णन केलें. तो ह्मणाला, "तुह्मी सारे जण मला दोष देत होतां व महाराजांलाही वेडे म्हणत होतां. आमचा सर्व प्रयत्न व्यर्थ होणार असें तुह्मी भाकित केलें होतें; पण ईश्वरकृपेनें तुमचें सर्वांचें बोलणें खोटें झालें हें कळविण्यास मला फार आनंद वाटतो. मी आठ महिन्यांची मुदत केली होती. पण औषधाचा प्रभाव असा कांहीं चमत्कारिक झाला कीं; सहाच महिन्यांत काम झालें. आतां महाराज तरुण झाले आहेत कीं नाहीं तें प्रत्यक्ष पाहून घ्या. आणखी दोन महिन्यांनीं त्यांचें रूप कांहीं निराळ्याच प्रकारचें होणार आहे. याकरितां दूर उभे राहून तुह्मी आतां उगीच त्यांला पाहून घ्या." असें सांगून त्या सर्वांला त्याणें भुयाराच्या दाराजवळ बोलावून आणलें. व आपण आंत जाऊन राजा होणाऱ्या त्या पुरुषाला दारासमोर उभें राहण्यास सांगून वैद्य बाहेर आला. एकेकाचा हात धरून त्याला भुयाराच्या दारांत नेऊन उभें करावें आणि त्याचें नांवगांव हुद्दा वगैरे काय असेल तें सांगून त्याला एकीकडे सारून दुसऱ्याला पुढें आणावें. याप्रमाणें—"सरकार, हे आपले मुख्य प्रधान **बुद्धिशाली** हे आपले सेनापती **वीरबाहु** आपल्याला भेटायला आले आहेत. हे आपले खजानवीस **वसुदत्त**जी," असें करून त्याणें कामदार वगैरे सर्व प्रमुख मंडळी भुयारांत असलेल्या पुरुषाला दाखविली. कांहीं दिवस हा त्याचा नित्यक्रमच चालला होता. प्रतिदिवशीं थोड्या थोड्या लोकांना नेऊन तो दाखवीत असे. कारण, एकदम सर्व मंडळी नेली तर त्यांचीं नांवें कदाचित् त्याच्या ध्यानांत राहणार नाहींत, म्हणून त्याणें ही युक्ती केली. क्रमाक्रमानें अंतःपुरांतले नोकरचाकर इतर राण्या व पट्टराणी **कमलप्रभा** हिलादेखील नेऊन भेटविलें.

असें करण्यांत त्या वैद्याचा काय हेतू होता तो सहज लक्षांत

येणार आहे. कारण त्यानें ज्याला राजा करण्याकरितां भुयारांत ठेवलें होतें, तो परदेशी असून अगदीं गैरमाहित असल्यामुळें, त्याला एकदम राजासनावर आणून बसविलें तर, कोणाची ओळख किंवा नांव गांव वगैरे कांहीं माहित नसल्यामुळें, कदाचित् आपलें कपट उघडकीस येईल. व औषधानें राजा म्हाताऱ्याचा तरुण झाला, तरी त्याची पूर्वीची ओळखदेखसुध्धां नाहींशी होईल ही गोष्ट लोकांना खरी वाटायची नाहीं म्हणून त्याणें अशी तजवीज केली. औषधोपचार करायला नित्य तो जेव्हां त्या भुयारांत जात असे तेव्हां पूर्वींच्या दिवशीं दाखविलेल्या मनुष्यांचीं नांवें व त्यांच्या संबंधाची इतर माहिती त्या पुरुषाला चांगली शिकवून ठेवीत होता. याप्रमाणें दोन महिन्यांत त्याणें त्याला शिकवून चांगला तयार केला. आणि आठवा महिना पुरा होतांच, खूप खाऊन पिऊन लठ्ठ झालेल्या त्या पुरुषाला मोठ्या समारंभानें भुयाराच्या बाहेर काढलें. त्या दिवशीं शहरांत जिकडे तिकडे मोठा उत्सव करविला. कांहीं विचक्षण पुरुषांला त्याचें तें सर्व ढोंग आहे असें वाटत होतें. तरी 'न जाणों आपण त्या वैद्याच्याविरुद्ध बोलावें तर राजद्रोह केल्याचा कदाचित् दोष घ्यावा लागेल,' म्हणून जो तो आपापल्याठिकाणीं भीत होता. वैद्यानें जसें जसें करावयास सांगितलें तसें तसें त्यांणीं केलें. शेवटीं तो दुर्दैवी म्हातारा राजा मरून, त्याच्याबदला हा दैवशाली तरुण पुरुष मोठ्या थाटानें सिंहासनावर आरूढ झाला. 'पहिला होता तोच आमचा राजा औषधीच्या प्रभावानें असा तरुण झाला आहे,' असें सर्व लोक बोलूं लागले. वैद्यबुवांचा तर जिकडे तिकडे जयजयकार सुरू झाला. नंतर, दोन महिने भुयारांत राहिल्यामुळें किंचित् मलिन दिसणारा तो तरणा राजा वैद्याच्या सांगण्याप्रमाणें जनानखान्यांत प्रविष्ट झाला. पट्टराणी **कमलप्रभा** व इतर स्त्रिया यांणीं प्रेमपूर्वक त्याचा स्वीकार केला. मंगल स्नान, उंची वस्त्रें, अलंकार इत्यादिकांच्या योगानें खूप बनून तो

दैवशाली तरुण पुरुष स्त्रियांसहवर्तमान जनानखान्यांत खुशाल मौज मारूं लागला. ज्ञाताऱ्याचा तरुण झाल्यामुळें **विनयशील** हें नांव बदलून **अजर** असें त्यानें आपल्याला दुसरें नांव घेतलें. हळूहळू राज्यकारभाराकडे तो विशेष लक्ष्य पुरवूं लागला. प्रत्येक कामांत, त्याला राजा बनविणारा **तरुणचंद्र** याचा सल्ला घेतल्यावांचून तो कांहींच करीत नव्हता. वैद्याच्या वर्तनाविषयीं कोणींच कांहीं शंका घेतली नाहीं. सर्वांनीं, रसायनाच्या प्रभावानें ज्ञाताऱ्याचा तरुण झाला, असेंच गृहीत केलें !

तो पुरुष खरोखरच दैवशाली होता. ज्या दैवानें त्याला हें आयतेंच राज्य दिलें, तें त्याला शहाणपण देण्यांत कां कमी करील ? त्यानें आपल्या उत्तम वर्तनानें व यथायोग्य न्यायमनसुबा वगैरे करण्यानें कामदार व प्रजा यांचीं मनें लौकरच आपल्याकडे ओढून घेतलीं. एवढा मोठा अधिकार प्राप्त झाल्यावर आपल्या मित्रांचें कल्याण करावें, ह्मणून त्याणें **भेषजचंद्र** व **पद्मदर्शन** नांवाचे त्याचे दोघे लंगोटीयार होते, त्यांला आपल्या आश्रयाखालीं ठेवून हत्ती घोडे जहागीर वगैरे देऊन त्यांना आपल्यासारखे बनविले. **तरुणचंद्राशीं** तो चांगल्याच प्रकारें वागत होता. परंतु त्याचा वाजवी असेल तितकाच मानमरातब ठेवून प्रसंगविशेषीं त्याला योग्य बक्षीस वगैरे देत होता.

**तरुणचंद्रानें** इतकी खटपट केली होती, ती हळूहळू व्यर्थ गेली असें त्याला वाटूं लागलें. भुयारांतून बाहेर निघतांच प्रथम तो **तरुणचंद्राच्या** तंत्रानें कांहीं दिवस वागत होता व अशाच रीतीनें हा अखेरपर्यंत वागेल, असें त्या वैद्याला वाटलें होतें. पण त्या **अजरानें** साधारण त्याला जेवढी माहिती पाहिजे होती तेवढी होईतोंपर्यंतच त्याचें वर्चस्व ठेवलें. प्रजाजनांला व कामदारलोकांना आपण प्रिय झालों आहों ; व पाहिजे ती सर्व आवश्यक माहिती मिळाली आहे असें वाटतांच हळू हळू त्याणें **तरुणचंद्राला** विचारण्याचें

सोडलें. कामापुरतेंच तो त्याच्याशीं बोलत असे. एकंदरींत त्या धूर्त वैद्यावर त्याणें मुळींच विश्वास ठेविला नाहीं ह्मटलें तरी चालेल. उघडच आहे; ज्याणें आपल्या अन्नदात्या विनयशील राजाला तशा रीतीनें फसवून मारविलें, तो प्रसंगीं आपल्यालादेखील तसें करणार नाहीं कशावरून? ही गोष्ट अजराच्या मनांत येणें साहजिकच आहे. असो.

याप्रमाणें राजा आपल्याला विचारीत नाहीं असें पाहून दुःखित झालेला तरुणचंद्र मनांत ह्मणाला, 'पहा, बेटा कसा लबाड आहे तो! या गुलामाला मीच एवढ्या योग्यतेला चढविलें. नाहीं तर जन्मभर याला भिक्षाच मागत राहावें लागलें असतें. असें असून हा इतक्यांतच मला विसरला. पण या मूर्खाला हें ठाऊक नाहीं का, कीं मीं पहिल्या राजाचा कसा घात केला तो? या बेट्याची उचलबांगडी करायला मला कितीसा वेळ लागणार आहे? तरी पण आपण एकदम तसें करूं नये. आधीं याला नीट समजावून सांगावें. न ऐकलें तर आपल्या कर्माचीं फळें भोगणें त्याच्या नशीबीं आलेंच ह्मणायचें.' असा विचार करून तरुणचंद्रानें राजाची एकांतीं भेट घेतली आणि त्याला ह्मणाला, "कां महाराज, आपण आतांशा माझी पर्वा न करितां अगदीं स्वतंत्रपणानें वागत असतां? काखेंतली झोळी काढून येवढ्या मोठ्या राज्यावर तुह्माला मी बसविलें, तें इतक्यांतच विसरलां काय?" हें ऐकून राजा अजर त्या धृष्ट वैद्याला ह्मणाला, "गृहस्था, मूर्ख तर नाहींसना. अरे, कोण कोणाला राजा करतो? आणि कोण कोणाला राज्य देतो? राजा करण्याची किंवा ऐश्वर्य देण्याची शक्ति कोठें मनुष्याच्या अंगीं असते काय? काय करायचें अथवा द्यायचें तें सर्व प्रारब्धकर्माकडून होत असतें. मनुष्य जर इतका शक्तिवान् असेल तर त्याच्यांत आणि ईश्वरांत अंतर कोणतें उरलें? याकरितां तूं उगीच गर्व वाहूं नकोस. तुला वाटत असेल कीं, आपण राजा केलें ह्मणून; पण ती गोष्ट अगदीं खोटी आहे. मला राज्य मिळालें ही माझ्या तप-

श्चर्येची सिद्धी आहे. तुझी खात्री नसेल तर मी लवकरच तुला ही गोष्ट प्रत्यक्ष घडवून दाखवीन."

हें ऐकून तो तरुणचंद्र वैद्य फार संतापला. तो मनांत ह्मणाला, 'काय बेटा धट्ट आहे पहा! मोठ्या धैर्यानें आणि ऐटीनें कसा बोलतो आहे. ह्मणे माझ्या तपाची सिद्धी होती; तर मग येथें भिक्षा मागत कां आला होतास? गुलामाला लाज कशी वाटत नाहीं. एकाद्या त्रिकालज्ञ ऋषीसारखा बोलतो आहे! मी याला याच्या मूळच्या स्थितीची आठवण दिली तरी हा कांहीं ताळ्यावर येत नाहीं. आतां जर याची गुप्त गोष्ट बाहेर फोडली तर हा राज्यावरून कदाचित् भ्रष्ट होईल; पण ह्मातार्‍या राजाला मारविल्याचा दोष आपणावरही येणार आहे. तेव्हां तसें करणें हें चांगलें नव्हे. ह्मणून याच्या मर्जीप्रमाणेंच वागावें. हा मला प्रत्यक्ष दाखवीन ह्मणाला आहे, तें काय दाखवितो तें पाहूं या तर खरें.' असा विचार करून वैद्य उगीच राहिला.

राजा अजर खरोखरच मोठा विलक्षण बुद्धिवान् पुरुष होता. त्या मूर्ख वैद्याचे डोळे चांगले उघडले पाहिजेत असें मनांत ठेवून दुसर्‍या दिवशीं, आपले मित्र व निवडक सेवक आणि तो तरुणचंद्र वैद्य यांना बरोबर घेऊन तो बाहेर फिरायला निघाला. थट्टामस्करी, हास्य विनोद करीत व नाना प्रकारचे चमत्कार पहात राजा एका नदीच्या तीरावर प्राप्त झाला. प्रवाहाची शोभा वर्णन करीत तो तेथें उभा राहिला होता इतक्यांत सोन्याचीं पांच कमळें वहात येत असलेलीं त्याच्या दृष्टीस पडलीं. लगेच आपल्या हुजर्‍याला सांगून त्याणें त्यांतलें एक कमळ आणविलें. त्याची शोभा अवलोकन करून राजा, जवळ उभा असलेल्या तरुणचंद्र वैद्याला ह्मणाला, "वैद्यबुवा, आपण या नदीच्या किनार्‍या किनार्‍यानें हिच्या उगमाकडे वर चला. हीं कमळें वरून वहात आलीं आहेत, तेव्हां कोठें तरी यांचें उत्पत्तिस्थान असेलच तर तें पाहून परत या. मला या कमळांच्या संबंधानें मोठें कौतुक

वाटतें. हीं अशीं अद्भुत कमळें कोणत्या ठिकाणीं उत्पन्न होतात हें आपल्याला जरूर समजलें पाहिजे. तुह्मी मोठे चाणक्ष असून माझे मित्र आहां ह्मणून तुह्माला हें काम सांगतों."

तरुणचंद्राच्या मनांत जायचें नव्हतें; तरी करतो काय? राजाचा हुकूम अमान्य करतां येत नाहीं. ह्मणून "हुकुमाप्रमाणें करतों" असें सांगून तो त्या नदीच्या किनाऱ्यानें कमळांचा शोध करीत निघाला. कांहीं वेळानें राजाही परत शहरांत निघून गेला. बिचाऱ्या वैद्याला काऱ्याकुऱ्यांतून जावें लागलें. तो पुष्कळ दिवस शोध करीत करीत नदीकिनाऱ्यावर असलेल्या एका शिवालयांत एकेदिवशीं येऊन पोंचला. त्या देवळाच्या समोर नदीच्या अगदीं काठावर एक गगनचुंबित वडाचें झाड होतें. त्याच्याकडे पहात आहे इतक्यांत त्याच्या पारंब्यांला लोंबकळत असलेला मनुष्याच्या हाडांचा सांपळा त्याला दिसला. हें येथें काय आहे तें पहावें अशी त्याला जिज्ञासा झाली होती. तरी फार दूरवर चालत आल्यामुळें तो श्रमला होता ह्मणून प्रथम त्याणें स्नान केलें. नंतर देवळांत जाऊन शंकराची यथाविधि पूजा केली. आतां पुढें तो सांपळा कोणाचा आहे? व कां लोंबतो आहे? याचा शोध करावा असें त्याच्या मनांत होतें. इतक्यांत पावसाची सुरवात झाली. हांहां ह्मणतां बराच जोराचा पाऊस पडला. तेव्हां देवळाच्या पायरीवर बसून तरुणचंद्र आसपासची शोभा पाहूं लागला. वडाच्या पारंब्यांला लोंबणाऱ्या माणसांच्या हाडांच्या सांपळ्यावर वैद्याची सारखी नजर होती. पाऊस जोराचा पडल्यामुळें त्याचें पाणी त्या झाडाच्या पानांवरून हळूहळू खालीं येऊन तें, लोंबत असलेल्या हाडांच्या सांपळ्यावरून खालीं पडूं लागलें. ज्या फांदीला तो सांपळा लटकत होता ती नदीकडच्या बाजूला असून नदीच्या पात्राच्या वर बरीच दूर गेलेली होती. यामुळें सांपळ्यावरून जे पावसाच्या पाण्याचे थेंब पडावयाचे ते थेट प्रवाहांतच पडूं लागले. तेव्हां त्यांपासून भराभर

अनेक सोन्याचीं कमलें बाहेर निघूं लागलीं. वैद्य लक्षपूर्वक तिकडे पहात असल्यामुळें तो सर्व चमत्कार त्याच्या दृष्टीस पडला. अजर राजानें जें कमळ धरलें होतें तें आणि हीं कमळें अगदीं एकसारखीं आहेत असें पाहून वैद्य मनांत ह्मणाला, 'वाहवा! हा काय चमत्कार आहे!! हें असें कसें होतें हें मला मुळींच समजत नाहीं. कोणाला विचारावें ह्मटलें तर या निर्जन अरण्यांत मला कोण सांगणार? बहुत आश्चर्यमय अशी ही विधात्याची सृष्टि कशी आहे? व हिच्यांत काय-काय चमत्कार आहेत हें तरी कोण जाणण्यास समर्थ आहे. राजानें कमळांचें ठिकाण पाहून यायला सांगितलें होतें त्याप्रमाणें मीं हें पाहिलें. या हाडांच्या सापळ्यापासून कमळें होत आहेत. आतां असें करावें कीं, हा जो सांपळा लटकत आहे तो नदींत फेंकून द्यावा. या तीर्थांत हाडें पडल्यानें, ज्याचीं तीं असतील त्या बिचाऱ्या प्राण्याला उत्तम गती प्राप्त होईल. आणि हा सांपळा नदींत टाकल्यापासून मलाही धर्म घडेल. अथवा या ठिकाणीं सोन्याचीं कमळें उत्पन्न होण्याची ही एक जागा होईल. या दोहोंतून कोणतेंही झालें तरी चांगलेंच आहे.'

असा विचार करून **तरुणचंद्र** झाडावर चढला आणि हळूच, ज्या पारंबीला तो सांपळा लटकत होता ती युक्तीनें त्याणें तोडली. अर्थात् तीं हाडें नदीच्या प्रवाहांत पडलीं. ती वेळ सायंकाळची होती. आतां रात्रींचें परत जाणें धोक्याचें आहे असें समजून वैद्यानें त्या रात्रीं त्या देवळांतच मुक्काम केला. ज्याकरितां तो आला होता तें काम सिद्ध झाल्यामुळें त्याला फार समाधान वाटलें होतें. दुसरे दिवशीं सकाळीं तो तेथून परत येण्यास निघाला. व कांहीं दिवसांनीं **विलासपुर** शहरांत येऊन पोंचला. मार्गाचा श्रम, खाणें पिणें नाहीं व भय वगैरे अनेक प्रकारच्या गोष्टींनीं तो कृश व मळकट झाला होता. सांगितलेली कामगिरी केल्याबद्दल राजाला कळवून मग आपण घरीं जावें असा विचार करून तो सरळ राजवाड्यांत आला. संप्रदा-

याप्रमाणें चोपदारांनी वर्दी लावली. तेव्हां तो राजाजवळ जाऊन मुजरा करून पुढें उभा राहिला तो त्याची दशा पाहून राजानें कुशल विचारिलें. व आदरसत्कार करून आधीं त्याचे श्रम परिहार करविले. मग गेलेल्या कामाच्यासंबंधानें विचारलें. तेव्हां वैद्यानें 'आपण कमळांच्या उत्पत्तीचें स्थान पाहिलें' असें सांगितलें. नंतर जवळच्या सर्व मंडळीला एकीकडे करून राजा एकांतीं त्याला ह्मणाला, "वैद्यबुवा, सोन्याचीं कमळें उत्पन्न होण्याचें ठिकाण आपण पाहिलेंना? तें क्षेत्र आणि तें मोठें वडाचें झाड व तेथलें तें शिवालय आणि त्या वडाच्या पारंब्याला लोंबत असणारा हाडांचा सांपळा हें सारें तुह्मीं पाहिलेंका? आणि तेथें त्या हाडांवरून पाण्याचे थेंब पडले व त्यांची कमळें झालीं हेंही पण तुमच्या दृष्टी पडलेंच असेल."

वैद्यानें 'होय सर्व पाहिलें' असें सांगितल्यावर राजा अजर त्याला म्हणाला, "तर मग जो हाडांचा सांपळा तूं पाहिलास तो माझा पूर्वीचा देह असें समज. मी त्या झाडाला उफराटें टांगून घेऊन फार दिवस तपश्चर्या करून शुष्क केलेलें शरीर तेथेंच टाकलें होतें. त्या तपाच्या प्रभावानें, माझ्या शरीराच्या हाडांवरून पडलेल्या पाण्याच्या थेंबांपासून तीं कमळें उत्पन्न होत होतीं. आतां तो सांपळा तूं त्या तीर्थांत टाकलास हें फार चांगलें केलेंस. तूं मला ओळखलें नाहींस तरी मी तुला पुरतेपणीं ओळखतों. तूं माझा पूर्वजन्मींचा मित्र आहेस. हा भेषजचंद्र तसाच पद्मदर्शन व तूं आणि मी आपण चौघेही त्या जन्मांतले खेळगडी आहों. तरी या जन्मांत मी जें कांहीं तप केलें त्याच्या प्रभावानें मला पूर्वजन्मींचें स्मरण राहिलें आहे. तुह्मी तसें न केल्यामुळें तुह्माला पूर्वींच्या गोष्टी आठवत नाहींत. मला हें राज्य व त्रिकाल ज्ञान वगैरे जें कांहीं प्राप्त झालें आहे, तें सर्व त्या तपश्चर्येचेंच फळ होय. आतां तरी तुझी खातरी झालीना? मी तुला त्या दिवशीं 'प्रत्यक्ष दाखवीन' असें जें सांगितलें होतें तें हेंच. युक्तीनें मी तुला सर्व दाख-

विलें व तूं त्या ठिकाणीं गेल्यावर काय काय केलेंस तें देखील सांगितलें. तेव्हां आतां आपण मला राज्य दिलें असा जो तुझा गर्व आहे तो व्यर्थ आहे अशी तुझी खात्री झालीना? तूं तसा उगीच अभिमान धरूं नकोस व मन अस्वस्थ करूं नकोस. जें व्हायचें होतें तेंच झालें. तूं केवळ निमित्त मात्र आहेस. प्राक्तनांत असल्यावांचून कोणी कोणाला कांहीं देऊं शकत नाहीं. गर्भांत आल्यापासून प्राण्याला जें कांहीं प्राप्त होतें तें सारें त्याच्या पूर्वकर्मरूपी वृक्षाचें फळ आहे."

याप्रमाणें राजानें सांगितलें व त्याला प्रत्यक्ष अनुभवही दिला, तेव्हां **तरुणचंद्रा**ची पुरती खात्री झाली. राजाचा त्याच्यावर द्वेष मुळींच नव्हता. केवळ त्याचा भ्रम दूर करावा इतकेंच त्याच्या मनांत होतें. व ह्मणूनच त्याणें त्याला बाहेर पाठविलें होतें. आतां त्याचे डोळे उघडले तेव्हां त्याचा सन्मान करून व पुष्कळ उत्तम उत्तम वस्तू त्याला देऊन राजानें त्याचें गौरव केलें. त्या वैद्याची पूर्ण खात्री झाल्यामुळें तो त्या दिवसापासून कधींच असंतुष्ट झाला नाहीं. राजाची सेवा करण्यांत त्याला फारच सुख वाटूं लागलें. याप्रमाणें **तरुणचंद्राला** संतुष्ट करून तो व **भेषजचंद्र** आणि **पद्मदर्शन**, यांसहवर्तमान राजा **अजर** बहुत दिवसपर्यंत मोठ्या आनंदांत निष्कंटक पृथ्वीचें राज्य करिता झाला." अशी कथा सांगून **तपंतक** ह्मणाला, "महाराज, याप्रमाणें या मनुष्यलोकांत सर्व प्राण्यांला सार्वकाल पूर्वकर्माप्रमाणें शुभ किंवा अशुभ प्राप्त होत असतें. आपण आह्माला धनी मिळालां हेंही पूर्वकर्माचेंच फळ आहे. आपल्याजवळ चाकर कांहीं थोडे आहेत कां? आह्मावरच आपण नेहमीं प्रसन्न असतां याला पूर्वजन्मीच्या संबंधावांचून दुसरें कांहींच कारण नाहीं." याप्रमाणें अपूर्व रमणीय व विचित्र अशी कथा **तपंतका**च्या मुखांतून ऐकून युवराज **नरवाहनदत्त** संतुष्ट होत्साता स्नानसंध्या करायला उठला, व नित्यकृत्य आटपून **वत्सराज** व **वासवदत्ता** यांच्या दर्शनाला गेला.

त्यांच्यासहवर्तमान तेथें यथेच्छ भोजन करून पुन्हां आपल्या महालांत येऊन **रत्नप्रभा** व प्रधान यांसहवर्तमान आनंदांत वेळ घालविता झाला.

दुसरे दिवशीं प्रातःकालींच **नरवाहनदत्तानें** बापाबरोबर शिकारीला जाण्याची तयारी केली. जिला क्षणभर देखील त्याचा वियोग सहन होत नव्हता अशा **रत्नप्रभेला**—'लौकरच परत येतों' असें सांगून तो **वत्सराजा**बरोबर मृगयेला गेला. त्याचे प्रधान बरोबर होते. रान काढणारे लोक व निवडक हत्ती घोडे वगैरे परिवारासह, पुढें **वत्सराजा**ची स्वारी व त्याच्या मागून **नरवाहनदत्ता**ची, अशा थाटानें ते पितापुत्र अरण्यांत गेले. तेथें चहूंकडून रानकाढ्यांनीं सावजें उठविलीं. तेव्हां—हत्तींचीं गंडस्थळें फोडतेवेळीं त्यांतलीं मोत्यें ज्यांच्या नखांत अडकलीं आहेत अशा स्थितींत **वत्सराज** व त्याचा पुत्र यांणीं अनेक सिंहांला मारल्यामुळें त्यांच्या पंजांतलीं मोत्यें चहूंकडे विखरलीं व त्यांवरून—या जमीनींत मोत्यांचा पेरा केला आहे कीं काय ! असें दिसूं लागलें. तसेंच भाल्याच्या आकाराच्या बाणांनीं—कोणाचें मस्तक, कोणाचे पाय व कोणाची कंबर तोडली आहे, अशा अनेक वाघांचे प्राण घेतल्यामुळें त्यांच्या दाढा हेच कोणीएक अंकुर उगवल्याप्रमाणें तो प्रदेश रमणीय दिसत होता. हरिणांच्या अंगांतून गळलेल्या रक्ताच्या थेंबांनीं त्या भूमीला कोमळ पानें आलीं आहेत काय असें वाटत होतें. बगळ्यांचीं पिसें ज्यांना लावलीं आहेत असे बाण ज्यांच्या अंगांत रुपले आहेत अशा रानडुकरांच्या प्रेतांनीं त्या पृथ्वीला गुच्छ आले आहे कीं काय असें दिसत होतें. जिकडे तिकडे शरभांचीं प्रेतें पडलीं होतीं व त्यांच्या योगानें पृथ्वीला फळें आल्यासारखें दिसूं लागलें."

जींत बाणांचा सोसाट्याचा आवाज होत आहे अशी ती मृगयालीला—सुशोभित अरण्याच्या शोभेकडे लक्ष अधीक वेधल्यामुळें **नरवाहनदत्ताच्या**—प्रीतीला विशेष कारण झाली. जंगलांत पोंचेपर्यंत मात्र तो **वत्सराजाच्या** बरोबर होता. पण शिकारीची सुरवात झाल्यावर

कोणाचीच सोबत राहिली नाहीं. ज्याला जिकडे सावज मिळेल तिकडे तो धांवला. **नरवाहनदत्ता**बरोबर त्याच्या परिवारापैकीं एकटा **गोमुख**मात्र काय तो होता. शिकार खेळतां खेळतां दोन प्रहर उलटून गेले. त्या सुकुमार राजपुत्राला अतिशय श्रम झाले तेव्हां तो एका झाडाखालीं बसून **गोमुखा**सह विश्रांति घेऊं लागला. उगीच बसल्यानें वेळ जाईना ह्मणून त्या दोघांनीं बोथाटीचा खेळ आरंभला. कांहीं वेळ तो खेळ खेळून पुन्हा शिकारीच्यामागें लागायचें असें त्यांच्या मनांत होतें. इतक्यांत एक वृद्ध तापसी त्या वाटेनें आली. **नरवाहनदत्ता**च्या हातांतून सुटलेली बोथाटी न समजतां चुकून त्या तापसीच्या डोक्याला लागली. चुकून असें घडलें हें तीही समजली. ह्मणून तिणें त्याबद्दल राग मानला नाहीं. तरी ती किंचित् हंसून त्याला ह्मणाली, "अरे, तुझ्या अंगांत बरीच मस्ती आहेसें दिसतें. पण यांत काय अर्थ आहे? माझ्यासारख्या तापसीला एक सोडून दहा बोथाट्या मारल्यास तरी त्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. तुझ्या अंगीं तितकी खुमखुमी असेल तर त्या **कर्पूरिके**ला आपली बायको करून घे. तसें करशील तर मात्र तुझी मस्ती खरी आहे, असें मी मानीन."

हें ऐकतांच **नरवाहनदत्त** घोड्यावरून खालीं उतरला आणि त्याणें तिचे पाय धरले. तो त्या वृद्ध तापसीला ह्मणाला, "भगवति, क्षमा करा. आपण मला माझ्या आईपेक्षांही अधिक पूज्य आहां. आह्मी खेळण्याच्या नादांत होतों. तुह्मी केव्हां आलां हें बिलकूल दृष्टी पडलें नाहीं. ह्मणूनच ही अशी चूक झाली. कृपा करून हा आमचा अपराध क्षमा करा. आमच्यासारख्या पोरांचे अन्याय तुह्मी पोटांत न घालाल तर दुसरें कोण घालील!" हें त्याचें प्रीतियुक्त व नम्र भाषण ऐकून ती तापसी ह्मणाली, "मुला, ऊट ऊठ. बाळा, मला मुळींच राग नाहीं. रागाला जिंकण्याकरितां तर मी सर्वसंगपरित्याग केला आहे. त्यांतून तुझ्यासारख्या सद्गुणी मुलावर मी कां रागावेन?"

असें बोलून तिनें **नरवाहनदत्ताला** उठविलें. व नंतर प्रेमपूर्वक त्याला कुरवाळून मनापासून आशीर्वाद दिला. तेव्हां **नरवाहनदत्ताचें** मन स्थीर झालें. 'ही आपल्याला अनुकूळ झाली आहे व राग नसल्यामुळें ही खरोखरीची तापसी आहे' असें समजून मोठ्या नम्रतेनें तो तिला ह्मणाला, "बरें आहे, आपण क्षमा केली हा मोठा अनुग्रह केला. **कर्पूरिका** ह्मणून जिचें नांव आपण घेतलें ती कोण? कोणाची? व कोठें आहे? तें ऐकण्याचें मला फार कौतुक वाटतें? जर तुह्मी माझ्यावर रागावलां नसाल, व खरोखरीच अनुग्रह करणार असाल; तर त्या **कर्पूरिकेचा** वृत्तांत मला सांगा. ह्मणजे मी समजेन कीं, तुह्मी प्रसन्न झालां आहां."

याप्रमाणें विनययुक्त असून कांहींसें लडिवाळपणाचें त्याचें भाषण ऐकून, ती तापसी पुढें जाण्याच्या त्वरेंत होती, तरी तिला त्याची भीड मोडवेना. ह्मणून ती म्हणाली, "बाबा, तूं तर मला अगदीं अडवलें-सच. आतां सांगतें ऐक. समुद्राच्या पलीकडे **कर्पूरसंभव** नांवाचें एक नगर आहे. तेथें अन्वर्थ नांव धारण करणारा **कर्पूरक** नांवाचा प्रसिद्ध राजा आहे. मी **कर्पूरिका** ह्मणून मघां जी सांगितली ती त्या राजाची मुलगी. ती सर्व स्त्रियांत रूपगुणादिकांनीं फार श्रेष्ठ आहे. आपलें मंथन करून देवांनीं **लक्ष्मी** काढून नेली; एक नेली तर काय गेलें आपण दुसरी **लक्ष्मी** मिळवूं, असा विचार करून **क्षीरसमुद्रानें** ती दुसरी प्रत्यक्ष **लक्ष्मीच** राखून ठेविली आहे कीं काय असें वाटतें! असो. तिच्या रूपाचें आणि गुणांचें वर्णन करीत बसण्याला मला अवकाश नाहीं. तें प्रत्यक्ष पाहिल्यावर समजून येईलच. ती मुलगी उपवर झाली आहे तरी लग्न करून घेण्यास इच्छीत नाहीं. कसलाही गुणवान् पुरुष असो, ती आपला त्याचा द्वेष करते. तुला पाहून जर ती लग्न करून घ्यायला तयार झाली; तर तुझ्या गुणांचें आणि तिच्या रूपाचें दोघांचेंही सार्थक होईल. याकरितां बाबा, तूं तिकडे जा. मला असें

वाटतें कीं, ती सुंदरी बहुतकरून तुला प्राप्त होईल. तिकडे जातांना वाटेंत या जंगलांत तुला फार क्लेश होतील. तथापि तूं धीर खचूं देऊं नकोस. तें तुझें दुःख सुखपरिणामी होईल. यावर तुला वाटेल तसें कर. आतां मला फार वेळ नाहीं." असें सांगून **नरवाहनदत्त** तिला आणखी कांहीं विचारणार इतक्यांत ती आकाशांत उडून अदृश्य झाली.

त्या तापसीची वाणी हीच कोणी एक मदनाज्ञा तिनें ज्याला त्या **कर्पूरिके**कडे ओढलें आहे असा, तो **गोमुखा**ला ह्मणाला, "गड्या, ह्या तापसीनें काय सांगितलें तें तूं ऐकलेंसना? तर मग चल आपण **कर्पूरसंभव** नगरांत त्या **कर्पूरिके**जवळ जाऊं या. माझ्या मनाची स्थिती कांहीं चमत्कारिक झाली आहे. तिला पाहिल्यावांचून आतां मला अगदीं चैन पडणार नाहीं." हें ऐकून **गोमुखा**वर आकांत कोसळला. कोठें समुद्र! कोठें तें **कर्पूरसंभव** नगर! कोठें ती **कर्पूरिका**! आणि हा एकदम जाणार ह्मणतो याला काय ह्मणावें? तो तर स्वतः मुखत्यारच आहे; पण **वत्सराज** आपल्यावर दोष ठेवील, ह्मणून तो घाबरून ह्मणाला, "युवराज, असें साहस करायचें मनांत आणूं नका. केवळ तिचें नांव ऐकलें एवढ्यावरून आपण **मदनमंचुका** व **रत्नप्रभा** यांच्यासारख्या दिव्य स्त्रिया असतांही कोठल्या त्या **कर्पूरिके**वर इतके आसक्त झालां हें काय? तिचें मन तुमच्यावर आहे किंवा नाहीं हें समजल्यावांचून तेथें जाऊन काय उपयोग? ज्या गोष्टीचा परिणाम संदिग्ध आहे ती करण्याविषयीं श्रम करणें अगदीं व्यर्थ आहे. त्यांतून दिव्य स्त्रिया सोडून त्या मनुष्यस्त्रीची आपण इच्छा कां करतां?" **गोमुखा**नें याप्रमाणें पुष्कळ गोष्टी सांगून **नरवाहनदत्ता**चें मन फिरविण्याचा यत्न केला तेव्हां तो ह्मणाला, "अरे, तूं ह्मणतोस तें खरें. पण ती सिद्ध तापसी खोटें बोलेल असें तुला वाटतें का? 'त्या सुंदरीचा लाभ तुला होईल' असें तिणें सांगितलेलें तूं ऐकलें नाहींस का? असें असून कार्य संदिग्ध आहे असें तूं ह्मणतोस हें काय?

त्या तापसीच्या सांगण्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. ह्मणून मला ती राजकन्या मिळविण्याकरितां अवश्य गेलेंच पाहिजे."

याप्रमाणें बोलून, आणखी पुढें भवतिनभवति करण्यांत व्यर्थ वेळ घालवावा लागेल ह्मणूनच कीं काय, घोड्यावर बसून **नरवाहनदत्त** समुद्रतीराकडे तत्क्षणीं चालता झाला. **गोमुखाला** त्याच्याबरोबर जाणें योग्य वाटलें नव्हतें तरी करतो काय? तो मुकाट्यानें घोड्यावर बसून त्याच्या पाठोपाठ निघाला. आपण सांगितलेलें धनी ऐकत नाहीं असें होईल तेव्हां सेवकांनीं मुकाट्यानें तो काय ह्मणेल त्याप्रमाणें त्याच्याबरोबर वागावें हाच त्यांचा धर्म. दुसरें त्यांच्याकडून काय होणार? असो. याप्रमाणें **नरवाहनदत्त** व त्याच्याबरोबर **गोमुख** दोघेही **कर्पूरसंभव** द्वीपाकडे निघाले. इकडे **वत्सराज** संध्याकाळपर्यंत अरण्यांत शिकार खेळून शहराकडे जाण्यास निघाला. **नरवाहनदत्ताचा** आणि त्याचा वियोग होऊन पुष्कळ वेळ झाला होता. तरी परत निघायच्या वेळीं त्याणें त्याचा शोध करविला. आसपास कोठें पत्ता लागला नाहीं, तेव्हां दुसऱ्या वाटेनें तो परत गेला असेल किंवा जाईल, असें समजून राजानें विशेष चौकशी केली नाहीं. तो घराकडे आला असेल अशीच **वत्सराजाची** समजूत होती. शहराजवळ पोंचल्यावर **मरुभूति** इत्यादि **नरवाहनदत्ताचे** सोबती त्याच्याविषयीं निराश होऊन परत आलेले त्याला भेटले. तरी त्याला विशेष संशय आला नाहीं. घरीं येऊन चौकशी केली पण तेथें कोठें ठिकाण लागला नाहीं तेव्हां **रत्नप्रभेला** विचारलें. ती तर हरिणी सारखी त्याची वाटच पाहत बसली होती. **मरुभूति** इत्यादिकांनीं "युवराज इकडे आले आहेत का?" ह्मणून विचारतांच ती घाबरी झाली. तेथेंही तो नाहीं असें जेव्हां समजलें तेव्हां **वत्सराज** फारच व्याकुळ झाला. मुलगा शूर असून मोठा हुषार आहे अशी त्याची खातरी होती. तरी साहसी असल्यामुळें तो कोणत्या वेळीं काय करील याविषयीं त्याला

भरंवसा नव्हता. सासूसासरे व राजवाड्यांतील इतर सर्व मंडळी याप्रमाणें व्याकुळ झालेली पाहून **रत्नप्रभेनें** आपल्या विद्येचें स्मरण करून क्षणभर ध्यान केलें. तेव्हां तत्काल, तो कोठें गेला आहे? कशाकरितां गेला आहे? वगैरे सर्व हकीकत तिला समजली. ती जाणून **वत्सराजाला** म्हणाली, "मामंजी, कोणी तापसीनें **कर्पूरिका** नांवाच्या राजकन्येची तारीफ केल्यावरून आर्यपुत्र तिला वरण्याकरितां **कर्पूरसंभव** नांवाच्या द्वीपाकडे गेले आहेत. गेल्याप्रमाणें कार्य करून लौकर **गोमुखासहवर्तमान** परत येतील. त्यांच्याविषयीं चिंता करण्याचें कांहींच कारण नाहीं. विद्येच्या प्रभावानें हा सर्व वृत्तांत मला समजला आहे."

असें सांगून तिणें सासूसासरे वगैरे सर्व मंडळीचें समाधान केलें. आणि नंतर आपल्या पतीचें रक्षण व्हावें व मार्गांत त्याला क्लेश बाधूं नयेत ह्मणून तिणें दुसरी एक विद्या त्याच्याकडे पाठविली. यद्यपि **नरवाहनदत्त** यावेळीं जिला वरायला गेला होता, ती **रत्नप्रभेला** दुसरी एक सवत होणार होती व त्या कामीं तिणें सवतिमत्सरानें कांहीं तरी अडथळा करायचा होता, निदान त्याला सहाय तरी करायचें नव्हतें असें कोणासही सहजीं वाटेल; तथापि भर्त्याचें हित चिंतन करणाऱ्या उदार मनाच्या स्त्रिया सवतिमत्सर मुळींच धारण करीत नाहींत. उलट नवऱ्याच्या मनाप्रमाणें वर्तन करून त्याला सहायच करतात. असो. इकडे **गोमुखासहवर्तमान नरवाहनदत्त** एकसारखा झपाट्यानें चालला होता. तो थोड्यावेळांत पुष्कळ दूर गेला. श्रम फार झाले होते तरी **कर्पूरिकेनें** त्याचें मन हरण केल्यामुळें त्याणें त्यांची गणना केली नाहीं. तो तसाच एकसारखा पुढें चालला आहे इतक्यांत एक सुंदर स्त्री त्याला येऊन भेटली. तूं कोणाची कोण? वगैरेबद्दल तो तिला विचारणार इतक्यांत ती म्हणाली, "महाराज, माझें नांव **मायावति**. मी एक विद्या आहें. विद्याधरांची कन्या व आपली प्रियपत्नी जी **रत्नप्रभा** तिणें मला आपल्याकडे पाठविलें आहे. मी अदृश्य रा-

हून तुमचें रक्षण करीन. आपण अगदीं निश्चिंत होऊन हवे तसे चला. कोणत्याच गोष्टीची काळजी करूं नका. वाटेंत तुमचा दगाफटका वगैरे कांहींएक व्हायचा नाहीं."

असें सांगून ती स्त्रीरूप धारण करणारी विद्या तेथेंच अदृश्य झाली व तिच्या प्रभावानें **नरवाहनदत्त** आणि त्याचा साथी **गोमुख** यांला क्षुधा आणि तृषा यांची जी पीडा झाली होती ती तत्काल नाहींशी झाली. हा चमत्कारिक अनुभव पाहून **नरवाहनदत्त गोमुखाला** म्हणाला, "गड्या, माझी **रत्नप्रभा** किती शहाणी व उदार मनाची आहे पाहिलेंस! या वेळीं तिणें आपल्याला हें कसें उत्तम साह्य केलें! ती विद्याधरांचीच कन्या आहे. तेव्हां तिनें विद्या पाठविली यांत कांहीं मोठें आश्चर्य नाहीं. पण तिच्या मनाचें औदार्य खरोखरीच वर्णन करण्यासारखें आहे."

याप्रमाणें तिची तारीफ करीत सायंकाल होईपर्यंत एकसारखा त्यांणीं मार्ग क्रमिला. **सूर्यास्ताच्या** सुमारास—'घोडे श्रमले आहेत; व आपल्यालाही श्रम फार झाला आहे. आतां कोठें तरी मुक्काम करूं या' असें **गोमुखानें** सांगितल्यावरून वाटेंत आढळलेल्या एका सुंदर सरोवराच्या कांठीं त्यांणीं मुक्काम केला. जवळच्या प्रदेशांत उत्तम फळें होतीं तीं गोळा करून आणलीं. नंतर उभयतांनीं त्या सरोवरांत स्नान करून यथेच्छ फळें खाल्लीं व अमृतासारखें गोड असें त्या सरोवराचें उदक प्राशन करून, इकडे तिकडे पहाताहेत तों रात्र पडली. तेव्हां घोड्यांला गवत वगैरे घालून एका मोठ्या झाडाखालीं त्यांला बांधिलें व आपण दोघेही त्या झाडावर चढून बसले. तो वृक्ष मोठा विशाळ होता. **गोमुख** एका मोठ्या खांदीवर निजला व दुसऱ्या खांदीवर **नरवाहनदत्त** निजला. लौकरच दोघांलाही गाढ झोंप लागली.

मध्य रात्रीच्या सुमारास त्या झाडाखालीं एक भयंकर सिंह फि-

रत फिरत येऊन पोंचला. त्याची गर्जना ऐकतांच झाडाखालीं बांधलेले घोडे मोठमोठ्यानें खिंकाळूं लागले. व दवासन तोडून पळण्याचा प्रयत्न करूं लागले. ती त्यांची गडबड ऐकून **नरवाहनदत्त** व **गोमुख** दोघेही जागे झाले. घोडे खिंकाळतात कां? याविषयीं लक्षपूर्वक पाहतात तों पंचाननाची स्वारी दृष्टी पडली. **नरवाहनदत्त** मोठा साहसी होता. सिंह आला आहे, तेव्हां हा आपल्या घोड्यांला मारील ह्मणून त्यांचा बचाव करण्याकरितां तो खालीं उतरूं लागला. तें पाहून **गोमुखानें** त्याचा हात घट्ट ओढून धरला. आणि वर ओढीत होत्साता त्याला ह्मणाला, "वाहवा, तुह्मी तर आज बुवा कमालच केली. आज तुह्मी आपल्या देहावर उदार झाला आहां कीं काय? तें मला कांहीं समजत नाहीं. मंत्रचळ लागल्याप्रमाणें तुह्मी कांहीं विचार न करतां सिंहाच्या अंगावर जातां याला ह्मणावें तरी काय? प्रत्येक गोष्टीचा आधीं नीट विचार केला पाहिजे. राजाचें शरीर किती अमोलिक आहे हें तुह्मी जाणतां काय? शरीर असेल तर राज्य आणि सारें. राजेपणाचें मूळ ह्मटलें ह्मणजे मसलत. ज्याचीं नखें आणि दाढा हींच आयुधें अशा या भयंकर प्राण्याशीं (सिंहाशीं) लढाईला जावें असें तुह्माला वाटलें तरी कसें! आपलें शरीर रक्षण करण्याकरितांच आह्मी सांप्रत या झाडावर चढून बसलों आहों."

याप्रमाणें **गोमुखानें** वाणी आणि शरीर दोहोंनीं त्याला अडविलें, तेव्हां **नरवाहनदत्ताचा** निरुपाय झाला. "तुझ्यापुढें तर बुवा कांहीं इलाजच नाहीं," असें ह्मणून तो त्या खांदीवरच बसला. आणि तेथून आपल्या घोड्यावर उडी टाकणाऱ्या सिंहावर, त्याणें त्याच्या कमरेला जंबिया होता तो नेम धरून अचूक मारला. तो त्याला लागला तथापि सिंहानें घोड्यावर उडी घालून त्याला ठार केलें. **नरवाहनदत्ताच्या** घोड्याला मारून त्याणें **गोमुखाच्या** घोड्यालाही ठार केलें. **नरवाहनदत्ताला**, आपल्या देखत सिंहानें घोडे मारले हीं

गोष्ट सहन झाली नाहीं. तरी **गोमुख** त्याच्या कंमरेला विळखा घालून बसला होता. तो कांहीं केल्या खालीं उतरूं देईना. तेव्हां त्याचा निरुपाय झाला. "अरे, तूं मला या सिंहाला मारूं देत नाहीं-सका? मी खालीं उतरत नाहीं पण कृपा करून तुझ्या कंमरेला तर-वार आहे ती तरी दे." असें ह्मणून त्याणें **गोमुखा**च्या कंमरेची तर-वार घेऊन तेथूनच जोरानें फेंकली. ती आडवी सिंहाच्या कंमरेला लागून त्याच्या शरीराचे दोन तुकडे झाले. नंतर दोघेही खालीं उतरले. त्या सिंहाच्या अंगांत रुपलेला आपला जंबिया **नरवाहनदत्तानें** काढून घेतला व **गोमुखानें** आपली तरवारही घेतली आणि ते दोघेही पुन्हां झाडावर जाऊन बसले.

ती रात्र तेथेंच घालवून प्रातःकालीं **गोमुखा**सहवर्तमान **नरवाहन-दत्त** पुढें **कर्पूरिके**कडे जाण्यास निघाला. कालचा मुक्काम बराच मोठा झाला होता. तरी घोडे असल्यामुळें त्यांना तितके श्रम झाले नाहींत. पण आज कांहीं वाहन नसल्यामुळें पायींच चालावें लागलें. **नरवाहनदत्ता**चा तो विलक्षण आग्रह व वाटेंत आलेले ते प्रसंग, यां-विषयीं विचार करून **गोमुख** त्याच्या मनाची कर्मणूक करित हो-त्साता ह्मणाला, "महाराज, आतांच्या ह्या प्रसंगावरून मला एक कथा आठवली ती सांगतों.

या पृथ्वीवर **इरावती** नावांची एक प्रख्यात नगरी आहे. जिणें ऐश्वर्याच्या योगानें कुबेराची **अलकावति** तुच्छ केली आहे, अशा त्या नगरींत **परित्यागसेन** नांवाचा राजा होता. त्याच्या प्राणांहूनही प्रिय अशा दोघी स्त्रिया होत्या. त्यांपैकीं एक त्याच्याच प्रधानाची मुलगी, तिचें नांव **अधिकसंगमा.** आणि दुसरी एका राजाची कन्या होती, तिचें नांव **काव्यालंकारा.** दोघीही स्त्रियांवर त्याचें सारखेंच प्रेम होतें. त्यांच्यासहवर्तमान विषयांचा उपभोग करीत असतां पु-ष्कळ दिवस गेले. तथापि त्या राजाला संतान झालें नाहीं. पुत्रप्राप्ति

व्हावी ह्मणून तो **अंबिकेचें** आराधन करूं लागला. सर्व राजभोगांचा त्याग करून एखाद्या तापसाप्रमाणें तो दर्भांवर शयन करीत असे. याप्रमाणें त्याणें एकाग्र अंतःकरणानें तप केलें. तेव्हां भगवती **अंबिका** त्याच्यावर प्रसन्न झाली. राजाला स्वप्नांत दर्शन देऊन तिणें त्याला दोन दिव्य फळें दिलीं. आणि "राजा, आतां तप पुरे कर. तुझा हेतू पूर्ण होईल. हीं फळें तुझ्या दोघी स्त्रियांस दे ह्मणजे त्यांला महापराक्रमी असे दोन पुत्र होतील," असें सांगून भक्तवत्सला **भवानी** गुप्त झाली.

इकडे राजा जागा होऊन आपला हेतू पूर्ण झाला असें समजून त्यानें मोठ्या आनंदानें, घेतलेल्या व्रताची सांगता केली. देवीनें दिलेलीं तीं दोन्ही फळें अवलोकन करून यांपासून आपल्याला खरोखर पुत्र प्राप्त होतील असें त्याला वाटलें. नंतर परत घरीं आला व देवीचा दृष्टांत झाल्याचें आपल्या दोघी स्त्रियांला सांगितलें. प्रथम देवीचें स्मरण करून त्याणें **अधिकसंगमा** नांवाच्या राणीला एक फळ दिलें. तिनें "हे आई **जगदंबे**, आमचा हेतू पूर्ण कर" असें ह्मणून तत्काल तें फळ भक्षण केलें. त्या रात्रीं राजा तिच्याच महालांत राहिला. तिचा बाप हा त्याचा मुख्य प्रधान होता व त्याला तो फार मानीत होता. ह्मणून **अधिकसंगमेनें** केलेला आग्रह त्याच्यानें मोडवेनासा झाला. राहिलेलें एक फळ दुसऱ्या स्त्रीला देण्याकरितां त्याणें आपल्या जवळ बाळगलें होतें. रात्रीं निजायच्या वेळीं त्याणें तें आपल्या उशाशीं ठेवून शयन केलें. कांहीं वेळानें त्याला गाढ झोंप लागली. तेव्हां त्याची ती स्त्री **अधिकसंगमा** हिनें आपल्यालाच दोन पुत्र व्हावेत अशी इच्छा धरली. व अप्पलपोटेपणानें, राजाचा डोळा लागला असें पाहून हळूच तें फळ काढून घेतलें, आणि देंठाकडून तेंही खाल्लें. स्त्रिया कितीही सरळ मनाच्या असल्या तरी सवतीमत्सर हा त्यांचा अगदीं स्वभावसिद्ध दुर्गुण आहे.

सकाळीं उठल्यावर राजाला त्या फळाची आठवण झाली. आणि तो उशाकडे शोधूं लागला. तेव्हां **अधिकसंगमा** हंसत हंसत म्हणाली, "आर्यपुत्र, क्षमा करा. माझ्या हातून चूक झाली. न समजून मींच तें फळ खाल्लें." राजाला हें तिचें बोलणें अगदीं अयोग्य वाटलें. तरी ती खाऊन चुकली. आतां रागावून काय उपयोग? असें समजून तो कांहीं बोलला नाहीं. खिन्न होत्साता आपल्या महालांत निघून गेला. तपश्चर्येकडे गुंतल्यामुळें फार दिवस राज्यकारभाराकडे त्याला लक्ष देतां आलें नव्हतें यामुळें अनेक कामें तुंबून राहिलीं होतीं, तीं पाहण्यांत त्यानें तो दिवस घालविला. आणि सायंकाळीं दुसरी राणी **काव्यालंकारा** हिच्या महालांत गेला. परस्परांचे हास्यविनोद वगैरे व्हायचे ते झाल्यावर तिणें "आपल्या वांट्याचें फळ कोठें आहे तें द्या," झणून मागितलें. तेव्हां नाखुष होऊन तो म्हणाला, "काल रात्रीं मी निजलों होतों तेव्हां मला न कळत तुझ्या सवतीनें तेंहि फळ खाल्लें. आतां बोलून काय उपयोग? गोष्ट होऊन गेली." हें ऐकून पुत्राची उत्पत्ति होण्याला कारण, असें तें फळ प्राप्त न झाल्यामुळें राणी **काव्यालंकारा** फार दुःखित झाली. तरी तिणें कांहीं बोलून दाखविलें नाहीं. ती मोठी विचारी व शांत होती. व्हायचें तें होऊन गेलें. आतां त्रागा करण्यांत काय अर्थ आहे? अशी तिणें आपल्या मनाची समजूत केली.

याप्रमाणें व्यवस्था होऊन कांहीं दिवस गेले. तेव्हां गर्भिणी झालेली राणी **अधिकसंगमा** योग्यवेळीं प्रसूत झाली. तिला एकदम दोन पुत्र झाले. राजा **परित्यागसेन** याणें आपला मनोरथवृक्ष सुफलित झाला झणून मोठा आनंद प्रदर्शित केला. उभयतां पुत्रांचें जातकर्म वगैरे करवून त्याणें त्या पुत्रजन्मरूप पर्वकालीं दानधर्म बक्षिसें वगैरेंची आपल्या लोकांवर एकसारखी वृष्टी केली. नंतर नांवें ठेवण्याचा समारंभ झाला. वडील पुत्राचे—इंदीवरासारखे (कमलासारखे) सुंदर नेत्र होते म्हणून त्याला **इंदीवरसेन** असें नांव ठेविलें.

त्याची आकृतीही फारच सुंदर व मोहक होती. धाकट्या पुत्राला **अनिच्छासेन** असें नांव ठेविलें. कारण राजाची इच्छा नसतां त्याच्या आईनें तें फळ खाल्लें व त्यापासून तो जन्मला ह्मणून त्याणें त्याला तसें नांव ठेवलें. धाकटी राणी **काव्यालंकारा** हिणें हावेळपर्यंत आपलें मन स्थीर ठेविलें होतें. व त्यावरून पुढेंही ती कांहीं द्वेष धरणार नाहीं असें वाटलें होतें; पण लौकरच तिच्या वृत्तींत बदल झाला. सवतीच्या पुत्रांच्या जन्मकालचा उत्सव व त्या मुलांच्या संबंधानें राजाचा तिच्याकडे विशेष ओढा या गोष्टी **काव्यालंकारेचें** मन क्षोभविण्यास कारणीभूत झाल्या. तिच्या मनांत आपल्या सवतीविषयीं अतिशय द्वेष उत्पन्न झाला. ती मनांत ह्मणाली, 'अग चांडाळणी सवती! तूं लबाडी करून मला जन्मभर वांझोटेपणांत राहण्यास लावलेंसना? कांहीं चिंता नाहीं. तूं असें केलेंस ह्मणून जिंकलें असें समजूं नकोस. मी तुझा सूड घेईन तरच घेईन!' असें वाटून तिणें आपल्या सवतीचे मुलगे ठार मारून उसनें फेडण्याचा निश्चय केला!

मनुष्याचें मन एकदां बिघडलें ह्मणजे नेहमीं त्याचे विचार प्रतिकूळच होत असतात. **अधिकसंगमे**चा सूड घ्यावा असा तर तिचा निश्चय झालाच होता; पण तो कसा घ्यावा याविषयीं ती उपाय शोधीत होती. ते दोघे राजपुत्र दिवसेंदिवस जसे वाढत होते, तसाच राणी **काव्यालंकारा** हिच्या मनांत तो वैराग्नीही अधीक पेटत होता. तरी बरेच दिवसपर्यंत **काव्यालंकारेला** त्या राजपुत्रांचा घात करण्याविषयीं योग्य उपाय सुचला नाहीं.

इकडे ते दोघे बंधू अनुक्रमानें बालपणाचा त्याग करून तारुण्यदशेप्रत येऊन पोंचले. राजानें त्यांना आवश्यक सर्व प्रकारचें शिक्षण दिलें होतें. एके दिवशीं त्या उभयतां बंधूंनीं दिग्विजय करायला जायचें असा विचार करून त्याबद्दल बापाजवळ गोष्ट काढली. ते ह्मणाले, "बाबा, आपण आह्माला उत्तमप्रकारचें शिक्षण देवविलें,

शस्त्रास्त्रविद्येंत आह्मी तरबेज झालों आहों. तारुण्याचा तर हा ऐन बहर आहे. तेव्हां अशावेळीं वीरश्रीनें फुरफुरणारे असे हे आमचे भुजदंड घेऊन उगीच येथें माशा मारीत कसें रहावें? जो क्षत्रिय पराक्रम दाखवून दिग्विजय करित नाहीं, त्याचे ते बाहू आणि तें त्याचें तारुण्य यांला धिक्कार असो. याकरितां आपण आह्मांला दिग्विजयाला जाण्याविषयीं आज्ञा द्यावी."

अहाहा! राजा **परित्यागसेन** किती तरी धन्य आहे. पराक्रमी पुत्राच्या तोंडचीं अशीं अक्षरें ऐकण्याचें भाग्यशाली असतील त्यांच्याच नशिबीं येतें. असो. मुलांची ती विनंती ऐकून राजाला फार आनंद झाला. त्याणें त्यांची तारीफ करून दिग्विजयाला जाण्याविषयीं आज्ञा दिली. त्यांच्याबरोबर फौजफाटा व पोक्त असून कुशल असे मंत्री आणि इतर नोकर चाकर वगैरे देऊन राजानें त्यांची रवानगी केली. जातेवेळीं स्नेहपूर्वक उभयतांला आलिंगन देऊन ह्मणाला, "माझ्या शूर मुलांनो, ईश्वर तुमचें साह्य करो. तुह्मी लवकर विजयी होऊन या. विनाकारण मनुष्यांची कत्तल करूं नका. लढाई दोन प्रकारची असते. एकींत केवळ प्राण्यांचा संहार केला जातो व दुसरींत आपल्या मुख्य उद्देशावर लक्ष ठेवून जरूर असेल तितकाच प्राणिवध केला जातो. तुह्मी दुसरा प्रकार घ्या. कारण तुमचा मुख्य हेतू निरनिराळ्या राजांला जिंकावें इतकाच आहे. तो दुसऱ्या एखाद्या चांगल्या रितीनें सिद्ध होईल तर उगीच लोकांचे जीव घेऊं नका. मुलांनों, तुह्मी सुशिक्षितच आहां. योग्य असेल तेंच कराल अशी माझी खात्री आहे. ह्मणून मी अधिक कांहींच सांगत नाहीं. ईश्वर करो आणि तसें न होवो पण तुह्मांला जर कांहीं संकट पडलें; तर तुम्ही दुःख निवारण करणारी भगवति **जगदंबा** हिचें भक्तिपूर्वक स्मरण करा. तिच्याच प्रसादानें तुह्मी मला प्राप्त झालां आहांत व तीच संकटसमयीं तुमचें रक्षण करणारी आहे."

याप्रमाणें योग्य उपदेश करून, राणी **अधिकसंगमा** हिणें ज्यांच्या प्रयाणकालीं मंगलकारक विधी केले आहेत, अशा त्या पुत्रांला राजानें दिग्विजयाला पाठविलें. पुष्कळ मांडलिक राजे त्यांच्या बरोबर होते. राजानें प्रथम आपला मुख्य मंत्री, व नंतर त्या मुलाचा आजोबा झालेला **प्रथमसंगम** नांवाचा जो आपला मोठा प्रधान, त्याला राजपुत्रांच्या बरोबर पाठविला होता. बापाची आज्ञा घेऊन सैन्यासहवर्तमान ते दोघे बंधू प्रथम पूर्वदिशेकडे गेले. त्या प्रदेशांत असलेल्या राजांला जिंकून त्यांच्याकडून करभार वगैरे घेऊन ते दक्षिणेकडे निघाले. दिग्विजय करीत असतां त्यांणीं कित्येक राजांशीं मैत्री केल्यावरून ते त्यांचें साह्य करायला त्यांच्याबरोबरच निघाले. याप्रमाणें दक्षिणदिशा जिंकली व पुढें पश्चिमेकडे निघाले. या त्यांच्या स्वारींतलें वर्तमान वरचेवर ते आपल्या आईबापांला कळवीत असत. दोन दिशा पुत्रांनीं जिंकल्या हें वर्तमान ऐकून राजा **परित्यागसेन** व राणी **अधिकसंगमा** या उभयतांलाही फार आनंद झाला. प्रत्येक दिवशीं पुत्राच्या विजयाचीच खबर त्यांच्या कानावर येत होती.

याप्रमाणें त्या मुलांचा विजय बाप व सख्खी आई यांला जसा आनंदकारक झाला तसाच सावत्र आई **काव्यालंकारा** हिला अतिशय संताप देण्यास कारण झाला. त्या मुलांच्या उत्कर्षाची गोष्ट ऐकली ह्मणजे ती पिचून जात असे. करतां करतां तिणें एक युक्ति योजली. तिच्या माहेरचा एक विश्वासू नोकर तिच्या तैनातींत होता. त्याच्याकडे राजाच्या नांवानें एक पत्र देऊन, तिणें त्या मुलांबरोबर जो मुख्य सेनापति होता त्याच्याकडे पाठविलें. त्या पत्रांत असा मजकूर होता कीं; 'हे माझे दोघे मुलगे फार गर्विष्ठ झाले आहेत. ते मोठे बलवान् असल्यामुळें सर्व पृथ्वी जिंकून निर्भय होत आहेत. पुढें त्यांचा विचार असा आहे कीं, मला ठार करून माझें सर्व राज्य घ्यावें; याप्रमाणें त्या दुष्ट पोरांनीं निश्चय केला आहे, तो मला समजल्यावरून

मीं तुह्माला हें पत्र लिहिलें आहे. तर, जर तुमची माझ्यावर भक्ति असेल व माझा घात न व्हावा अशी जर तुमची इच्छा असेल तर पत्रदर्शनीं कांहीं एक विचार न करतां त्या दोघांही पोरांला ठार मारून टाकावें. याविषयीं काडीमात्र अंदेशा धरूं नये. ज्याच्या हातून माझ्या हिताचें हें काम होईल त्याला मी आपल्या राज्याचा मुख्य अधिकारी करीन."

याप्रमाणें त्या पत्रांत मजकूर होता. **काव्यालंकारेनें** वर दिलेल्या मजकुराचें पत्र एकट्या सेनापतीलाच पाठविलें होतें असें नाहीं. तर त्याच्याबरोबर जे मोठे मोठे मांडलिक राजे होते, त्यांलाही अशाच प्रकारचीं पत्रें पाठविलीं. तीं सर्व पत्रें एकाच दिवशीं त्या मनुष्यानें वांटलीं. हें काम **काव्यालंकारेनें** इतक्या बंदोबस्तानें केलें होतें कीं; इतर मनुष्यांला त्याचा मागमूस देखील लागूं नये. परराज्याशीं पत्रव्यवहार वगैरे करणाऱ्या प्रधानाचा जो मुख्य कारकून होता, त्याला पुष्कळसें द्रव्य देऊन तिणें आपलासा करून घेतला होता. त्याणें तीं पत्रें अशीं लिहिलीं होतीं कीं, तीं ज्यांच्या ज्यांच्या हातांत पडतील त्यांला त्यांला त्यांत लिहिलेलें काम करण्याविषयीं ईर्षा उत्पन्न व्हावी.

याप्रमाणें **काव्यालंकारेनें** आपल्याकडून खूप तयारी केली. पत्रें घेऊन गेलेल्या मनुष्यानें युक्तीनें त्या राजपुत्रांच्या छावणींत प्रवेश करून आपलें काम बजावलें. ज्यांला ज्यांला पत्रें दिलीं होतीं ते ते त्या उभयतां राजपुत्रांवर स्नेह करणारेच होते. तथापि ते आपसांत म्हणाले, "न जाणों राजाचा हुकूम असा व्हायचाच नाहीं असें कशावरून म्हणावें? राजनीति फार कठोर आहे. तिला आपला आणि परकीय याचा मुळींच विचार नाहीं. राजांला अवध्य कोणीच नाहीं. बाप असो किंवा मुलगा असो, तसा प्रसंग येण्याचाच काय तो अवकाश; त्याला मारण्यास कांहीं उशीर नाहीं! आपल्याला या कामांत अधिक विचार करीत बसण्याचें कांहीं कारण नाहीं. धन्याची आज्ञा मोड-

ण्यासारखी नसून त्याच्या हुकुमाप्रमाणें केलेंच पाहिजे." असा विचार करून त्या सर्वांनीं रात्रीं गुप्त रीतीनें एक सभा केली. व तींत भवति न भवति होऊन त्यांनीं निरुपायास्तव—जरी ते त्यांच्या गुणांनीं त्यांच्यावर प्रीति करीत होते तरी—राजपुत्रांला मारण्याचा निश्चय केला.

इतकी मंडळी एकेठिकाणीं जमून त्यांणीं जो हा निश्चय केला, तो बाहेर फुटल्यावांचून कसा राहील ? त्यांतूनही मोठा अनुभवीक राजकारणी मुख्य प्रधान जो **प्रथमसंगम** तो आपल्या नातवांला नेहमीं सारखा जपत होता. त्याला या गोष्टीची सहज गुणगुण समजल्यावरून त्याणें त्यांतल्याच एकाला फोडला आणि त्याचयाकडून सर्व हकीकत समजून घेतली. तरी हें सारें सावत्र आईचें कारस्थान आहे असें त्याला समजलें नाहीं. शिक्का मोर्तब व ओळखीचें अक्षर वगैरे सर्व यथास्थित असल्यावरून हें पत्र राजाचेंच असेल; असें त्यालाही वाटलें. राजेलोक प्रसंगीं पाहिजे त्याला मारायला मागें पुढें पहात नाहींत, ही गोष्ट त्याच्या अनुभावांतलीच होती. ह्मणून त्याला त्या पत्रांविषयी संशय आला नाहीं. त्याणें तत्काल आपल्या नातवांचा बचाव करण्याकरितां त्या उभयतांला एकांतीं नेऊन या घातकी मसलतीविषयीं त्यांना सर्व माहिती दिली. व "कोणाला न कळत तुह्मी उभयतांनीं येथून पळून जावें यावांचून दुसरा कांहीं उपाय नाहीं" असें त्याणें त्यांला सांगितलें.

जरी ते उभयता बंधू स्वतः मोठे शूर होते; तरी त्यांला आजोबाची मसलत हीच योग्य आहे असें वाटलें. कारण समोर लढाईला येणारांस ते हार गेले नसते. पण फौजेंतले मुख्य मुख्य अधिकारी आपल्याला मारायला टपले आहेत. तेव्हां न जाणों कोणत्या वेळीं ते आपल्यावर घाला घालतील त्याचा कांहीं नियम नाहीं. त्यांणीं अपघातानें मारलें तर आपलें काय चालणार? असें त्यांला वाटलें. ह्मणून आजोबाच्या सांगण्याप्रमाणें करण्याचा त्यांनीं निश्चय केला. **प्रथमसंगमानें** त्यां-

च्याकरितां दोन उत्तम घोडे तयार करावयास लावले. व वेषांतर करवून त्यांला गोटांतून बाहेर काढून एका नियमित ठिकाणीं ते घोडे त्यांना मिळतील असा बंदोबस्त केला आणि त्याप्रमाणें ते निघूनही गेले.

ते अपरात्रीं पळून गेले होते. कदाचित् कोणी पाठलाग करतील ह्मणून घोडे जितक्या वेगानें दवडवतील तितके त्यांनीं दवडले. त्यांना कोणीकडे जायचें? व कोणती वाट सरळ आहे? हें मुळींच ठाऊक नव्हतें. रस्ता फुटेल तिकडे धांवत सुटल्यामुळें ते चुकून सातपुड्याच्या डोंगरांत येऊन पोंचले. ते एक सारखा मार्ग क्रमीत होते. दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरपर्यंत मध्यें विश्रांती न घेतां त्यांणीं आपले घोडे चालविले. दोन प्रहरच्या समयीं तहान, भूक व रस्त्याचा श्रम यांनीं व्याकुळ झालेले त्यांचे घोडे अतिशय थकले. ह्मणून एका झाडाखालीं अंमळ विश्रांति घेण्याकरितां ते घोड्यांवरून खालीं उतरले. तों त्यांच्या पाठोपाठ त्यांचा आजोबा घोड्यावर बसून आलेला त्यांना भेटला. सुस्कारा सोडून तोही त्या झाडाखालींच एका दगडावर बसला. तिघांचेही घोडे अतिशय थकले होते; त्यांणीं धाडकन् जमिनीवर अंग टांकून तेथल्या तेथेंच प्राण सोडले. कांहीं वेळानें, क्षुधेनें आणि तृषेनें व्याकुळ झालेला तो ह्मातारा **प्रथमसंगम** हाही आपल्या नातवांच्या देखत मरण पावला!

हा दुःखकारक प्रसंग पाहून ते राजपुत्र ह्मणाले, “हायरे देवा! बाबांनीं कांहीं अपराध नसतां आह्मांला अशा दुर्दशेंत कां पाडलें. त्यांचें मन तर आमच्याविषयीं इतकें कठोर होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. त्या आमच्या सावत्र आईचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां कदाचित् त्यांणीं असें केलें असावें.” याप्रमाणें दुःखित होऊन शोक करणाऱ्या त्या उभयतां बंधूंला, त्यांच्या बापानें घरांतून निघतेवेळीं संकटकालीं देवीची प्रार्थना करण्याविषयीं सांगितलें होतें, त्याची आठवण होऊन त्यांणीं जगदंबेचा धांवा केला. तिच्या ध्यानाच्या

प्रभावानें ते दुःखापासून मुक्त झाले. शरणागताचें रक्षण करण्याविषयीं तत्पर अशा भगवतीनें त्यांची क्षुधा तृषा व श्रम हे नाहींसे करून त्यांला बळकट केलें. हावेळपर्यंत, देवीचें स्मरण केल्यानें खरोखरच आपलें संकट निवृत्त होईल किंवा नाहीं, याविषयीं त्यांना संशय होता. पण आतां प्रत्यक्ष अनुभव आल्यावरून त्यांची पूर्ण खात्री झाली. तेव्हां विंध्यपर्वताच्या अरण्यांत राहणाऱ्या देवीचें दर्शन करावें असा संकल्प करून ते तिकडेच निघाले.

विंध्यवासिनी देवीचें दर्शन घेऊन त्यांणीं तिच्यासमोर बसून तप करण्यास प्रारंभ केला. खाणें नाहीं, पिणें नाहीं, रात्रंदिवस एकाग्र मनानें भगवतीचें ध्यान करीत होत्साते ते तिचें आराधन करूं लागले. इकडे त्यांच्या छावणींतले—ज्या लोकांनीं त्यांला मारण्याचा कट केला होता ते—सगळे दुसऱ्या दिवशीं एकत्र जमून बोलतां बोलतां कांहीं तरी निमित्त काढून राजपुत्रांला मारण्याच्या बेतानें त्यांच्या तंबूंत आले. पण ते दोघे बंधु आणि त्यांचा आजोबा हे तिघेही त्यांना कोठें मिळाले नाहींत. यावरून ते पळून गेले असा त्यांणीं निश्चय केला. व त्यावरून त्यांला दुसरी एक भीतीही उत्पन्न झाली. ज्यापेक्षां तो प्रधानही पळून गेला त्यापेक्षां आपली मसलत फुटली व आतां या गोष्टीचा परिणाम फार विलक्षण होईल, असें समजून ते फार भ्याले. राणी काव्यालंकारेनें जें बनावट पत्र पाठविलें होतें तें खुद्द राजा परित्यागसेन यांचेंच आहे, अशी त्यांची पक्की समजूत होती. ह्मणून राजपुत्रांला मारण्याचा जो आपण विचार केला, तो राजाच्या हुकुमाप्रमाणेंच केला तेव्हां तो याबद्दल आपल्यावर प्रसन्नच होईल, असें ते समजत होते. त्यांना भय कायतें म्हाताऱ्या प्रधानाचें. व त्या दोघां राजपुत्रांचें होतें. ह्मणून त्यांणीं होईल तितकी त्वरा करून इरावती नगरीची वाट धरिली. रात्रीचा दिवस आणि दिवसाची रात्र करून ते त्या नगरींत येऊन पोंचले.

फौज फांटा व सरदार वगैरे आले हें ऐकून राजा परित्यागसेन मोठ्या उत्कंठेनें पुत्रांच्या भेटीची आशा करून बसला, पण ती सफळ झाली नाहीं. "मुलगे कोठें आहेत?" ह्मणून त्याणें चौकशी केली, तेव्हां त्यांणीं आपल्याला आलेलीं पत्रें राजाच्या पुढें ठेवलीं. व झालेलें सर्व वर्तमान त्याला निवेदन केलें. पत्रांत जो भयंकर मजकूर लिहिला होता तो राजाच्या कधीं स्वप्नांत देखील आला नव्हता. शिक्का मोर्तब वगैरे सर्व यथास्थित आहे अक्षरही ओळखीचें दिसतें, अशाप्रकारचीं तीं पत्रें पाहून राजाच्या अंगाचा फार संताप झाला. त्याला हें काय आहे हें मुळींच समजेना. तो म्हणाला, "हीं पत्रें मीं पाठविलेलीं नाहींत. कांहींतरी गौडबंगाल आहे. पण मूर्खांनों, तुह्माला कांहींच अक्कल नव्हती का? तुह्मी यांतला मजकूर खरा कसा मानला? एवढें देखील तुमच्या लक्षांत आलें नाहीं कीं, कित्येक दिवस उग्र तप करून मिळविलेले मुलगे मी कसे मारवीन? दुष्टांनों, तुह्मी तर त्यांला मारलेंच असतें. पण त आपल्या पुण्यानें वांचले. त्यांच्या आजोबानें आपला मसलतीपणा योग्यवेळीं उत्तमप्रकारें दाखविला. नाहीं तर तुमच्या सारख्या अविचारी राक्षसांच्या हातून त्यांचा शेवट झाला असता!"

याप्रमाणें त्या सरदारांची फजिती करून राजानें तीं पत्रें कोणीं लिहिलीं व कां लिहिलीं वगैरे गोष्टींचा तपास सुरू केला. अक्षर त्याच्या ओळखीचेंच होतें. ज्या कारकुनानें तीं पत्रें लिहिलीं होतीं त्याला प्रथम कैद करून आणण्याविषयीं हुकूम केला. पण राजाचा हुकूम होण्यापूर्वींच तो पळून गेला होता. राणी काव्यालंकारा हिच्याकडे वरचेवर बातम्या येतच होत्या. राजपुत्र पळून गेले व आपला प्रयत्न व्यर्थ झाला हें वर्तमान समजतांच तिणें त्या कारकुनाला पळून जाण्याविषयीं सूचना केली. कारण या सर्व कपटाचा खुलासा त्याच्याकडून होण्यासारखा होता. राजा परित्यागसेनानें मोठें इनाम देण्याचें प्रसिद्ध करून आपल्या कामदारांला सक्तीचे हुकूम

दिल्यावरून, त्यांणीं चहूंकडे शोध करून त्या लबाड कारकुनाला पकडून हाजर केलें. राजानें त्याला अनेक रीतीनें खोदून खोदून विचारिलें तरी तो कांहींच सांगेना. तेव्हां चवदावें रत्न दाखविलें. त्या रत्नाला मोठेमोठे ब्रह्मराक्षस, समंध व भुतें हीं देखील भितात; मग त्या बिचाऱ्या कारकुनाची कथा काय? तो तत्काल कबूल झाला. पत्रें लिहिण्यास कोणीं सांगितलें वगैरे वर्तमान त्याणें खरेंखरें निवेदन केलें. तेव्हां, जरी त्याला देहान्तशिक्षा देणें योग्य होतें तरी तसें न करतां, राजानें त्याला कैदेंत ठेवलें. राणी **काव्यालंकारा** हिच्याकडून कबूल करविण्याविषयीं फारसा प्रयास पडला नाहीं. ज्या जासुदानें तीं पत्रें नेलीं होतीं त्याच्या व कारकुनाच्या जबान्यांवरून तें कृत्य तिचें होतें असें सिद्ध झालें व त्याप्रमाणें पुढें तिणें कबूलही केलें. तसलें घातकी कृत्य करणाऱ्या स्त्रीला देहांतशिक्षा दिली असती तरी योग्यच होतें. तथापि, 'ईश्वरकृपेनें आपले मुलगे बचावले; आतां त्या स्त्रीचा जीव घेण्यांत काय अर्थ आहे? घडोघडी तिला आपल्या कर्मांचा पश्चात्ताप होण्यासारखी शिक्षा द्यावी.' असा विचार करून राजानें तिला भुयारांत घातलें. व पुत्रघातापासून प्राप्त होणारा नरक याच लोकांत तिला भोगायला लावला. उघडच आहे; पुढें परिणाम काय होईल याचा विचार न करतां केवळ द्वेषानें आंधळ्या झालेल्या बुद्धीनें एकाएकीं केलेलें जें पाप तें विपत्तीला कारण कसें बरें न होईल?

याप्रमाणें त्या दोघांला शिक्षा देऊन ज्याणें तीं पत्रें नेऊन पोंचविलीं होतीं त्यालाही शिक्षा दिली. पण ती फार सौम्य होती. कारण एकंदरींत त्याच्यावर म्हणण्यासारखा अपराध शाबीत झाला नाहीं. केवळ पत्रें पोंचविलीं एवढाच कायतो दोष. आतां ज्या सरदारांनीं राजपुत्रांला मारण्याचा निश्चय केला होता, ते तर आपल्या तोंडानेंच कबूल झाले होते. त्यांणीं सरकारी हुकूम असें समजून तो अमलांत

आणण्याचा प्रयत्न केला. स्वतः राजपुत्रांशीं त्यांचा द्वेष अथवा दुसरें कोणत्याही प्रकारचें वाईट वर्तन नव्हतें. तेव्हां त्यांच्यावर त्याबद्दल अपराध ठेवतां येईना. तथापि एकंदरींत ते मूर्ख आहेत असें समजून राजानें त्यांला बरतर्फ करून त्यांच्या जागीं दुसऱ्यांची योजना केली. याप्रमाणें सर्व चौकशी होऊन शिक्षा वगैरे द्यायच्या त्या दिल्या. आतां मुलगे व त्यांचा आजा हे कोणीकडे गेले, याच्या शोधाकडे राजाचें लक्ष्य लागलें. त्याणें निवडक व विश्वासू स्वार चहूंकडे पाठविले व आसपासच्या राजांला पत्रें लिहिलीं. येणाऱ्याजाणाऱ्यांकडे शोध करण्याचा क्रम ठेवला. तात्पर्य जितकें ह्मणून त्याच्यानें करवलें तितकें सर्व त्यानें केलें. असो.

आतां देवीचें आराधन करीत बसलेल्या राजपुत्रांचें काय झालें तें पाहूं. त्या उभयतांच्या आराधनेनें भगवती लवकरच प्रसन्न झाली. तिणें त्यांतला वडील **इंदीवरसेन** याला प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याच्या हातांत एक तरवार दिली. आणि—"ह्या खड्गाच्या प्रभावानें तूं मोठमोठ्या दुर्जय शत्रूंला जिंकशील व ज्या ज्या वेळीं जें जें तुझ्या मनांत येईल तें तें सिद्ध होईल. ह्या तरवारीच्या योगानें तुह्मी दोघेही विजयी व्हाल. तुमचे मनोरथ पूर्ण होतील." असें सांगून भगवती अंतर्धान पावली. **इंदीवरसेन** तत्काल जागा होऊन पहातो तों, एक उत्तमप्रकारची तरवार आपल्या हातांत असल्याचें त्याणें पाहिलें. तेव्हां अतिशय आनंदित होऊन तत्काल त्याणें आपल्या भावाला जागें केलें. आणि त्याला पडलेलें स्वप्न सांगून तरवार दाखवून—"आतां आपलें कार्य सिद्ध झालें," असें म्हणाला.

दुसरे दिवशीं जंगलांतलीं कंद मुळें व फळें आणून त्यांचा देवीला नैवेद्य दाखवून त्यांणीं पारणें केलें. आणि देवीला नमस्कार करून तिच्या प्रसादानें ज्यांचे श्रम व क्लेश नाहींसे झाले आहेत, असे ते **इंदीवरसेन** व त्याचा बंधू तरवार घेऊन आनंदानें तेथून निघून

गेले. बरेच दूर गेल्यावर सुवर्णमय उंचउंच घरांनीं, हीं जणुं काय मेरु पर्वताचीं शिखरेंच आहेत असा प्रेक्षकांस भास करणारें, असें एक उत्तम नगर त्यांच्या दृष्टीस पडलें. त्या शहराची शोभा पाहण्याकरितां ते उभयता बंधू वेशीच्या आंत जाण्यास तयार झाले, तों तेथें एक भयंकर राक्षस त्यांला दिसला. **इंदीवरसेन** मोठा धैर्यशाली होता. दुसरा कोणी असता तर राक्षसाला पाहतांच त्याची गाळण झाली असती. पण तो राजपुत्र धैर्यानें त्याचयाजवळ जाऊन ह्मणाला, "गृहस्था, तूं कोण आहेस? हें जरी आह्माला अगदीं माहीत नाहीं तरी तुझ्या या आकारावरून तूं मनुष्य नसावास असें वाटतें. जर कांहीं हरकत नसेल तर आपलें नांव गांव वगैरे मेहरबानी करून सांग. तसेंच हें नगर कोणाचें? याचा अधिपति कोण व त्याचें नांव काय? हें ऐकण्याची आह्मांस फार उत्कंठा आहे." हें त्या राजपुत्राचें भाषण ऐकून व त्याच्या बोलण्याची वगैरे ऐट पाहून त्याचा तिरस्कार करण्याचें राक्षसाला धैर्य झालें नाहीं. तो ह्मणाला, "तूं कोण पाहिजे तो ऐस. पण तुझें हें धैर्य पाहून मला तुझी मुरवत मोडवत नाहीं. असो; तूं विचारलेलें सांगतों तें ऐक. या शहराचें नांव **शैलपूर**. येथें **यमदंष्ट्र** नांवाचा आह्मा राक्षसांचा राजा राहत आहे. शत्रूला मर्दन करणाऱ्या त्या आमच्या राजाच्या दराऱ्यानें मनुष्य तर काय, पण देवदैत्य देखील त्याला न जुमानतां येथें येऊं शकत नांहीत."

त्या राक्षसाला असें वाटलें होतें कीं, आपण सांगितलेलें ऐकून हे मुलगे भयभीत होऊन पळून जातील. पण ते कसचे भितात! लगेच **इंदीवरसेनानें** कंबर बांधली आणि **यमदंष्ट्र** राक्षसाचा समाचार घेण्याकरितां तो शहरांत जाऊं लागला. तेव्हां—"अरे तरुण मनुष्या, आंत कशाला जातोस? आह्मी राक्षस मोठे निर्दय आहों. आह्माला मनुष्य खाणें ही एक मेजवानीच वाटते! त्यांतून तुझ्यासारखीं कोंवळीं कोंवळीं पोरें ह्मटलीं ह्मणजे तीं उंची पक्वान्नें असें आह्मी समजतों! तुह्मी या

शहरांत गेलां आणि एखाद्यानें सहज तुह्माला तोंडांत टाकलें, तर गोड पेढ्यासारखे तुह्मी त्याच्या पोटांत जाल. तेव्हां असला हा व्यापार तुह्माला कोणीं सांगितला आहे ? माझेदेखील दांत शिवशिवताहेत. जर मला तुमचा राग आला असता तर मीच तुमच्या ताज्या रक्ताचा आणि कोंवळ्या मासाचा फराळ केला असता. पण मला तुमची दया येते. तर आतां कृपा करून मुकाट्यानें येथून चालते व्हा. नाहीं तर उगीच प्राणांला मुकाल. ते पहा आमचे जमादार साहेब येताहेत. त्यांला कोंवळीं कोंवळीं पोरें खाण्याची फारच गोडी लागली आहे ! तर तुह्मी जातां किंवा नाहीं तें सांगा. नाहीं तर माझ्या तोंडचा गोड घांस दुसराच कोणी तरी घेऊन जाईल !"

इंदीवरसेनानें राक्षसाला मुळीं उत्तरच दिलें नाहीं. तो त्याला न जुमानतां आंत शिरूं लागला. तेव्हां तो राक्षस पुढें आडवा उभा राहिला. इंदीवरसेनानें त्याला फार वेळ तसें तिष्ठत ठेवलें नाहीं आपल्या तरवारीचा असा एक सपाटा मारला कीं, त्याबरोबर त्याचें विशाल डोकें खालीं पडलें. त्याची अशी अवस्था होतांच त्याच्याजवळ जे दुसरे राक्षस होते ते पळत सुटले. नंतर राजपुत्र बंधूसहवर्तमान तसाच पुढें शहरांत गेला. दरवाजावरच्या राक्षसाला मारल्याचें वर्तमान हां हां ह्मणतां जिकडे तिकडे पसरलें. ज्याला इंदीवरसेनानें मारलें होतें, तो मोठा शूर म्हणून त्यांच्यांत नांवाजलेला होता. त्याचें जेव्हां याणें डोकें उडविलें तेव्हां हे मुलगे मोठे विलक्षण प्राणी आहेत, असें समजून इतर राक्षसांनीं त्यांच्यावर हल्ला केला नाहीं. इंदीवरसेन मोठ्या ऐटीखालीं राजवाड्यांत येऊन पोंचला. तेथें तो निशाचरांचा राजा यमदंष्ट्र सिंहासनावर बसला होता. नांगरासारख्या बाहेर आलेल्या दाढांनीं ज्याचें तोंड भयंकर दिसत आहे, व डाव्या बाजूला त्याची सुंदर स्त्री जवळ बसली आहे, व उजव्या बाजूला एक दिव्य मुलगी बसली आहे आणि सभोंवतीं मोठमोठे भयंकर राक्षस बसले

आहेत, असा तो थाठ पाहून इंदीवरसेनाला मोठा चमत्कार वाटला. त्या दोघी स्त्रिया वणव्यांत मोगरीच्या वेली असाव्या त्याप्रमाणें तेथें दिसत होत्या. तो धीट राजपुत्र आसपासचे लोक नको नको ह्मणत असतां एकदम सभेंत गेला. आणि त्या राक्षसाला खूप राग येईल अशा प्रकारें त्याची निंदा करून त्याणें त्याला युद्धाला बोलाविलें.

आधींच तो मोठा बलाढ्य राक्षस, त्यांतूनही सर्वांचा राजा. बायको आणि बहीण यांच्या देखत यःकश्चित् मनुष्याच्या पोरानें असा पाणउतारा केलेला त्याला कसा सहन होईल?—"दुर्दैवी पोरा, अरे विनाकारण दिव्यावर टोळ जळून जातो त्याप्रमाणें तूं माझ्या सामर्थ्यांत भस्म होणार आहेस! तुला अशी दुर्बुद्धी कां आठवली? अद्याप नीट विचार कर. तुझी मला फार दया येते. जरी तूं माझा अपमान केला आहेस तरी तुझ्या पोरपणाकडे पाहून मी क्षमा करतों." इत्यादि प्रकारें बोलून त्याणें इंदीवरसेनाचे हातपाय गळविण्याचा प्रयत्न केला; पण तो पुनः पुन्हां गर्जनाच करूं लागला. तेव्हां अतिशय संतापून तो लढाईला आला. देवीच्या वरदानाच्या प्रभावानें तशा त्या प्रचंड राक्षसाच्यानें देखील इंदीवरसेनाला मारवलें नाहीं. त्या राजपुत्रानें बराच वेळ युद्ध करून आपल्या तरवारीनें राक्षसराजाचा मस्तक तोडला. तरी क्षणमात्रानें पुन्हां जशासतसा तो उत्पन्न झाला. हा चमत्कार पाहून चकित झालेल्या राजपुत्रानें पुन्हां तोडला. तरी पूर्वींप्रमाणेंच उत्पन्न झालेला पाहून ही कांहीं तरी राक्षसी माया आहे, असें त्याला वाटलें. किती वेळ डोकें तोडलें तरी पुन्हां उत्पन्न होतें याचें कारण काय? हें न समजल्यामुळें तो मोठ्या विवंचनेंत पडला.

देवता ज्याचें साह्य करायला तयार झालेल्या असतात, त्याला सर्व कांहीं अनुकूल होतें. त्या राक्षसाच्या उजवीकडे बसलेली कुमारिका इंदीवरसेनाला पाहून त्याच्यावर अनुरक्त झाली होती. तो विचारांत पडला आहे हें तिच्या लक्षांत येतांच त्या राक्षसाचें जें कांहीं वर्म

होतें तें तिणें त्याला खुणेनें सुचविलें. तेव्हां आपलें काम झालें असें समजून त्याणें पुन्हा यमदंष्ट्राचें डोकें तोडलें व लगेच त्या शिराचे दोन तुकडे केले. अर्थात् पूर्वीप्रमाणें पुन्हां मस्तक उत्पन्न झालें नाहीं. हेंच त्याचें वर्म होतें तें समजल्यामुळें इंदीवरसेनाला त्याला मारतां आलें. तो राक्षस मरतांच त्याच्याजवळ बसलेल्या दोघी स्त्रिया आनंद पावल्या. त्यांणीं बंधूसहवर्तमान इंदीवरसेनाला मोठ्या सत्कारानें, तो यमदंष्ट्र ज्या आसनावर बसत होता त्यावरच बसविलें. आणि त्याचा वृत्तांत समजून घेण्याविषयीं आपली इच्छा प्रगट केली. तेव्हां तो ह्मणाला, "ह्या अशा अप्रतिम नगरांत शहराचा बंदोबस्त ठेवणारे फारसे लोक मला दिसले नाहींत हें काय? जो आमच्या हातानें मेला तो एक द्वारपाल मात्र दिसला. आंत पाहिलें तों हा आतांच मेलेला राक्षस व त्याच्याजवळ कांहीं थोडे लोक प्रथम दृष्टी पडले होते; पण मी त्याला मारलें, तेव्हां त्यांनीं मला मुळींच हरकत केली नाहीं, आणि आतां ते कोठें दिसतही नाहींत. तुह्मी दोघी स्त्रिया ह्या राक्षसाजवळ कशा आलां? आणि याला मारल्यामुळें तुह्मी इतक्या खुष झालां त्या कां? हें सर्व ऐकण्याची माझी इच्छा आहे."

हें ऐकून त्या दोघी स्त्रियांतून जी कुमारी होती ती ह्मणाली, "महाभागा, या नगराचें नांव शैलपूर हें कदाचित् तुह्माला समजलें असेल. येथें वीरभुज नांवाचा राजा पूर्वीं होता. ही माझ्या शेजारीं जी बसली आहे ती त्या राजाची पट्टराणी. हिचें नांव मदनदंष्ट्रा. ज्याला आपण आतां मारलें, त्याचें नांव यमदंष्ट्र. त्या राक्षसानें येथें येऊन हिचा पति राजा वीरभुज याला खाऊन टाकलें. नंतर त्या राजाचा जो कांहीं परिवार होता, तो सर्व त्या काळानें नाहींसा करून टाकला. हिची देखील तीच अवस्था झाली असती. पण हिचें सौंदर्य पाहून तो हिच्यावर फिदा झाला यामुळें त्याणें ही मदनदंष्ट्रा आपली भार्या केली. नंतर या रम्य नगरांत—सर्वांचा नाश करून

अगदीं एकांत झाल्यामुळें—तो हिच्यासहवर्तमान यथेच्छ क्रीडा करीत होता. हें सर्व नगर व यांतील लहानमोठ्या वस्तू त्याणें आपल्या मायेच्या सामर्थ्यानें सुवर्णमय केल्या. त्याच्याबरोबर पुष्कळ राक्षस होते. पण त्या सर्वांला या शहरांत राहण्याचा हुकूम नव्हता. आतां जे कांहीं राक्षस आपल्याला दिसले ते, आज त्याचा जन्मदिवस होता, ह्मणून केवळ उत्सवाच्या निमित्तानें आले होते. तसेंच वेशीच्या आंत आल्यावर आपल्याला वाटेंत पुष्कळ स्त्रिया व पुरुष दिसले असतील, पण तेही याच निमित्तानें आले होते. यावेळीं आपण बाहेर जाऊन पहाल, तर एक देखील दिसावयचा नाहीं!

आतां माझ्याविषयींची माहिती सांगतें. माझें नांव खड्गदंष्ट्रा. मी या राक्षसाची धाकटी बहीण. जरी मी राक्षसकुलांत उत्पन्न झालें आहें तरी त्यांच्यासारखी मी तामसी नाहीं. आपली मनोहर मूर्ति पाहून तत्काल माझ्या मनांत, तरुण व मनाजोगत्या पुरुषाला पाहून वयांत आलेल्या कुमारिकांच्या मनांत जो एक विशेष विकार उत्पन्न होतो तो सहज झाला यांत आपल्याला अयोग्य वाटायचें नाहीं. जरी ही मदनदंष्ट्रा या राक्षसाची बायको झाली होती, तरी आपल्या इच्छेनें त्याला अनुसरली नव्हती. निरुपायास्तव तिला तसें करणें भाग पडलें होतें. स्त्रिया आपल्याशा करून घ्यायच्या झाल्या तर त्यांला प्रेमानेंच बद्ध केल्या पाहिजेत. जबरीचा किंवा अधिकाराचा तेथें कांहीं उपयोग नाहीं, हें आपल्याला माहीत असेलच. तेव्हां अर्थात् ही मदनदंष्ट्रा मनापासून त्याला चाहत नसल्यामुळें, त्याला मेलेला पाहून खूष झाली. मी त्याची बहीण तेव्हां मला त्याच्या मरणाबद्दल दुःख झालें असतें; पण त्याचा तो उग्र स्वभाव मला मनापासून आवडत नव्हता. त्याला शांत करण्याबद्दल मी आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. भाऊ असला ह्मणून काय झालें? त्याची वर्तणूक जर भयंकर असली

व ती आवडत नसली, तर बहिणीचें प्रेम त्याच्यावर कसें बसेल? मला तो दृष्टीसमोर देखील नको होता; तरी त्याला सोडून दुसरीकडे जाण्याचें माझें धैर्य झालें नाहीं. व तसें केलें तर तो कदाचित् मलाही खाऊन टाकील असें भय होतें, ह्मणून मी त्याच्याजवळच दिवस काढले. त्या दुष्टाचा कोणत्याही रीतीनें नाश झाला तर बरें होईल, असें माझ्या मनांत घोळत होतें. आपण त्याला खचित माराल असें वाटल्यावरून मीं आपल्याला खुणेनें युक्ती सांगितली. व तो मेला ह्मणून मला फार आनंद झाला. ही आह्मा दोघींची हकीकत. आतां मीं आपलें शरीर तुमच्या पायांवर अर्पण केलें आहे. आर्यपुत्र, प्रेमानें दिलेली अशी ही खड्गदंष्ट्रा आपल्या चरणांची दासी आहे असें समजून हिला हातीं धरावी."

याप्रमाणें खड्गदंष्ट्रेनें सांगितलें तें ऐकून तिच्या प्रेमानें बद्ध झालेल्या इंदीवरसेनानें तत्काल गांधर्वविधीनें तिचा स्वीकार केला. नंतर ते उभयतां बंधू त्याच नगरींत राहिले. देवीनें दिलेल्या तरवारीच्या प्रभावानें जी वस्तू त्यांणीं मनांत चिंतन करावी, ती तत्काल त्यांला प्राप्त होत होती. याप्रमाणें त्या राक्षसकन्येच्या विलासांत मग्न झालेल्या इंदीवरसेनाचे पुष्कळ दिवस तेथें गेले. एके दिवशीं त्याला आपल्या घराकडील आठवण झाली. आपल्या आईबापांची कशी काय अवस्था झाली आहे ती कळावी असें त्याच्या मनांत आलें. पण ती सांगणारा तेथें कोणीच नव्हता. तेव्हां त्याणें आपला बंधु अनिच्छासेन याला पाठविण्याचा विचार केला. देवीचें स्मरण करतांच तिच्या कृपेनें, आकाशमार्गानें हवें तिकडे जाणारें विमान तत्काल त्याच्याजवळ आलें. त्या विमानांत आपल्या पराक्रमी बंधूला बसवून क्षेमसमाचार घेऊन येण्याकरितां त्याणें त्याला बापाकडे पाठविलें. तें विमान क्षणमात्रांत हजारो कोस जाणारें होतें. बापाची भेट घेण्याचा संकल्प करून अनिच्छासेनानें विमानाची प्रेरणा केली.

तेव्हां तें लौकरच इरावती नगरींत येऊन पोंचलें. तें विमान एकीकडे ठेवून अनिच्छासेन अकस्मात् आपले मातापितर ज्या ठिकाणीं होते, त्या ठिकाणीं एकाएकीं प्रकट झाला. उन्हानें जसा चकोर पक्षी त्या-प्रमाणें, विरहानें संतप्त झालेल्या आईबापांला चंद्रासारखें त्याचें दर्शन सुखकर झालें. तो लवकर लवकर जाऊन त्यांच्या पायांवर पडला. त्या उभयतांनीं वरचेवर त्याला पोटाशीं धरून इतक्या दिवसाचें वियोग दुःख शांत केलें. त्यांनीं विचारल्यावरून वडील बंधूचें कुशल सांगून त्यांची चिंता त्यानें दूर केली.

राजा **परित्यागसेन** याला **काव्यालंकारेनें** घातक मसलत केलेली पूर्वींच समजली होती. तरी **अनिच्छासेनाकडून** त्याणें पुन्हां सर्व हकीकत ऐकली. तेव्हां एकाएकीं मोठें संकट प्राप्त झालें, तरी त्याचा परिणाम सुखकारक झाला, हें ऐकून आईबापांला फार आनंद झाला. **इंदीवरसेनावर** देवीनें अनुग्रह केला व त्याणें मोठ्या पराक्रमानें त्या राक्षसाला मारलें आणि **खड्गदंष्ट्रेसारखी** स्त्री त्याला मिळाली या सर्व गोष्टी ऐकून राजा **परित्यागसेन** अतिशय हर्षित झाला. ज्या सावत्र आईनें ही मसलत केली होती तिला तिच्या दुष्टपणाचें फळ कसें कसें प्राप्त झालें हें वृत्त ऐकून **अनिच्छासेनाला** फार वाईट वाटलें. नंतर लोकांनीं ज्याचें विशेष गौरव केलें आहे व आईबापांनीं ज्याच्यावर प्रेमरसाची वृष्टी केली आहे, असा **अनिच्छासेन** फार संतोषानें राहूं लागला. वडील बंधु **इंदीवरसेन** दूरच्या प्रदेशांत एकटाच होता; तरी त्याच्याबद्दल कांहीं काळजी करावयास नको असें समजून तो स्वस्थ होता. याप्रमाणें कांहीं दिवस गेल्यावर एका रात्रीं त्याला वाईट स्वप्न पडलें. त्यावरून बंधूवर कांहीं तरी अनिष्टाचा प्रसंग आला असावा अशी शंका आल्यावरून तो त्याला भेटण्याविषयीं उत्कंठित होऊन बापाला ह्मणाला, “ बाबा, आतां मी जातों. आईची आणि तुमची फार उत्कंठा आहे असें सांगून मी दादाला लौकर इकडे

घेऊन येतों. तो एकटाच तिकडे आहे हें मला बरें वाटत नाहीं. तर तिकडे जाण्याविषयीं मला आपण आज्ञा द्यावी."

इंदीवरसेनाला भेटण्याविषयीं तीं उभयतां फार उत्सुकच होतीं. ह्मणून त्यांनीं अनिच्छासेनाला तिकडे जाण्याविषयीं तत्काल आज्ञा दिली. तेव्हां पूर्वींप्रमाणें आपल्या विमानांत बसून तो आकाशमार्गानें लौकर शैलपुरांत आपल्या बंधूजवळ प्राप्त झाला. तो शैलपुरांत पोंचला त्यावेळीं मध्यरात्रीचा समय झाला होता. बंधूला आतांच भेटावें असें जरी त्याच्या मनांत होतें, तरी ती अपरात्रीची वेळ असून नवराबायको कदाचित् आपल्या आनंदांत असतील, ह्मणून त्याणें ती रात्र बाहेरच्या बाहेरच काढून सकाळीं त्यांच्या महालांत प्रवेश केला. स्वप्नें हीं बहुत करून पुढें होणाऱ्या शुभाशुभ गोष्टींचीं सूचक असतात. अनिच्छासेनाला जें वाईट स्वप्न पडलें होतें, त्यावरून तो आधींच साशंक झाला होता व त्याप्रमाणेंच घडूनही आलें. तो महालांत गेला त्यावेळीं इंदीवरसेन अगदीं बेशुद्ध होऊन पडला आहे व खड्गदंष्ट्रा आणि मदनदंष्ट्रा दोघी स्त्रिया त्याच्याजवळ बसून रडताहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां घाबरा होऊन त्याणें त्या स्त्रियांला—'असें होण्याचें कारण काय?' ह्मणून विचारिलें. त्यावरून मोठ्यानें ओरडून मदनदंष्ट्रा ह्मणाली, "दुसरें काय कारण असणार! या अवदसेनें (खड्गदंष्ट्रेनें) असा घात केला. जळो मेलीचें पोट भाजलं तें! चांडाळणीला दयामाया ह्मणून एवढीदेखील नाहीं!"

हें ऐकून अनिच्छासेनाला अधिकच संशय आला. त्याणें खड्गदंष्ट्रेला—'काय झालें?' ह्मणून विचारिलें. तेव्हां ती खालीं तोंड घालून दीन होऊन ह्मणाली, "मी मोठी अपराधी आहें. माझ्या हातूनच अशी वाईट गोष्ट घडली. तुह्मी येथून निघून गेलां तेव्हां आह्मी दोघीजणी आणि हे (इंदीवरसेन) मोठ्या आनंदांत होतों.

एकेदिवशीं मी आंग धुवायला गेलें, आणि ही द्वाड (मदनदंष्ट्रा) त्यांच्या जवळ होती, तितक्यांत हिणें त्यांना भुरळ पाडली. मला हें आधींच ठाऊक होतें. ही बया मोठी चंचल आहे ह्मणून मी आर्यपुत्राला सोडून क्षणभर देखील दुसरीकडे जात नव्हतें; पण त्यादिवशीं माझी अक्कल कोठें गेली कुणास ठाऊक! मी गेल्यामुळें एकांत मिळाला आणि तेवढ्यांत हिचें आणि त्यांच सख्य जमलें! मी आंग धुवून आलें तों, ह्या दोघांचें तें कृत्य माझ्या पाहण्यांत येतांच माझ्या अंगाची लाही झाली ती सांगतां पुरवत नाहीं. मला तुह्मी आतां पाहिजे तें ह्मणा व हवे तितके दोष द्या; पण माझ्यानें तें पाहवलें नाहीं यांत माझा कांहीं दोष नाहीं. तुह्मीच विचार करा. बरें, आपल्या नवऱ्याचें तसें वर्तन बायकोला प्रत्यक्ष पहावेल काय? मी हिची (मदनदंष्ट्रेची) खरवड काढली तेव्हां हातापायांपडून मला शांत करण्याचा हिनें प्रयत्न केला व आर्यपुत्रांनींही माझी पुष्कळ समजूत केली; तरी तो राग गेला नाहीं. ज्याचें कोणाच्याही हातून उल्लंघन व्हायचें नाहीं अशा मेल्या दैवानेंच मला त्यावेळीं प्रेरणा केली. मी खरें खरें सांगतें, तुमच्या बंधूवरचें प्रेम नाहींसें होऊन मला त्याच्याबद्दल मोठी ईर्षा उत्पन्न झाली. तिणें मोहित झाल्यामुळें मीं आपल्या मनांत असें ह्मटलें कीं, 'मी सर्वस्वीं आपलें शरीर, घरदार, वगैरे सर्व याला वाहिलें असून हा पुरुष माझी पर्वा न ठेवतां दुसऱ्या स्त्रीशीं रत होतो. तेव्हां असें त्याला वाटतें याचें कारण तरी काय? याच्याजवळ मोठें ऐश्वर्य नाहीं किंवा दुसरें कांहीं एक नाहीं, आणि असें असून हा इतका बेपर्वा आहे तेव्हां ह्या तरवारीच्या जोरावरच तो असा वागत असेल. त्याचा हा गर्व काय तो ह्या तरवारीच्या जोरावर आहे; तर तीच नाहींशी करून टाकावी ह्मणजे हा मऊ येईल!' असें समजून मी रात्रीं हा निजला असें पाहून ती तरवार आगींत टाकली. त्यामुळें तीवर जिकडेतिकडे डाग पडले व ती खराब झाली. तिकडे तरवारीची तशी

दशा झाली व इकडे यांची अशी दशा झाली. मी रागाच्या भरांत असें केलें तरी आतां मला त्याचा फार पश्चात्ताप झाला आहे. या **मदनदंष्ट्रेनें** माझ्यावर तेव्हांपासून शिव्याशापांचा जो वर्षाव केला आहे त्याणें मी अर्धमेली झालें आहें. सांप्रत ही (**मदनदंष्ट्रा**) आणि मी एकाच स्थितींत आहों. आह्मी दोघींनींही आतां मरणाचा निश्चय केला आहे. कोणत्या उपायानें मरावें याविषयीं विचार करीत असतां तुह्मी येथें पोंचला. आतां फार चांगलें झालें. हीच तरवार कृपा करून तुह्मी हातांत घ्या आणि तिच्यासारखें कठोर कर्म करणाऱ्या व आपल्या मूळच्या ह्मणजे राक्षसी वर्णावर गेलेल्या मला आतांच्याआतां मारून टाका!"

भावजईनें सांगितलेली ही हकीकत ऐकून **अनिच्छासेनाला** प्रथम तिचा फार राग आला होता, तरी तो आतां नाहींसा झाला. तिणें दिलेली तरवार त्याणें हातांत घेतली. जरी ती आपली मान पुढें करून "मला मारा, मला मारा" ह्मणत होती, तरी कृतकर्माचा पश्चात्ताप झाल्यामुळें **खड्गदंष्ट्रा** निरपराधी आहे असें त्याला वाटलें. अशा स्थितींत वांचून तरी काय करायचें आहे? असें समजून त्याणें ती तरवार आपल्याच मानेवर ठेवली. तो आतां गळा कापून घेणार! इतक्यांत आकाशवाणी झाली. ती अशी कीं; "अरे राजपुत्रा, असें भलतेंच करूं नकोस. हा तुझा वडील बंधु खरोखर मेला नाहीं. आपण दिलेल्या तरवारीची तशी अवज्ञा झाली ह्मणून देवीनें त्याला मोहित केलें आहे. या **खड्गदंष्ट्रेलाही** तूं अपराधी समजूं नकोस. शापामुळें मनुष्यलोकांत अवतार धारण करणाराचें वर्तन असेंच चमत्कारिक असतें. ही **खड्गदंष्ट्रा** आणि ही **मदनदंष्ट्रा** ह्या दोघीही पूर्वजन्मींच्या तुझ्या भावाच्या बायकाच आहेत. आणि यांत अपराध कोणाचाही नाहीं. भाऊ सावध होण्याकरितां तूं देवीची प्रार्थना कर. ह्मणजे तुझा इच्छित हेतु पूर्ण होईल."

याप्रमाणें आकाशवाणी झालेली ऐकून **अनिच्छासेन** आत्मघातापासून निवृत्त झाला; आणि भावाला उठविण्याकरतां, ज्या विमानांत बसून तो आला होता त्याच विमानांत बसून तो तत्काल **विंध्यवासिनी** देवीचें दर्शन घेण्याकरितां गेला. तेथें, आगींत टाकल्यामुळें खराब झालेली ती तरवार देवीच्या पायांवर ठेवून त्याणें यथाविधि तिची पूजा केली. आणि दृष्टांत होईपर्यंत कांहीं खायचें नाहीं व बसलेल्या जाग्यावरूनही उठायचें नाहीं, असा दृढ नियम धरून तो देवीपुढें बसला. तीन दिवस झाले, तरी देवी प्रसन्न झाली नाहीं असें पाहून त्याणें आपलें शिर तिच्या पायांवर अर्पण करायचें असा निश्चय केला व त्याप्रमाणें तो मस्तक अर्पण करण्यास सिद्ध झाला. इतक्यांत पूर्वींप्रमाणें पुनः आकाशवाणी झाली. "मुला, असें साहस करूं नको. जा तुझा बंधु जीवंत होईल व ती मळीण झालेली तरवारही निर्मळ होईल. तुझ्या भक्तीनें मी प्रसन्न झालें आहें. आतां विलंब करूं नकोस. लवकर जाऊन आपल्या भावाला उठीव."

ही दिव्य वाणी ऐकून **अनिच्छासेन** तत्काल तेथून उठला वं पाहतो तों तरवार पूर्वींप्रमाणें चकचकीत झाली. तेव्हां देवीला नमस्कार करून त्याणें तरवार हातीं घेतली व प्रदक्षिणा करून तो, जणूं काय आपला मनोरथच अशा त्या दिव्य विमानांत बसून, भावाच्या भेटीविषयीं उत्सुक झाला होत्साता, पुन्हां **शैलपुरांत** आला. तेथें आंत जाऊन पाहतो तों देवीच्या वरदानानें **इंदीवरसेन** पूर्वींप्रमाणें सावध झाला असून बायकांबरोबर खुशाल विनोद करीत आहे असें त्याणें पाहिलें. **अनिच्छासेनाला** पाहतांच **इंदीवरसेन** लगबगीनें पुढें जाऊन त्याणें त्याला मिठी मारली. उभयतांचे यथायोग्य नमस्कार व आशीर्वाद झाले. नंतर त्या दोघीही स्त्रिया—"भावोजी, आज कृपा करून तुह्मी आह्माला चुडेदान केले; तुमचे उपकार किती तरी वर्णन करावे!" याप्रमाणें बोलल्या व त्यांणीं **अनिच्छासेनाचे** पाय धरले. नंतर **इंदीव-**

**रसेनानें** विचारल्यावरून **अनिच्छासेनानें** झालेला सर्व प्रकार त्याला सांगितला. आईबापांचा क्षेमसमाचार व सावत्र आईचें भयंकर कृत्य ऐकून **इंदीवरसेनाला** संतोष व दुःखही झालें. नंतर **खड्गदंष्ट्रा** आणि **मदनदंष्ट्रा** या दोघींनीं काय केलें तेंही त्याणें त्याला सांगितलें. तें ऐकून **इंदिवरसेनानें खड्गदंष्ट्रेवर** राग केला नाहीं. तो ह्मणाला, "बायकांचा असा दुस्वासी स्वभाव असतोच." **अनिच्छासेनानें** त्याला सावध करण्याविषयीं जो यत्न केला, तो ऐकुन **इंदीवरसेनाला** फार आनंद झाला. नंतर आईबाप आपल्या भेटीविषयीं फार उत्कंठित झाले आहेत, असें भावानें सांगितल्यावरून **इंदीवरसेनानें** त्या दोघी स्त्रिया व **अनिच्छासेन** यांना बरोबर घेऊन, ध्यान करतांच प्राप्त झालेल्या विमानांत बसून **इरावती** नगरीकडे प्रयाण केलें. आपल्या राजधानीजवळ येऊन पोंचतांच बायका व बंधू यांसह खालीं उतरून त्याणें विमानाला निरोप दिला. नगरवासी लोकांला, तें त्यांचें कृत्य पाहून हे देव आहेत किंवा देवपुत्र आहेत, असें वाटलें. उघडच आहे. ध्यान करतांच विमान येणें व त्यांत बसून इच्छेप्रमाणें पाहिजे तिकडे जाणें या गोष्टी मनुष्याच्या हातून मुळींच होण्याचा संभव नाहीं.

**इंदीवरसेन** लोकांला आनंद देत होत्साता थेट राजवाड्यांत गेला. तेथें आपल्याविषयीं चिंता करीत बसलेल्या मातापितरांचे त्यानें पाय धरले. अश्रुधारांनीं ज्याचें मुख धुतलें आहे असा तो त्यांच्यापुढें हात जोडून उभा राहिला. स्त्रिया व बंधूसहवर्तमान एकाएकीं आलेल्या **इंदीवरसेनाला** पाहून, वणवा लागलेलें अरण्य उदकवृष्टीनें किंवा मेलेला प्राणी अमृतवृष्टीनें, टवटवीत व्हावा त्याप्रमाणें राजा व राणी हुषार झाले. दोघी सुनांनीं सासूसासऱ्यांला नमस्कार केला. त्यांला पाहून सर्वांला फार आनंद झाला. त्या सुनांचा पूर्वींचा वृत्तांत ऐकून त्यांतून एकीविषयीं ह्मणजे **मदनदंष्ट्रे**विषयीं आईबापांला बरेंसें वाटलें नाहीं. कारण ती प्रथम **वीरभुज** राजाची बायको होती. नंतर **यमदंष्ट्र**

राक्षसाच्या आश्रयाखालीं राहिली व पुढें पुष्कळ दिसांनीं तिणें आपल्या मुलग्याचा आश्रय केला. तेव्हां एकंदरींत ती चांगली नाहीं, असें त्यांना वाटलें. पण अनिच्छासेनानें—"आकाशवाणी झाली. त्या दोघीही पूर्वजन्मींच्या इंदीवरसेनाच्याच बायका होत्या. शापानें त्यांची अशी स्थिती झाली आहे," ह्मणून सांगितलें. तेव्हां राजा व राणी यांचें मन शुद्ध झालें. पुत्रांची एकेक अलौकिक कृत्यें ऐकून त्यांला फार आनंद झाला. उघडच आहे. विमानांतून जाणारा, यमदंष्ट्रासारख्या राक्षसाला मारणारा व सुवर्णाच्या नगरीचा उपभोग घेणारा, अशाप्रकारच्या आपल्या पुत्राला पाहून कोणाला कृतकृत्यता वाटणार नाहीं ?

याप्रमाणें लहानपणींच जें दुःख प्राप्त झालें, त्याचा देवीच्या कृपेनें परिहार करून ते उभयता बंधू आईबापांचा आनंद वाढवीत होत्साते सुखानें राहूं लागले. इंदीवरसेन परत घरीं आला होता तरी त्याचा मूळचा इरादा अद्याप त्याच्या मनांतून गेला नव्हता. फार दिवसांनीं आपण आलों आहों तेव्हां इतक्यांतच आज्ञा मागावी तर आईबापांला वाईट वाटेल, ह्मणून त्याणें कांहीं दिवस जाऊं दिले. नंतर एके दिवशीं महादिग्विजयाला जाण्याबद्दल त्याणें आईबापांजवळ गोष्ट काढिली. जे शहाणे मातापितर असतात ते—मुलगा खुळावेडा कसाही असो, त्यानें सारावेळ आपल्याजवळ असावें, असें मनांत आणीत नाहींत. जरी त्यांना मुलांनीं डोळ्याआड जाणें हें दुःखकारक वाटतें तरी त्यांणीं आपलें कर्तव्य करावें अशी त्यांची इच्छा असते. इंदीवरसेनानें दिग्विजयाला जाण्याविषयीं विनंती केली, तेव्हां राजानें मोठ्या संतोषानें त्याला आज्ञा दिली. व "दिग्विजयी होऊन लवकर परत या;" असें सांगून उभयता मुलांची पुनः रवानगी केली.

इंदीवरसेन हा देवीच्या कृपेनें अलौकिक योद्धा झाला होता. तो तरवार घेऊन उभा राहिला ह्मणजे त्याच्यापुढें कोणाचाच टिकाव

लागत नव्हता. तो अनुक्रमानें एकेक राजाला जिंकीत जिंकीत चारही दिशा जिंकून पार झाला. प्रथम प्रथम कांहीं ठिकाणीं निकराच्या लढाया झाल्या; पण पुढें त्याच्या पराक्रमाचा दरारा ऐकून, जेथें जेथें तो गेला तेथें तेथें करभार देऊन राजेलोकांनीं त्याचें मांडलिकत्व आपण-होऊन कबूल केलें. निरनिराळ्या ठिकाणच्या उत्तम उत्तम वस्तू, अपरंपार द्रव्य, चांगले चांगले गुणी लोक वगैरे घेऊन; हत्ती, घोडे व रथ यांच्या चालण्याच्या धुरळ्यानें सूर्याला देखील झांकून टाकीत होत्साता तो परत आपल्या नगराकडे यायला निघाला. जेथें भयाचें नांव देखील नाहीं अशा इरावती नगरींत प्रवेश करून वडील, मातोश्री, मोठमोठे कामदार व आप्त इष्टमित्र वगैरे सर्वांनीं ज्याचा बहुत सन्मान केला आहे व ज्याणें मोठ्या नम्रपणानें लोकांच्या आशीर्वादाला व विश्वास, महत्व आणि कीर्ति यांला आपणाला पात्र करून घेतलें आहे, असा तो विजयी इंदीवरसेन बंधूसहवर्तमान परत राजवाड्यांत प्राप्त झाला. राणी अधिकसंगमा हिला पुत्रांचा उत्कर्ष पाहून काय वाटलें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. नंतर पुत्रा-बरोबर आलेले मोठमोठे सरदार व राजे यांचा उत्तम पाहुणचार करून राजानें सत्कारपूर्वक त्यांना आपापल्या ठिकाणीं जाण्यास निरोप दिला.

याप्रमाणें सर्व पृथ्वीचें राज्य मिळवून इंदीवरसेनानें तें आपल्या बापाच्या हवालीं केलें. जो राजा परित्यागसेन यापूर्वी सामान्य राजांत गणला जात होता तोच आतां मोठा सार्वभौम झाला. जणूं काय त्याचें अवतारकृत्यच सरलें, ह्मणूनच इंदीवरसेनाला आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें. त्याबरोबर त्याची एका एकीं स्थिती पाल-टली. निजलेला पुरुष जागा झाला ह्मणजे पूर्वीं केलेल्या कृत्यांची जशी त्याला आठवण होते; तद्वत् त्या राजपुत्राला पूर्वजन्मींच्या सर्व गोष्टींचें स्मरण झालें! नंतर तो बापाला ह्मणाला, “ताता, काय असेल तें असो. मला यावेळीं पूर्वजन्माचें स्मरण झालें आहे. त्यावेळच्या

सर्व गोष्टी यावेळीं मजपुढें जणुं उभ्या राहिल्या आहेत. आतां मी सांगतों तें आपण ऐकून घ्या. **हिमाचलाच्या** शिखरावर **मुक्तापुर** नांवाचें एक नगर आहे. व तेथें **मुक्तावेग** नांवाचा विद्याधरांचा राजा आहे. **कंबुवती** नामक त्याच्या राणीच्या पोटीं **पद्मवेग** आणि **रूपवेग** असे उत्तम गुणवान् दोन पुत्र झाले. त्यांतून **पद्मवेगाला** **आदित्यप्रभा** नांवाची विद्याधरराजाची कन्या प्रेमपूर्वक आपणच वरिती झाली, हें समजून तिची **चंद्रवती** नांवाची सख्खी बहीण होती तीही कामपीडित झाली आणि तिणें आपण होऊन **पद्मवेगाला** वरलें.

याप्रमाणें **पद्मवेगाच्या** दोघी स्त्रिया झाल्या. पण त्या नेहमीं एकमेकींचा द्वेष करीत यामुळें तो फार दुःखित झाला होता. त्याची मुख्य स्त्री **आदित्यप्रभा** ही मोठी कजाग बायको होती. तिला आपल्या सवतीचा फारच द्वेष होता. ती सवतही कमी नव्हती; अर्थात् एकमेकींविषयीं ईर्षा धारण करणाऱ्या त्या दोघींचें दररोज भांडण होत असे. तें ऐकून ऐकून **पद्मवेग** फार कंटाळला. "दररोज या भांडखोर बायकांची कपाळकटकट माझ्यानें ऐकवत नाहीं. या दुःखांतून मुक्त होण्याकरितां मी तपोवनाला जातों. मला आपण आज्ञा द्या." ह्मणून त्याणें आपला बाप **मुक्तावेग** याच्याजवळ फार आग्रह केला. त्याणें दोन समजुतीच्या गोष्टी सांगितल्या, तरी **पद्मवेग** आपला हेका सोडीना ह्मणून त्याच्या बापाला फारच राग आला. त्याणें त्याला आणि त्याच्या बायकांलाही तत्काल शाप दिला. तो ह्मणाला, "तुझ्यासारख्या मूर्खाला तपोवनांत जाऊन काय करायचें आहे? तूं आपला मनुष्यलोकांतच जा; तेथें तुझी भांडखोर बायको **आदित्यप्रभा** राक्षसी होऊन पुन्हां तुला प्राप्त होईल. आणि हा तुझा बंधू **रूपवेग** हाही यावेळीं तुझ्याबरोबर जाण्याविषयीं उत्सुक झाल्यासारखें दिसतें. याकरितां यालाही मनुष्यलोक प्राप्त होवो! तेथें देखील हा तुझा बंधूच होईल. आणि दोन बायकांपासून होणारें दुःख मनुष्य-

जन्मांतदेखील तुला थोडेंसें भोगावें लागेल." याप्रमाणें शाप देऊन त्याचा शेवट असा सांगितला कीं, "तूं राजपुत्र होऊन ज्या वेळीं सर्व पृथ्वी जिंकून आपल्या बापाला देशील त्यावेळीं या तुझ्या दोघी बायका व हा तुझा बंधू या सर्वांला पूर्वजन्माचें स्मरण होऊन, तुह्मी शापापासून मुक्त व्हाल." याप्रमाणें **मुक्तावेगानें** दिलेला शाप शिरसा मान्य करून **पद्मवेग,** आपला बंधु व बायका यांसहवर्तमान मनुष्यलोकांत उतरला."

ही कथा सांगून **इंदीवरसेन** बापाला ह्मणाला, "**पद्मवेग** ह्मणून जो मीं आतां सांगितला तो प्रत्यक्ष मीच आहें. पित्याच्या शापानें मी तुमचा पुत्र झालों. माझें जें कांहीं कर्तव्य होतें तें मी केलें. **रूपवेग** ह्मणून जो विद्याधरपुत्र मी सांगितला तोच हा माझा बंधु **अनिच्छासेन.** या जन्मांतरीं देखील हा माझा धाकटा बंधूच झाला. **आदित्यप्रभा** ह्मणून जी माझी भांडखोर बायको तीच ही **खड्गदंष्ट्रा** आणि दुसरी **चंद्रावती** ह्मणून सांगितली ती ही **मदनदंष्ट्रा** या जन्मांतही त्यांणीं भांडण करायचें सोडलें नाहीं! आतां हा आमच्या शापाचा शेवट झाला आहे. तर आपण आह्मांला आज्ञा द्या; आह्मी आपल्या पूर्वीच्या विद्याधरपदाला जातों. आह्मी आपली आणखी कांहीं सेवा करावी असें असेल तर सांगा. सर्वप्रकारें आपला हेतु पूर्ण करावा हें आमचें कर्तव्य आहे."

असें सांगून **इंदीवरसेन** अथवा **पद्मवेग,** त्याच्या हुकुमाची वाट पहात उभा राहिला. त्याणें जी हकीकत सांगितली, ती ऐकून चकित झालेला व सद्गुणी पुत्रांचा कायमचा वियोग होणार हें ऐकून ज्याची छाती फाटून गेली आहे असा राजा **परित्यागसेन** चित्रा-सारखा तटस्थ झाला. त्याणें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तरी, हाच त्याचा निरोप असें समजून **पद्मवेग, रूपवेग** व त्या दोघी स्त्रिया आपापल्या पूर्वजन्माचें स्मरण करून, इकडच्या सर्व गोष्टींविषयीं

निरीच्छ होत्सात्या जाण्यास निघाल्या. त्या चौघांनीही तत्काल मनुष्यांचे देह सोडून विद्याधरांचीं शरीरें धारण केलीं. नंतर आपल्या आईबापांला नमस्कार करून **पद्मवेगा**नें दोघी स्त्रियांला व बंधूला बरोबर घेऊन आकाशमार्गानें विद्याधरलोकांत प्रयाण केलें. तेथें, पुत्रांच्या वियोगानें उत्कंठीत झालेला **मुक्तावेग** व **केतुवती** यांणीं प्रेमपूर्वक ज्यांचा स्वीकार केला आहे, असे ते उभयता बंधू सुखानें वास्तव्य करिते झाले. **आदित्यप्रभे**नें पुन्हां भांडण कज्जा करायचें सोडून दिलें. **चंद्रावती** आणि ती दोघीही सख्ख्या बहिणीप्रमाणें स्नेहानें वागूं लागल्या. त्यांच्यासह आईबापांला आनंद देत होत्साता **पद्मवेग** दिव्य सुखाचा अनुभव घेता झाला."

या प्रमाणें कथा सांगून **गोमुखा**नें **नरवाहनदत्ता**च्या मनाची करमणूक केली. त्याची कथा ऐकण्याच्या नादांत बराच वेळ त्याला वाटेचे श्रम जाणवले नाहींत. कथा पुरी करून **गोमुख** पुन्हां ह्मणाला, "महाराज, **पद्मवेगा**प्रमाणें मोठ्यांला मोठेच क्लेश भोगावे लागतात. व त्यांपासून त्यांचा उदयही मोठाच होतो. इतरांचें तसें कोठून होणार ? त्यांचे क्लेशही तेवढेच आणि पुढें होणारा उत्कर्षही तेवढाच. देवी **रत्नप्रभा** हिणें आपल्या विद्येच्या सामर्थ्यानें तुमचें रक्षण केलें आहे. व आतां ती राजकन्या **कर्पूरिका** तुह्माला लौकरच प्राप्त होईल. यावेळीं जरी कांहीं क्लेश झाले तरी पुढें त्यांचा वचपा निघेल." याप्रमाणें गोड भाषण करणाऱ्या **गोमुखा**नें सांगितलेली कथा ऐकून **नरवाहनदत्ता**ला नवी उमेद आली. तो तसाच झपाट्यानें मार्गक्रमण करीत असतां सायंकाळीं—जेथें कोकिल, राजहंस इत्यादिकांचा मंजुळ शब्द होत आहे, अमृतरसासारखें स्वच्छ असून शीतल ज्याचें उदक आहे, आसमंतात् आंबे फणस दाळिंब इत्यादि सुंदर वृक्ष शोभताहेत, अशा व प्रफुल्लित झालेल्या कमलांनीं रमणीय दिसणाऱ्या सरोवराच्या कांठीं येऊन पोंचला. तेथें स्नान करून

दोघांनीही भक्तिपूर्वक **शंकराची** पूजा केली नंतर तेथील स्वादिष्ट फळें यथेच्छ खाऊन आपल्या सोबत्यासहवर्तमान कमलिनीच्या व इतर वृक्षांच्या पानांच्या बिछान्यावर सुखानें निद्रा करून **वत्सराजाचा** पुत्र **नरवाहनदत्त** ती रात्र तेथें घालविता झाला.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं **नरवाहनदत्त गोमुखासहवर्तमान** तेथून निघाला. वाटेंत, गेल्या रात्रीं आपल्यास कशी काय झोंप वगैरे लागली या संबंधानें एकमेकांनीं परस्परांला आपापला अनुभव सांगितला. नंतर **नरवाहनदत्त** ह्मणाला, "गड्या **गोमुखा**, काल रात्रीं मला एक स्वप्न पडलें. पहाटेच्या प्रहरीं शुभ्र वस्त्र नेसलेली एक दिव्य कुमारी माझ्याजवळ येऊन मला ह्मणाली, "वत्सा, तूं कांहीं काळजी करूं नकोस येथून थेट समुद्राच्या कांठीं जा. तेथें अरण्याच्या मध्यभागीं तुला आश्चर्यकारक एक नगर लागेल, तेथें खुशाल विश्रांती घे. तेथूनच **कर्पूरसंभवनगराला** जाण्याची तुला सोय मिळेल. व तेथें गेल्यावर ती राजकन्या **कर्पूरिकाही** तुला प्राप्त होईल!" इतकें सांगून ती दिव्य कुमारिका अदृश्य झाली. व मीही लौकरच जागा झालों. आतां यावरून तुला काय वाटतें तें पहा."

स्वप्न ऐकून **गोमुखाला** मोठी उमेद वाटली. तो ह्मणाला, "असें आहे तर आपलें कार्य झालेंच ह्मणायचें. आपल्यावर देवतांचा अनुग्रह झाला आहे; तेव्हां दुष्कर असें कांहींच नाहीं. या स्वप्नावरून आपण अशी पूर्ण खात्री बाळगा कीं, ज्याकरितां हा आपला प्रयत्न चालला आहे, तें इष्ट कार्य उत्तमप्रकारें सिद्ध होईल." याप्रमाणें, ज्यानें विशेष उमेद दिली आहे अशा स्वप्नाविषयीं बोलून, **नरवाहनदत्त गोमुखासहवर्तमान** त्वरेनें मार्ग क्रमण करूं लागला. चालतां चालतां तो समुद्राच्या तीराजवळ येऊन पोंचला. तेथें देवीनें स्वप्नांत सांगितल्याप्रमाणें एक मोठें नगर दृष्टीस पडलें. जणूं काय पर्वतच उभे केले आहेत, याप्रकारच्या मोठमोठ्या बुरुजांनीं शोभाय-

मान असून ज्यातील घरें उंच आहेत, मेरूच्या शिखरांप्रमाणें कित्येक वाड्यांला सुवर्णमय शिखरें आहेत, आंत ऐस पैस जागा असल्यामुळें हें एक दुसरें भूमंडलच असें वाटत आहे, अशी ती नगरी पाहून **नरवाहनदत्ताला** फार आनंद झाला. त्या नगरीच्या चार दिशांला चार मोठ्या वेशी होत्या. त्यांतून जवळ असलेल्या एका वेशींतून त्या उभयतांनीं आंत प्रवेश केला. **गोमुखा**सहवर्तमान **नरवाहनदत्त** तेथील चमत्कार पहात व आपसांत त्यांचें वर्णन करीत बाजारांतून चालला होता. तेथें एका मोठ्या दुकानांत यंत्रमय अनेक बाहुल्या ठेवलेल्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. फक्त जीवकला मात्र नाहीं; बाकी त्या बाहुल्या मनुष्यांप्रमाणें सर्व चेष्टा करीत होत्या. पाहतां पाहतां **नरवाहनदत्ताला** असें वाटलें कीं, हें सारें शहरच अशाप्रकारचें आहे. नंतर तो विशेष लक्षपूर्वक पाहूं लागला तेव्हां आपला तर्क खरा आहे असें त्याच्या अनुभवास आलें. त्या नगरींत स्त्रिया पुरुष, पशुपक्षी वगैरे जें कांहीं दिसत होतें; तें सर्व काष्ठमय असून यंत्रानें सर्वांचे व्यापार चालले आहेत व त्यामुळें ते सजीव प्राण्यांप्रमाणें दिसताहेत अशी त्याची पूर्ण खात्री झाली. प्रथम कांहीं वेळ ते उभयतां गोंधळांत पडले होते व आपल्याला जें यावेळीं दिसतें आहे तें सजीव आहे किंवा निर्जीव आहे! याचा त्यांला निर्णय करतां येत नव्हता. पण त्यांत कोणीच बोलत नाहीं असें जेव्हां त्यांणीं पाहिलें तेव्हां हें निर्जीव आहे अशी त्यांची पुर्ती खात्री झाली. तो चमत्कार पहात पहात ते तसेच पुढें गेले, तों त्यांला एक मोठा सुंदर राजवाडा दिसला. तेथें हत्ती, घोडे, पायदळ, वगैरे सर्व राजकीय थाटाला शोभेल असा परिवार होता. हा तरी सजीव असेल, असें प्रथम त्यांना वाटलें होतें; पण पुढें पाहतात तों, इतरांप्रमाणें तेही निर्जीवच दिसले! तेव्हां हें आहे तरी काय! तें समजून घेण्याविषयीं त्यांला मोठी उत्कंठा लागली.

ज्याच्या मध्यभागीं मस्तकावर उंच सोन्याचें शिखर शोभत आहे अशा त्या राजवाड्यांत **गोमुखासहवर्त्तमान नरवाहनदत्त** प्रवेश करता झाला. तेथें जें जें पहावें तें तें आश्चर्यकारकच वाटत होतें. तेव्हां अमक्या एका गोष्टीबद्दल विशेष कौतुक करण्यासारखें कांहींच राहिलें नाहीं. त्या राजवाड्यांत दरवाज्यावर यंत्रमय द्वाररक्षक होते. त्यांणीं यांला मोठ्या आदबीनें रामराम करून आंत जाऊं दिलें. पुढें मधल्या चौकांत सुंदर सुंदर वेश्या नृत्य करीत होत्या. क्षणभर तेथें उभें राहून **नरवाहनदत्तानें** तो चमत्कार पाहिला. ह्या सर्व नगरींत यंत्रमय परिवार आहे, ही तर त्यांची खात्री झालीच होती. पण त्यावरून, त्यांचा चालक कोणी तरी सजीव पुरुष असला पाहिजे व त्याला अवश्य पहावें असा त्यांचा इरादा होता. त्याप्रमाणें राजवाड्यांतला एकेक चमत्कार पहात पहात ते पुढें गेले. तेव्हां त्या जड वस्तूंला गती देणारा, जणूं काय इंद्रियांच्या मध्यभागीं राहणारा आत्माच, असा सर्वांचा अधिष्ठाता होऊन बसलेला एक भव्य पुरुष त्यांणीं पाहिला. तो रत्नखचित उत्तम सिंहासनावर बसला होता. आपल्या सामर्थ्यानें तो सर्वांला चालवीत होता. त्याला पाहून **नरवाहनदत्ताला** मोठा आनंद झाला. हळूहळू त्याच्याजवळ ते दोघेही गेले. तेव्हां आकारावरून हे कोणी तरी मोठे आहेत, असें समजून त्याणें त्यांचा फार सत्कार केला. स्वागत करून त्यांना आपल्या आसनाच्या जवळ दुसऱ्या रत्नखचित आसनांवर बसविलें. नंतर कुशलप्रश्न करून तो ह्मणाला, "आपण कोण आहां? आणि या अमानुष नगरींत आपण कसे आलां? बरोबर परिवार कांहीं दिसत नाहीं, तथापि, आपण कोणीतरी मोठे अहां हें मी अनुमानावरून समजतों." याप्रमाणें त्याणें प्रश्न केल्यावरून **गोमुखानें नरवाहनदत्ताची** सर्व हकीकत निवेदन केली. आणि कशाकरितां व कोणीकडे जायचें तेंही सांगितलें. नंतर "आह्मी आपला वृत्तांत निवेदन केला, त्याप्रमाणें

आपणही कृपा करून आपला वृत्तांत निवेदन करावा" असें त्यानें सांगितलें. **नरवाहनदत्ताचें** चरित्र ऐकून तो पुरुष फारच नम्र झाला. व त्यावरून त्याला त्याच्याविषयीं विशेष पूज्यबुद्धी उत्पन्न झाली आहे असेंही वाटलें. नंतर त्या पुरुषानें आपला वृत्तांत सांगण्यास आरंभ केला. तो ह्मणाला, "या पृथ्वीवर दक्षिण देशांत **कांची** नांवाची प्रसिद्ध नगरी आहे. तिचें नांव कदाचित् आपल्या कानांवरून गेलें असेल. उत्तम गुणांनीं (दोरांनीं) गुंफलेली पृथ्वीरूप स्त्रीच्या कंबरेंतली कांची (कमरपटा) च कीं काय; अशी ती नगरी ह्या भूतलास अलंकारभूत आहे. त्या नगरींत **बाहुबल** नांवाचा प्रसिद्ध राजा आहे. लक्ष्मी चंचल आहे; तरी त्या राजानें आपल्या भुजबलानें संपादन करून तिला जामदारखान्यांत कोंडून ठेविलें आहे. त्या राजाच्या राज्यांत आह्मी दोघे बंधू राहत होतों. आह्मी जातीचे सुतार आहों. मयासुरानें यांत्रिककला निर्माण करून लांकडाच्या बाहुल्या वगैरे—सजीव प्राण्यांप्रमाणें—चालविण्याची जी विद्या निर्माण केली आहे, तिचा आह्मी विशेष अभ्यास केला होता. माझा दुसरा बंधू ह्मणून जो मीं सांगितला त्याचें नांव **प्राणधर** असून तो माझा वडील बंधु. प्रथम तो अगदीं निर्व्यसनी होता, पण दुर्दैवानें त्याला पुढें वेश्यांचें व्यसन जबर लागलें. त्यापायीं त्याणें घरांत जें कांहीं होतें नव्हतें तें सारें फस्त केलें! मी त्याचा धाकटा बंधु. माझें नांव **राज्यधर**. मी लहानपणापासून त्याच्या आज्ञेंत वागत होतों. वडिलोपार्जित द्रव्य मला अर्धें मिळायचें होतें, पण माझ्या बंधूनें प्रथम आपल्या वांट्याचें व नंतर माझ्या वांट्याचेंही सारें घालविलें. तें सरलें तेव्हां स्वतः मीं जें कांहीं मिळविलें होतें तेंही त्यानें उडविलें. पण बंधूच्या स्नेहाला वश होऊन मी त्याला चकार शब्द बोललों नाहीं.

याप्रमाणें जिकडे तिकडे लखेलख्ख होऊन आह्मी उभयतां अगदीं कफल्लक झालों. तरी माझ्या भावाचे डोळे उघडले नाहींत. वेश्यां-

च्या येथें जाणाऱ्या पुरुषांची स्थिती कशी असते, याचा आपल्याला अनुभव असण्याचा संभव नाहीं; तथापि ऐकून तरी माहित असेल. द्रव्य ज्याच्याजवळ नसेल त्याला त्यांच्या घरीं काडीइतका देखील मान मिळत नाहीं. माझा बंधु द्रव्यवान् होता तोंपर्यंत तेथें त्याची खूप चैन उडत होती. तें नाहींसें झालें तेव्हां अर्थात् हळूहळू मानपान कमी होऊं लागला. व आणखीं कांहीं दिवसांनीं कदाचित् अर्धचंद्रही मिळण्याचा संभव होता! व्यसनाधीन झालेल्या पुरुषांला, ते जसजसे दरिद्री होत जातात तसतशी, ईर्षा अधिकाधिक उत्पन्न होत जाते. त्याप्रमाणें माझ्या भावानें द्रव्य मिळविण्याकरतां आपल्या यंत्रविद्येचा[१] उपयोग सुरू केला. त्याणें यंत्रमय दोन हंस तयार केले. मध्यरात्रीच्या सुमारास तो त्या पक्ष्यांला सोडीत असे. ते त्या नगरीचा राजा बाहुबल याच्या जामदारखान्यांत झरोक्याच्या वाटेनें प्रवेश करून तेथील कांहीं तरी दागिना आपल्या चोंचीत धरून घेऊन येत असत! याप्रमाणें जेव्हां जेव्हां त्याला गरज लागे तेव्हां तेव्हां तो त्या हंसांच्या द्वारें राजाच्या खजीन्यावर हल्ला करी. तें त्याचें कृत्य जेव्हां मला समजलें तेव्हां मीं त्याची पुष्कळ निंदा केली. व तसें कृत्य न करण्याविषयीं त्याचें मन वळविण्याचा प्रयत्नही केला, तथापि त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उघडच आहे, व्यसनांध मनुष्य चांगला किंवा वाईट मार्ग मुळींच पहात नसतो. असो. याप्रमाणें तो तें अकार्य कित्येक दिवस करीत होता. पण निरंतर तें कसें चालणार? वाईट कृत्यांचा केव्हांना केव्हां झाडा द्यावाच लागतो.

१—ही कथा मोठी ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. युरोपियन लोकांचा इकडे प्रवेश झाल्यापासून त्यांणीं अनेक यंत्रांचे चमत्कार आमच्या लोकांस दाखविले. ते पाहिल्यावरून आमच्या मंडळींचें ठाम मत असें झालें आहे कीं, आर्यलोकांस यंत्रें वगैरे मुळींच माहीत नव्हतीं. त्यांणीं आत्मज्ञान व होमहवन आणि देवपूजा यांतच आपली सारी बुद्धी खर्च केली. यंत्रादिकांच्या साह्याने मानवी सुखसोयी वाढविण्याची अकल त्यांस सुचलीच नाहीं! अशी ज्यांची चुकीची समजूत असेल त्यांणीं २००० वर्षांपूर्वी झालेल्या या ग्रंथांतली ही कथा वाचावी.

राजाच्या जामदारखान्याचा कडेकोट बंदोबस्त होता. त्याच्यावरचा मुख्य अधिकारी नेहमीं तपासणी करीत असे. पण आज अमका दागिना नाहींसा झाला, उद्यां तमका नाहींसा झाला, याप्रमाणें जामदारखान्यांतल्या वस्तू आलीकडे नाहींशा होऊं लागल्या. तेव्हां अधिकारीलोक विशेष चौकशी करूं लागले. त्यांणीं तेथें कोठे उंदरांचीं बिळें आहेत कीं काय? याचा प्रथम शोध केला. इमारत पक्की असल्यामुळें बिचाऱ्या उंदरांचा तेथें प्रवेश होईल कोठून! तरी वरचेवर एकेक दागिना नाहींसा होत चालला आहे तेव्हां हा चमत्कार काय आहे? याचा त्यांणीं पुष्कळ तपास केला. पण दागिने जातात कसे? व नेतें कोण? त्याचा कांहीं थांग लागला नाहीं. शेवटीं मुख्य अधिकाऱ्यानें ही गोष्ट राजाच्या कानावर घातली. राजालाही त्याचा मोठा अचंबा वाटला. कोणत्याही रितीनें याचा पत्ता लावला पाहिजे, ह्मणून त्याणें एका रात्रीं जामदारखान्यांत मुद्दाम कांहीं लोक बसविले. ते डोळ्यांत तेल घालून चहूंकडे पहात बसले होते.

माझ्या भावानें त्या रात्रीं हंस पाठविले नसते तर आणखी कांहीं दिवस त्याला लाट मारतां आला असता. पण त्याच्या पापाचे घडे भरल्यामुळें त्याला तशी बुद्धी सुचली नाहीं. त्याणें सुमारें मध्यरात्रीच्या वेळीं आपले ते हंस सोडले. नेहमींप्रमाणें झरोक्यांतून ते दोघेही आंत गेले. तेव्हां पाळतीवर बसलेल्या लोकांना चोरांचा पुरा पत्ता लागला. त्या दोन्ही पक्ष्यांच्या मागें दोऱ्या होत्या. तेव्हां हे सजीव नसून यंत्रमय आहेत हें त्यांना उघड समजून आलें. त्या पक्ष्यांनीं चोंचींत दागिने धरीपर्यंत त्यांणीं कांहींच हालचाल केली नाहीं. दागिने घेऊन आतां ते उडणार, इतक्यांत पाळतीवर बसलेल्या लोकांनीं त्यांच्या दोऱ्या कापल्या; अर्थात् ते खालीं पडले. नंतर ते दोनही हंस त्यांणीं राजाकडे नेऊन हाजर केले. इकडे माझ्या बंधूचें धाबें दणाणलें. तो कावरा बावरा होऊन तत्काल माझ्या खोलींत

आला आणि मला जागें करून ह्मणाला, "घात झाला रे झाला! माझे ते हंस कोणी तरी पाळतीवर बसून पकडले असें वाटतें. कारण माझ्या हातांतल्या दोऱ्या सैल झाल्या व यंत्राची कळही मंदावली. यावरून कोणीं तरी त्या दोऱ्या खास कापून टाकल्या. हें कृत्य दुसरें कोणी कशाला करील? जामदारखान्यावरच्या अधिकाऱ्यांनीं किंवा तेथल्या पाहरेवाल्यानींच केलें असावें. पण आतां माझी ही चोरी उघड होणार व उद्यां राजा जी शिक्षा करील ती मला भोगावी लागणार. हें लचांड आह्मा दोघांवरही येणार आहे. तूं जरी तें काम केलें नाहींस तरी माझ्या सहवासाचें हें फळ तुला मिळाल्यावांचून राहणार नाहीं. याकरितां आपण दोघेही आतांच्या आतां येथून पळून जाऊं या. नाहीं तर सकाळीं, चोर ह्मणून राजा आह्माला कैद केल्यावांचून राहणार नाहीं. या शहरांत अशाप्रकारचे यांत्रिक चमत्कार आमच्यावांचून दुसऱ्या कोणाला येत नाहींत हें तर प्रसिद्धच आहे. तेव्हां आपण येथून पळून गेल्यावांचून परिणाम लागणें नाहीं. मला वायूच्या यंत्रानें विमान तयार करावेसें वाटल्यावरून मीं तसें एक सहज करून ठेविलें आहे. त्याला एकवेळ किल्ली दिली ह्मणजे आठशें योजनें-(३२०० कोस) पर्यंत तें एकसारखें चालतें. त्या विमानांत बसून

१—या पुस्तकाचें हें पत्र छापल्या दिवशीं (तारीख ११–१२–१८९१ रोजीं) एका पाश्चात्य साहसि पुरुषानें (लेफ्टनेन्ट मॉन्सफिल्ड याणें) विमान उडविलें असून तें फुटून गेल्यामुळें त्याचा देहांत झाला. पण याच पुरुषानें यापूर्वीं (ता० १३–११ १८९१) रोजीं जो प्रयोग केला त्यांत ११४०० फूट उंच वर जाऊन तो खुशाल खालीं आला. याणें केलेलें विमान रेशमी कपड्याचें असून धुरानें (ग्यासानें) भरलेलें होतें. व वर गेल्यावर विमान सोडून देऊन तो छत्रीच्या साह्यानें खालीं उतरत असे. प्रकृतस्थलीं मुळांत प्राणधर आणि राज्यधर यांची जीं विमानें वर्णिलीं आहेत तीं वायूच्या साह्यानें चालणारीं असून त्यांस चावी होती व एकवेळ चावी दिली ह्मणजे नियमित अंतरापर्यंत तें विमान चालत असल्याचें वर्णन केलें आहे. यावरून हीं विमानें कांहीं निराळ्याप्रकारचीं असलीं पाहिजेत. तें कसेंही असो. विमानें हीं पाश्चात्यांनींच करविलेलीं नसून त्यांची कल्पना दोन हजार वर्षांपूर्वींच आह्मास माहीत होती हें

आपण येथून निघूंया. परदेशांत जाणें हें जरी दुःखकारक आहे. तरी येथें अपमान व हालअपेष्टा भोगावी लागणार त्यापेक्षां तें बरें. केलेल्या पापकर्माचा आतां मला मोठा पश्चात्ताप होतो. तूं हितकारक गोष्ट सांगितली असूनही मी तिचा अव्हेर केला. तेव्हां आतां सुख कोठून प्राप्त होणार ? मीं दुष्टानें तुझें हितकारक सांगणें ऐकलें नाहीं त्याचा हा परिणाम असून तो केवळ माझ्या संगतीमुळें आतां तुलाही भोगावा लागणार आहे! पण झाल्यागोष्टीविषयीं आतां रडून काय उपयोग ?"

याप्रमाणें भयभीत झालेल्या माझ्या भावानें सांगितलें तरी मला पळून जावें असें वाटलें नाहीं. माझी खुषी नाहीं असें पाहून त्याणें तत्काल आपलें विमान तयार केलें. आणि तो माझा बंधू प्राणधर सकुटुंब त्या विमानांत बसून आकाशमार्गानें निघून गेला. 'आपण इतकीं माणसें बसलों तर कदाचित् हें विमान खालीं पडेल' असें कांहीं निमित्त सांगून मीं जाण्याचें टाळलें. माझा बंधू तेथून निघाला तो पुढें कोठें गेला तें मला हावेळपर्यंत कांहीं एक समजलें नाहीं. त्यावेळीं रात्र बरीच राहिली होती तरी मला नंतर झोंप कसली ती मुळींच लागली नाहीं. माझ्याकडे कांहीं अपराध नव्हता तथापि उद्यां सकाळीं कांहीं तरी लचांड येईल असें भय होतें. मीं तेथून जाऊं नये असा प्रथम विचार केला होता; पण पुढें मला असें वाटलें कीं, राहण्यापेक्षां जाणें हेंच श्रेयस्कर आहे. माझ्या बंधूनें जसें विमान केलें होतें तसें मीही एक तयार केलें होतें. जावें असें जेव्हां माझ्या मनांत आलें तेव्हां तत्काल तें विमान सिद्ध करून मी एकटाच त्यांत बसून तेथून निघालों, तो उजाडतां उजाडतां दोनशे योजनांच्यां अंतरावर

---

निश्चित आहे. देवदैत्यांचीं विमानें केवळ कविसृष्टींतलीं मानलीं तरी यांत्रिक विमानें आमच्या पूर्वजांस माहीत होतीं याविषयीं ही कथा चांगला पुरावा देते असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

जाऊन पोंचलों. माझ्या भावाच्या विमानाइतकी माझ्या विमानाची गति नव्हती. त्याला एकदां चावी दिली ह्मणजे तें दोनशें योजनें चालत होतें. मग पुन्हां आणखी चावी द्यावी लागत होती. याप्रमाणें करीत करीत मी ह्या समुद्राच्या जवळच्या प्रदेशांत येऊन पोंचलों. तेव्हां आतां पाठलाग होण्याची भीति नाहीं, असें समजून मीं तें विमान टाकून दिलें. आणि पायीं चालत हळू हळू या ओसाड नगरांत येऊन पोंचलों.

येथें आल्यावर या शहराचे सर्व प्रदेश धुंडून पाहिले; पण येथें एकदेखील मनुष्य दिसलें नाहीं. मी या राजवाड्यांत आलों, तेव्हां येथें बाकी सर्वप्रकारची उत्तम तयारी असून मनुष्य मात्र नाहीं असें दिसलें. दूरचा प्रवास केल्यामुळें मला श्रम फार झाले होते. उत्तम वस्त्रें, अलंकार, बिछाने वगैरे सर्व कांहीं येथें होतें. ती समोर दिसते आहे त्या तळींत यथेच्छ स्नान करून येथील फळें खाऊन मी आपल्या क्षुधेची शांति केली. नंतर या राजमहालांत येऊन, तो पलिकडे पलंग दिसतो आहे त्यावर एकटाच खुशाल निजलों. जिकडेतिकडे शून्य असल्यामुळें अशा सुखशय्येवर निजलों होतों, तरी झोंप मुळींच आली नाहीं. एकावर एक असे अनेक विचार माझ्या मनांत घोळत होते. 'ओसाड ठिकाणीं राहून काय करायचें आहे? ही रात्र कशी तरी काढावी आणि सकाळीं येथून दुसरीकडे कोठेंतरी जावें. राजा बाहुबल याचें आतां कांहीं भय राहिलें नाहीं. आपण उघडपणें हवें तिकडे फिरलें तरी कांहीं हरकत नाहीं' असा मी विचार केला. नंतर बऱ्याच वेळानें मला थोडीशी झोंपही लागली. पहांटेच्या वेळीं दिव्य रूप धारण करणारा असून मोरावर बसलेला एक पुरुष स्वप्नांत माझ्याजवळ येऊन ह्मणाला, "बाबा तूं येथेंच रहा. दुसरीकडे कोठें जाऊं नको. तुला जें कांहीं पाहिजे तें सर्व येथें आहे. फक्त भोजनाची मात्र तयारी नाहीं. पण त्याविषयीं तूं कांहीं काळजी करूं-

नकोस. या वाड्याच्या मधल्या चौकाच्या गच्चीवर तें तुला आयतें प्राप्त होईल. जेवणाची वेळ झाली ह्मणजे तूं तेथें जाऊन बसत जा." असें सांगून तो पुरुष अदृश्य झाला. नंतर जागा होऊन मी मनांत ह्मणालों, 'हें स्थान कोणा मनुष्याचें नाहीं. हें साक्षात् **स्वामिकार्तिकानें** निर्माण केलेलें दिव्य स्थान असावें. पूर्वजन्माचें कांहीं पुण्य माझ्या पदरीं होतें ह्मणून स्वप्नांत दर्शन देऊन त्यानें मजवर अनुग्रह केला. आतां येथें राहिल्यानेंच माझें कल्याण होणार आहे. दुसरीकडे जाण्याचा जो मीं विचार केला होता तो सोडला पाहिजे.'

याप्रमाणें माझा पक्का विचार झाला. नंतर प्रातःकालचें कृत्य आटपून मी स्वप्नांत देवानें जें कांहीं सांगितलें, त्याविषयीं विशेष आस्था धरून आपलें आन्हिक आटपलें. नंतर जेवणाची वेळ झाली तेव्हां मी या चौकाच्या गच्चीवर जाऊन बसलों. आणि आतां आपल्याला भोजन मिळावें असें मनांत आणलें. तों इतक्यांत, सोन्याच्या ताटांत एकेका वाटींत एकेक पदार्थ घातला आहे असें दिव्य भोजन माझ्यापुढें आलें! खीर, केशरीभात वगैरे उत्तमोत्तम पक्वान्नें व भाज्या, चटण्या, लोणचीं कोशिंबिरी वगैरे सर्व कांहीं त्या ताटांत होतें. तें पाहतांच मला किती आनंद झाला असेल त्याचें आपणच अनुमान करा. असो. देवाचें नांव घेऊन मीं जेवणाची सुरवात केली. जेवायला बसल्यावर जोजो पदार्थ पाहिजे असें माझ्या मनांत आलें; तोतो पदार्थ पुढें हाजर होऊं लागला. मग काय विचारतां? गेल्या दिवशीं मला अन्न मुळींच मिळालें नव्हतें यामुळें पोटांत कल्पांत झाला होता. तशांतून तें दिव्य अन्न. मी आपल्या जिवाकडे न पाहतां यथेच्छ त्यावर ताव दिला. नंतर पाणी वगैरे पिऊन पोटावर हात फिरवीतफिरवीत **अगस्ति**[1]ऋषीचें स्मरण करीत शतपावली करून मी खालीं आलों.

---

१—खाल्लेलें अन्न पचण्याकरितां प्राचीन शास्त्रकारांनीं एक मंत्र सांगितला आहे—
'अगस्तिं कुंभकर्णं च शनिं च वडवानलम् ।

महाराज, मी आपल्याला काय सांगूं? तें अमृतासारखें जेवण आणि हें येथील राजाला योग्य असें सर्व सामानसुमान वगैरे पाहून माझें मन येथेंच रमलें. स्वामिकार्तिकाच्या प्रसादानें मी जोजो भोग मनांत आणावा तोतो मला प्राप्त होऊं लागला. तरी पण एकमात्र मिळालें नाहीं; तें कोणतें ह्मणाल तर बायको व नोकरचाकर वगैरे. तें मिळावें ह्मणून पुष्कळ वेळ मीं चिंतन केलें; तरी तें कांहीं मिळालें नाहीं. तेव्हां एकंदरींत येथें उणीव काय ती लोकवस्तीची आहे व ती वस्ती होण्यास दुसरें कांहीं साधन नाहीं ह्मणून बसल्या बसल्या मी आपल्या यांत्रिक ज्ञानाच्या सामर्थ्यानें ती उणीव भरून काढली. हा बाजार, हत्ती, घोडे, भालदार, चोपदार, वगैरे सर्व मीं यंत्रमय केलें आहे. माझें नांव **राज्यधर** अर्थात् राज्य धारण करणारा. पण प्रजेवांचून राज्य कसलें! प्रजा तर नाहीं. तेव्हां यांत्रिक प्रजा उत्पन्न करून मीं आपलें नांव अन्वर्थ करून घेतलें

---

आहारपरिपाकार्थं स्मरामि च वृकोदरम्' ॥

ह्या श्लोकांत ज्यांचीं नांवें आलीं आहेत ते सर्वही मोठे खादाड होते, असें पुराणांतरीं वर्णन आहे. तथापि यांत अगस्तिऋषीचें स्मरण मुख्य आहे. कारण पूर्वीं वातापि आणि इल्वल नांवाचे दोघे राक्षस बंधू होते. अगस्त्य हा राक्षसांचा नाश करीत होता. ह्मणून त्याचा सूड उगविण्याकरतां वातापि बकरा झाला व इल्वलानें एका ब्राह्मणाचें रूप घेतलें; आणि अगस्त्याला आपल्या येथें जेवणाचें आमंत्रण देऊन तो बकरा त्या दिवशीं त्याच्याकरितां मारला. मसलत अशी होती कीं, त्या बकऱ्याचें मांस अगस्त्याच्या पोटांत गेलें ह्मणजे त्याला आपण हाक मारावी; अर्थात् तो मायावी त्या ब्राह्मणाचें पोट फाडून बाहेर निघेल आणि अगस्ति मरेल! पण ही मसलत सिद्ध झाली नाहीं. अगस्त्यानें तो बकरा खाऊन पार केला आणि पुढें राक्षसाचें कपट काय आहे तें त्याच्या लक्ष्यांत आलें तेव्हां आपल्या तपाच्या सामर्थ्यानें त्याणें तो बकरा जिरवून टाकला. ह्मणून त्याला उद्देशून—

'वातापिर्भक्षितो येन वातापिश्च महाबलः ।
अगस्त्यस्य प्रसादेन भोजनं मम जीर्यताम्' ॥

हा श्लोक ह्मटला असतां खाल्लेलें जिरतें व अजीर्ण होत नाहीं, असें धर्मशास्त्रांत कोठें कोठें सांगितलें आहे.

आहे. बाकीचा सर्व थाटमाट येथें मूळचाच तयार होता. याप्रमाणें येथें येऊन मीं ही राज्याची लीला केली व दैवयोगानें निर्वेधपणें त्या ऐश्वर्याचा मी उपभोग घेत आहें.

याप्रमाणें ही मीं माझी हकीकत आपल्याला सांगितली. या ठिकाणीं आल्यापासून मनुष्याचें दर्शन काय तें हें आजच घडलें याबद्दल मला फार संतोष वाटतो. या माझ्या यांत्रिक प्रजेशीं बाकीचा सर्व व्यवहार चालतो; पण भाषण मात्र बंद. तो बोलण्याचा योग आज कित्येक दिवसांनीं आला. आतां आपण येथें आलां तसे दोन दिवस राहून माझ्या हातून कांहीं सेवा चाकरी घ्यावी अशी माझी इच्छा आहे. आपण येथें खुशाल विश्रांति घ्या. मी यथाशक्ति आपली बरदास्त ठेवीन." ही त्याची विनंती ऐकून नरवाहनदत्ताला फार संतोष झाला. त्याच्या त्या विचित्र कारागिरीचा त्याला इतका अचंबा वाटला कीं, प्रतिसृष्टि करणारा हा एक दुसरा विश्वामित्रच[1] आहे असें तो समजला. नंतर आणखी कांहीं गोष्टी झाल्यावर राज्यधरानें नरवाहनदत्ताचा हात धरून त्याला गोमुखासहवर्तमान बाहेरच्या बागेंत नेलें. तेथें तळींत यथेच्छ सर्वांनीं स्नानें केलीं. तेथलींच कमळें घेऊन नरवाहनदत्तानें शंकराचें व राज्यधरानें स्वामिकार्तिकाचें पूजन

---

१—विश्वामित्र नांवाचा ऋषि होता हें प्रसिद्धच आहे. तो मूळचा क्षत्रिय असून ब्राह्मण झाला होता. तरी जातिस्वभावाप्रमाणें त्याचा मानीपणा कमी झाला नव्हता. कांहीं कारणावरून स्वर्गस्थदेवांची आणि या ऋषीची ईर्षा पडली. तेव्हां—"स्वर्ग स्वर्ग ह्मणजे काय? तेथें सारें दिव्य आहे हाच ना त्याचा मोठेपणा. त्यांत कांहीं मोठेंसें नाहीं. आपण देखील प्रतिसृष्टि उत्पन्न करूं." असें बोलून त्याणें सृष्टि करण्याची सुरवात केली! शेवटीं देवांनीं मध्यस्ती करून तो क्रम बंद करविला असें पुराणांत वर्णन केलें आहे. ( वाल्मीकिरामायण अयोध्याकांड पहा. ) एकसारख्या आकाराचे पण योग्यतेनें कमी असे, जे कांहीं प्राणी सांप्रतकाळीं आहेत ते विश्वामित्राच्या सृष्टीपैकीं अशी समजूत आहे. उदाहरणार्थ माकड, माढव वगैरे प्राणी हे मनुष्य व घोडा इत्यादिकांचीं प्रतिरूपें आहेत असें म्हणतात.

केलें. आन्हिक आटपल्यावर **राज्यधर** त्या दोघांना घेऊन जेवणाच्या ठिकाणीं ह्मणजे त्या मधल्या चौकाच्या गच्चीवर गेला. तेथें जाऊन ध्यान करण्याबरोबर तिघांकरितां तीन सोन्याचीं ताटें आलीं. नंतर त्या तिघांनींही गोष्टी करीत करीत स्वस्थ भोजन केलें. **राज्यधर** वरचेवर "महाराज, कोणता पदार्थ पाहिजे?" ह्मणून विचारीत असे व या दोघां पाहुण्यांनीं सांगावा तो पदार्थ ध्यान करतांच त्यांच्या पानांवर येऊन पडत होता! अमृतासारखें तें दिव्य अन्न **गोमुख** व **नरवाहनदत्त** यांणीं यथेच्छ खाल्लें. **राज्यधराला** तें नित्यच प्राप्त होत होतें, ह्मणून त्याविषयीं त्याला कांहीं अपूर्व वाटलें नाहीं; तरी या दोघां पाहुण्यांला तो लाभ अपूर्वच होता.

भोजन झाल्यावर ते तिघेही तेथून उठले. तों इतक्यांत तेथलीं उष्टीं खरकटीं वगैरे काढलीं जाऊन जागा आपोआप साफ झाली. तें काम कोणीं केलें हें मात्र तिघांपैकीं एकालाही दिसलें नाहीं. **राज्यधराच्या** मागून ते दोघेही खालीं उतरले. आणि शतपावली करून सिंहासनावर येऊन बसतात, तों त्रयोदशगुणी विडे त्यांच्यापुढें हाजर झाले. यावेळीं **नरवाहनदत्ताला** मद्य प्यावेंसें वाटलें. तेव्हां त्याणें **राज्यधराला** सूचना करतांच तेंही आलें. नंतर यथेच्छ मद्य पिऊन सुखानें तिघांनींही वामकुक्षि केली. श्रम झाल्यामुळें **नरवाहनदत्त** आणि **गोमुख** यांला फार झोंप लागली. ते जागे झाल्यावर सायंकाळच्या वेळीं त्यांला बरोबर घेऊन **राज्यधरानें** तें सर्व शहर दाखविलें आणि सूर्यास्ताच्या वेळीं परत राजवाड्यांत आणलें. संध्या वगैरे करून दोनप्रहरच्या प्रमाणेंच त्यांनीं पुनः भोजन केलें. कांहीं वेळ गप्पा गोष्टी होऊन तिघेही निरानिराळ्या तीन पलंगांवर निजले. ते पलंग एकाच हारीनें जवळजवळ घातलेले होते. **नरवाहनदत्त** बिछान्यावर पडला तरी त्याला झोंप मुळींच लागली नाहीं. **कर्पूरिकेच्या** भेटीविषयीं जी त्याला विशेष उत्सुकता प्राप्त झाली होती तिणें झोपेला

दूर पिटाळून दिली. यामुळें तो पुष्कळ वेळ बिछान्यावर लोळत होता. मध्येंच **राज्यधराला**—" काय तुह्माला झोंप लागली काय?" ह्मणून त्याणें विचारिलें. तेव्हां बिछान्यावर पडल्यापडल्याच तो त्याला ह्मणाला, " हे भाग्यशाली पुरुषांनो, तुह्मी उगीच कां चिंता करतां? तुह्माला झोंप येत नाहीं याचें कारण काय तें मी समजलों. पण त्याबद्दल इतकी काळजी करावयास नको. ती तुमची **कर्पूरिका** खरोखर तुह्माला प्राप्त होईल. सत्ववान् पुरुषाला जशी **लक्ष्मी** आपण होऊन वरते तशाच स्त्रियाही वरतात. याविषयीं पुष्कळ गोष्टी मीं ऐकिल्या आहेत. पण एक तर प्रत्यक्ष पाहिली आहे, ती पाहिजे असेल तर सांगतों." असें बोलून **राज्यधर** कथा सांगूं लागला.

" मी **कांची** शहरचा राहणारा हें पूर्वीं आपल्याला सांगितलेंच आहे. व **बाहुबल** नांवाचा त्या नगरीचा राजा आहे, असेंही मीं सांगितलेलें तुह्माला आठवतच असेल. त्याच राजाचा **अर्थलोभ** नांवाचा एक चोपदार होता. तो खरोखरीच आपल्या नांवाप्रमाणें अर्थ-(द्रव्य) लोभी होता. जो लोभी असतो तो कृपण असलाच पाहिजे; आणि कृपणाजवळ द्रव्याचा संग्रह हा आपला असायचाच. त्याप्रमाणें त्या चोपदाराजवळ पुष्कळ द्रव्य होतें. त्याची **मानपरा** नांवाची स्त्री होती. ती फारच सुंदर असून मोठी गुणी होती. तिचा नवरा **अर्थलोभ** हा मोठा कृपण असल्यामुळें अविश्वासी होता. राजाचा चोपदार आणि त्यांतून पैसेवाला असल्यामुळें त्याच्या घरीं नोकर चाकर वगैरे बराच परिवार होता. पण त्यांपैकीं एकावरही त्याचा विश्वास नव्हता. पुढें त्याणें राजाला खुष करून त्याची चाकरी सोडण्याची परवानगी मिळविली. तो जातीचा वाणी होता. वाण्याच्या संप्रदायाप्रमाणें त्याला व्यापार करावा असें वाटलें; तरी दुकानावर कोणीं बसावें? याचा विचार पडला. कारण राजानें त्याला चाकरी सोडण्याची परवानगी दिली होती, तरी अगदींच संबंध सोडण्या-

विषयीं त्याचा हुकुम नव्हता. व तसें करणें हें त्या लोभ्यालाही इष्ट नव्हतें. कारण चाकरी सोडली तर तिकडून जी प्राप्ती व्हावयाची ती नाहींशी होईल, याचें त्याला भय होतें. शेवटीं त्याणें दुकान तर घातलेंच; पण आपल्या बायकोला त्यावर बसाविलें. दुकानावर बसून व्यापार करावा हें तिला चांगलें वाटत नव्हतें. तरी बिचारी करते काय? नवऱ्याच्या हुकुमाप्रमाणें तिला तसें करणें भाग पडलें. ती बाजारांत व्यापार करूं लागली तेव्हां दुसऱ्या उदमी लोकांशीं तिचें बरेंच संघट्टण झालें. तिचें तें मनोहर रूप, मधुर भाषण व सालसपणाचें वर्तन पाहून तिच्या दुकानावर गिऱ्हाइकांची इतकी गर्दी होई कीं, क्षणभर देखील तिला फुरसत मिळेनाशी झाली. हत्ती, घोडे, रत्नें, वस्त्रें वगैरे सर्वप्रकारचा व्यापार तिणें चालविला होता. जो जो माल तिणें विकावा त्यांत फायदा पुष्कळ राहूं लागला. कित्येक गिऱ्हाइकें केवळ तिच्या रूपाला भुलूनच तिला पैसे देत, असें चाललें होतें. व्यापारांत अतिशय लाभ होऊं लागला हें पाहून तिचा नवरा अर्थलोभ याला फार आनंद झाला.

असें होतां होतां एकेदिवशीं सुखधन नांवाचा एक मोठा सावकार घोडे, हत्ती, रत्नें, वगैरे अनेक वस्तू विकण्याकरितां बरोबर घेऊन त्या शहरांत आला. तो मोठा व्यापारी असल्यामुळें गावांत जिकडे तिकडे तें वर्तमान लवकर समजलें. तेव्हां अर्थलोभ आपल्या बायकोला ह्मणाला, "प्रिये, सुखधन नांवाचा कोणी व्यापारी देशांतराहून येथें आला आहे असें समजतें. त्याणें वीस हजार घोडे विकण्याकरितां आणले आहेत. चीन देशांतलीं अगणित उत्तम उत्तम वस्त्रें आणि इतर पुष्कळ वस्तू त्याणें विकण्याकरितां आणल्या आहेत. तर तूं त्यापासून पांच हजार घोडे आणि दहा हजार चांगल्या चांगल्या वस्त्रांच्या जोड्या इतका माल विकत घेऊन ये. ह्मणजे आपल्याजवळचे हजारो घोडे आणि त्या व्यापाऱ्यानें आणलेल्यांपैकीं पांच

हजार मिळून पुष्कळच होतील. ते सर्व एकसारखे लावून आपण आपल्या राजाला दाखवूं ह्मणजे तो ते खरेदी करील. अर्थात् त्यावर आपल्याला पुष्कळ नफा मिळेल."

त्या लोभ्यानें असें सांगून आपल्या बायकोला **सुखधन** व्यापाऱ्याकडे मालखरेदीकरितां जाण्याविषयीं आग्रह केला. तिणें तें काम पत्करलेंच होतें. तेव्हां ती उत्तम पोषाख करून कांहीं लोकांसह **सुखधन** ज्या ठिकाणीं उतरला होता तेथें गेली. त्यानें आणलेला माल—घोडे, वस्त्रें वगैरे पहात पहात ती तो जेथें बसला होता तेथें गेली. तेव्हां तिच्या रूपानें ज्याचें चित्त हरण केलें आहे, अशा **सुखधनानें** तिचें उत्तम आगत स्वागत केलें. आपल्याला अमुक अमुक माल घ्यायचा आहे तर त्याची नक्की किंमत सांगण्याविषयीं तिनें विनंती केली. तेव्हां **सुखधनाला** आपली दुष्ट वासना पूर्ण करून घेण्यास ती उत्तम संधि मिळाली. तो ह्मणाला, "येथें पुष्कळ मंडळी आहेत. यांच्यादेखत नक्की आंकडा सांगतां येत नाहीं. चला आपण एका बाजूस जाऊन ठरवूं!" असें ह्मणून त्याणें तिला एकांतीं नेलें. आणि तिच्या रूपाची वगैरे खूप तारीफ करून ह्मणाला, "तुह्मी पांच हजार घोडे आणि दहा हजार वस्त्रांच्या जोड्या विकत घेणार ह्मणतां हें चांगलेंच आहे. एकदम इतका माल घेणारें गिऱ्हाईक मिळालें तर आह्मी आपला माल फारसा नफा न घेतांदेखील देतों. तें सगळें खरें; पण तुह्मी पाहिजे तितकी किंमत दिली तरी—किंमतीनें माझ्याजवळचा एक देखील घोडा किंवा वस्त्र तुह्मांला मिळायचें नाहीं. मला जें पाहिजे आहे तें निराळेंच. आणि तें तुह्मी समजलांच असाल; तथापि मी उघड करून सांगतों. एक रात्रभर जर मेहेरबानीनें तुह्मी माझ्या सहवासांत रहाल, तर पांचशें घोडे आणि पांच हजार वस्त्रांच्या जोड्या मीं तुह्मांला किंमत घेतल्यावांचून केवळ नजराण्यादाखल देईन! तर कृपा करून असें करा ह्मणजे सौदा पटेल!"

**मानपरा** ही स्वतः दुराचारी नव्हती. त्या **सुखधनानें** पांचशे घोडे आणि पांच हजार वस्त्रें द्यायचें कबूल केलें; तरी तिणें त्याची विनंती मान्य केली नाहीं. इतकेंच नव्हे, उलट ती त्याच्यावर रागावली. **सुखधन** हा बायकोला वश करून घेण्याच्या कामांत फारच हुषार होता. त्याणें आणखी बऱ्याच लाडीगोडीच्या गोष्टी सांगून 'पांचशें घोड्यांवर तुह्मी राजी होत नसलां तर हजार घोडे देतों,' असें तिला सांगितलें. शेवटीं तिच्या नवऱ्यानें पांच हजार घोडे आणि दहाहजार वस्त्रांच्या जोड्या विकत आणावयास सांगितलें होतें तितका सारा माल, केवळ एका दिवसाच्या सहवासाबद्दल देण्यास तो कबूल झाला! **सुखधन** हाही वाईट चालीचा मनुष्य होता असें नाहीं. तथापि मर्यादा सोडून वागणाऱ्या स्त्रियांविषयीं कोणालाही इच्छा उत्पन्न होते. अनोळखी व्यापाऱ्याजवळ जाऊन माल खरेदी करणें वगैरे हीं कामें पुरुषांनींच करायचीं; तीं करायला जेव्हां **मानपरा** आली, तेव्हां **सुखधनाला** तिजविषयीं अभिलाष उत्पन्न झाला यांत कांहीं आश्चर्य नाहीं. केवळ एक रात्रीकरितां इतका माल मिळतो असें जेव्हां पाहिलें, तेव्हां **मानपरेचें** मन किंचित् त्याच्याकडे वळलें. तरी ती ह्मणाली, "तुमचा मजविषयीं फारच ओढा दिसतो. ह्मणून तुमचें बोलणें झिडकारावें हें मला बरेंसें वाटत नाहीं. मी आपली इच्छा कदाचित् पूर्ण करीन. पण त्यापूर्वीं मी आपल्या नवऱ्याला याबद्दल विचारून येतें. याविषयीं तुह्मीं कांहीं शंका धरूं नका. तो अत्यंत लोभी आहे. बायको दुसऱ्याच्या सहवासांत ठेवणें हें जरी कोणाला बरें वाटण्यासारखें नाहीं, तरी तो लोभी याबद्दलही नको ह्मणणार नाहीं! याकरितां थोडा वेळ दम धरा. मी घरीं जाऊन यजमानाला विचारून लौकर परत येतें."

हें ऐकून **सुखधनानें** तसें करण्यास सांगितलें. राजीखुषीनेंच तें काम जमण्यासारखें दिसल्यावरून त्याणें बळजबरी केली नाहीं. व

परकी ठिकाणीं त्याला तसें करतांही येत नव्हतें. **मानपरा सुख-धना**चा निरोप घेऊन निघाली ती लौकर लौकर घरीं गेली. तिचा नवरा **अर्थलोभ**, बायको सरीफेवार माल खरेदी करून केव्हां येते याची वाट पहात बसला होता. ती दृष्टि पडतांच "कसें काय झालें?" ह्मणून त्याणें विचारिलें. तेव्हां "फायदेशीर सौदा पटत आहे; चला एकांतीं तुह्माला काय तें सांगतें," असें सांगून तिणें त्याला खोलींत नेलें आणि ह्मणाली, "तो मेला व्यापारी मोठा नष्ट आहे. तो पांच हजार घोडे आणि दहा हजार वस्त्रें द्यायला तयार झाला आहे. पण त्याच्या बदला—जळ्ळी मेली सांगायला देखील मला लाज वाटते— एक रात्र तेथें रहा ह्मणतो! जळो मेल्याचें तोंड आणि तो त्याचा माल. आपलें त्याच्याविणें काय अडलें आहे?"

हें ऐकून तो लोभी हलकट नवरा तिच्या हनुवटीला हात लावून ह्मणाला, "प्रिये, तूं काय वेडी आहेस? असा भलताच हेका धरूनये. व्यापारी ह्मटला कीं, त्याणें नम्र असावें. इकडे बघ, पांच हजार घोडे आणि दहा हजार वस्त्रांच्या जोड्या ह्मणजे किती किंमतीचा माल झाला हें तुझ्या लक्ष्यांत आलें काय? आणि एवढा माल एका रात्रीनें जर मिळत असेल तर हातचा दवडावा हें मूर्खपण नव्हे का? त्यांत तुझें काय जातें? त्याच्या ह्मणण्याप्रमाणें तूं एक रात्र तेथें घालीव ह्मणजे झालें! कबूल केलेला मालमात्र आधीं ताब्यांत घेऊन इकडे पाठवून दे. मग पंचाईत नको. जा जा, मी तुला सांगतों हें ऐक. तूं शहाणीच आहेस. तुला कांहीं फार सांगायला नको." असें बोलून तिकडे जाण्याविषयीं तो आग्रह करूं लागला. प्रथम थोडेसें नाहीं होय करून **मानपरा** शेवटीं कबूल झाली. प्रिय वाचकहो, हें त्या गांडू व हलकट नवऱ्याचें सांगणें तिला कसें वाटलें असेल याची तुह्मीच कल्पना करा. त्याणें जा ह्मणून सांगितलें तेव्हां ती मनांत ह्मणाली, 'हायरे चांडाळा, निर्लज्जा! प्रत्यक्ष आपली बायको विकायला तयार झालासना? धिःकार

असो तुला! मेल्या जळो हें तुझें ऐश्वर्य. रात्रंदिवस हाय हाय करणाऱ्या पाजी मनुष्याच्या सहवासांत राहून काय उपयोग! तुला निर्लज्जाला सोडून मी आतां त्यालाच (सुखधनाला) नवरा करून घेतें. जो उदार पुरुष केवळ एका रात्रीकरतां पांच हजार घोडे आणि दहा हजार उंची वस्त्रांच्या जोड्या देऊन मला विकत घेत आहे त्याचें औदार्य किती वानावें. आणि तशाची बायको झाल्यानें माझें काय कमी पडणार!'

याप्रमाणें विचार करून ती—हीन मनुष्याला कंटाळून जशी लक्ष्मी निघून जावी त्याप्रमाणें—सुखधनाकडे जावयास निघाली. "रात्रीची रात्र रहा; पण सकाळीं परत लौकर ये हो!!" असें त्या पाजी नवऱ्यानें पुनः तिला सांगितलें. तेव्हां ती ह्मणाली, "नीट विचार करा बरं. यांत माझा कांहीं दोष नाहीं. पुढें भलतें सलतें कांहीं झालें तर मला बोल लावूं नका." हे ऐकून अर्थलोभ ह्मणाला, "छेः छेः त्यांत भलतें सलतें तें काय होणार? तूं आपली हुषारीनें वाग ह्मणजे झालें. चल चल आतां लवकर जा. वेळ लावूं नकोस." याप्रमाणें त्या दुर्दैव्यानें बळेंच घालवून दिलेली ती मानपरारूपिणी गृहलक्ष्मी त्या दुष्ट नवऱ्याचा त्याग करून सुखधनाच्या बिऱ्हाडीं गेली. तो तिच्या मार्गाकडे डोळे लावूनच बसला होता. येईल किंवा नाहीं, याविषयीं त्याच्या मनांत गडबड चालली होती. इतक्यांत ती दृष्टी पडली तेव्हां त्याचा जीव ठिकाणावर बसला. येतांच तिचा आदरसत्कार करून सुखधनानें हकीकत विचारली. तेव्हां, जरी तिला लाज वाटत होती तरी, आपल्या त्या पाजी नवऱ्याचें वर्तन तिणें त्याला कळविलें. व "केवळ एका रात्रीकरितांच नाहीं, तर आजन्मपर्यंत मी माझें हें शरीर व प्राण तुह्मालाच अर्पण केले आहेत," असेंही तिणें सांगितलें. तें ऐकून सुखधनाला मोठें आश्चर्य वाटलें. आपल्याला हिची प्राप्ती झाली तरी कशी? याचाच त्याला अचंबा वाटला. असें स्त्रीरत्न अना-

यासानें मिळाल्याबद्दल त्यानें आपल्याला धन्य मानिलें. आणि तत्काल तिचा पहिला पति जो **अर्थलोभ** याच्याकडे तिची किंमत—ह्मणजे पांच हजार घोडे आणि दहा हजार वस्त्रांच्या जोड्या—कबूलकेल्याप्रमाणें पाठवून दिल्या. तें धन अवशींच आलेलें पाहून **अर्थलोभ** फार खुष झाला. व आपली बायको मोठी हुषार आहे असें त्याला वाटलें.

इकडे **सुखधन** जणूं काय प्रत्यक्ष लक्ष्मीच अशा त्या सुंदर स्त्रीच्या प्राप्तीनें पूर्णकाम होत्साता ती रात्र मोठ्या आनंदांत घालविता झाला. त्याला आपल्या ऐश्वर्याचें फळ बहुत दिवसांनीं आपल्याला प्राप्त झालें असें वाटलें. उभयतांच्या प्रेमाच्या गोष्टींत व विलासांत ती रात्र केव्हांच निघून गेली. सूर्याचा उदय झाला. घटकाभर दिवस आला. दोनघटका, चार घटका, ह्मणतां ह्मणतां प्रहर दिवस आला; तरी बायको परत आली नाहीं. ह्मणून त्या मूर्ख **अर्थलोभानें** तिला बोलावूं पाठविलें. ती आपल्या पाजीपणाला विटून कायमची गेली हें त्याच्या लक्षांत मुळींच आलें नव्हतें. त्या निर्लज्ज गांडू मनुष्यानें बोलावण्यास पाठविलेल्या मनुष्याला **मानपरा** ह्मणाली, "तुह्मी आतां कशाला आलां? त्या तुमच्या दुर्दैवी धन्याला सांगा कीं, काल तुह्मी आपली बायको विकली. आणि तिणें दुसऱ्याशीं समागमही केला. आतां पुन्हां ती तुमची बायको कशी होईल? तुमच्यासारखी ती निर्लज्ज नाहीं असेंही त्याला सांगा. पण तुह्मीच पहाना, आतां मी त्याच्याकडे जावें हें तुह्माला तरी योग्य वाटतें कां? झालें, व्हायचें होतें तें होऊन गेलें. तेव्हां तुह्मी परत जाऊन त्या आपल्या लोभी धन्याला सांगा कीं; पांच हजार घोडे आणि दहाहजार वस्त्रांच्या जोड्या घेऊन ज्याला तुह्मी आपली बायको विकली, त्यालाच तिणें आपला नवरा करून घेतला आहे. आतां तिची तुह्मी आशा सोडा." या निरापोवर ते बिचारे चाकर काय बोलणार? **मानपरेचें** ह्मणणें त्यांनाही योग्य वाटलें. तेव्हां ते तिची आज्ञा घेऊन मुकाट्यानें परत आपल्या यजमानाकडे गेले.

आणि लज्जेनें मान खालीं घालून मानपरेनें काय सांगितलें तें त्यांनीं त्याला कळविलें. इतकें झालें तरी त्या नराधमाला त्याबद्दल कांहीं शरम वाटली नाहीं. अशी सुंदर बायको गेली याबद्दल तो दुःखी मुळींच नव्हता, तर तिच्यावांचून आतां आपला व्यापार पूर्वींप्रमाणें चालायचा नाहीं, म्हणून त्याला वाईट वाटलें! बोलावूं गेलेल्या मनुष्यांनीं तिचें ह्मणणें सांगितलें; तें ऐकून तिला बलात्कारानें आणण्याविषयीं तो प्रयत्न करूं लागला. तेव्हां हरबल नांवाचा त्याचा एक मित्र होता तो त्याला ह्मणाला, "अरे, तूं काय वेडा आहेस. त्या सुखधनाजवळून तिला आणणें तुझ्या हातून शक्य नाहीं. तो मोठा प्रबल आहे. त्याच्याजवळ तुझ्यानें धैर्य धरवणार नाहीं. केवळ औदार्यानें खूष झालेल्या तुझ्या बायकोनेंच त्याला एवढा शूर केला आहे. त्यांतून तो स्वतः बळकट असून त्याच्याबरोबर जिवाला जीव देणारे त्याचे मित्र व शूर शिपाई प्यादे वगैरे पुष्कळ आहेत. आणि तूं तर कृपणत्वानें एकांतीं जी बायको विकलीस तिणें मनापासून तुला सोडलें आहे. या अपमानानें तूं निरुत्साह होणार आहेस. व या तुझ्या पाजीपणाच्या वर्तनानें लोकांत तूं निंद्य झाला आहेस. गांडू तर मूळचाच आहेस. स्वतः तूं बळकट नाहींस. व तुला तसें मित्रबळही नाहीं. तेव्हां तूं त्या सामनेवाल्याला जिंकण्याविषयीं कसा समर्थ होशील? याशिवाय तूं बायको विकलीस हें अधमपणाचें कृत्य राजाला समजेल तर तो तुझ्यावर फार रागावेल. तेव्हां तूं आतां आपला मुकाट्यानें बैस. बायको गेली ती गेलीच; उलट लोकांकडून हंसून घेऊं नको!"

याप्रमाणें त्याचा शहाणा मित्र जो हरबल याणें बोध करून निषेध केला. तथापि त्या मूर्खानें त्याचें कांहीं ऐकलें नाहीं. तो आपलीं माणसें बरोबर घेऊन रागानें सुखधनाच्या बिऱ्हाडावर चालून गेला. त्याणें त्याच्या बिऱ्हाडाला वेढा दिला. आणि एका मनुष्याला आंत पाठवून 'आपली बायको आपल्या हवालीं कर. नाहीं तर आतां

कत्तल उडवितां' अशी धमकी दिली. ती ऐकून **सुखधनाला** हसूं आलें. त्याणें तत्काल आपल्याबरोबरचे लोक व मित्र यांला इषारा केला. तेव्हां त्या सर्वांनीं तयारी करून **अर्थलोभा**बरोबर आले-ल्या लोकांची दाणादाण उडवून दिली. उघडच आहे, त्या लोभी मनुष्याविषयीं कोणाला अभिमान वाटणार ? व त्याच्याकरितां आपला जीव तरी धोक्यांत कोण घालणार? चाकर धन्याकरितां जीव देण्यास तयार होतात; पण त्यांला धनी तशाच रीतीचा असण्याची जरूर लागते. कृपणाचे चाकर नेहमीं त्याच्याविषयीं बेपर्वा व स्नेहशून्य असतात. तात्पर्य **हरबलानें** पूर्वीं जें भाकित केलें होतें तेंच खरें झालें. तरी तो मूर्ख शुद्धीवर आला नाहीं. तो तेथून पळत पळत राजाजवळ गेला. आणि त्याच्या पायांपडून—“ महाराज! **सुखधन** नांवाचा एक व्यापारी देशांतराहून येथें आला असून त्याणें माझी बायको नेली. व आतां मागितली तरी देत नाहीं !” अशी त्याणें फिर्याद केली. पण आपलें पाजीपणाचें कृत्य मात्र राजाला कळविलें नाहीं. राजाला ती हकीकत ऐकून अतिशय राग आला. उघडच आहे, परदेशी व्यापारी येऊन आपल्या चोपदाराची बायको जबरीनें नेतो, हें त्याला कसें सहन होईल ? राजाच्या मनांत **सुखधनाला** कैद करावें असें आलें. व त्याणें त्याप्रमाणें हुकूमही केला. तेव्हां **संधान** नांवाचा त्याचा प्रधान त्याला ह्मणाला, “ महाराज, तो **सुखधन** व्यापारी आहे तरी तो असातसा नसून सहज कैद करतां येणार नाहीं. तो मोठा पैसेवाला आहे. त्याणें आपल्याबरोबर अकरा असामी आपले जिवलग मित्र आणले आहेत. ते मोठे बलाढ्य असून त्याच्याकरितां प्राण देणारे आहेत. याशिवाय त्याच्याबरोबर उत्तम उत्तम सुमारें एक लक्ष घोडे आहेत. जरी त्यांत निवडक स्वार ह्मणण्यासारखे थोडेच असले तरी प्रत्येक घोड्याचा एकेक सैस धरला तरी एक लक्ष लोक झाले. तेव्हां त्याला सहज कसें कैद करतां येईल? याशिवाय त्या परदेशी मनुष्याला येथें येऊन फार

दिवस झाले नाहींत. त्याला या चोपदाराची बायको मिळाली कशी? हा एक चमत्कार आहे. कांहीं तरी योग्य कारण असल्यावांचून याची बायको त्याच्या हातीं लागण्याचा संभव दिसत नाहीं. याकरितां या खटल्याची बारीक चौकशी करावी. मला असें वाटतें कीं; कोणी-तरी शहाणा मनुष्य प्रथम त्या **सुखधना**कडे पाठवावा. या फिर्यादीच्या संबंधानें त्याचें ह्मणणें काय आहे तें तरी आधीं पहावें."

प्रधानाचें हें सांगणें राजाला मान्य झालें. तो ह्मणाला, "असें करावें हें मलाही बरें वाटतें." नंतर राजानें एका हुषार मनुष्याला **सुखधना**कडे पाठविलें. राजाचा दूत असें समजून **सुखधनानें** त्याचा योग्य आदरसत्कार केला. व 'महाराजांची काय आज्ञा आहे?' ह्मणून विचारलें. दूतानें राजाची इच्छा कळविली; तेव्हां **सुखधनानें मानपरे**-कडे बोट दाखवून—"तिलाच काय तें विचारा ह्मणजे झालें," असें सांगितलें. इतक्यांत **मानपरा** पुढें येऊन तिणें आपला सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हां त्या दूताला मोठें नवल वाटलें. त्याणें ती सर्व हकी-कत राजा **बाहुबल** याला कळविली. ती ऐकून त्याला तर त्याचा फारच अचंबा वाटला. एका रात्रीकरतां **सुखधनानें** पांच हजार घोडे व उत्तम वस्त्रांच्या दहा हजार जोड्या देऊं केल्या तेव्हां **मानपरा** ही अशी किती सुंदर आहे तें एकवेळ पहावें अशी इच्छा झाल्यावरून "आपण समक्ष येणार" असें **सुखधना**ला कळवून तो त्याच्या बिऱ्हाडीं गेला. यावेळीं **अर्थलोभा**लाही त्याणें बरोबर नेलें होतें. **सुखधनानें** राजाचा मोठा सत्कार केला व हात जोडून त्याच्या पुढें उभा राहिला. त्याच्याजवळच, आपल्या सौंदर्याच्या शोभेनें प्रत्यक्ष विधात्यालादेखील विस्मित करणारी, ती **मानपरा** राजाच्या दृष्टि पडली. रीतिप्रमाणें तिनेंही राजाला नमस्कार केला. राजानें—"कशी काय गोष्ट घडून आली?" ह्मणून विचारलें, तेव्हां तिणें झालेली सर्व हकीकत मुळा-पासून प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याच्यादेखत ठांसून सांगितली.

तिच्या सांगण्यांत असत्याचा अंश मुळींच नव्हता. 'यावर तुझें कांहीं बोलणें आहे काय?' ह्मणून राजानें **अर्थलोभाला** विचारलें पण तो काय बोणार? त्याला मान खालीं घालावी लागली. याप्रमाणें खरें वृत्त कळलें खरें. तरी राजाला हें एक मोठें कोडें पडलें. आतां ही बायको कोणाची झाली? याप्रश्नाचा निर्णय करायचा होता. दुसरें कांहीं सुचलें नाहीं, तेव्हां त्याणें **मानपरे**लाच 'आतां पुढें कसें व्हावें तें सांग!' ह्मणून विचारिलें. तिचा तर पक्का निश्चय झालाच होता. ह्मणून ती ह्मणाली, "महाराज मी अबला आहें. मी काय विनंती करूं! पण सरकारचा हुकूम मला मानला पाहिजे; ह्मणून दोन शब्द बोलतें. शास्त्राप्रमाणें नवऱ्याची बायकोवर पूर्ण सत्ता आहे. त्याला पाहिजे तर तिला विकतांदेखील येतें; पण तें केव्हां? आपत्तीच्या वेळीं. सांप्रत माझ्या नवऱ्यावर कांहीं प्रसंग आलेला नव्हता हें तर उघडच आहे. असें असून केवळ पैशाच्या लालचीनें त्याणें मला विकलें. तेव्हां त्या लोभ्याची मी आतां कशी बायको होईन? याचा आपणच विचार करून काय तो निर्णय करावा." **मानपरे**चें हें बोलणें राजाला व इतर सर्वांलाही मान्य झालें. बायको विकतां येते; पण तशीच आपत्ति असली तर. नाहींपेक्षां तसें करणारा दोषी होतो हा सिद्धांत सर्वांला मान्य झाला. व राजानें—"फार चांगलें बोललीस" असें सांगून तिची तारीफ केली.

**अर्थलोभा**ची यावेळीं फारच फजीती झाली. काम, क्रोध आणि लज्जा या तीन विकारानीं वेडा झालेला तो ह्मणाला, "महाराज, माझी एक विनंती आहे तेवढी सरकारांनीं ऐकून घेतलीच पाहिजे. अशा रितीनें बायको विकल्याचा कलंक माझ्यावर लावूं नका. मी केवळ

१—आर्य लोकांच्या धर्मशास्त्राप्रमाणें बायकोवर नवऱ्याचें पूर्ण स्वत्व आहे, यामुळें प्रसंगीं तिला विकण्याचाही नवऱ्यास अधिकार पोंचतो. तरी तसें करणें हे अत्यंत निंद्य मानलें आहे. भार्याविक्रय करणारास मोठा राजदंड सांगितला असून त्याला ज्ञातीनें अपंक्त करावा असेंही ठरविलें आहे.

एका राज्ञीकरितांच तो करार केला होता. तथापि त्याविषयीं माझें कांहीं ह्मणणें नाहीं. आतां हा **सुखधन** आणि मी आह्मी दोघांनीं द्वंद्वयुद्ध करावें. त्या युद्धांत ज्याचें सत्व अधिक ठरेल, त्याणें ही बायको घ्यावी. असें झालें ह्मणजे माझा न्याय यथायोग्य झाला असें मी समजेन." हें ऐकून **सुखधनानें** राजाला मध्यें बोलण्याची सवडच दिली नाहीं. तो एकदम ह्मणाला, "माझी या गोष्टीविषयीं कबुली आहे, आपण दोघेही खुशाल लढूंया. बरोबरचे साह्यकारी वगैरे कोणीएक नकोत. आह्मा दोघांचेंच युद्ध व्हावें. ज्याचा जय होईल त्याची **मानपरा**, ही गोष्ट मला मान्य आहे." ही गोष्ट राजालाही मान्य झाली. तेव्हां **मानपरा** व राजा तटस्थ होऊन पहात असतां, ते उभयतां घोड्यांवर बसून लढण्याच्या ठिकाणीं आले.

उभयतांचें कडक युद्ध सुरू झालें. **मानपरारूपिणी** जयश्री आतां कोणाची होते, याविषयीं कांहींवेळ प्रेक्षकांला मोठा संशय वाटला. पण लौकरच **सुखधनानें अर्थलोभाच्या** घोड्याला असा जोरानें भाला मारला कीं त्यासरसा तो अपायी येऊन त्यानें **अर्थलोभाला** जमीनीवर फेंकून दिलें. नंतर **अर्थलोभ** दुसऱ्या घोड्यावर बसून लढूं लागला. पुनः **सुखधनानें** त्याला खालीं पाडला. याप्रमाणें दोन वेळ झालें. तिसऱ्या खेपेस, सचिंत होऊन पाहत बसलेल्या **मानपरेला** हर्ष द्यावा ह्मणूनच कीं काय, **अर्थलोभाचा** घोडा ठार करून **सुखधनानें** त्याला जमीनीवर ढकलून दिलें. तो धर्मयोद्धा होता; नाहीं पेक्षां यावेळीं त्याणें **अर्थलोभाला** ठारच करायचा. पण त्याणें तसें क्रौर्य केलें नाहीं. नंतर दुसरा घोडा आणून **अर्थलोभ** लढूं लागला. पुनरपि **सुखधनानें** त्याला

१—पूर्वकाळीं भरतखंडांत अशाप्रकारचीं द्वंद्वयुद्धें होत असत व सांप्रत युरोपखंडांत होत असतात. अशाप्रकारचीं युद्धें होणें हें एक राष्ट्राच्या सशक्ततेचें लक्षण आहे, पण सर्वप्रकारें हतबल झालेल्या आमच्या राष्ट्रांत असले प्रसंग येण्याचा मुळींच संभव नाहीं. इतकेंच नव्हे, रिकामी वटवट करणारे व भेकड झालेले आमचे लोक परदेशांतलें द्वंद्वयुद्धाचें वर्तमान ऐकून तद्देशीयांस रानटी ह्मणण्यास देखील लाजत नाहींत !

खालीं पाडला. याप्रमाणें चार खेपा झाल्या. पांचव्या खेपेला **अर्थ-लोभाच्या** घोड्याला वर्मीवर भाला लागतांच त्याणें तत्काल आपल्या यजमानाला खालीं झुगारून दिला आणि मागच्या दुगाण्या झाडल्या. त्या त्याच्या लाथा **अर्थलोभाच्या** छातीवर लागून तो मूर्च्छा येऊन पडला. तेव्हां राजाच्या आज्ञेनें त्याचे चाकर त्याला घरीं घेऊन गेले.

याप्रमाणें **सुखधनानें** आपल्या शत्रूचा पराभव केला. तेव्हां जिकडे तिकडे "शाबास! शाबास!" असा ध्वनि झाला. स्वतः राजा **बाहुबलानें** त्याची पाठ थोपटली. त्याणें शत्रूला जिंकलें तेव्हां अर्थात् जयश्रीनें **मानपरेला** त्याच्या हातांत आणून दिली. यावेळीं राजानें सन्मानार्थ त्याला उंची पोषाख व कांहीं वस्तू बक्षीस दिल्या. व **मान-परेचा** खुशाल उपभोग घेण्याविषयीं आज्ञा देऊन तो आपल्या वाड्यांत निघून गेला. राजाला त्या दुष्ट **अर्थलोभाचा** अतिशय राग आला. त्याणें अन्यायानें जें कांहीं अपरंपार द्रव्य मिळविलें होतें, ते राजानें सर्व लुटून नेलें; आणि त्याला कोठेंतरी जंगलांत राहण्याचा हुकूम देऊन पोटापुरती नेमणूक करून दिली. व त्याच्या जाग्यावर दुसऱ्या मनुष्याची नेमणूक केली. त्या नराधमाला शहरांतून घालवून दिलें; तेव्हां लोकांला फार समाधान वाटलें. उघडच आहे, पापी मनुष्यांचा संपर्क निवृत्त झाल्यानें सत्पुरुषांला समाधान वाटतेंच. असो. याप्रमाणें सर्वां-समक्ष मिळविलेल्या **मानपरेला** आपली बायको करून घेऊन **सुखधन** मोठ्या चैनींत राहूं लागला. त्याणें तें स्त्रीरत्न आपल्या सामर्थ्याच्या व औदार्याच्या जोरावर मिळविल्यामुळें; लोक त्याची फार तारीफ करूं-लागले. दुष्ट मनुष्य दुसऱ्याचा घात करण्याकरितां ह्मणून कांहीं मसलती योजीत असतात; पण त्यापासून त्यांचें सर्वस्वीं नुकसान होऊन ज्यांच्यावर त्यांणीं तो प्रयोग केलेला असतो, त्यांचीच कीर्ति निष्क-लंक होते. **अर्थलोभानें** द्वंद्वयुद्धाची तोड **सुखधनाला** मारण्याक-रितांच काढली होती. तें तर झालें नाहींच; पण त्याच्यायोगानें

**सुखधना**ची वाहवा मात्र झाली. तें युद्ध झालें नसतें तर **सुखधनानें** पैशाच्या बळावर दुसऱ्याच्या बायकोला फितविलें हा कलंक त्याच्या कपाळीं लागला असता. तो लागूं नये ह्मणूनच कीं काय? **अर्थलोभानें** युद्धाचें प्रकरण काढलें! आणि त्यांत तो विजयी होऊन सर्वांच्या देखत हक्कानें **मानपरे**ला घेऊन गेला." असो. ही कथा सांगून **राज्यधर** ह्मणाला, "सत्वहीन मनुष्याला याप्रमाणें बायका सोडून निघून जातात. द्रव्यही असेंच त्यांना सोडतें. सत्ववान् पुरुषांला आयताच लाभ होतो. बायका त्याला स्वयमेव जाऊन वरतात व द्रव्यही चोहोंकडून येऊं लागतें. याकरितां तुह्मी चिंता करूं नका. खुशाल निजा. लौकरच ती राजकन्या **कर्पूरिका** तुह्माला प्राप्त होईल." **राज्यधराचें** हें मोठें मार्मिक व यथार्थ भाषण ऐकून **नरवाहनदत्त** खुष झाला. व त्याणें आपलें मनही स्थिर केलें. तेव्हां तत्काल झोंपेनें त्याला माळ घातली. नंतर **गोमुख**ही निजला. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं उठून, कालच्याप्रमाणेंच स्नान संध्या भोजन वगैरे त्याणीं आटपलें. नंतर **गोमुख राज्यधरा**ला ह्मणाला, "मित्रा, तूंच आमच्या महाराजांचा खरा मित्र झाला आहेस. संकटकालीं साह्य करील तोच मित्र. आमच्या महाराजांचा हेतू पूर्ण होणें हें तुझ्या हातीं आहे. तूं जशा विमानांत बसून येथें आलास तशाप्रकारचें माझ्या यजमानाकरतां एक विमान तयार कर. ह्मणजे त्या **कर्पूरसंभव** नगरींत जातां हेईल व ती राजकन्या यांला प्राप्त होईल." हें ऐकून तो सुतार **राज्यधर** मोठ्या संतोषानें विमान तयार करण्याच्या कामाला लागला. लौकरच त्याणें वातयंत्राचें विमान तयार केलें. आणि **नरवाहनदत्ता**ला ह्मणाला, "महाराज, हें घ्या. हें आपल्याला मनासारखें त्वरितगतीनें पाहिजे तिकडे घेऊन जाईल. आतां यांत बसून आपण **कर्पूरसंभव** नगरीला जाऊन आपला हेतू खुशाल पूर्ण करून घ्या."

हें ऐकून **नरवाहनदत्ता**ला फार आनंद झाला. त्वरित गमन कर-

णाऱ्या अशा त्या विमानांत बसतेवेळीं त्यानें आपल्याला उत्तम साह्य करणारा अशा त्या **राज्यधराचा** प्रेमपूर्वक निरोप घेतला व **गोमुखा-**सहवर्तमान त्याणें त्या विमानांत आरोहण केलें. परत येतेवेळीं अवश्य भेटण्याविषयीं वचन घेऊन **राज्यधरानें** त्या विमानाची किल्ली **नरवाहनदत्ताच्या** हातीं दिली. त्याचें तें अलौकिक धैर्य पाहून आनंदित झाल्यामुळेंच कीं काय, मोठमोठ्या लाटांनीं उचंबळल्यासारखा दिसणाऱ्या समुद्राची शोभा पहात पहात ते लौकरच पलीकडच्या कांठाला जाऊन पोंचले. **कर्पूरसंभव** नगरांतलाच तो एक प्रदेश होता. तेथें विमानांतून खालीं उतरून **गोमुखासहवर्तमान नरवाहनदत्त** त्या नगरीची शोभा पहात फिरत होता. तेथें उंचउंच हवेल्या, तऱ्हतऱ्हेच्या नमुन्याचीं घरें, चमत्कारिक पशुपक्षी वगैरे पाहून त्याला मोठें कौतुक वाटलें. प्रत्यक्ष **कर्पूरसंभव** नगरांतच ते फिरत होते, तरी हेंच तें नगर हें त्यांना माहीत नव्हतें. फिरतां फिरतां सहज त्यांणीं एका मनुष्याला कांहीं विचारलें. पण त्याची भाषा अगदीं स्वतंत्र असल्यामुळें, तो काय बोलला हें त्यांला मुळींच समजलें नाहीं. तथापि **कर्पूरसंभव** हीं अक्षरें ऐकून आपल्याला पाहिजे होती त्याच नगरींत आपण आलों असें ते समजले. इतकें तर काम झालेंच. आतां **कर्पूरिकेला** भेटायचें तें कसें भेटावें? याविषयीं ते विचार करूं लागले. फिरत फिरत ते तेथल्या राजवाड्याजवळ येऊन पोंचले. तेथें लहानसेंच पण दिसण्यांत सुंदर असें एक घर असून त्यांत एकच म्हातारी बाहेर बसली होती. ती **आर्यावर्तांतली** राहणारी असून व्यापाराकरतां नवऱ्याबरोबर जी एकदां तिकडे गेली ती तेथेंच राहिलेली होती. यावेळीं ती विधवा होती. या उभयतां प्रवाशांला कोठेंतरी राहण्याला जागा पाहिजे होती. म्हणून त्यांणीं त्या म्हातारीला "बाई जागा द्याल काय?" म्हणून विचारिलें. तेव्हां हे आपल्या मूळच्या देशांतले आहेत, असें समजून तिणें त्यांच्याच भाषेनें त्यांना राहण्याविषयीं संमति दिली.

त्या म्हातारीला आपली भाषा येत आहे, हें पाहून ह्या उभयतांला फारच समाधान वाटलें. तिणें दिलेल्या आसनावर बसून यांणीं तिच्याशीं इकडच्या तिकडच्या बऱ्याच गोष्टी केल्या. नंतर **गोमुख** तिला ह्मणाला, “आजीबाई, या तुमच्या देशाचें नांव काय? येथल्या राजाला काय ह्मणतात? याला मुलेंबाळें वगैरे किती आहेत? हें कृपा करून आह्माला सांगाल काय? कारण आह्मी विदेशी हें तुह्माला ठावूक आहेच. आह्माला येथील कांहींच माहिती नाहीं.” हें त्याचें मधुर भाषण ऐकून व त्यांच्या आकारावरून हे कोणी तरी मोठे मनुष्य आहेत; असें आधींच तिला वाटलें होतें. तेव्हां ती त्यांना ह्मणाली,” बाबांनो, सर्व सांगतें ऐकून घ्या. या बेटाला **कर्पूरसंभवद्वीप** ह्मणतात. आणि या नगरीचेंही तेंच नांव आहे. सांप्रत येथें **कर्पूरक** नांवाचा राजा राज्य करीत आहे. तो फार दिवस अनपत्य होता. संतान व्हावें असा संकल्प करून त्याणें **बुद्धिकारिणी** नामक आपल्या राणीसहवर्त्तमान निराहार राहून **शंकराचें** आराधन केलें. तीन दिवस त्याणें एकाग्रअंतःकरणानें आराधन केल्यावरून भगवान् **शंकर** प्रसन्न झाला. त्याणें स्वप्नांत त्याला आज्ञा केली कीं, “अरे राजा, ऊठ; पुत्रापेक्षांही अधिक अशी तुला एक उत्तम कन्या होईल. जिच्या नवऱ्याला विद्यधरांचें सार्वभौमत्व मिळेल. अशा त्या मुलीसहवर्त्तमान उत्तम सुखाचा उपभोग करशील. याप्रमाणें स्वप्नांत **शंकरानें** आज्ञा केली; तेव्हां प्रातःकालीं जागा होऊन राजानें आपली राणी **बुद्धिकारिणी** हिला स्वप्नाचा वृत्तांत सांगितला, आणि तिच्यासहवर्तमान, आनंदानें घेतलेल्या व्रताची सांगता केली. साक्षात् भगवंताचाच अनुग्रह तो. तो फुकट कसा जाईल? लवकरच राणी **बुद्धिकारिणी** गरोदर झाली. महिने परिपूर्ण झाल्यावर, जिच्या सर्व अवयवांत सौंदर्य सारखें भरलें आहे, न्यून असें कांहींच नाहीं, अशी कन्या उत्पन्न झाली. जिणें आपल्या कांतीनें जिंकलेले दिवे, काजळ ओकण्याच्या निमित्तानें जणूं काय दुःखाचे

सुस्कारे सोडताहेत असें वाटलें. असो. त्या मुलीच्या रूपाचें आणि गुणांचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे.

राजा **कर्पूरक** याणें मोठा उत्सव करून आपलेंच, ह्मणजे **कर्पूरिका** हें तिला नांव ठेविलें. लोकांच्या डोळ्यांला **चंद्रिके**प्रमाणें आनंद देणारी ती मुलगी दिवसेंदिवस वाढत गेली. सांप्रत ती राजकन्या तारुण्याच्या ऐन बहरांत आली आहे. तिचा बाप राजा **कर्पूरक** तिचें लौकर लग्न करावें, अशी इच्छा करीत आहे. पण ती मुलगी मोठी चमत्कारिक आहे. तिला पुरुषांचा आपला द्वेषच आहे ह्मटलें तर चालेल. बापानें जो कोणी वर योजावा; तो तिच्या ह्मणून खात्रीस उतरतच नाहीं. राजानें पुष्कळ सांगितलें सवरलें; पण ती कांहींच कबूल करीत नाहीं. तेव्हां तिचा हेतू तरी काय आहे? तो समजून घ्यावा, ह्मणून त्याणें तें काम माझ्या मुलीला सांगितलें. माझ्या मुलीची आणि तिची फारच मैत्री आहे. नंतर एकेदिवशीं—"लग्न हें बायकांच्या जन्माचें उत्तम फळ. असें असून गडे, तूं विवाह करून घेत नाहीं ह्मणतेस हें काय?" असें माझ्या मुलीनें तिला विचारिलें, तेव्हां ती ह्मणाली, "सखे, मला माझ्या पूर्वजन्मींचें वृत्त स्मरत आहे. त्या जन्मांतली माझी हकीकत ऐकून घे ह्मणजे तसें कां ह्मणतें तें तुला समजून येईल."

असें सांगून राजकन्येनें माझ्या मुलीला आपल्या पूर्वजन्मींचा वृत्तांत सांगण्यास आरंभ केला. ती ह्मणाली, "सखे, महासमुद्राच्या तीरावर एक चंदनवृक्ष आहे. त्याच्या जवळच प्रफुल्लित कमलांनीं शोभायमान दिसणारें एक सुंदर सरोवर आहे. कर्मयोगानें पूर्वजन्मीं मी त्या सरोवरांत **हंस** पक्षीण झालें होतें. माझा पति **राजहंस** आणि मी, आह्मी उभयतां समुद्रकिनाऱ्यावर त्या चंदनाच्या वृक्षावर रहात होतों. तेथेंच आह्मी एक सुंदर घरटें तयार केलें होतें. एके दिवशीं समुद्राचें पाणी खूप तुफान झालें. आणि उंचउंच जाणाऱ्या त्याच्या लाटांनीं आमचें तें घर वाहून गेलें. त्यांत माझीं लहान

लहान पिल्लीं होतीं. आह्मी उभयतां भक्ष्य शोधायला बाहेर गेलों होतों. कांहीं वेळानें मी आपल्या चोंचींत थोडासा चारा घेऊन लवकर लवकर घराकडे येऊन पहातें, तर तें तेथें नसून दुर समुद्राच्या पाण्यांत तरंगत असल्याचें दृष्टीस पडलें. माझीं तीं लहान पोरें तेंव्हांच मेलीं असावीं. ह्मणून त्याच्याकरितां मी एकसारखी शोक करूं लागलें. कांहीं खाल्लें नाहीं, प्यालें नाहीं; घर आणि पोरें यांचा नाश झाल्यामुळें अतिशय दुःखित होऊन तेथें समुद्राच्या कांठीं एक शिवलिंग होतें, त्याच्याजवळ शोक करीत बसलें.

कांहीं वेळानें माझा पति जो राजहंस तोही आला. झालेला वृत्तांत समजून घेऊन तो मला ह्मणाला, "चल ऊठ; गेलेल्या पोरांबद्दल आतां उगीच कां शोक करतेस? तीं गेलीं तर गेलीं. आपल्याला आणखी दुसरीं होतील. जीवंत असलेल्या प्राण्यांला सर्व कांहीं प्राप्त होतें!" हें त्याचें कठोर बोलणें शोकाकुल झालेल्या माझ्या हृदयाला बाणासारखें झोंबलें, आणि पहिल्यापेक्षां अधिक दुःखी होऊन मी म्हणालें, "मेली पुरुषांची जातच निष्ठुर, आणि अतिशय पापी. धिक्कार असो या पुरुषांला! ते आपल्या लहान बाळांविषयीं देखील असे स्नेहरहित व निर्दय बनतात. जी मुलांची गती तीच बायकांची. बायका त्यांच्याकरितां कितीही जीव देत असल्या तरी त्यांना त्यांच्याविषयीं कांहींच वाटत नाहीं. तेंव्हां अशा या निर्दय नवऱ्याला घेऊन मला काय करायचें आहे? आणि हें दुःखी शरीर तरी कशाला पाहिजे!" असा विचार करून मी त्या भगवान् शंकराला भक्तिपूर्वक नमस्कार केला. व त्याचेंच चरणकमल हृदयांत घट्ट धरून जन्मांतरीं पूर्वजातीचें स्मरण असलेली, उत्तम राजकन्या व्हावें, असा संकल्प करून तेथेंच—तो माझा नवरा पहात असतां—मीं आपलें शरीर समुद्रांत टाकलें. संकल्पाप्रमाणें या जन्मांत मी राजकन्या झालें असून शंकराच्या कृपेनें मला पूर्वजन्माचें स्मरण चांगलें राहिलें आहे. पूर्वजन्मीं मी

माझ्या त्या नवऱ्याचा कठोरपणा पाहून पुरुषाच्या संगतीविषयीं विरक्त झालें होतें. यामुळें या जन्मांत माझें मन कोणत्याही पुरुषावर अनुरक्त होत नाहीं. आणि ह्मणूनच मी लग्नाची इच्छा करीत नाहीं. माझ्या मनाची स्थिती अशी आहे; तरी दैवांत काय लिहिलें असेल तें अवश्यमेव होणार हें मी समजून आहें." याप्रमाणें राजकन्या **कर्पूरिका** हिणें विवाह नको ह्मणण्याचें कारण एकांतीं माझ्या मुलीला सांगितलें; तें ती घरीं आली तेव्हां तिणें मला सांगितलें. तुह्मी प्रश्न केला व तुमच्या आकृतीवरून तुह्मावर विश्वास ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं असें वाटल्यावरून तो वृत्तांत मीं तुह्माला सांगितला." असें बोलून ह्मातारी **नरवाहनदत्ताला** ह्मणाली, "बाबा, मला कांहीं ज्योतिष येत नाहीं व मंतरतंतरही माहित नाहीं. पण माझें मन मला असें सांगत आहे कीं, ती राजकन्या **कर्पूरिका** तुझीच बायको होईल. पुढें तूं विद्याधरांचा चक्रवर्ति होणार हें नुकतेंच तुझ्या सोबत्यानें मला सांगितलें व तशाच पुरुषाची ती बायको होईल असें पूर्वीं **शंकरानें**ही सांगितलें आहे. तुझीं लक्षणें पाहिलीं, त्यावरून तूं सार्वभौम होशील, असें मला वाटतें. नजाणों दैवानें तिच्याकरतांच तुला येथें आणलें नसेल कशावरून? तें असो. पुढें जें कांहीं होईल तें दिसलेच. आतां चला, आपण घरांत जाऊं या. तुह्माला भूक लागली असेल. कांहीं खाऊन पिऊन अंमळ विसावा घ्या." असें सांगून ह्मातारीनें त्या दोघांलाही घरांत नेलें.

ती वेळ संध्याकाळची होती. तिणें लौकर लौकर दिवाबत्ती करून स्वयंपाक केला. आणि त्या दोघांला स्नेहपूर्वक आग्रह करकरून जेवायला घातलें. **नरवाहनदत्ताला** ती आपली सासूच असें वाटलें. जेवणखाण आटपल्यावर **कर्पूरिकेच्याच** संबंधाच्या आणखी कांहीं गोष्टी केल्या व कोणत्या युक्तीनें तिची भेट घ्यावी याविषयीं त्यांणीं पक्का निश्चय ठरविला. ह्मातारीनें त्या दोघांला दोन बिछाने

करून दिले, त्यांवर त्यांणीं ती रात्र कशी तरी घालविली. प्रातःकाल होतांच स्नान वगैरे आटपून, रात्रीं संकेत केल्याप्रमाणें, **वत्सराजाचा** पुत्र **नरवाहनदत्त** याणें जोग्याचा वेष घेतला व **गोमुख** त्याचा चेला बनला. असें वेषांतर करून "हे हंसी! हे हंसी!" असें मोठ्यानें ह्मणत ते दोघेही राजवाड्याच्या दरवाज्यांत शिरले. त्यांचें तें सुंदर रूप व त्याला अनुचित असा तो गोसाव्याचा वेष आणि "हे हंसी, हे हंसी" हा आक्रोश ऐकून राजवाड्यांतील लोकांचा त्यांच्याभोंवतीं गराडा पडला. हां हां ह्मणतां जनानखान्यापर्यंत ती बातमी पोंचून तेथल्या दासी पहायला आल्या. **नरवाहनदत्त** कोणाशींच कांहीं बोलला नाहीं. एकसारखा त्याचा आक्रोश चालला होता. दासींनीं तो चमत्कार पाहून राजकन्या **कर्पूरिका** हिला खबर दिली. त्या ह्मणाल्या, "अहो छोट्या बाईसाहेब, अहो छोट्या बाईसाहेब! बाहेर एक मोठा चमत्कार चालला आहे. आपल्या वाड्याच्या मोठ्या दरवाजांत एक तरुण जोगी आला आहे. त्याचें रूप किती तरी सुंदर आहे ह्मणून सांगावें! जरी त्याच्याबरोबर तसलाच दुसरा एक जोगी आहे, तरी रूपानें तोच अद्वितीय आहे. तरुण स्त्रियांच्या मनाला मोहित करणारा तो एक जादूमंत्रच आहे असें वाटतें. रात्रंदिवस "हे हंसी! हे हंसी!" याप्रमाणें तो एकसारखा आक्रोश करीत आहे. कांहीं खात नाहीं पीत नाहीं. राजवाड्यांतल्या सर्वांनीं त्याला विचारिलें; पण तो कोणाशीं कांहीं बोलतच नाहीं. तेव्हां हा काय चमत्कार आहे देव जाणे!"

**कर्पूरिका** ही पूर्वजन्मीं हंसी होती हें वर सांगितलेंच आहे. दासींनीं केलेली तारीफ ऐकून तिला फार कौतुक वाटलें. तिणें त्यांनाच पाठवून **नरवाहनदत्त** आणि **गोमुख** यांला आपल्याजवळ बोलावून नेलें. त्याचें तें उद्दाम सुंदर रूप व शरीराची ठेवण, तेजस्वीपणा वगैरे पाहून, **शंकराचें** आराधन करून साक्षात् **मदनानेंच** हें रूप धारण केलें

आहे कीं काय असें तिला वाटलें. विस्मयानें टवटवीत झालेल्या नेत्रांनीं एकसारखी ती त्याच्याकडे पहात राहिली. कांहीं वेळानें तिणें, "अहो गोसावीबुवा, सारा वेळ 'हे हंसी, हे हंसी,' असें कां ह्मणतां?" असें त्यांला विचारिलें. तरी **नरवाहनदत्तानें** तें ऐकलें न ऐकल्यासारखेंच केलें. आणि पुन्हा तो "हे हंसी! हे हंसी!" करूं लागला. राजकन्येनें पहिल्यापेक्षां अधिक अगत्य दाखवून पुन्हां विचारलें, तेव्हां जवळ असलेला **गोमुख** पुढें होऊन राजकन्येला ह्मणाला, "बाईसाहेब, हे आमचे गुरुजी असा कां विलाप करतात त्याचें कारण मी आपल्याला थोडक्यांत सांगतों. हे आमचे गुरुमहाराज पूर्वजन्मीं दैवयोगानें हंस झाले होते. समुद्राच्या किनाऱ्यावर एका मोठ्या चंदनवृक्षावर घरटें करून हे आपली स्त्री हंसी हिच्यासहवर्तमान रहात होते. दुर्दैवानें समुद्र तुफान होऊन यांचीं पिलें व घरटें वाहून गेलें. तेव्हां यांची स्त्री हंसी हिणें शोकार्त होऊन तेथेंच प्राणत्याग केला. नंतर तिच्या वियोगानें दुःखित झालेले, हे पक्ष्याच्या जन्मांतदेखील अगदीं विरक्त झाले. यांणीं आपल्या शरीराचा त्याग करण्याचा निश्चय करून जन्मांतरीं, पूर्वजन्माची आठवण असलेला असा आपण राजपुत्र व्हावें असा संकल्प करून, प्रियेच्या विरहाग्नीनें संतप्त झालेलें आपलें शरीर यांणीं त्या समुद्रांत सोडलें. नंतर हे आमचे गुरुजी **कौशांबी** नगरींत **वत्सराजाच्या** पोटीं जन्मास आले. यांचें नांव **नरवाहनदत्त**. यांना आपल्या पूर्वजन्माचें स्मरण आहे. हे शुभे राजकन्ये, ज्यावेळीं हे, जन्मास आले त्यावेळीं हे पुढें विद्याधरांचे चक्रवर्ती होतील अशी स्पष्ट आकाशवाणी झाली. नंतर अनुक्रमानें लहानाचे थोर होऊन बापानें यांला यौवराज्याचा अभिषेक केला. कांहीं कारणानें मनुष्यजन्मास आलेली दिव्य कन्यका **मदनमंचुका** इच्याशीं यांचा विवाह झाला. तीच यांची मुख्य राणी. नंतर **हेमप्रभ** नामक विद्याधरांच्या

राजाची मुलगी **रत्नप्रभा** हिणें स्वतः आपण येऊन यांच्या गळ्यांत माळ घातली. याप्रमाणें दोघी दिव्य स्त्रिया प्राप्त झाल्या; तरी ती पूर्वजन्मींची आपली स्त्री हंसी हिच्याकडे मन लागल्यामुळें हे असे झाले आहेत. त्या दोघी स्त्रियांवर मन आसक्त न झाल्यामुळें हे त्या आपल्या हंसीचा शोध करीत करीत जोगी बनून सांप्रत तीर्थाटन करीत आहेत. मी यांचा शिष्य ह्मणा किंवा लहानपणापासून सेवक आहे असें समजा. हे माझ्यावर पूर्ण विश्वास ठेवून आपलें हितगुज मला सांगतात. ह्मणून मला हें त्यांचें वर्तमान माहीत आहे. आणि तेंच मी तुह्माला सांगितलें.

आतां हे हंसीला शोधायला निघाले याचें विशेष कारण सांगतों. एकेदिवशीं आह्मा सेवकांला बरोबर घेऊन हे अरण्यांत शिकारीला गेले होते. तेथें अकस्मात् एका सिद्ध तापसीनें यांना दर्शन दिलें. त्यावेळीं फक्त मीमात्र बरोबर होतों. तिणें इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी केल्या. सहज गोष्टीवर गोष्ट निघतां निघतां ती यांच्यावर अनुग्रह करून ह्मणाली, "मुला, कर्मयोगानें **काम** पूर्वीं **हंस** झाला होता. तो समुद्रकिनाऱ्यावर एका चंदनाच्या झाडावर रहात होता. शापानें मनुष्यलोकांत आलेली दिव्य स्त्री **रती हंसी** होऊन त्याची बायको झाली होती. समुद्राच्या लाटांनीं त्या दोघांचीं पिलें वाहून गेल्यामुळें, दुःखित झालेल्या **हंसीनें** त्यांत उडी टाकली. नंतर कांहीं वेळानें तिचा वियोग असह्य होऊन **हंसानेंही** तेथेंच जीव दिला. तोच **हंस शंकराच्या** प्रसादानें सांप्रत तूं **वत्सराजाचा** पुत्र झाला आहेस. तुला आपलें पूर्वजन्म ठाऊक आहे. व त्याची पक्की आठवण आहे. तुझ्या प्रमाणेंच ती तुझी बायको **हंसी** समुद्राच्या पलीकडे **कर्पूरसंभव** नांवाच्या बेटांत तेथील राजाची कन्या झाली आहे. सांप्रत तिला **कर्पूरिका** ह्मणतात. याकरितां बाळा, तूं आतां तिकडे जा. ती तुझी प्रियपत्नी तुला पुन्हां प्राप्त होईल." असें सांगून ती सिद्ध तापसी आकाशांत उसळी मारून क्षणांत दिसेनाशी झाली.

इकडे हे आमचे यजमान आपल्या प्रियेचा वृत्तांत समजल्यामुळें उत्कंठित होऊन तत्काल माझ्यासहवर्तमान या दिशेला तोंड करून निघाले. तुमच्या स्नेहानें यांना इकडे ओढ लावली. आपल्या प्राणांचा पण लावून यांणीं भयंकर शेंकडों रानावनांतून व दऱ्याखोऱ्यांतून प्रवास केला. आणि मोठ्या संकटानें आह्मी समुद्राच्या किनाऱ्यावर येऊन पोंचलों. तेथें खरोखरीच हेम ( सुवर्ण ) मय अशा हेमपुरांत आह्मी येऊन पोंचलों. तेथें राज्यधर नांवाचा एक सुतार मोठा कारागीर भेटला. त्याणें केवळ स्नेहास्तव यंत्रमय विमान करून दिलें. प्रत्यक्ष साहस अथवा मृत्यूचें तोंडच ह्मटलें तरी चालेल, अशा त्या विमानांत बसून आह्मी भयंकर समुद्र वलांडून या नगरांत येऊन पोंचलों, व फिरत फिरत तुमच्याजवळ आलों. झालें. इतकाच आमचा वृत्तांत. हे आमचे धनीसाहेब—"हे हंसी! हे हंसी!" ह्मणून विलाप करीत आहेत, त्याचें कारण हेंच असें समजा. बाईसाहेब! हे आमचे यजमान, ज्यांचा कधीं जमिनीस पाय लागायचा नाहीं व ज्यांच्या अंगाला सूर्यकिरणाचा कधींही स्पर्श व्हायचा नाहीं, असे असतांही काट्याकुट्यांतून अनवाणी भटकत येथपर्यंत आले, ते कशाकरितां हें मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. असो. याणीं जें इतकें दुःख भोगलें त्याचा परिणाम चांगला झाला. सांप्रत तेजस्वी अशा तुमच्या मुखचंद्राच्या उदयानें असंख्य दुःखरूपी अंधकार नाहींसा होऊन, यांचा आत्मा अंमळ स्वस्थ झाला आहे. आतां पुढें काय केलें पाहिजे आहे, तें मला सांगण्याची गरज नाहीं. सप्रेम दृष्टिरूप नीलकमलांच्या माळेनें ह्या अतिथीची आपण पूजा केली ह्मणजे सार्थक झालें!"

गोमुखाचें संगतवार असून मनाला आकर्षण करणारें हें भाषण ऐकून व त्याणें ज्या गोष्टी सांगितल्या त्यांचा परस्पर मेळ बसलेला पाहून कर्पूरिकेला तें खरें वाटलें. पूर्वजन्मीं आपल्या नवऱ्याचें जें तिणें कठोरपण पाहिलें होतें, त्यावरून ती पुरुषांचा तिरस्कार करीत

होती. त्या जन्मांत जो **हंस** तिचा पति होता, तोच **नरवाहनदत्त** असें ह्मणण्यास कांहीं आधार नव्हता. तरी ह्मातारीनें सांगितलेल्या हकीकतीवरून **गोमुखानें** जी गोष्ट रचून तिला सांगितली ती तिला अगदीं खरी वाटली. ती मनांत ह्मणाली, 'हाय हाय !! या आर्यपुत्राचा माझ्यावर किती तरी स्नेह आहे. आजपर्यंत मी उगीच याला निर्दय समजत होतें. याच्याविषयीं इतके दिवस मी विरक्त राहिलें, हें फार वाईट केलें." असें ह्मणून प्रेमार्द्र होऊन ती **गोमुखाला** ह्मणाली, "होय, मी खरोखर तीच हंसी जन्मास आलें आहें. माझ्याकरितां आर्यपुत्रानें दोन जन्म एकसारखें दुःख भोगलें यावरून मी आपल्याला धन्य मानतें. असो. जें झालें तें झालें. आतां, केवळ प्रेमानें विकत घेतलेली मीं यांच्या (**नरवाहनदत्ताच्या**) पायांची दासी आहें असें समजावें." असें बोलून त्या उभयतांला तिनें आपल्या महालांत नेलें. तेथें स्नान, भोजन, वस्त्र, अलंकार इत्यादिकांनीं त्यांची उत्तम बरदास्त ठेविली. नंतर आपल्याजवळच्या विश्वासूक मनुष्याकडून तिनें हा सर्व वृत्तांत बापाला कळविला. तो ऐकून त्याला मोठा आनंद झाला. **नरवाहनदत्ताला** पाहण्याकरितां तो तत्काल मुलीच्या महालांत आला. त्याला पाहतांच **कर्पूरिका** अतिशय लाजली. कारण आजपर्यंत लग्न मुळींच करून घ्यायचें नाहीं, असा तिणें हट्ट धरला होता व आतां **नरवाहनदत्ताशीं** विवाह करून घेण्यास तीच उत्सुक झाली होती. जावयाला पाहून राजाला फार संतोष झाला. फार दिवसांनीं योग्य वर मिळाला ही परमेश्वरानें आपल्यावर कृपाच केली, असें त्यानें मानलें. पुढें विद्याधरांचा सार्वभौम होण्याचीं सर्व लक्षणें त्याच्या अंगांत दिसत होतीं. तीं पाहून राजानें आपल्याला कृतकृत्य मानलें.

कोणत्याही रीतीनें मुलगी लग्न करून घ्यायला एकदांची तयार होवो, असें त्याला झालें होतें. त्यांतून **नरवाहनदत्तासारखा** योग्य वर प्राप्त झाला असून **कर्पूरिका** आपण होऊन त्याला वरायला तयार

झाली. मग काय विचारतां? त्यानें तत्काल लग्नाची तयारी केली. देवब्राह्मणादिकांच्या समक्ष मोठ्या समारंभानें यथाविधि राजानें आपली मुलगी **नरवाहनदत्ता**च्या हातांत दिली. वधूवरें अग्नीला प्रदक्षिणा करूं लागलीं; त्यावेळीं प्रत्येक प्रदक्षिणेला तीन तीन कोटि रुपयांच्या किंमतीचें सुवर्ण राजानें जांवयाला दिलें. व तितकेच रुपयेभार कापूर दिला. त्या बेटावर मुख्य उत्पन्न कायतें कापुराचें होतें. व ह्मणूनच त्याला **कर्पूरसंभव** ह्मणत असत. राजानें दिलेलें सोनें व कापूर याचे जे मोठे राशी झाले ते पाहून, हे **शिवपार्वती**च्या विवाहाचा समारंभ पाहायला आलेले **मेरू** आणि **कैलास** पर्वत आहेत कीं काय असें प्रेक्षकांला वाटलें. नंतर दहा कोटि उत्तमोत्तम वस्त्रें दिलीं, दागदागिन्यांनीं भरगच्च भरलेल्या तीनशे दासी दिल्या. राजा **कर्पूरका**ला काय ती एक मुलगीच होती. ह्मणून तिला काय द्यावें, आणि काय न द्यावें याचा कांहीं विचारच राहिला नाहीं. असो. याप्रमाणें मोठ्या थाटाचा लग्नसमारंभ पुरा झाला. त्या **कर्पूरिके**सहवर्तमान **नरवाहनदत्त** प्रतिदिवशीं नवे नवे भोग भोगीत सासऱ्याच्या घरीं मोठ्या चैनींत राहिला. त्याला ती प्रत्यक्ष प्रीतिच आहे कीं काय असें वाटत होतें. **मोगरी**ची वेल आणि **आंब्या**चा वृक्ष यांचा समागम होऊन, **वसंता**चा उत्सव प्राप्त झाला असतां, जसा सर्वांला आनंद होतो, तसा परस्परांला अनुरूप अशा त्या वधूवरांचा समागम कोणाला आनंदकारक वाटला नाहीं? सर्वांला फार सुख व समाधान वाटलें.

याप्रमाणें सासऱ्याच्यायेथें बरेच दिवस आनंदांत राहून **नरवाहनदत्तानें** तेथून निघण्याचा विचार केला. तो आपली प्रियपत्नी **कर्पूरिका** हिला ह्मणाला, “प्रिये, चल आतां आपण आपल्या घराला जाऊं या. तुझे सासूसासरे आपली वाट पहात असतील. आईबापांला एकदम सोडून जाण्याचें तुला कठीण वाटेल, ह्मणून मी इतके दिवस मुळींच गोष्ट काढली नाहीं; पण आतां घराकडे गेलें पाहिजे.” हें

ऐकून **कर्पूरिका** ह्मणाली, "माझ्याकडून कांहीं ना नाही. मीं अत्तां तयार आहें. पण जायचें कसें? त्याचा मात्र विचार करावा. आपण ज्या विमानांत बसून आलां त्यांतूनच गेलें तर काय हरकत आहे? जर तें लहान असेल तर दुसरें मोठें मी करवायला लावतें. येथें आमच्या बाबांच्या आश्रयाला **प्राणधर** नांवाचा एक सुतार आहे. तो मोठा कारागीर असून यंत्रमय विमानें वगैरे करण्यांत फार कुशल आहे. कोठल्या देशांहून तो आला आहे कोणास ठाऊक? पण आज पुष्कळ दिवस तो येथेंच राहतो. त्याच्याकडून मी चांगलें विमान तयार करवितें." असें सांगून तिणें चोपदाराला बोलावून आणलें आणि त्याला ह्मणाली, "आर्यां **प्रियंवदा,** तो यंत्रें करणारा **प्राणधर** नांवाचा विदेशी सुतार आला आहे, त्याला जाऊन सांग कीं, **कौशांबी** नगरीला जाण्याकरितां आह्माला एक मोठें विस्तीर्ण असून मजबूत विमान तयार करून दे." याप्रमाणें चोपदाराला आज्ञा करून तिणें आपला पिता राजा **कर्पूरक** याला, 'आपणास सासरीं जाण्याची इच्छा झाली आहे' असें दासीकडून कळविलें.

राजाही विचारीच होता. 'मुलीनें सासरीं जावें, हें विहितच आहे. आतां आपण तिला किती दिवस येथें ठेवून घेणार? आपल्या घरीं गेली तर बरें.' असें समजून त्याणेंही तिला पाठविण्याचें मनांत आणलें. तत्काल त्याणें हें वर्तमान राणीला कळविलें. इकडे **नरवाहनदत्त** मनांत ह्मणाला, 'आपल्या बायकोनें **प्राणधर** असें ज्याचें नांव घेतलें, तो आपला मित्र जो **राज्यधर** त्याचाच बंधु असेल. तो कोठून देशांतराहून आला आहे, असें तिच्या बोलण्यांत आलें होतें. राजाच्या भयानें जो आपल्या गांवाहून पळाला होता तोच हा **प्राणधर** असेल.'

असें तो मनांत चिंतन करीत आहे इतक्यांत राजा **कर्पूरक** तेथें आला. व क्षणमात्रानें चोपदारासहवर्तमान तो **प्राणधर** सुतारही आला. त्याणें हात जोडून सांगितलें, "महाराज हुकुमाप्रमाणें मी एक मोठें

विमान तयार करून आणलें आहे. त्यांतून एकहजार मनुष्यें सहज जाऊं शकतील एवढें तें मोठें आहे!" त्याची ही विनंती ऐकून राजानें व **नरवाहनदत्तानें** त्याला शाबासकी दिली. नंतर **नरवाहनदत्त** आदरपूर्वक त्याला ह्मणाला, "अहो, तुमचें कसब तर मोठें अजबतऱ्हेचें आहे. बरें, पण कांहो, तुह्मी त्या **राज्यधराचे** वडील बंधु का? आणि तुमचें नांव **प्राणधर** ना? मोठेमोठे नानाप्रकारचे यंत्रप्रयोग माहीत आहेत ह्मणतात ते तुह्मांलाच, हें खरें कीं नाहीं तें सांगा?" हें ऐकून **प्राणधराला** मोठा विस्मय वाटला. तो अत्यंत नम्रतेनें ह्मणाला, "होय महाराज. **राज्यधराचा** मी बंधु आहें खरा. पण महाराजांला आमची माहिती कशी झाली याचें मला आश्चर्य वाटतें." हें ऐकून **नरवाहनदत्तानें राज्यधराची** भेट कशी झाली व त्याणें काय हकीकत कळविली ती सर्व सांगितली. घरांतून निघाल्यापासून **प्राणधराला** आपला भाऊ कोठें आहे व त्याचें काय झालें हें बिलकुल ठाऊक नव्हतें. **नरवाहनदत्तानें** त्याचा वृत्तांत सांगितला, तो ऐकून त्याला फार संतोष झाला.

नंतर **प्राणधरानें** तें मोठें विमान आणून हाजर केलें. सासूसासरे वगैरे सर्वांचा निरोप घेऊन **प्राणधराला** बरोबर घेऊन, **गोमुखासहवर्तमान नरवाहनदत्त** विमानांत बसला. दासी, कापूर व सोनें वस्त्रें वगैरे जें कांहीं सासऱ्यानें दिलें होतें तें सर्व त्या विमानांत घातलें. जावयाला सुखरूप पोंचविण्याकरीतां राजानें **प्राणधराला** मुद्दाम त्याच्या बरोबर दिलें होतें. **कर्पूरिकेला** आईबापांचा वियोग असह्य वाटला; तरी ती त्यांचा निरोप घेऊन विमानांत जाऊन बसली. आईबाप वरचेवर तिच्याकडे पाहून डोळ्यांवाटे अश्रू टाकीत होते; पण तिला तितकें कांहीं कठीण वाटलें नाहीं. बायकांची किंवा सामान्यतः सर्व प्राणिमात्रांची, प्रवृत्ति कांहीं चमत्कारिक आहे. त्यांचें मन नेहमीं पुढें पुढें धांव घेत असतें. आईबाप आपल्याला जन्म देणारे व लहानाचे थोर करणारे असें माहीत असूनही, बायकोकडे अथवा

आपल्या मुलांकडे जितकें मन ओढतें तितकें मातापितरांकडे ओढत नाहीं. बायकांचेही असेंच आहे. कोठला **नरवाहनदत्त**? कोठून आला? व कोठें चालला आहे? याचा कांहींच पत्ता नाहीं. आणि त्याचा समागम तरी किती दिवसांचा? असें असतां **कर्पूरिकेनें** आपले प्राण एकदम त्याच्या हातांत दिले! तिचा सर्व ओढा कायतो त्याच्याकडे लागला. आणि जिणें नऊ महिने ओझें बाळगलें, बाळपणचे कष्ट काढले व लहानाचें थोर केलें त्या आईकडे किंवा बापाकडे न पाहतां ती एकदम नवऱ्याबरोबर चालती झाली. सारांश जगाची प्रवृत्तीच तशी आहे. त्याबद्दल तिला एकटीलाच काय ह्मणून दोष द्यावा? असो. राजानें **प्रियंवद** चोपदार **कर्पूरिके**च्या विश्वासांतला आहे असें जाणून त्याला तिच्या बरोबर दिलें. आईनें जिला न्हाऊधुवूं घालून वस्त्रालंकारांनीं सजवून विमानांत आणून बसविलें आहे, अशा त्या आपल्या नववधूला बरोबर घेऊन **नरवाहनदत्त**, निघतेवेळीं गोरगरीब ब्राह्मण इत्यादिकांला सुवर्ण वस्त्रें वगैरे देऊन, सासूसासऱ्यांचा स्नेहपूर्वक निरोप घेऊन, **गोमुखा**सहवर्तमान तेथून निघाला. **प्राणधर** स्वतः विमान चालवायला बसला होता. निघण्यापूर्वीं—"प्रथम समुद्राच्या तीरावर **हेमपुरांत राज्यधरा**ला भेटूं. आणि मग घरीं जाऊं" असें त्याणें **प्राणधरा**ला सांगितलें होतें. नंतर, जणूंकाय पूर्ण झालेला आपला मनोरथच अशा त्या विमानांत बसून **नरवाहनदत्त** परिवारासह तेथून निघाला. तो लौकरच समुद्र वलांडून **राज्यधर** ज्या ठिकाणीं होता, त्या **हेमपुरांत** येऊन पोंचला, आकाशांतून विमान येत आहे असें पाहून **राज्यधर** तिकडे टक लावून बसला होता. सर्व मंडळी खालीं उतरली, तेव्हां आपल्या बंधूला भेटून **राज्यधराला** फार आनंद झाला. तेथें एकदोन दिवस राहून सर्वांनीं त्याचा पाहुणचार घेतला. याप्रमाणें **राज्यधर** आणि **प्राणधर** या दोघांला स्वस्थपणानें सुखदुःखाच्या गोष्टी बोलण्याची सवड दिल्यानंतर **नरवाहन**-

**दत्तानें** तेथून जाण्याची तयारी केली. **राज्यधराला** द्रव्याची कांहीं वाण नव्हती. त्याच्याजवळ कोणी नोकर चाकर मात्र नव्हते. तेव्हां ती उणीव भरून काढण्याकरितां **नरवाहनदत्तानें**, सासऱ्यानें ज्या त्याला तीनशें दासी दिल्या होत्या त्या सर्व **राज्यधराला** दिल्या. आणि त्याला फार खुष करून, प्रेमाश्रूंनीं ज्याचे डोळे भरून आले आहेत, अशा त्या मित्राचा **नरवाहनदत्तानें** निरोप घेतला. वरचे-वर स्नेहपूर्वक परस्परांला भेटून **राज्यधरानें** मोठ्या संकटानें आपल्या वडील बंधूला निरोप दिला. नंतर विमानांत बसून सर्व मंडळी **कौशांबी** नगरीला जाऊन पोंचली. मोठ्या विमानांत बसून तेथें एकाएकीं आपला अनुचर **गोमुख, प्राणधर** व नववधू **कर्पूरिका** यांसहवर्तमान आलेल्या **नरवाहनदत्ताला** अवलोकन करून लोकांना मोठा विस्मय वाटला.

**वत्सराजाला** पुत्र आल्याचें वर्तमान शहरांतल्या लोकांच्या गड-बडीवरून समजलें. तेव्हां त्याला आणायला जाऊन आपल्या स्नेहाचा अतिशय दाखविण्याकारितां राण्या, प्रधान व सुना आणि इतर परिवार यांसहवर्तमान राजा सामोरा गेला. यावेळीं **नरवाहनदत्त** विमानांत बसून आला होता; त्यावरून पुढें तो विद्याधरांचा सार्वभौम होणार, याचें हें एक चिन्ह आहे असें सर्वांला वाटलें. **कर्पूरिकेसहवर्तमान** पायांपडलेल्या पुत्राला प्रेमपूर्वक राजानें आलिंगन दिलें. तसेंच राणी **वासवदत्ता** व **पद्मावती** यांनींही **नरवाहनदत्ताला** आलिंगन देऊन इतके दिवस तो दृष्टी न पडल्यामुळें जें दुःख झालें होतें तें, नेत्रांतून गळणाऱ्या अश्रूंच्या द्वारानें बाहेर सोडून दिलें. तसेंच **रत्नप्रभा** आणि **मदनमंचुका** या दोघी स्त्रियांनीं प्रेमानें बद्ध होऊन, सवतीबद्दल द्वेष न धरतां आपल्या हातानें प्रिय पतीचे चरण व हृदयानें त्याचें हृदय बराबरच धरलें. नंतर **नरवाहनदत्तानें यौगंधरायण** इत्या-दिक आपल्या बापाच्या सचिवांला वडीलपणाच्या नात्यानें नमस्कार केला. व **मरुभूति** इत्यादि त्याच्या प्रधानांनीं **नरवाहनदत्ताला**

नमस्कार केला. याप्रमाणें सर्वांचा यथायोग्य आदरसत्कार झाला. आईनें दिलेलीं उत्तमोत्तम वस्त्रें व अलंकार धारण करणारी व अनेक दासी जिच्याबरोबर आलेल्या आहेत अशा **कर्पूरिकेला** अवलोकन करून लोकांना असें वाटलें कीं, ही साक्षात् **लक्ष्मीच** आहे. राणी **वासवदत्तेनें** आपल्या पुत्रानें मिळवून आणलेली जणूं काय प्रत्यक्ष जयश्रीच, अशा त्या **कर्पूरिकेला** आपल्याजवळ घेतलें. तिच्याबरोबर आलेल्या चोपदारानें राजाला मुजरा केला तेव्हां त्याचेंही त्याणें यथायोग्य गौरव केलें.

नंतर **नरवाहनदत्तानें** बरोबर आणलेलें सोनें व कापूर आणि उत्तमोत्तम वस्त्रें राजाला निवेदन केलीं. आपल्यावर उपकार करणाऱ्या त्या **प्राणधर** सुताराला हातीं धरून **नरवाहनदत्तानें** त्याचा आणि आपला संबंध कसा झाला व त्याणें आपल्याला काय काय साह्य केलें तें **वत्सराजाला** सांगितलें. तेव्हां राजानें त्याचे फार फार आभार मानले. नंतर सर्व मंडळी राजवाड्यांत गेली. तेथें आपापल्या ठिकाणीं जाऊन स्नान, भोजन इत्यादिकेंकरून श्रमाचा परिहार केला. प्रधान व राण्या इत्यादिक जवळ बसले आहेत अशा वेळीं **नरवाहनदत्ताला** राजानें बोलावून आणलें व त्याच्या बरोबर गेलेल्या **गोमुखाला**—'तुह्मी येथून कोठें गेला? काय काय केलें? ह्या **कर्पूरिकेची** प्राप्ती कशी झाली?' वगैरें वर्तमान सविस्तर सांगण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां **गोमुखानें** मुळापासून ह्मणजे मृगयेला गेल्यानंतर तपस्विनीचें दर्शन, वाटेंत घडलेला प्रकार, **राज्यधरानें** करून दिलेलें विमान, त्यांत बसून **कर्पूरसंभव** द्वीपाला जाणें, **कर्पूरिका** लग्न करून घ्यायला नाखुष असतांही कशी राजी झाली, **प्राणधरानें** केलेलें विमान व परत आगमन वगैरे सर्व वृत्त जसें घडलें होतें तसें **वत्सराजाला** निवेदन केलें.

कोठें मृगया? कोठें ती तापसी? कोठें समुद्रतीरावरचें तें नगर? कोठें तो यंत्रें जाणणारा **राज्यधर** सुतार? त्याणें दिलेल्या विमानांत बसून समुद्र तरणें कोठें? तेथें पुढें दुसऱ्या विमान करणाऱ्याची गांठ

पडणें; या सर्व गोष्टींचा परस्परांशीं कांहीं तरी मेळ आहे का? दैवशाली पुरुषांचा इष्ट हेतु सिद्ध करण्याविषयीं स्वतः दैवच, कोणकोणते उपाय करावे त्यांची योजना करतें असें ह्मटलें पाहिजे. याशिवाय दुसरें कांहींच योग्य कारण दिसत नाहीं, असें समजून तेथें जमलेली सर्व मंडळी विस्मित होऊन माना डोलवूं लागली. **गोमुखानें** 'हा सर्व आपल्या यजमानांच्या शक्तीचा प्रभाव आहे,' असें सांगून राणी **रत्नप्रभा** हिची फार तारीफ केली. तो ह्मणाला, "या बाईसाहेबांनीं पतिव्रताधर्मापासून विशेष संतोष मानून सवतीमत्सर न धरतां आपल्या भर्त्याचें विद्येच्या साह्यानें मार्गांत उत्तम रक्षण केलें, ह्मणूनच हा एवढा मोठा प्रवास निर्विघ्नपणें पार पडला. याबद्दल **रत्नप्रभा**-बाईसाहेबांची स्तुती करावी तितकी थोडीच." तें **गोमुखाचें** सांगणें सर्वांला फार आवडलें. स्वतः **वत्सराजानेंही** तिची तारीफ केली. नंतर इतक्या दिवसांचा प्रवास व आकाशमार्गानें आल्यामुळें झालेला श्रम, परिहार करित होत्साता **नरवाहनदत्त** फार संतोषानें राहता झाला. नंतर त्याणें आपले आप्त, इष्टमित्र, इत्यादिकांला **कर्पूरसंभव** द्वीपाहून आणलेलें सुवर्ण, रत्नें, बहुमोल वस्त्रें, वगैरे वांटलीं. **नरवाहनदत्ताच्या** मनरंजनार्थ **प्राणधर** आणि तो चोपदार बरेच दिवस तेथें राहिले होते.

नंतर एके दिवशीं त्यांणीं **नरवाहनदत्ताला** विनंती केली कीं, "महाराज, आतां आह्माला परत जाण्याविषयीं आज्ञा असावी. आमच्या महाराजांनीं आपण आपल्या घरीं पोंचतांच लवकर परत येण्याविषयीं हुकूम दिला होता. कारण आपण सुखरूपपणें पोंचल्याचें वर्तमान आह्मी गेल्यावांचून त्यांना कळणार नाहीं. तेव्हां आतां आह्माला गेलेंच पाहिजे. आपल्याला तिकडे काय निरोप वगैरे सांगायचा असेल तो सांगावा. आणि **कर्पूरिका** बाईसाहेबांचें स्वतः लिहिलेलें पत्र आह्माला द्यावें. नाहींपेक्षां आमच्या महाराजांचें मन स्वस्थ होणार नाहीं. यांच्यावर त्यांचा अधिक लोभ असल्यावरून अनेक

प्रकारच्या शंका ते घेतील. विमानांत बसून त्यांणीं कधीं प्रवास केलेला नाहीं, तेव्हां हें विमान वाटेंत पडलें कीं काय, याविषयीं त्यांना संशय असायचाच. त्याकरितां बाईसाहेबांच्या हातचा लेख पाहिजे. माझ्याबरोबर या चोपदारालाही परत जाण्याविषयीं हुकुम असावा. आपला मजवर अतिशय लोभ आहे व त्याप्रमाणें आपले पाय सोडून जाण्यास मला कठीण वाटतें, तरी महाराजांच्या आज्ञेप्रमाणें मला गेलेंच पाहिजे. मी एकवेळ तिकडे जाऊन महाराजांला इकडचा क्षेमसमाचार सांगून आपलें कुटुंब घेऊन परत येथें तुमच्या सेवेंत हाजर होतों. अत्यंत सुखदायक असे हे पाय सोडण्यास मला आतां सामर्थ्य होणार नाहीं!"

याप्रमाणें **प्राणधरानें** विनंती केली. व परत येण्याविषयींचें वचन दिलें. तेव्हां युवराज **नरवाहनदत्त** याणें त्याला निरोप दिला. आणि लगेच **कर्पूरिकेला** बोलवून बापाला पत्र देण्याविषयीं सांगितलें. **कर्पूरिकेनें नरवाहनदत्ताच्या** समक्षच पत्र लिहिलें. त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर होता:—

स्वस्तिश्री महाराजाधिराज तीर्थरूप वडिलांच्या

सप्रेम सेवेसी—

प्रियकन्या **कर्पूरिका** हिचे स्नेहपूर्वक अनेक प्राणिपात. आज **मार्गशीर्ष** वद्य १० पावेतों **कौशांबी** नगरींत आपल्या आशीर्वादानें पतिचरणसेवेंत सुखरूप आहें विशेष, मी आपली आज्ञा घेऊन प्रियपतीसहवर्तमान तेथून निघालें, ती **हेमपुरांत** सुखरूप पोंचलें. तेथें **प्राणधराचा** बंधू **राज्यधर** याच्या आग्रहास्तव आह्मीं दोन दिवस विश्रांति घेतली. तेथून निघून गेल्या शुद्ध एकादशीं रोजीं येथें **कौशांबी** नगरींत सुखरूप पोंहचलों. माझे सन्मान्य सासूसासरे यांणीं स्नेहपूर्वक आमचें स्वागत केलें. आतां मी मोठ्या आनंदांत आहें. बाबा, माझ्याविषयीं आपण काडीमात्र चिंता करूं नये. प्रेमळ भर्त्याच्या सुखकारक घरांत मी स्वस्थ आहें. उत्तम पुरुषाचा ( **विष्णूचा** ) आश्रय करणारी **लक्ष्मी**

**क्षीरसमुद्राच्या** चिंतेला आस्पद कशी होईल? माझे पूज्य सासरे **वत्सराज** व सासूबाई **वासवदत्ता** आणि **पद्मावती** ह्या मला जीवप्राण करतात. खरोखर तुह्मी आणि आई जसें मला वागवीत होतां, तसेंच ते वागवितात. माझ्या सवती **मदनमंचुका** आणि **रत्नप्रभा** ह्या देखील माझ्या प्रिय मैत्रीणी झाल्या आहेत. आर्यपुत्राविषयीं तर माझ्यानें कांहीं लिहवतच नाहीं. ते माझें पूज्य दैवत, पालक, मित्र अथवा सर्व कांहीं नातीं त्यांच्या ठिकाणीं संभवत असून, ते मला फार स्नेहानें वागवितात. तेव्हां माझ्याविषयीं आपण कांहीं चिंता करूं नये. आपला आणि प्रिय आईचा वियोग यावांचून मला येथें दुःखाला कारण दुसरें कांहींच नाहीं. वरचेवर मला क्षेमसमाचार कळवीत असावें. आपल्या शरीराला नीट जपावें. व हेंच आईलाही माझें सांगणें आहे असें कळवावें. बाकी मजकूर **प्राणधर** व **चोपदार** हे समक्ष आपल्याला सांगतील. हे विनंती.

तुमची लाडकी कन्या,

**कर्पूरिका.**

हें पत्र घेऊन **चोपदार** आणि **प्राणधर** उभयतांनीं **कर्पूरिके**चा निरोप घेतला. त्यांणीं तिच्या सख्या व इतर प्रेमांतल्या माणसांना, व आईबापांला वगैरे जें कांहीं सांगायचें होतें तें सर्व तिच्याकडून ऐकून घेतलें. नंतर ते दोघेही **वत्सराज** आणि **वासवदत्ता** यांचा निरोप घ्यायला गेले. त्यांणीं त्यांना अहेर वगैरे देऊन विहिणीला आणि व्याह्याला इकडचा क्षेमसमाचार सांगायला सांगून निरोप दिला. नंतर राजवाड्यांतील **गोमुख** इत्यादि जे जे त्यांच्या ओळखीचे झाले होते, त्या सर्वांचा निरोप घेऊन ते जायला निघाले. **प्राणधरानें** आपलें विमान चालू केलें तेव्हां **कर्पूरिके**ला अंमळ वाईट वाटलें. सासरीं कितीही सूख असलें तरी बायकांला माहेरची आठवण झाल्या-वांचून राहत नाहीं. व तिकडच्या माणसांचा लोभ सुटत नाहीं. असो.

**प्राणधर** आणि **चोपदार** दोघेही विमानांत बसून समुद्र वलांडून लौकरच **कर्पूरसंभव** नगरांत जाऊन पोंचले. विमान आपल्या घरीं ठेवून **प्राणधर** चोपदारासह राजाच्या भेटीला गेला. त्याणें जांवयाकडचा कुशल वृत्तांत निवेदन करून **कर्पूरिकेनें** दिलेलें पत्र राजाला दिलें. तें पाहून **कर्पूरक** व त्याची स्त्री यांना फार आनंद झाला. आणखी कोणाकोणाला कांहीं सांगितलें होतें, तें त्यांना कळवून ते दोघेही आपापल्या घरीं गेले. नंतर दुसऱ्या दिवशीं **प्राणधरानें कर्पूरक** राजाला विनंती करून **नरवाहनदत्ताकडे** जाऊन राहण्याविषयीं आज्ञा मिळविली. आणि पूर्वींप्रमाणें विमान तयार करून बायको, मुलेंबाळें, चीज वस्त, जें कांहीं होतें नव्हतें तें घेऊन तो तेथून निघाला. समुद्राच्या अलीकडे येऊन तो प्रथम आपला बंधू जो **राज्यधर** त्याला भेटला. तेथें कांहीं दिवस राहून त्याच्या संमतीनें **कौशांबी** नगरींत **नरवाहनदत्ताजवळ** हाजर झाला. वचनाप्रमाणें **प्राणधर** परत आला, हें पाहून युवराजाला फार आनंद झाला. त्याणें आपल्या वाड्याच्या शेजारींच त्याला राहायला जागा दिली. व नित्याच्या खर्चाकरितां मोठी नेमणूक करून दिली. तो नेहमीं तऱ्हेतऱ्हेचीं विमानें तयार करून देत असे. आपल्या स्त्रियांसहवर्तमान त्यांत बसून **नरवाहनदत्त** यथेच्छ क्रिडा करीत होता. तें पाहून, लौकरच पुढें विद्याधरांचा चक्रवर्ती होणार ह्मणून आकाशांत संचार करण्याचा जणूं काय तो अभ्यास करीत आहे असें लोकांस वाटे. असो. याप्रमाणें मातापितर, आप्त, इष्टमित्र, या सर्वांला आनंद देत होत्साता **रत्नप्रभा, मदनमंचुका** आणि तिसरी **कर्पूरिका** यांसहवर्तमान **नरवाहनदत्त** सुखानें वास्तव्य करिता झाला.

## उपसंहार.

या चवथ्या भागांत बहुतकरून निरनिराळ्याप्रकारच्या कथा आल्या आहेत. ज्या **कलिंगसेनेनें वत्सराजाला** वरण्याविषयीं अतो-

नात प्रयास केला व आपलें गणगोत वगैरे सोडून एकदम ती **वत्स-राजा**च्या येथें आली त्याच्याशीं तिचा विवाह घडून आला नाहीं. या प्रकरणांत **यौगन्धरायणा**नें बरीच खटपट केली व तो विवाहाचा योग घडून आला नाहीं त्यास पुष्कळ अंशानें त्याची खटपट कारण झाली असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. तथापि एकंदरींत मानवी प्रयत्न दैवाच्या साहाय्यावांचून किती दुर्बळ होतो हें या गोष्टीवरून चांगलें ध्यानांत येतें. **कलिंगसेना** मुद्दाम वरण्याकरितां ह्मणून आली आहे **वत्सराज** तिला वरण्यास तयार आहे इतकेंच नव्हे तर त्याला तिचा ध्यास लागला आहे व 'तुह्मी लग्न करूं नका' असें सांगण्याची कोणाची छाती नाहीं. इतक्या सगळ्या गोष्टी अनुकूळ असूनही तो योग घडून येत नाहीं व त्या उभयतांच्या स्नेहाचा परिणाम भलताच होतो याला दैव नव्हे तर काय ह्मणावें? या कामांत दैवानें जसें आपलें प्रभुत्व दाखविलें तसेंच **वीरभुज** आणि **शृंगभुज** यांच्या कथेंतही दाखविलें आहे. **निर्वासभुज** व इतर स्त्रिया यांणी आपल्याकडून होईल तितकी खटपट केली व तिचा परिणाम **शृंगभुज** व **गुणवरा** यांचा सर्वस्वीं नाश व्हावा असा योग असतां केवळ दैवाच्या अनुकूळतेनेंच **शृंगभुज** त्यांतून पार पडला व **गुणवरा**ही तिच्यावर आलेल्या वाईट आरोपातून मुक्त झाली. बायकाच्या वर्तनाविषयीं पुरुषांनीं नीट जपावें हें खरें. तथापि त्यासंबंधानें फार चिकित्सा करणें व त्यांच्यावर अविश्वास ठेवणें अगर अतिशय ईर्ष्यालु असणें हें चांगलें नाहीं. त्याचा परिणाम अपमान, असंतोष, मनःसंताप इत्यादि रूपानें झाल्या वांचून राहत नाहीं हें **रत्नाधिपती** राजाच्या कथेवरून चांगलें [illegible] येतें. तसेंच स्त्रियांची प्रीति कितीही असली तरी ती [illegible] मची आहे असें समजणें ही मोठी चूक आ[illegible] पात्र होऊन सुखाचा उपभोग घ्यावा." [illegible] जून वागावें. ह्मणजे पुढें पश्चा[illegible]

वश होऊन हवें तें करण्यास कधींही तयार होऊं नये. त्याच्यायोगानें उभयतो भ्रष्ट होण्याचा प्रसंग केव्हांना केव्हां येण्याचा संभव असतो. याविषयीं **निश्चयदत्ताची** कथा चांगलें उदाहरण आहे. ईश्वरदत्त स्थितीचा मानवी प्रयत्नानें परिहार करण्याविषयीं प्रयत्न करणारा मनुष्य कसा नाश पावतो याविषयीं **विनयशीलाची** कथा उदाहरणभूत होईल. **तपोदत्त** आणि **विरूपशर्मा** यांच्या गोष्टींतही तशाप्रकारचा प्रयत्न निरर्थक आहे असें दाखविलें आहे. पण अत्यंत विषयी जो राजा **विनयशील** तो यापायीं प्राणास मुकला असें उघड दाखविलें आहे. सवतीमत्सर हा फार वाईट आहे त्यापासून कांहीं फायदा होत नसून नाशच होत असतो याविषयीं **परित्यागसेनाची** कथा हें एक उत्तम उदाहरण आहे. बायकांला स्वातंत्र्य द्यावें पण तें मर्यादित असावें. घरकामांत त्यांना विशेष मोकळीक द्यावी पण ज्या कामांत परकी लोकांशीं दळणवळण ठेवण्याची जरूरी असते अशीं कामें त्यांच्या कडून करवूं नयेत. त्यांच्या जवळ अधिक कृपणपणाही दाखवूं नये. तसें केलें असतां परिणाम वाईट होतो हें **अर्थलोभ** व **मानपरा** ह्यांच्या कथेवरून उत्तम सिद्ध होतें. असो. एकंदरींत या भागांतल्या प्रत्येक कथेंत घेण्यासारखा उत्तम बोध असून संसाराटवींत क्रमण करणाऱ्या पुरुषानें अवश्यमेव तो चांगला लक्षांत ठेवण्यासारखा आहे यांत कांहीं संशय नाहीं.

याच्या पुढें पांचवा भाग येईल त्यांतही उत्तमप्रकारच्या कथा असून मनोरंजक व बोधपर अशाच आहेत व तो भागही लवकरच होईल.



